# क्रांतिमार्गावरील प्रवासी

(बाबा पृथ्वीसिंह आझाद यांच्या क्रांति-पथका पथिक
या आत्मचरित्राचा अनुवाद)




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई



अनुवादक
प्रा. तु. शं. कुळकर्णी

# क्रांतिमार्गावरील प्रवासी

(क्रांति-पथ का पथिक)

माझी आत्मकथा

पृथ्वीसिंह
(बाबा पृथ्वीसिंह आझाद)

दोन शब्द
डॉ. हजारीप्रसाद द्विवेदी

मराठी अनुवाद
प्रा. तु. शं. कुळकर्णी



महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ



बाबा पृथ्वीसिंह आज़ाद

# निवेदन

भारताच्या स्वातंत्र्यलढ्यातील एक थोर क्रांतिकारक बाबा पृथ्वीसिंह आझाद यांचे वयाच्या ९७ व्या वर्षी १९८९ च्या मार्चमध्ये निधन झाले. अंबाला शहराजवळच्या एका खेड्यात त्यांचा १५ सप्टेंबर, १८९२ रोजी जन्म झाला होता. ते मूळचे रजपूत असून त्यांचे चौधरी घराणे पंजाबात स्थायिक झाले. लहानपणीच त्यांची आई मरण पावली आणि हलाखीच्या परिस्थितीमुळे पृथ्वीसिंहांचे वडील शादीराम यांना रोजगार शोधीत ब्रह्मदेशात जावे लागले. पृथ्वीसिंहांचे चुलते दोन पुतण्यांना घेऊन पंजाबातून ब्रह्मदेशात गेले. रशियातील १९०५ ची अयशस्वी क्रांती, बंगालच्या फाळणीविरुद्ध चाललेले आंदोलन, लाला लजपतरायांची हद्दपारी, लोकमान्य टिळकांना झालेली सहा वर्षांची शिक्षा वगैरे घटनांमुळे पृथ्वीसिंहांनी भारत स्वतंत्र करण्याचा ध्यास घेतला. ते १९१३ च्या अखेरीस अमेरिकेत गेल्यानंतर "गदर" या नावाने ओळखल्या जाणाऱ्या क्रांतिकारकांच्या गुप्त संघटनेत सामील झाले. हिंदुस्थानात परतल्यानंतर एकाच वेळी कलकत्त्यापासून पेशावरपर्यन्त सशस्त्र उठाव करण्याची योजना आखण्यात आली पण ती अयशस्वी ठरली.

त्याआधीच दिनांक ८ डिसबर, १९१४ रोजी पृथ्वीसिंह पकडले गेले आणि त्यांना दहा वर्षे सश्रम कारावासाची शिक्षा ठोठावण्यात आली. लाहोर कट खटल्यात पृथ्वीसिंहांना दीर्घ मुदतीची सजा फर्मावण्यात येऊन त्यांची अंदमानात रवानगी करण्यात आली. १९५१ साल उजाडेपर्यन्त त्यांची सुटका होणार नव्हती. अंदमानात यमयातना भोगीत असताना पृथ्वीसिंहांनी उपोषण करून कारागृहाच्या अधिकाऱ्यांच्या अत्याचाराविरुद्ध अनेक दिवस दिलेल्या झुंजीची कहाणी स्वातंत्र्यवीर सावरकरांनी "माझी जन्मठेप" या पुस्तकात सांगितली आहे.

सहा वर्षे अंदमानात काढल्यानंतर १९२१ साली बेड्या घालून आंध्र प्रदेशातल्या ओंगोल गावाजवळून आगगाडीने त्यांना घेऊन जाण्यात येत असताना त्यांनी धावत्या गाडीतून उडी मारून निसटण्याचा प्रयत्न केला पण तो निष्फळ ठरला. मात्र २९ नोव्हेंबर, १९२२ रोजी अमरावती जवळच्या बडनेरा स्टेशनजवळ धावत्या गाडीतून पृथ्वीसिंहांनी उडी मारली. पलायनाचा हा दुसरा प्रयत्न यशस्वी झाला आणि डॉ. वऱ्हाडपांडे, डॉ. शिवाजीराव पटवर्धन, डॉ. नारायण दामोदर सावरकर, न. वि. उर्फ काकासाहेब गाडगीळ आणि ग. र. वैशंपायन या देशभक्तांच्या मदतीने पृथ्वीसिंहांनी अखेर भावनगरला व्यायाम शिक्षक म्हणून आठ वर्षे नोकरी केली. या काळात स्वामीराव हे नाव धारण

करून त्यांचा देशभर संचार सुरू होता. भगतसिंग, राजगुरू आणि सुखदेव या तिघा क्रांतिकारकांना फाशीची शिक्षा ठोठावण्यात आल्यानंतर भगतसिंगांचे सहकारी सुखदेवराज, दुर्गाभाभी व्होरा यांच्याबरोबर पृथ्वीसिंहांनी मुंबईत लॅमिंग्टन रोडवरच्या पोलिस ठाण्यावर गोळीबार केला आणि ते सहीसलामत निसटले. त्यानंतर ते रशियातही गेले. "लेनिन के देश में" या त्यांच्या हिंदी पुस्तकात त्यांनी रशियाला आपण कसे गेलो त्याची हकीगत सांगितली आहे. मायदेशी परतताना त्यांना काबूलच्या तुरुंगात १३ महिने डांबण्यात आले होते. रशियातील कम्युनिस्ट पक्षाचे ते सदस्य झालेले असल्यामुळे त्या देशाच्या सरकारने त्यांना काबूलच्या तुरुंगातून सोडवून आणले. १९३४ साली पृथ्वीसिंह पुन्हा भारतात परतले.

१६ वर्षे भूमिगत राहिल्यानंतर १८ मे १९३८ रोजी पृथ्वीसिंह सेवाग्रामच्या आश्रमात गांधीजींच्या स्वाधीन झाले. पोलिसांनी त्यांना ताब्यात घेतल्यानंतर आणि रावळपिंडीच्या तुरुंगात त्यांना डांबण्यात आल्यानंतर इंग्रज सरकारने पृथ्वीसिंहांची सुटका १९६६ साली केली जाईल असे त्यांना कळवले. महात्मा गांधींनी पृथ्वीसिंहांच्या मुक्ततेसाठी व्हाइसरॉयला पत्रे लिहिली. अखेर २३ जानेवारी, १९३९ रोजी त्यांना मुक्त करण्यात आले. त्यानंतर पृथ्वीसिंहांचे गांधीजींच्या आश्रमात काही वर्षे वास्तव्य होते. १९४२ च्या चले जाव चळवळीस कम्युनिष्ट पक्षाने विरोध केला कारण जर्मनीने रशियावर आक्रमण केल्यानंतर १९३९ सालीच सुरू झालेले साम्राज्यवाद्यांमधील युद्ध त्यांना "लोकयुद्ध" वाटू लागले. पृथ्वीसिंह १९४२ ते १९५६ पर्यंतच्या काळात कम्युनिस्ट पक्षाचे कार्य करीत असत. त्यामुळे स्वातंत्र्य लढ्याच्या अखेरच्या पर्वात ते चळवळीत सहभागी झाले नाहीत.

त्यांचे इंग्रजी आत्मचरित्र "The Legendary Crusader" या शीर्षकानिशी आणि हिंदी आत्मकथा "क्रांति-पथ का पथिक" या नावाने प्रकाशित झाली आहे. प्रा. तु. शं. कुलकर्णी यांनी पृथ्वीसिंहांच्या हिंदी आत्मकथेचा मराठी अनुवाद केला आहे. १९८८ साली त्यासाठी आवश्यक ती अनुमती खद्द पृथ्वीसिंह आझाद यांनीच मंडळाला दिली होती. हा मराठी अनुवाद पृथ्वीसिंहांच्या हयातीत मंडळाला प्रकाशित करता आला नाही कारण तोपर्यंत अनुवादाचे काम पुरे झाले नव्हते. मंडळाच्या नियमानुसार अनुवादाचे हस्तलिखित १९९० च्या मार्चमध्ये एका तज्ज्ञाकडे अभिप्रायासाठी पाठविण्यात आले. ते तपासून पाठविण्यात तज्ज्ञाने दिरंगाई केल्यामुळे अखेर त्यांच्यावर स्मरणपत्रांचा मारा करावा लागला. १५ जुलै, १९९१ रोजी त्यांच्या घरी जाऊन त्यांच्याकडे पडून राहिलेले हस्तलिखित ताब्यात घ्यावे लागले. ८ ऑक्टोबर, १९९१ रोजी अनुवादाचे हस्तलिखित शासकीय मध्यवर्ती मुद्रणालयाकडे प्रकाशनासाठी सोपविण्यात आले पण

छपाईस अग्रक्रम दिला तरीही पृथ्वीसिंह आझाद यांच्या जन्मशताब्दी वर्षाची सांगता होण्यापूर्वी हा अनुवाद वाचकांना उपलब्ध करून देण्याचा मंडळाचा संकल्प मात्र सिद्धीस जाऊ शकला नाही. अखेर उशीरा का होईना हा मराठी अनुवाद प्रकाशित करताना मंडळास आनंद होत आहे. श्रीमती आझाद यांनी याबाबतीत झालेली दिरंगाई सहन केली याबद्दल मंडळ त्यांचे सदैव ऋणी राहील.

**य. दि. फडके,**

अध्यक्ष,

दिनांक २८ ऑक्टोबर, १९९७.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ.

## दोन शब्द

बाबा पृथ्वीसिंह आज त्यांच्या ७२ व्या वर्षीही एखाद्या तरुणाप्रमाणं आहेत. शरीरावर वार्धक्याच्या खुणा उमटल्या असल्या, तरी जुन्या पिंजऱ्यात बंदिवान झालेला सिंह म्हातारा झालेला नसतो. त्यांच्या अंतःकरणात अजूनही तारुण्याची मस्ती आहे, आणि अजून कार्य करायचंच आहे, ह्याची मनाला जाणीव आहे, मनात नवे कल्पना-तरंग आहेत. आराम करावा, सुखा-समाधानात राहावं, असं त्यांना अजूनही वाटत नाही. असं जीवन जगण्याची पद्धत चूक आहे असं त्यांना वाटतं—आजही ते मनानं तरुण आहेत. त्यांनी आपली आत्मकथा या पुस्तकाद्वारे मांडली आहे. ती वाचल्यानंतर आपण आश्चर्य-चकित होतो. भर वादळात नौका घालून ती सुरक्षित बाहेर काढण्याची, ही कथा आहे. संकटं आणि आपत्ती कशा कशा हसत हसत स्वीकाराव्या, त्यांच्याशी कसा सामना द्यावा यांची ही कथा आहे. या कथेत कुठे थकावट नाही, कुठे विश्रांती नाही, फक्त ध्येयप्राप्तीसाठी पुढं पुढं जात राहावं, अन्यायाचा प्रतिकार करावा—त्यासाठी प्रसंगी मृत्यू येणार असेल तर त्यालाही घाबरायचं नाही—ध्येयावरून आपली दृष्टी विचलित होऊ द्यायची नाही, दृढनिश्चय डळमळीत होऊ द्यायचा नाही. वाचता वाचता हेच जाणवतं की, भयंकर वादळात देखील एक दीपज्योत न विझता, न थरथरत तेवत राहिली आहे.

ज्यावेळी भारताभोवती गुलामगिरीचे पाश होते—त्यावेळी काही तरुणांना ही अपमानकारक परिस्थिती असह्य वाटू लागली. तळहातावर शिर घेऊन ते निघाले. स्वतंत्र भारताचं स्पष्ट चित्र कुणाच्याच डोळ्यापुढं नव्हतं. त्या सर्वांच्या मनात एकच गोष्ट ठळकपणे होती—ती म्हणजे देशाला स्वतंत्र करायचं—परकीय राजवटीचं जू मानेवरून भिरकावून द्यायचं आहे. या तरुणांनी इंग्रजी राजवटीला आव्हान दिलं. ते सर्वजण भावनाप्रधान होते, त्यांच्या अंतःकरणातून तीव्र वेदनेची कळ उठत होती. त्यांच्यापैकी पुष्कळ जणांनी थोडंसं थांबून याचाही विचार करण्याची तसदी घेतली नाही की आपण ज्या शक्तिशाली साम्राज्याच्या विरुद्ध दंड थोपटून उभे राहिलो आहोत, त्याचं बळ किती आहे आणि आपल्याजवळ काय साधनसामग्री आहे? जे नेते सर्व गोष्टींचा हिशेब करून, काळजीपूर्वक पाऊलं टाकतात ते बुद्धिमान व मुत्सद्दी जरूर असतात—ते क्रांतिकारक नसतात. क्रांतिकारक हिशेब जाणत नसतो—आपण जे काही केलं त्याचा साधक-बाधक विचार करण्याची त्याला गरज वाटत नाही. त्याच्याजवळची सर्वात मोठी शक्ती असते, त्याचा आत्म-विश्वास—आणि त्यानं निश्चित केलेलं ध्येय, हा असतो त्याचा प्रेरणा-स्रोत. जोपर्यंत त्याचं ध्येय निश्चित असतं आणि स्वतःवरचा विश्वास कायम असतो—तोपर्यंत तो चालत राहतो. ह्या चालत राहण्यात त्याला आनंद मिळतो. साधनांची त्याला पर्वा नसते.

बाबा पृथ्वीसिंह असेच क्रांतिकारक होते. लहान वयातच इंग्रजी साम्राज्य उखडून फेकण्याचा संकल्प करून ते घराबाहेर पडले. त्यांनी कधी मागचा-पुढचा विचार केला नाही. देशातले बुद्धिमान लोक, विचारवंत जेव्हा कायदे-कानूंचा कीस पाडू लागले, डावपेच आखू लागले त्या सुमारास बाबा पृथ्वीसिंह डोक्याला कफन बांधून बाहेर पडले. विशाल इंग्रज साम्राज्यानं त्यांचा धसका घेतला. त्यांचा थरकाप उडाला. बाबा पृथ्वीसिंहांना अनेक यातना सहन कराव्या लागल्या. कधी त्यांना तुरुंगात खितपत पडावं लागलं तर कधी लपत-छपत कामं करताना स्वतःच ओढवून घेतलेल्या संकटांचा सामना करावा लागला—त्रास सहन करावा लागला. परंतु आत्मविश्वासानं त्यांची कधीच साथ सोडली नाही. हे आत्मचरित्र वाचताना वेळोवेळी त्यांनी जे मानसिक चढ-उतार अनुभवले त्या मानसिक आंदोलनांची कहाणी लक्षात येते—परंतु त्यांचं स्थान संचारी भावांचं आहे, तात्कालिक आहे. त्यांचा स्थायी भाव आहे उत्साह, अद्भुत उत्साह—स्वतःवर विलक्षण विश्वास आणि ध्येयासंबंधी त्यांची अविचल निष्ठा. आजही त्यांचा तोच आत्मविश्वास कायम आहे. याच कारणामुळं शरीर वृद्ध झालेलं असलं तरी मनानं ते तरुण आहेत. तारुण्याचा काळ हा उभारीचा काळ असतो. मानसिक उभारी म्हणजेच उत्साह—आत्मविश्वास.

अनेक क्रांतिकारक वीरांनी इंग्रज सत्तेला आव्हान दिलं. त्यातल्या अनेकांची नावं देखील आपणास माहीत नाहीत. कित्येक जण फुलण्याआधीच कोमेजून गेले. अनेक संकटांच्या महासागरातून जे तरले व किनाऱ्याला पोंचले त्यातल्या फार थोड्या लोकांनी आपल्या आत्मकथा लिहून ठेवल्या आहेत. या आत्मकथांचा एक मोठा फायदा हा की प्रसंग-घटनांच्या चित्रणातून अशा अनेक लोकांच्या आठवणी नोंदवल्या गेल्या आहेत ज्यांचा अन्यत्र कुठेच उल्लेख सापडत नाही. इतिहासानं त्यांची एवढी उपेक्षा केली आहे की, जणू ते कधी अस्तित्वातच नव्हते. प्रसंगपरत्वे बाबा पृथ्वीसिंहांनी अशा अनेक मोठ मोठ्या वीरांचा निर्देश केला आहे. स्वतंत्र राष्ट्रांच्या मालिकेत भारत जो आज ताठ मानेन उभा आहे—त्याला ही गोष्ट अनेक मोठमोठ्या वीरांच्या बलिदानामुळेच शक्य झालेली आहे. स्वतंत्रता उपभोगणारी नवी पिढी या हुतात्म्यांविषयी श्रद्धा आणि कृतज्ञता व्यक्त करीना गेली तर ती खरोखरच दुर्दैवाची गोष्ट ठरेल—तो दुर्भाग्याचा दिवस ठरेल. त्या तरुणांचा आपणास खरोखरच विसर पडत चालला आहे, ही किती दुर्दैवाची गोष्ट आहे. स्वातंत्र्य प्राप्तीच्या आधीच्या काळात भारताची आध्यात्मिक विचारांसंबंधी व आदर्शांसंबंधीच्या त्याच्या निष्ठांविषयी जी आस्था प्रकट होत होती ती स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या काळात कमीकमी होत चालली आहे. आपण सर्वजण भौतिक समृद्धीच्या मागे डोळे मिटून चाललो आहोत. वैयक्तिक स्वार्थानं आपणा सर्वांना घेरलेलं आहे. ऐहिक वैभवाच्या लालसेनं आपण अधिकाधिक जडवादी बनत चाललो आहोत—

यामुळं आपल्या मनातल्या संवेदनाच आपण गमावून बसलो आहोत. खरं म्हणजे स्वातंत्र्या-साठी लढलेल्यांविषयी कृतज्ञताबुद्धी असावी लागते—आम्ही आता ती बुद्धीदेखील झटकून टाकली आहे.

क्रांतिकारकांनी लिहिलेली आत्मचरित्रं वाचतेवेळी, सर्वसामान्य लोकांच्या ही ध्येयासाठी, त्यागाच्या भावनांची आपल्याला जाणीव होते—धोक्याची पर्वा न करता त्यांनी क्रांति-कारकांना कशी मदत केली होती, हे आपणास समजतं. राष्ट्रीय जागृतीचं खरं चित्र या सर्वसामान्य माणसांच्या साहसावरूनच स्पष्ट होतं. त्याकाळी देशासाठी प्राणार्पणाला, बलिदानाला सिद्ध झालेल्या या वीरांविषयी लोकांच्या मनात विलक्षण सहानुभूती आणि श्रद्धा वसत होती. जे स्वतः काही करू शकत नव्हते ते लोकही या वीरांकडे आदरानं आणि श्रद्धेनं बघत होते, त्यांना होईल ती मदत करणं हे आपलं कर्तव्य मानत होते. भारतात राष्ट्रीयत्वाची भावना निर्माण होण्यात या अशा सामान्य माणसांचा फार मोठा वाटा आहे—त्याचं मूल्यमापन करणं कठीण आहे. हे असे लोक होते, म्हणूनच क्रांतीच्या उपासकांना त्यांच्या मार्गानं पुढे जाता आलं होतं. त्यांना प्रत्येक क्षणी विश्वासार्ह माणसांच्या आश्रयाची आवश्यकता होती व अशी विश्वासू माणसं त्यांना मिळत होती

माणसाची मूळ प्रवृत्ती चांगलीकडे आपलं कार्य करत असते. प्राणांची बाजी लावून जे लोक या मार्गानं निघाले होते त्यांच्याही ठिकाणी ईर्ष्या, द्वेष, भांडणं व वादविवाद वेळोवेळी प्रकट व्हायच्या. आपल्या दुबळेपणामुळं काही लोक सरकारपक्षाचे (माफीचे) साक्षीदार व्हायचे, त्यांच्यामुळे त्यांच्या सहकाऱ्यांवर संकटं कोसळायची. काही वेळा अत्यंत मामुली गोष्टी भांडणाचं कारण ठरायच्या. वैमनस्य निर्माण करायच्या. परंतु एकूण गोळा बेरीज करून विचार केला तर महान आदर्श आणि त्यागभावनाच प्रबळ होती, हे दिसून येतं. सरकार हर प्रयत्नानं त्यांच्यात फूट पाडण्याचा, त्यांना दुबळं करण्याचा प्रयत्न करत होतं. स्वार्थी वृत्तीचे देशद्रोही देखील त्यांच्या मागे लागलेले असत. कित्येक वेळा संपूर्ण गटच्या गट पकडले जात. काही कादंबरीकारांनी कल्पनेच्या साहाय्यानं या क्रांतिकारकांच्या दुर्बलतेचं [illegible] चित्रण आपल्या कादंबऱ्यातून केलं आहे, परंतु या मंडळींनी लिहिलेल्या त्यांच्या आत्मकथांतून या दुर्बलतेचं यथार्थ दर्शन घडतं. पुष्कळसे भावुक वृत्तीचे तरुण क्षणिक उत्साहापोटी या बिकट मार्गाने जाण्यासाठी उद्युक्त व्हायचे परंतु शेवटपर्यंत त्यांना निर्धार टिकू शकत नसे.

क्रांतिकारक लेखकांच्या आत्मचरित्रांतून अनेकदा काही कटुता आणि संशयापोटी निर्माण झालेला कडवटपणा आढळतो. आपलं ते बरोबर व इतरांचं चूक, असाही दुराग्रह त्यांच्या ठिकाणी दिसतो. तरीही या आत्मकथा महत्त्वपूर्ण आहेत. या आत्मचरित्रांतून ज्या ज्या ठिकाणी विशिष्ट व्यक्तीचं मन आणि त्यांच्या स्वभावाचं दर्शन घडतं त्याच वेळी उदय

पावणाऱ्या देशाचं सामूहिक चित्र, नव राष्ट्र निर्माणाची विकास-प्रक्रिया आपणास समजते. या क्रांतिकारकांचेही अनेक प्रकार होते—ही गोष्ट आता आपणास कळून चुकलेली आहे. त्यातले काही पुढील काळात हिंदू राष्ट्राची स्वप्नं बघणारे होते—काही साम्यवादी व समाजवादी बनलेले आहेत—काही असेही आहेत—ज्यांच्या मनात कुठल्याही पक्षा-विषयी प्रेम नाही. ज्यांच्यापुढं रचनात्मक आदर्श नाही—अनेकजण वैफल्यग्रस्त बनले आहेत. काही जण असेही आहेत जे प्रवाहाबरोबर वाहत चालले आहेत. हे काहीही असलं तरी देशाला त्यांच्या बलिदानाचा कधीही विसर न पडला पाहिजे. देशाला स्वतंत्र करण्यासाठी त्यांनी ज्या यातना भोगल्या, त्याचं मूल्य कशानंही कमी होत नाही.

बाबा पृथ्वीसिंह आझादांची ही आत्मकथा वाचताना हे विशेषत्वानं जाणवतं की या कथेत मस्ती आहे, आत्मविश्वास आहे, सचोटी आणि आत्मपरीक्षणाची वृत्ती आहे. परंतु कुठंही कटुता नाही. इतरांची निंदा करून आपलं तेच बरोबर असं सिद्ध करण्याचा अट्टाहास नाही. त्यांच्या एकूण जीवनातच आग्रहीपणाला फारसं स्थान नाही. महात्मा गांधीजींकडे जाऊन त्यांनी जेव्हा आत्मसमर्पण केलं, या घटनेतूनही त्यांचा अनाग्रहीपणाच दिसतो. त्यांच्या ठिकाणी एक प्रकारचा विमुक्तपणा दिसतो. दीर्घकाळ जपलेल्या गोष्टींचाही त्याग करण्याची त्यांची वृत्ती दिसते.—संस्कारांची बंधनं झुगारण्याचं धाडस त्यांच्यापाशी आहे. मनुष्य धन-धान्यादी ऐहिक गोष्टींचा त्याग करतो परंतु मनात उभ्या केलेल्या भिंती पाडणं त्याला अवघड होऊन जातं. पुष्कळवेळा लोक संततीचा मोह सहजतेनं सोडतात, कुटुंबाचे पाशही तडकाफडकी तोडतात. परंतु आपल्या मनात जपलेल्या संस्कारांचा मोह सोडणं त्यांना फार कठीण होऊन जातं. जो संस्कारांचाही त्याग करू शकतो तोच खराखुरा विमुक्त असतो. बाबा पृथ्वीसिंहांना मी विमुक्त मानतो.

एखादी निश्चित ठरवलेली योजना सफल किंवा असफल होण्यानं इतिहासाला निराळं वळण लागतं परंतु या योजना कार्यान्वित करताना जे अन्तर्द्वंद्व चालतं, त्यातून व्यक्तीच्या निर्मितीची प्रक्रिया लक्षात येते. बाबा पृथ्वीसिंहांनी थोडयाशा पृष्ठांतून, अत्यंत सरळ शब्दात आपल्या मानसिक संघर्षाचं जिवंत चित्र उभं केलं आहे. मानसिक अन्तर्द्वंद्वावर विजय मिळवण्यातच माणसाचं खरं यश आहे. अनेक वैयक्तिक बाबी, वैयक्तिक प्रसंग यामधून त्यांच्या मानसिक संघर्षाचं चित्र स्पष्ट होतं.—यामुळेच बाबा पृथ्वीसिंहांचं हे आत्मचरित्र लक्षणीय ठरतं—त्याचं मोल वाढतं. अशा काही प्रसंगी ते खूप कठोर वाटत न परंतु लगेचच त्यांचं मनोहारी व्यक्तित्व फुलून येतं.

बाबाजी आज देखील व्याकुळ आहेत. आजही त्यांना अस्वस्थ वाटतं. सगळं काही झालं. परंतु काय झालं? ही परिस्थिती निर्माण करण्यासाठी आपण मृत्यूशी पैज लावली होती का? सुखाचा आणि सोयी-सवलतींचा त्याग केला होता का? भारत देश

इंग्रजांच्या गुलामगिरीतून मुक्त झाला खरा, पण उपयोग काय? ततः किम्! त्यात कुठं ती ज्योत तेवत आहे काय, जी प्रज्वलित करण्यात आली होती? ज्यासाठी संपूर्ण जीवन खर्ची पडलं होतं? आजही असे अनेक जुने देशभक्त आहेत जे देशाच्या वर्तमान परिस्थितीविषयी असमाधानी आहेत. बाबा पृथ्वीसिंह देखील दुःखीच आहेत.

इतिहास निर्माण करणारे आपल्या मार्गाने जात आहेत. देशातल्या मूठभर तपस्वी व्यक्तिमत्त्वांकडे बघून ते आपला मार्ग सोडणार नाहीत. त्यांना पुरेपूर किंमत हवी असते. दोन-चार नव्हे, समग्र जनतेला या महामंत्रानं जागं झालं पाहिजे. सत्य देखील आपलं मोल मागतंच असतं. मृत्युदेवता झालेल्या थोड्या बलिदानानं संतुष्ट झाल्यासारखी दिसत नाही. जेवढं द्याल तेवढंच मिळेल. पुढे मार्ग नसतो. ज्या वीरांनी स्वातंत्र्य वेदीवर सर्वस्वाची आहुती दिली त्यांना स्वातंत्र्य-वेदीची प्राप्ती झाली. परंतु हे पुरेसं नाही. भारताला खऱ्या अर्थानं भारत बनवायचं असेल तर आणखी बलिदानांची आवश्यकता आहे, आणखी त्यागाची गरज आहे. नवी पिढी ही गोष्ट विसरत चालली आहे. विसरण्यानं काम होणार नाही. स्वेच्छेनं त्यागाला तयार झाला नाहीत, तर नाइलाज म्हणून त्याग करावाच लागेल. "कर्तुं नेच्छसि यन्मोहात करिष्यस्यवशोऽपि तत्" (तू मोहवश होऊन जे काम इच्छित नाहीस ते तुला लाचारीनं करावं लागेल.) आपण स्वेच्छापूर्वक त्याग केला तर आपला गौरव होईल, बळजबरीनं केलेल्या त्यागामुळे आपलं काय होईल कुणास ठाऊक? इतिहास निर्माण करणारा निर्मोही असतो. नव्या पिढीचे तरुण बाबा पृथ्वीसिंहांचं आत्मचरित्र वाचून, नव्या प्रकाराने, नव्या परिस्थितीच्या संदर्भात काही त्याग करायला पुढे सरसावले तर इतिहासकारांना त्यांची नोंद करावीच लागेल. त्यागाला पुढे आला नाहीत, तर मग परमेश्वरच वाली आहे.

बाबा पृथ्वीसिंहांचं हे आत्मचरित्र वाचून मला मोठा आनंद झाला. सरळ भाषा आणि अनलंकृत शैलीनं मला त्यांनी आकृष्ट करून घेतलं. देशातल्या तरुणांनी हे आत्म-चरित्र वाचावं आणि भारत देशाला महान बनविण्यासाठी त्यागाचा आणि बलिदानाचा मंत्र त्यांनी जपावा, अशीच मी अपेक्षा करतो.

हजारीप्रसाद द्विवेदी

चंदीगढ:
१३ सप्टेंबर १९६४.

# भूमिका

जेव्हा गांधीजींच्या आज्ञेनुसार जेलमधील बंदी अवस्थेत मी आपला वृत्तान्त लिहायला सुरुवात केली, त्यावेळी माझ्या मनात एकच विचार सतत येत होता की, हे सर्व लिहिण्याचा उपयोग काय? आणखी अनेक विचार मनात येत होते. मी विचार करत होतो की, इंग्रज सरकार १९६६ साला पर्यंत आपली सुटका करणार नाही. कैदी म्हणून जगत असताना १९६६ पर्यंत आपण जिवंत राहणार काय? असाही प्रश्न उभा राहायचा. ही शक्यता कमीच होती. दुसरा प्रश्न होता, तो म्हणजे आपण लिहिलेला मजकूर तुरुंगाच्या चार भिंतींच्या बाहेरील जगात पोचणार आहे काय? सरकार हे लेखन बाहेर जाऊ देईल काय? सरकारची सेन्सॉर यंत्रणा आपलं लेखन मूळ स्वरूपात प्रकाशित करू देईल काय? जर काट-छाट करून त्यांनी छापायची परवानगी दिली तर बराच गोंधळ होणार—अर्थाचा अनर्थ होणार. मुंबईच्या—ठाण्याच्या छोट्या तुरुंगात आपणास किती काळ ठेवतील, याचा अंदाज बांधणंही कठीण होतं.

आत्मसमर्पणानंतर लवकरच पंजाब सरकारनं, मी पंजाब सरकारच्या तुरुंगात प्रथम होतो, या मुद्यावर पृथ्वीसिंगला आमच्या स्वाधीन करा, अशी त्यांनी मागणी केली. मुंबई प्रमाणं त्याकाळी पंजाबमध्ये काँग्रेसच्या बहुमताचं सरकार नव्हतं. तिथं कदाचित लिहिण्याची परवानगी देखील मिळणार नाही-असाही विचार मनात आला. पंजाब सरकारनं मागणी केल्यावर, पंजाबचे पोलीस कोणत्याही क्षणी येतील व आपणास घेऊन जातील ह्याचाच मी विचार करत राहिलो. वाट बघण्यात पन्नास दिवस निघून गेले. या अवधीत जेलच्या एकान्तवासात जीवनवृत्तान्त लिहिण्यासाठी मला खूप वेळ मिळाला. कुठलंच विघ्न आड आलं नाही. झोपण्याचा वेळ सोडला तर बाकी सगळा वेळ मी लिहिण्यातच घालवला. परंतु तिथं माझा जीवनवृत्तान्त पूर्णपणे लिहून झाला नाही. याचं कारण असं होतं की, लिहिण्याच्या ओघात माझ्याकडून एखादी अशी घटना लिहिली जाण्याची शक्यता होती, जिचा इतरांना त्रास झाला असता. इतर लोक माझ्यामुळं सरकारच्या जाळ्यात सापडतील, अशी मला धास्ती होती. ज्या गोष्टी पोलिसांना समजल्या होत्या व ज्या लिहिण्याची भीती बाळगण्याचं कारण नव्हतं—त्या सर्व गोष्टी मी लिहून टाकल्या. त्या पन्नास दिवसांच्या कालावधीत २९ नोव्हेंबर, १९२२ पर्यंतचा लिहिण्याजोगा सर्व भाग मी लिहिला.

२३ सप्टेंबर १९३९ रोजी मी जेव्हा तुरुंगातून मुक्त झालो तेव्हा महात्माजींनी माझं सर्व लेखन इंग्रज सरकारकडून हस्तगत करून माझ्या हवाली केलं. महादेवभाई देसाई

आणि किशोरीलाल मश्रुवाला यांनी माझं लेखन काळजीपूर्वक वाचून बघितलं. बापूजी मला म्हणाले—"१९२२ नंतरचा वृत्तान्त देखील लिहून टाका". मुंबई आणि मध्यप्रदेशात कांग्रेसची सरकारं अस्तित्वात आली होती तरी इंग्रजांची राजवट जशीच्या तशी कायम होती. यामुळं सर्व गोष्टी स्पष्टपणे लिहिणं अवघड होतं. तरीही बापूंच्या आज्ञेनुसार जुहू येथील समुद्रकाठी, श्री. जमनालाल बजाज यांच्या 'जानकी कुटीर' येथे दोन महिने राहून, जेवढं लिहिणं शक्य होतं, ते सर्व निर्विघ्नपणे मी लिहून टाकलं. आता पूर्ण केलेल्या या जीवनवृत्तान्ताचं वाचन बापूजी, महादेवभाई देसाई आणि किशोरीलाल मश्रुवाला या तिघांनी फिरून एकदा केलं. हस्तलिखित वाचल्यानंतर हे पुस्तक रूपानं प्रकाशित करा, अशी इच्छा त्यांनी प्रदर्शित केली. किशोरीलाल मश्रुवाला म्हणाले की सरदार पृथ्वीसिंहाचं हे चरित्र पुस्तक रूपानं प्रकाशित झालं तर हे पुस्तक गरमागरम भजीप्रमाणं लगेचच विकलं जाईल. त्याच्या आर्थिक उत्पन्नातून सरदारजींच्या कुटुंबियांचे आर्थिक प्रश्न नेहमीसाठी सुटतील. श्री. महादेवभाई देसाई यांचं असं मत होतं की हे आत्मचरित्र प्रथम 'हरिजन' च्या अंकातून क्रमशः प्रसिद्ध करावं. बापूंनी आपली इच्छा अशा तऱ्हेनं प्रकट केली-"पृथ्वीसिंहजी, जर तुम्ही सत्य आणि अहिंसेचा अर्थपूर्णपणे समजून घेतला असेल आणि ही मूल्यं तुमच्या जीवनाचा भाग बनली असतील—तर माझं म्हणणं आहे की, पुस्तकाच्या अखेरीस तुम्ही तुमची ही स्वीकृती नोंदवा—तुम्हाला हे मान्य असेल तर पुस्तकाची 'भूमिका' मी स्वतः लिहीन- पुस्तक प्रकाशित करून जगासमोर आणू या. हे पुस्तक प्रकाशित झाल्यानंतर जगातल्या सर्व भाषांत त्याचा अनुवाद होईल."
मी या तिन्ही महनीय व्यक्तींच्या विचारांशी सहमत होऊ शकलो नाही. मी जे काही लिहिलं होतं, त्यातला बराचसा भाग मी तुरुंगात असताना लिहिला होता. नंतरचा भाग जेलबाहेर आल्यानंतर लिहिला असला तरी ज्या इंग्रज सरकारने भारतावर अत्याचार केले होते, त्याच सरकारच्या छत्राखाली हा भाग देखील मला लिहावा लागला. ज्या सरकारचं समूळ उच्चाटन करण्यासाठी मी सतत प्रयत्नशील राहिलो, ते सरकार अजून अस्तित्वात असताना, माझ्या जीवनाचं संपूर्ण खरं चित्र रेखाटणं कसं बरं शक्य होतं? ज्या घटना घडल्या होत्या, त्याचंही पूर्ण वर्णन करणं कठीण होतं.

माझ्यासमोर एवढाच विचार होता की, जर हे लेखन पुस्तक रूपानं प्रकाशित होऊन समाजासमोर आलं व बापूंच्या संमतीचं त्यावर शिक्कामोर्तब झालं म्हणजे मग त्यात कुठलेही फेरफार करण्याचा मला अधिकार राहणार नाही. पैसा आणि कीर्ति ही दोन प्रलोभन आकर्षक होतीच, परंतु आजवर जे काही मी केलं होतं ते कीर्ति प्राप्त व्हावी म्हणून थोडंच केलं होतं? पैशाचाही मला कधी मोह पडला नव्हता. यासाठीच त्यावेळी माझा हा जीवनवृत्तान्त पुस्तक रूपानं प्रसिद्ध करायला किंवा 'हरिजन' मधून क्रमशः प्रकाशित करायला मी अनुमती दिली नाही. बापूजींनी जी इच्छा व्यक्त केली होती, ती बरोबरच होती.

मी बापूजींपासून वस्तुस्थिती लपवून ठेवली नाही. मन, वचन आणि कर्मानं सत्य-अहिंसेचं कसं पालन करायचं ? हे खरोखरच मला समजलेलं नव्हतं. सत्य-अहिंसेचा विचार समजून घ्यावा आणि तो जीवनात आचरणात आणावा, त्यासाठी मी प्रयत्न केले होते. जोपर्यंत मला हा विचार नीट समजत नाही—तसा मला विश्वास वाटत नाही—तोपर्यंत इतरांच्या 'हो' मध्ये आपणही 'हो' म्हणायचं, हा माझ्यामते ढोंगाचा प्रकार होता—मी दांभिक ठरलो असतो.

आत्मसमर्पणानंतर मी सोळा महिने जेलमध्ये होतो. त्यावेळी माझं अनुमान होतं की मी सत्य-अहिंसेचा स्वीकार करू शकेन. परंतु जेव्हा मी जेलमधून बाहेर आलो व बापूजींसमवेत अनेक वर्षं राहिलेले त्यांचे साथीदार बघितले तेव्हा माझ्या डोक्यात प्रकाश पडला. मन, वचन आणि कर्मानं सत्य-अहिंसेचं पालन करणं हा एखादा पोरखेळ नव्हे, हे स्पष्टपणे माझ्या लक्षात आलं. बापूजींनी माझ्याकडून जी अपेक्षा केली ती त्यांना माझ्यासंबंधी अत्यंत विश्वास वाटत होता म्हणून. आत्मसमर्पण करून जो माणूस १९६६ पर्यंतचा तुरुंगवास स्वेच्छेनं स्वीकारतो त्याचं आत्मबळ यावरूनच दिसत होतं. असा माणूसच सत्य-अहिंसेचा पूर्णपणे स्वीकार करू शकेल, असं बापूजींना वाटलं असावं.

आपला दुबळेपणा झाकून ठेवण्याकडे मनुष्यप्राण्याची प्रवृत्ती असते—हा त्याचा दुर्गुणच म्हटला पाहिजे. परंतु मी माझा दुबळेपणा लपवून न ठेवता बापूजींना स्पष्टपणे सांगितलं की मन, वचन आणि कर्मानं सत्य-अहिंसेचे सिद्धान्त आपल्या जीवनात आचरण्याचं बळ माझ्या ठिकाणी नाही. बापूजींना माझे हे स्पष्ट विचार ऐकून आनंदच वाटला. 'या प्रयत्नात यशस्वी व्हा'! असा त्यांनी आशीर्वाद दिला.

ही २५-३० वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. बापूजींच्या अनुयायांनी किती प्रमाणात सत्य आणि अहिंसेचा स्वीकार केला होता ह्याचा काटेकोर पद्धतीने विचार केला तर सत्य परिस्थिती निराळीच होती. म्हणूनच बापूजींच्या इच्छेप्रमाणं मी पुस्तक प्रकाशित करायचं नाही, असं ठरवलं. पुस्तक त्यावेळीच प्रसिद्ध केलं असतं तर मला कीर्ती आणि पैसा दोन्ही गोष्टी मिळाल्या असत्या, परंतु माझी बदनामीही झाली असती. लोक असंच म्हणाले असते की पृथ्वीसिंहानं कपट-कारस्थानं करून पैसा व कीर्ति मिळवली आहे. आजवरच्या अनुभवावरून माझी खात्री होऊन चुकली होती की, सत्य-अहिंसा ही आपल्या आवाक्यातली गोष्ट नाही.

भारतातील तरुणवर्गाची प्रेम भावनेनं सेवा करून, आपल्या जीवनात सर्व प्रलोभनांपासून बाजूस राहून जागृत जनतेच्या मनात माझ्यासंबंधी आदर भाव वसत होता, हे मी बघत होतो. माझा कुणाशी कधी संघर्ष घडला नाही आणि मीही कुणाला त्रास दिला नाही, फसवणूक केली नाही. सर्व प्रकारच्या नियमांचे बंधन स्वीकारून संयम बाळगून मी

वागत आलो आहे. दुसऱ्यांचा दृष्टिकोण बाजूला ठेवा परंतु माझ्या दृष्टीने माझा एक दुबळेपणा स्पष्टपणे मला दिसतो व तो म्हणजे मन, वचन आणि कर्मानें सत्य आणि अहिंसेचा पूर्णपणे स्वीकार करणं खरोखरच माझ्या सामर्थ्याच्या पलीकडची गोष्ट आहे.

माझी जीवन-कहाणी लिहिण्याचा मूळ हेतू हा आहे. पंजाब प्रांतातल्या माझ्या जन्मभूमीत मी १७-१२-१९५७ रोजी आलो. तेव्हापासून आतापर्यंत मी तिकडल्या शाळांतून व कॉलेजांतून अनेकवेळा भाषणं दिली आहेत. मी माझा जीवनवृत्तांत सांगावा अशी सर्वांचीच इच्छा दिसली. यावरून माझ्या असं लक्षात आलं की लोकांना माझ्या जीवन-कहाणीत खूप रस वाटतो. माझ्या जीवनातून काही प्रेरणा मिळेल असंही त्यांना वाटत असावं.

राजकीय जीवनात किती चढ-उतार असतात, किती वळणं मार्गात आडवी येतात, किती बिकट दऱ्या-खोरे ओलांडावे लागतात, निराशेला कसं तोंड द्यावं लागतं, माणूस एखाद्या नावाड्याप्रमाणं आपली जीवन-नौका संसार सागरातून कशी चतुराईनं हाकतो आणि वयाच्या ७८ व्या वर्षीही कशातऱ्हेनं तो जीवन शक्तीला आपल्या नियंत्रणात ठेवू शकतो हे सांगण्याचा माझा हेतू आहे. या सर्व गोष्टी राष्ट्राच्या शूर वीर पुरुषांच्या रोमांचित करणाऱ्या इतिहासात अगोदर पासूनच उपलब्ध आहे. आपल्या देशाचा प्राचीन इतिहासही वीर पुरुषांच्या गाथांनी भरलेला आहे. पण ही एक अशा माणसाची जीवन-गाथा आहे जो गेली ५७ वर्षे आपल्या देशवासीयांचा साथीदार बनून देशसेवा करत आलेला आहे. माझ्या जीवनाचे विविध पैलू कालक्रमानुसार खालीलप्रमाणे विभागले जाऊ शकतात :—

| | |
|---|---|
| १. १८९२ ते १९१० पर्यंत | २. १९११ ते १९१४ पर्यंत |
| ३. १९१५ ते १९२२ पर्यंत | ४. १९२३ ते १९३० पर्यंत |
| ५. १९३१ ते १९३८ पर्यंत | ६. १९३९ ते १९४२ पर्यंत |
| ७. १९४३ ते १९५६ पर्यंत | ८. १९५७ ते १९६७ पर्यंत |
| ९. १९६७ ते आजतागायत. | |

१९२१ साली जेव्हा मी धावत्या आगगाडीतून उडी मारली होती त्यावेळी मृत्यू आवडणार की स्वातंत्र्य मिळणार ह्याची कल्पना करणं देखील कठीण होतं. उडी मारल्याबरोबर अपघातानं मरण येण्याची शक्यता होती. डोकं वर उचलल्याबरोबर गोळी लागण्याची शक्यता होती. अन्यथा गोळ्या लागून पंगुत्व येणंही शक्य होतं. थोडक्यात हे साहस म्हणजे काळ्या धाग्याला जीवन लटकावण्याचा प्रकार होता.

इ. स. १९३८ साली सोळा वर्षांच्या अज्ञातवासानंतर जेव्हा मी गांधीजींच्या सल्ल्यानुसार इंग्रज सरकारच्या स्वाधीन झालो तेव्हा ही देखील एक उडीच होती. या प्रकाशात सुद्धा मी अंधारातच स्वतःला झोकून दिलं होतं. मी ज्यांना माझा शत्रू मानत होतो ते लोक

माझ्यावर कोण विश्वास ठेवणार? हा सर्व विचार मी आधीच केला होता. मला आपल्या ताब्यात पकडण्यासाठी त्यांनी जंग जंग पछाडलं होतं—ते हातीं आलेली शिकार सोडणार थोडेच? माझ्यावर काहीही आरोप ठेवून ते मला फाशावर चढवू शकले असते. हा पळून जाण्याचा प्रयत्न करत होता म्हणून याला गोळी घालावी लागली असं ते भासवू शकत होते किंवा मला जेलमध्ये खितपत ठेवून सडत सडत मरावं लागलं असतं—असंही घडणं शक्य होतं. अशा परिस्थितीत सुटकेचा कुठलाच मार्ग नव्हता. तरीही मी आत्मसमर्पण करून स्वतःहून अटक करवून घेतली. देशभरातील तरुणांसमोर एक आदर्श निर्माण करावा हाच माझा उद्देश होता.

जेव्हा मी बापूंना त्यांच्याच इच्छेनुसार आपल्या जीवनाची सगळी रूपरेषा मांडून दाखवली तेव्हा ती वाचून ते थोडेसे अस्वस्थ झाल्यासारखे झाले होते. ते मला म्हणाले होते की, ज्याप्रमाणे तुम्ही सोळा वर्षं अज्ञातवासात काढली आहेत तशीच आणखी काही वर्षं काढा. इंग्रज सरकार तुमच्यावर विश्वास ठेवणार नाही. त्यांच्या हातीं पडलात, तर मृत्यूची भीती आहे. बापूंचं अनुमान संभवच होतं. आत्मसमर्पणानंतर इंग्रज सरकारने आशा केली की १९६६ पर्यंत तुम्हाला जेलमध्ये बंदीवान म्हणून राहवं लागेल.

जेलमध्ये परत शिक्षा भोगत असताना मला बापूजींनी जी पत्रं लिहिली किंवा अन्य मित्रांनी जी पत्रं पाठवली त्या सर्वांना उत्तरादाखल मी जी पत्रं पाठवली, त्यावरून ही गोष्ट स्पष्ट होते की, १९६६ पर्यंत तुरुंगवास भोगण्याची शिक्षा मिळाल्यानंतर माझ्या मनात काय काय आलं?—माझ्या आत्मसमर्पणाकडे लोक कोणत्या दृष्टीने बघत होते?

जेलच्या अधिकाऱ्यांनी, माझ्या निकटवर्ती मित्रांनी आणि खुद्द बापूजींनी माझी सुटका व्हावी म्हणून शक्य ते सर्व प्रयत्न केले. मला भेटायला येणारे सरकारी अधिकारी माझं बोलणं ऐकून प्रभावित होत होते. माझ्या सुटकेसाठी त्यांचा जीव तीळ तीळ तुटायचा परंतु सरकारने या सर्व गोष्टींकडे कानाडोळा केला. सरकारला डोळे असतात परंतु बघण्यासाठी डोळे उघडे नसतात. माझ्या जीवनाचे जे रेकॉर्ड सरकारी कार्यालयात नोंदवलं होतं, ते जर कुणी वाचलं असतं तर माझ्यासाठी काही करावं, असं कुणालाच वाटलं नसतं. बापूजींना सरकारने स्पष्टपणे लिहून कळवलं की; सरकारचा पृथ्वीसिंहावर कधीही विश्वास बसू शकणार नाही. त्यांची शिफारस करणं व्यर्थ आहे. सरकारचं उत्तर वाचून बापू अतिशय निराश झाले. त्या खिन्न मनःस्थितीतच त्यांनी महादेवभाई देसाई यांना जेलमध्ये माझ्या भेटीसाठी पाठवलं. मला त्यांनी निरोप पाठवला की, सुटकेची आशा सोडून द्या. मला जणू आन्तरिक निरोप मिळाला की, यापुढे परमेश्वर आपला वाली आहे. आपल्या शक्तीचा आणि वेळेचा सदुपयोग करा, असाही त्यांचा निरोप होता. माझ्या लेखी निराशेचं काही कारणच नव्हतं. इंग्रज सरकारकडून आपली सुटका होईल, या अपेक्षेने काही मी आत्मसमर्पण केलेलं नव्हतं.

१९३९ मध्ये जेव्हा माझ्या सुटकेची बातमी मला समजली तेव्हा जन्मठेप भोगणाऱ्या कैद्याला सुटका होण्याचा जो एक प्रकारचा आनंद होतो, त्या आनंदालाही मी पारखा झालो. माझ्यावर अनेक बंधनं लादून मला सोडण्यात आलं होतं—त्यामुळे सुटकेचा सगळा आनंद मावळला. माझ्यावर दोन अटींचं बंधन घालण्यात आलं—परवानगीवाचून मला माझ्या जन्मभूमीत–पंजाबात–पाऊल ठेवता येणार नव्हतं. दुसरी अट होती गांधीजींचा आश्रम सोडून अन्यत्र जायचं नाही. बापूंच्या आज्ञेनुसार मी या अटी स्वीकारल्या. अटी मान्य केल्या म्हणजे सुटका झाली आहे, याला फारसा अर्थ नव्हता. रावळपिंडीच्या तुरुंगातून कैद्याप्रमाणे वागवीतच मला बाहेर काढण्यात आलं व माझी रवानगी वर्ध्याच्या जेलमध्ये करण्यात आली. मी आश्रमात पोचलो त्याच्या दुसऱ्या दिवशीच बापूंना शिमल्याला जाऊन व्हाइसरॉयची भेट घ्यायची होती. सायंकाळच्या प्रार्थनेच्या वेळी बापू म्हणाले—"एक नवा माणूस आजपासून तुमच्याबरोबर राहण्यासाठी इथं आला आहे. त्याच्याकडे लक्ष ठेवा आणि त्याला ओळखून घेण्याचा प्रयत्न करा. त्याला जवळ करा व आपल्याशी एकरूप करून घ्या. हा डाकू इथं आला आहे तेव्हा दुसरा कुणी डाकू इथं येण्याचं धाडस करणार नाही"!

सन १९३९ ते १९५६ पावेतो माझ्या जीवनात अनेक चढ-उतार आले. तो काळच तसा होता. ज्या मार्गानं मी निघालो होतो त्या मार्गावर अवघड वळणं आडवी आली. प्रत्येक वळणावर, आता कोणत्या दिशेने जावं, अशी बिकट समस्या उभी राहायची. निर्णय घेणं कठीण व्हायचं. मी खूप विचार करून, दिशा निश्चित करायचो आणि बेधडक त्या दिशेनं चालायला लागायचो. प्रत्येक वळणावर मित्र भेटत गेले व त्यांचं मला साहाय्य लाभत गेलं—मात्र माझे हे मित्र दोन गोष्टींबाबत माझ्याशी सहमत नव्हते. पहिली गोष्ट म्हणजे मी मीराबेनची इच्छा डावलून स्वतःच्या हट्टाला चिकटून राहिलो, ही होती व दुसरी मी बापूजींची साथ सोडायला नको होती, असं त्यांना वाटत होतं. त्यामुळे माझा मार्गच चुकला, असं त्यांचं मत होतं. मी माझ्या जीवनातल्या अनेक घटना विसरण्याचा प्रयत्न केला आहे. पुष्कळशा घटना विसरून जाऊन माझं मनाचं ओझं मी कमीही केलं आहे. परंतु मीरा आणि बापू यांना मात्र मी कधीच विसरू शकलो नाही. मीरा मला जीवनसाथी बनवून देशाची महान सेवा करू इच्छित होती. बापूंही मला जवळ करून माझ्या कडून देशाचं एखादं महान कार्य करवून घेण्याच्या विचारात होते. मी त्या दोघांच्याही अपेक्षा पूर्ण करू शकलो नाही. जेव्हा जेव्हा मला या आठवणी येतात, तेव्हा मी खूप खिन्न बनतो. दुःखी मनानं विचार करत राहतो. मी जे काही केलं होतं ते शुद्ध मनाने केलं होतं. माझा हेतु शुद्ध होता. म्हणूनच मी हे सगळं शुद्ध मनानंच लिहिलं आहे. मी जरी या दोघांचा साथीदार होऊ शकलो नाही तरी त्यांच्या पावन स्मृती ह्या माझ्या जीवनाच्या बहुमोल ठेवा बनल्या आहेत. त्यांच्या आठवणींच्या प्रेरणेनंच मी देशकार्यासाठी स्वतःला वाहून घेतलं आहे. १९५६ नंतर मी पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू

यांचा विश्वास संपादन करून, एक स्वयंसेवक म्हणून कार्य करत आहे. मी आणि माझं कार्य देशवासीयांच्या समोरच आहे.

माझ्या समकालीन लोकांचं ज्या प्रमुख घटनांकडे लक्ष गेलेलं होतं त्या माझ्या जीवनातल्या घटनांचा मी इथे उल्लेख केलेला आहे. लहान-सहान घटनांनाही रोचक व मनोहर कहाण्यांचं रूप प्राप्त होतं. अशा सर्वच घटना सांगायला लागलो तर ही जीवनकथा हजारो पृष्ठांची होईल. इतरांना आश्चर्यकारक स्वरूपाच्या वाटतील अशा घटनाच मी प्रामुख्यानं सांगितल्या आहेत. हे वाचून वाचकांना, अशा घटना घडणं शक्य आहे का, असा प्रश्न पडेल.

तुरुंगात असताना ज्या यातना मला सहन कराव्या लागल्या, त्या नरकांतून आपला आणि आपल्या साथीदारांचा बचाव करण्यासाठी जो संघर्ष करावा लागला, तुरुंगातील अधिकाऱ्यांचं माझ्यासंबंधी जे प्रतिकूल मत बनलं होतं—या संबंधीचा संपूर्ण वृत्तान्त जेलच्या कार्यालयातून वाचायला मिळू शकेल. आता फार थोडे समकालीन साथीदार हयात असतील—त्यांपैकी ६५ वर्षे वयाचे माननीय बुजुर्ग साथी बाबा सोहनसिंह भकना, ज्यांच्या हृदयात ५० वर्षांपूर्वी होती तशीच देशप्रेमाची ज्योत आजही प्रज्वलित आहे, आणि पंडित परमानंद हे माझ्याच वयाचे असून, माझे आवडते साथीदार आहेत—यांचा आवर्जून उल्लेख करावा लागेल. पं. परमानंदांइतका तुरुंगवास कुणाही क्रांतिकारकाच्या वाट्याला आला नसेल. ३५ वर्षे त्यांनी तुरुंगातील यातना सहन केल्या—आजही समाजसेवेचं त्यांचं कार्य चालू आहे व त्यांची लोकप्रियता टिकून आहे.

२९ नोव्हेंबर १९२२ रोजी धावत्या गाडीतून उडी मारून पळ काढल्यानंतर मी अमरावती येथं पोचलो. तिथं मला संरक्षण देणारे, साहाय्य करणारे, लोकप्रिय सामाजिक कार्यकर्ता डॉ. शिवाजीराव पटवर्धन यांचाही उल्लेख करणं आवश्यक आहे. आजही कुष्ठरोग्यांचा आश्रम ते चालवतात. आपलं जीवन त्यांनी या कार्याला समर्पित केलं आहे.

सन १९२२ पासून आजपर्यंत सौराष्ट्रातील तरुणपिढी समवेत मी माझं जीवन व्यतीत केलं आहे. तिथं ४५ ते ५० वयोगटातील क्वचितच एखादा सुशिक्षित माणूस असा असेल, जो माझ्या संपर्कात आला नाही. १९२२ ते १९३० पावेतो मी कोणत्या प्रकारचं लपाछपण केलं, जीवन कसं कंठलं, समाजाची कोणत्या प्रकारे सेवा केली, कोणकोणती कामं केली, हे सारं लिहायला बसलो तर त्याचा ही एक ग्रंथ होईल.

भारतीय राजकारणाचं स्वरूप समजावं म्हणून रशियाला जाण्यापूर्वी मी संबंध भारताचा दौरा केला होता. त्या वेळचे माझे विचार मी लिहिले आहेत. मात्र आत्मचरित्रात मी त्याचा समावेश केला नाही. १९२२ पासून आजपर्यंत वेळोवेळी राजकीय, सामाजिक आणि आर्थिक विषयांवर मी लिहिले आहे. त्या संबंधीही या पुस्तकात मी उल्लेख केलेला नाही.

राजमहेंद्री (आंध्र) येथील जेलमध्ये असताना लिहिण्यासाठी मला थोडा वेळ मिळाला होता. ''बदलणारं जग'' (परिवर्तनशील संसार), या नावाखाली मी बरंच काही लिहिलं होतं. बंदीवासात मात्र शांत चित्तानं, संपूर्ण स्वरूपात लेखन करण्यास मला पुरेसा वेळ मिळाला आणि मी बरंच काही लिहिलं. ह्या लेखनाचाही प्रस्तुत जीवन-कथेत समावेश नाही.

राष्ट्रीय ऐक्य, अनुशासन, आरोग्य, मैदानी व मर्दानी खेळ, जीवनशास्त्र, आहारशास्त्र, शिक्षणशास्त्र. या सर्व विषयांवर लेखन करण्यास मला भरपूर अवधी मिळाला. जेल-मध्ये असताना मी डायरी लिहीत होतो. त्या डायऱ्यातूनही पुष्कळसं लेखन झालेलं आहे. भारतातील मान्यवर नेत्यांना मी जी पत्रं लिहिली आणि मीराबेनशी माझा जो पत्रव्यवहार झाला, त्या सर्वांचं एक स्वतंत्र पुस्तक काढण्याचा माझा विचार आहे.

ह्या पुस्तकात, एका सर्वसामान्य शेतकऱ्याचा मुलगा, आपल्या मनात उत्पन्न झालेल्या ऊर्मी स्वीकारून, मोठ्या धैर्याने जीवन-संग्रामाला कसा सामोरा जातो, ही वस्तुस्थिती मांडण्याचा मी प्रयत्न केला आहे! यम-नियमांची बंधनं स्वीकारून, आपल्या साथीदारां मध्ये कसा ठळकपणे उठून दिसतो, हे सांगण्याचा मी प्रयत्न केला आहे. तसंच आपली जीवन-नौका मोठमोठ्या भोवऱ्यांतून, आणि वेड्यावाकड्या वळणांवरून तो किती कुशलतेने दुसऱ्या किनाऱ्यावर घेऊन जातो, याचंही दिग्दर्शन केलेलं आहे! जीवनासंबंधी ज्याला विशेष ओढ लागली नाही किंवा जीवनापासून ज्यानं पळण्याचाच प्रयत्न केला तोच माणूस जीवनाशी झुंजण्याची धडपड करतो—याचंही चित्रण केलेलं आहे!

जे सेवाभावी तरुण, देशासाठी काही ना काही करण्याची इच्छा बाळगतात परंतु शारीरिक कष्टांना घाबरतात व मृत्यूला सामोरं जायला कचरतात, अशांनी हे पुस्तक वाचलं तर त्यांच्या लक्षात येईल की, शारीरिक कष्ट किंवा मृत्यूचं भय या गोष्टी मनोनिर्मित असतात. एक जिज्ञासू आणि ध्येयानं वेडा झालेला माणूस आपलं ध्येय साध्य करण्यासाठी स्वतःला झोकून देतो, तेव्हा त्याची दृष्टी केवळ त्याच्या ध्येयावर खिळून राहते. कष्टांचा, हाल-अपेष्टांचा व मृत्यूचा विचार त्याच्या लेखी लुप्त होऊन जातो—त्यांची आठवण सुद्धा होत नाही.

माझी ही जीवन-कथा म्हणजे करमणूक करणारी कादंबरी नव्हे. हे पुस्तक, जे तरुण ध्येयप्राप्तीसाठी जगू इच्छितात, त्यांना समोर ठेवून लिहिलेलं आहे. जीवनाच्या लढाईत कोणते डावपेच लढवावे लागतात हे ज्यांना समजून घ्यायचं असेल, त्यांना हे पुस्तक थोडंफार उपयोगी पडेल.

परवापर्यंत मी अत्याचारी परकीय सत्तेला आव्हान देत होतो, संकटांना, मृत्यूला सामोरं जात होतो. आज मी आपल्या सरकारचा अविभाज्य भाग म्हणून उभा आहे. मी माझं कार्यक्षेत्र सोडलं नाही किंवा मी निष्क्रियही बनलो नाही. कार्यासंबंधीची माझी दृष्टी आता बदलली आहे.

आज मी देशातील सर्व तरुणांना आवाहन करतो आहे की, आपल्या पूर्वजांनी महान कष्ट करून जो देश स्वतंत्र केला आहे तो देश आता समृद्ध व सुखकारक बनवायचा आहे, आपल्याला एक नवा समाज घडवायचा आहे. एखाद्या नव्या गोष्टीला जन्माला घालणं नवनिर्मिती करणं, हे काम सोपं नाही. माता आपल्या बालकाला जन्म देते, त्यासाठी जे कष्ट ती सहन करते—मातेच्या सहनशीलतेपासून आपल्याला काही प्रेरणा घ्यावी लागेल. आपल्या मातेनं स्वेच्छेनं, स्वतःवर लादून, कष्ट उपसले नसते, तर आपल्याला हे जग बघायलाच मिळालं नसतं. हे जीवन आपल्या वाट्याला आलं नसतं. आपण सर्वांनी आपापल्या ठिकाणी निर्धारपूर्वक प्रयत्न केले नाही तर नवा समाज निर्माण होऊ शकणार नाही.

स्वातंत्र्यप्राप्ती होऊन २२ वर्षे उलटली तरी आपल्या समाजाच्या चेहऱ्यावर गुलामगिरीच्या काळातील अवकळा अजूनही कायम आहे. चेहऱ्यावर डाग असले तरी एक गोष्ट स्पष्टच आहे की आता त्यावर गुलामगिरीचा काळा डाग नाही. गुलामगिरीच्या अमदानीमुळे आम्हाला चहूकडून जे फटकारे बसत होते, आपल्या दुबळेपणामुळे व निष्काळजीपणामुळे ते परत बसू नयेत, म्हणजे मिळवली. आम्ही सावध व जागृत राहिलो तरच तो डाग आमच्या चेहऱ्याला दिसणार नाही. ह्याचा एक मोठा चांगला परिणाम घडून येईल व तो म्हणजे आपल्या चेहऱ्यावरील जुने डाग ही कायमचे नष्ट होऊन जातील.

आज मी देशाच्या कानाकोपऱ्यात जाऊन तरुणांना आवाहन करत फिरतो आहे की, आपण आपल्या परिश्रमांनी, आणि कष्टांनी जोपर्यंत हा देश समृद्ध करणार नाहीत तोपर्यंत आपण खऱ्या अर्थानं देशाचे अंग बनू शकणार नाहीत, तोपर्यंत आपण देशाशी एकरूप होऊ शकणार नाहीत व देशही आपल्याला स्वीकारणार नाही. ज्या गोष्टींशी आपण एकरूप झालो नाहीत, त्या गोष्टींच्या रक्षणासाठी आपण प्राणार्पणाला सज्ज होऊ काय ?

स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या काळात माझ्या जीवनात मुद्दाम उल्लेख करावा, अशी एकही घटना घडलेली नाही. माझ्या मनाला पटलेल्या या न त्या समाजोपयोगी कार्यात मी सहभागी होत गेलो. १९५६ पासून सतत आपल्या देशाचे लाडके नेते पंडित जवाहरलाल नेहरू यांच्याशी संपर्क ठेवून, आपल्या वकुबाप्रमाणे, देशाच्या तरुण वर्गाच्या सेवेत मग्न राहिलो. जीवनभरच्या तपश्चर्येतून जे सुंदर विचार मी ग्रहण केले, पचवले व आपल्या जीवनात त्यांना स्थान दिलं, त्या विचारांचा शैक्षणिक केंद्रावर जाऊन मी प्रचार व प्रसार करण्याचा प्रयत्न करत आहे. समाजाला नवीन जीवन देण्याचं कार्य, एखादा तपस्वीच करू जाणे. तपस्व्याला शाबासकी द्यायला कुणी जात नाही, त्याची छायाचित्रंही कुठं प्रकाशित होत नाहीत. त्याचं कार्य अनेकदा लोकांच्या डोळ्यातही भरत नाही. तो निष्ठापूर्वक समाजाशी एकरूप होऊन आपलं काम करत राहतो. मोठा थोरला वृक्ष उभा राहावा यासाठी बीज जसं धरणीच्या कुशीत स्वतःला गाडून घेतं—तसं अशा तपस्वीचं वागणं असतं.

हुतात्म्यांच्या बलिदानातूनच देश स्वतंत्र होतात. हुतात्मे आपल्या रक्तानं इतिहास निर्माण करतात. लोकांत जागृती उत्पन्न करतात, त्यांच्यात नवा जोश निर्माण करतात. जे शूरवीर असतात ते रणांगणावर जाऊन देशहितासाठी प्राणांची बाजी कशी लावायची, ते लोकांना दाखवून देतात. रचनात्मक कार्यातून समाजाची निर्मिती होते. तपस्वी भक्त किंवा उत्तम कार्यकर्ते आपोआप निर्माण होत नसतात, विशिष्ट वातावरणातच ते उत्पन्न होतात. अनुभवी गुरुजनांच्या मार्गदर्शनातूनच ते कुशल कार्यकर्ते बनतात. हौतात्म्याचा प्याला प्राशन करणारे आणि पतंगाप्रमाणे आपले प्राण देणारे वीर, दैवी योगायोगानं आपोआप जन्माला येतात—परंतु उत्तम कार्यकर्ते असे आपोआप जन्माला येत नसतात—ते तयार करावे लागतात.

भारताच्या क्रांतिकारकांत माझं जीवन एक अद्भुत जीवन ठरलेलं आहे. देशावर प्रेम करणाऱ्या लोकांत माझ्यासंबंधी आदर आहे, हे माझं मोठं सद्भाग्य आहे. माझ्या जीवनातील अद्भुत घटनांचा विचार करून महात्माजींनीही माझ्यासंबंधी बरंच काही लिहिलं आहे. देशप्रेमाच्या धुंदीत अशी काही कार्यं माझ्या हातून घडली की सर्वांची माझ्याकडे दृष्टी वळली. अशा स्वरूपाचं कार्य करण्याची हिंमत बाळगणारा माणूस विरळाच असतो.

आज जे समाजोपयोगी कार्य मी स्वीकारलं आहे, तेही अत्यंत महत्त्वपूर्णच आहे अशा प्रकारच्या कार्यासाठी देखील एका निराळ्याच सामर्थ्याची गरज असते. अशा कार्यकर्त्यांचाही अभावच आहे. आज जे काम मी हाती घेतलं आहे, ते यशस्वीपणे पार पाडण्यासाठी मी शांतपणे आपली सर्व शक्ती त्यासाठी पणाला लावतो आहे. माझ्या या कार्याकडे लोकाचं जाव तेवढं लक्ष जात नाही. याचं कारण म्हणजे असं कार्य समजण्यासाठी जी विशिष्ट दृष्टी लागते, ती दृष्टी समाजामध्ये उत्पन्न झालेली नाही. एखादं काम किती महान स्वरूपाचं आहे, ह्याची जाणीव लोकांना तेव्हाच होते जेव्हा त्या कामाची सुंदर फळं लोकांना समक्ष दिसायला लागतात.

आतापावेतो मी जे काही कार्य केलं, ते अन्तःप्रेरणेनं केलं—कुणी सांगितलं म्हणून किंवा कुणी डिवचल्यामुळं नव्हे—जे काही केलं ते आपल्या बळावर केलं. आज देखील मी अन्तःकरणाच्या बळावरच हाती घेतलेलं काम करत आहे. ह्या कार्याचं महत्त्वही कालांतरानं लोकांच्या लक्षात येईल ह्याची मला पूर्ण खात्री आहे.

बहुसंख्य लोकांना जीवनातला सुखी काळच आठवणीत राहतो-त्यांची मनापासून तीव्र इच्छा असते की तेच जीवन त्यांना पुनःपुन्हा जगायला मिळावं. आपली सर्वांची अशीच मनोवृत्ती बनली आहे. हे लक्षात घेऊन सुद्धा, सुखी-समाधानी जीवन, आपल्याला मोठं बनवत नसतं, हे मान्य करावंच लागतं. सुखाची व चैनीची

भटकू लागली की मनुष्याला आपल्या कर्तव्याचा विसर पडतो. परंतु तरीही तो सुख आणि चैन यांच्याच मागे लागतो. लहानपणापासून ते आजपर्यंत माझं जीवन असं काही बनलेलं आहे की मला एकाहून एक बिकट अशा कसोट्यांचा सामना करावा लागला आहे. अनेकदा ज्या प्रकारच्या अग्नि-दिव्यातून मला जावं लागलं आहे त्याची कुणाला कल्पना करता येणंही शक्य नाही. मी त्या अग्नि-दिव्यांतूनही मोठ्या अभिमानानं सहीसलामत बाहेर आलो. आज वयाच्या ७८ व्या वर्षीही मी मान ताठ ठेवून, समोर बघून, गर्वानं चालतो. याचं महत्त्वाचं कारण एकच आहे. जीवन-संग्रामात मी कठोर तपाचरण केलं आहे. माझ्या मनाला आणि शरीराला खूप ताप सहन करावा लागला आहे. जीवनातल्या कसोटीच्या क्षणी मी जसा वागलो त्यामुळं स्वतःच्या व दुसऱ्याच्या दृष्टीनंही मी खूप उंची गाठू शकलो. आज त्या सर्व आठवणींनीच माझं मन आनंदानं नाचू लागतं.

आज आपण ज्या प्रकारच्या राजकीय, सामाजिक व नैतिक वातावरणात जगतो आहोत, ते वातावरण प्रेरणादायक नाही. मानव-समाज भोवतालच्या वातावरणातून प्रेरणा घेऊनच, आपली जगण्याची दिशा निश्चित करतो. जीवनाचा एक नियम आपण सदैव लक्षात ठेवला पाहिजे की प्रेरणादायक वातावरण आपोआप तयार होत नसतं. तेजस्वी व्यक्तिमत्त्वाची माणसंच आपल्या तेजानं वातावरणाला जिवंत बनवतात, चैतन्यानं भारावून टाकतात.

प्रत्येक माणसाला सामाजिक संचितातून आपल्याला सवलती मिळाव्यात असं वाटत असतं. प्रत्येक जबाबदार व्यक्तीनं, त्याच्या उदरनिर्वाहासाठी आवश्यक असेल तेवढंच समाजाकडून घ्यावं. सामाजिक भांडार नेहमी भरलेलं राहील यासाठी त्यानं प्रयत्न केले पाहिजेत.

देशाच्या ज्या महान व्यक्तिमत्त्वांच्या आठवणी माझ्या मनात उभ्या राहतात, त्यांनी दाखवलेल्या विशिष्ट मार्गानं जाण्याचाच मी सदैव प्रयत्न करतो. देशाला स्वातंत्र्य मिळावं यासाठी व तो सुरक्षित राहावा म्हणून मी जे काही कार्य केलं त्या आधारेच मी देशातील तरुणांना काही सांगण्याचं धाडस करतो आहे. समाज-जीवनात तुम्हाला सुरक्षित आणि सुदृढ बनून राहायचं असेल तर तुम्हालाही समाजाचं रक्षण केलं पाहिजे—आणि चांगल्या तऱ्हेनं जीवन कसं जगावं, हे शिकलं पाहिजे—हे मी त्यांना सतत सांगतो. हे ध्येय गाठायचं असेल तर त्यासाठी कठोर परिश्रम करावे लागतील, तपश्चर्या करावी लागेल—बळाची उपासना करावी लागेल—स्वतःवर बंधनं लादून यम-नियम सांभाळावे लागतील. संयमी बनावं लागेल. ह्याच जीवन-उद्देशाच्या सिद्धीसाठी प्रयत्नशील असणाऱ्या, देशातील जिवंत मनाच्या सर्व बालकांना हे पुस्तक मी अर्पण करत आहे.

## कोणकोणत्या योगायोगामुळं हे पुस्तक लिहिलं गेलं ?

माणूस ज्या ज्या भावनांनी प्रेरित होऊन कार्य करतो, त्या भावनांच्या व त्या कार्याच्या आठवणी सदैव त्याच्या मनात राहतात. मनाला भावलेल्या गोष्टींची आठवण वारंवार येते आणि त्या गोष्टींशी संबंधित असणाऱ्या मित्रांचाही उल्लेख अशा वेळी होत राहतो.

मी जे काही केलं होतं, माझ्या मनात जे विचारतरंग उत्पन्न झाले होते–त्या सर्व गोष्टी अंधूकपणे आठवत होत्या–त्या सर्व गोष्टी आपण शब्दबद्ध करणार आहोत–याची मात्र मी कधीच कल्पना केलेली नव्हती.

१७ मे १९३८ रोजी जेव्हा आत्मसमर्पणासंबंधी मी बापूजींशी बोललो तेव्हा मला माझी हकीकत थोड्या शब्दांत त्यांच्यापुढे मांडावी लागली. ती ऐकून बापूजींनी सविस्तरपणे ही हकीकत जाणून घेण्याची इच्छा प्रदर्शित केली. संक्षिप्त रूपातच ही हकीकत लिहून काढा, असं मला सांगण्यात आलं. माझी संक्षिप्त हकीकत बापूजींना खूपच अद्भुत वाटली. ही जीवन-गाथा विस्तारानं लिहिली गेली पाहिजे, असं त्यांचं मत पडलं. देशातील तरुणांना ती स्फूर्तिदायक ठरेल–संघर्षमय जीवन जगण्याचं स्वरूप त्यांना कळेल.

मी स्वतःच्या डोळ्यांनी स्वतःकडे बघत होतो. त्या दिवसानंतर मी मात्र स्वतःकडे एका महान व्यक्तीच्या दृष्टीने पाहू लागलो. मला खूप उल्हसित वाटलं आणि जेवढं लिहिता आलं तेवढं मी लिहिलं. ज्यांनी कुणी माझं हस्तलिखित वाचून बघितलं, त्या सर्वांना ते खूपच आवडलं. पुस्तक रूपानं हे सर्व मी प्रसिद्ध करावं असंही मला सांगण्यात आलं. मात्र पुस्तक प्रसिद्ध करताना मला जी बंधनं घालण्यात आली, ती मला मान्य नव्हती–म्हणून हे हस्तलिखित त्यावेळी पुस्तकरूपानं प्रसिद्ध होऊ शकलं नाही.

"काही वडीलधारी माणसं अशी आहेत ज्यांनी माझ्यावर पुत्रवत प्रेम केलं आणि कित्येकांनी मला भाऊ मानलं. अनेक तरुणांचा मी इष्ट मित्र होतो तर अनेकांचा गुरु आणि मार्गदर्शकही होतो–मला गुरु मानून माझी पूजा करणाऱ्यांचीही मोठी संख्या होती. अनेक मातांनी, भगिनींनी, चांगल्या घराण्यातल्या मुलींनीही माझ्यावर सदैव माया केलेली आहे.

अशा सर्वांचा, स्नेह व श्रद्धा, भक्ती आणि दया मला लाभली असली तरी त्यातल्या फारच थोड्या लोकांना मी संपूर्ण विश्वासात घेतलं होतं. यापैकी बहुतेक लोकांना मी माझी खरी ओळख, नाव-गाव सांगितलं नव्हतं. मोठ्या चातुर्यानं आपल्या

विषयी बनावट कथा रचून मी त्यांची सारं म्हणजे फसवणूकच केली होती. माझी बनावट हकीकत देतांना, भावना-भावनात्मक बदलत असे. या सर्व लोकांना मी फसवत होतो, पण मला मुळीच वाईट वाटत नव्हतं कारण एका महान ध्येयानं मी प्रेरित झालो होतो. त्यामुळे मला हे करणं भाग होतं. आता सर्व गोष्टी स्पष्ट झाल्या आहेत आणि त्याबद्दल निराळं काही सांगण्याची गरजही राहिलेली नाही.

अशा बिकट परिस्थितीत मला सर्वतो प्रकारचे साहाय्य करणाऱ्या देशबांधवां-संबंधी मी नेहमीच कृतज्ञ राहीन. त्या सर्वांचे आभार मानत असताना त्या सर्व संबंधित व्यक्तींची क्षमा मागतो, ज्यांना मला प्रामाणिकपणे सत्य परिस्थिती सांगता आली नव्हती.

त्या वेळी सत्य परिस्थिती कथन करण्याची मला हिंमत होत नव्हती. तसंच अशीही शक्यता होती की त्या लोकांपैकी फारच थोड्या लोकांना हे सत्य स्वीकारण्याची, ऐकून घेण्याची हिंमत झाली असती. हे मी आता स्वच्छ मनानं कबूल करतो.

वरील निवेदन मी इ. स. १९३९ साली माझं आत्मचरित्र प्रकाशित व्हायचं होतं म्हणून लिहिलं होतं.

१९४५ साली माझं हे सर्व वाङ्मय महापंडित राहुल सांकृत्यायन यांच्या हाती पडलं. त्यांना माझा हा जीवन-वृत्तान्त आवडला आणि त्याला पुस्तकाचं रूप द्यायचा विचार त्यांच्या मनात आला. कम्युनिस्ट पक्षाच्या नेत्यांशी विचारविनिमय करून त्यांनी पुस्तक लिहायला सुरुवात केली. परंतु त्यांच्या इच्छेनुसार आणि ठरवल्या-प्रमाणं ते पुस्तक लिहू शकले नाहीत. मध्य-आशियाचा इतिहास लिहिण्यासाठी त्यांना सोवियत रशियाला जावं लागलं. त्यांच्या लेखनाचं जे पुस्तक प्रकाशित झालं-त्या पुस्तकाचाही बराच गाजावाजा झाला परंतु स्वतः राहुलजींचं किंवा परिचित मित्रांचंही त्या पुस्तकानं समाधान झालं नाही. ते पुस्तकही चांगलंच लोकप्रिय झालं. पुस्तकाचे गुजराती, मराठी, सिन्धी व तेलगु भाषांतून अनुवादही झाले.

महात्मा गांधींनी त्यांचं लोकप्रिय साप्ताहिक "हरिजन" मधून माझ्या विषयी अनेकदा लिहिलं होतं. भारताच्या एका महान लेखकानं माझ्यावर जेव्हा पुस्तक लिहिलं व ते पुस्तक लोकांसमोर आलं तेव्हा देशातील तरुणांची दृष्टी माझ्याकडे वळली. उत्साही, तसंच देशप्रेमानं भारावलेले तरुण माझी सविस्तर हकीकत जाणून घेऊ इच्छित होते. तसंच शिक्षकांशी-विद्यार्थ्यांशी माझा संपर्क येऊ लागला, माझ्यासंबंधी अधिक जाणकारी त्यांना हवी आहे, हे लक्षात येऊ लागलं.

१९५६ साली शिमल्या जवळ "चैल" या ठिकाणी मी शिक्षकांसाठी एक शिबीर भरवलं होतं. हिमालयाच्या बर्फाच्छादित शिखरांनी वेढलेलं व साडे-सात हजार फूट उंचीवर असलेलं हे ठिकाण फारच सुंदर होतं. पतियाळाच्या महाराजांनी हे निसर्ग रम्य ठिकाण राहण्याच्या दृष्टीनं विकसित केलं होतं. अशा निसर्गरम्य ठिकाणी श्री. प्रतापसिंह कैरों आणि पंजाबच्या शिक्षणखात्याच्या सहकार्यानं ५०० तरुण व तरुणींचं हे शिबीर मी अडीच महिने चालवलं होतं. त्यांच्या मनात राष्ट्रीयत्वाची भावना निर्माण करण्याचा मी प्रयत्न केला होता. पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरूंनीही शिबिराला मुद्दाम भेट देऊन तरुणांचा उत्साह द्विगुणित केला होता. या तरुणांच्या आग्रहावरून मी त्यांना माझी आत्मकहाणी सांगितली होती. ही आत्मकहाणी टेपरेकॉर्डही करण्यात आली होती. लोकांना ती वारंवार ऐकावीशी वाटली. कहाणी ऐकणाऱ्या लोकांना विस्तृत जाणकारी व्हावी, असं वाटू लागलं.

ऐकणारे श्रोते भेटले म्हणजे कुणालाही आपली जीवन-कहाणी सांगाविशी वाटते. अनेक वर्षांच्या अनुभवानं मलाही हे जाणवलं की लोकांना माझी कहाणी ऐकाविशी वाटते, ती सांगताना मलाही मोठा हुरूप वाटतो, आनंद होतो.

जेलमध्ये बसून मी पुष्कळ लिहिलं होतं परंतु त्यालाही २५ वर्षं होऊन गेली होती. शिवाय ते लेखन इंग्रज सरकारच्या साक्षानं केलेलं होतं. म्हणून मी परत सुरुवातीपासून ते लिहायला घेतलं. एकसलग लिहिण्यासाठी वेळ मिळाला नाही. एका विशिष्ट मनोवस्थेत लेखन करण्याची, त्यात सातत्य राखण्याची जी गरज असते, तसं मला जमलं नाही. जेव्हा जेव्हा वेळ मिळे तेव्हा मी लिहीत असे. काही न काही लेखन होई. आता हे सर्व वाचणार कोण? असा प्रश्न पडला. मीच स्वत: ते वाचून काढावं आणि इतरांना वाचता येईल अशा पद्धतीनं परत लिहून काढावं, एवढा माझ्यापाशी वेळ नव्हता. मी एक साहाय्यक शोधून काढला. माझे एक स्नेही श्री. गणेश रघुनाथ वैशंपायन यांचे धाकटे बंधू श्री. काशीनाथ वैशंपायन यांना मी हे सर्व वाचून, आवश्यक त्या दुरुस्त्या करून, चांगल्या अक्षरांत लिहून काढण्याची विनंती केली. त्यांनी मोठ्या सौजन्यानं आणि उदार मनानं माझी विनंती मान्य केली. या कामासाठी ते मुद्दाम चंदीगडला माझ्याकडे येऊन राहिले. माझं गिचमिड अक्षरांत लिहिलेलं हस्तलिखित वाचून त्यांनी सुंदर हस्ताक्षरात ते सगळं परत लिहून काढलं, त्यासाठी खूपच त्रास त्यांना झाला. इतरांना वाचता येईल असं हस्तलिखित तयार झालं. यानंतर हे सर्व बाड टाईप करून घेतलं. अनेक मित्रांनी वाचून पाहिलं. आणखी सुधारणा करण्यात आल्या. सर्व उणीवा काढून टाकण्याचे प्रयत्न केले, परंतु तरीही हे काम कुणालाच पुरं करता आलं नाही.

माझे एक मित्र श्री. ओ. पी. आरिक, जे जालंदर रेडिओ स्टेशनवर मुलांचे कार्यक्रम सादर करत असत, त्यांनी बराच प्रयत्न केला परंतु वेळेअभावी तेही समाधानकारक-रीत्या हे काम पूर्ण करू शकले नाहीत.

१९५६ मध्ये जयपूर येथे, राजस्थानचे प्रसिद्ध कवी श्री. चंद्रसिंह यांच्याशी माझे निकटचे संबंध आले. त्यांचे "बादली" आणि "लू" हे काव्य तेव्हा खूप गाजत होतं. त्यांचे एक मित्र श्री. रावत सारस्वत यांच्याशीही माझा स्नेह जडून आला. ह्या दोन मित्रांनी मी माझी कथा लिहावी अशी सूचना केली. मी त्यांना सर्व वस्तुस्थिती सांगितली. या दोघांनी सगळ्या कामाची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली व मला निश्चिंत व्हायला सांगितलं. एका महिन्याच्या आतच त्यांनी माझ्या आत्म-चरित्राचं हस्तलिखित वाचून काढलं व किरकोळ व्याकरण-दोष दुरुस्त करण्यापलीकडे दुसरं काही करावं लागणार नाही, असं त्यांनी सांगितलं. सर्व प्रकारची मदत करण्याचं त्यांनी मान्य केल्यामुळे मी, जयपूरला दहा दिवस त्यांच्यासमवेत बसलो. श्री. चंद्रसिंह, श्री. रावत सारस्वत व त्यांचे मित्र श्री. भूरसिंह राठोड, यांच्या मदतीनं काम पूर्ण झालं.

श्री काशीनाथ वैशंपायन, काव्यतीर्थ श्री. चन्द्रसिंह, श्री. रावत सारस्वत आणि श्री. भूरसिंहजी राठोड यांचं बहुमोल साहाय्य मिळालं नसतं तर मी हे पुस्तक वाचकांच्या हाती देऊ शकलो नसतो.

माझ्या आत्मकथेला भूमिका किंवा प्रास्ताविक लिहिण्याची विनंती मी कै. डॉ. राजेंद्र प्रसादजींना केली होती. माझ्या जीवनकार्याची त्यांना चांगली ओळख होती. पुस्तकाची छपाई आटोपल्या बरोबर पुस्तक आपल्याकडे पाठवू काय? असं मी त्यांना विचारलं होतं. यावर ते म्हणाले होते की माझं जीवनकार्य त्यांनी वाचलेलं आहे, पुस्तक वाचण्याची गरजच कुठं आहे? मी तसंच लिहू शकेन. हे लिहिण्यापूर्वीच दुर्दैवानं त्यांचं निधन झालं.

यानंतर मी पंडित जवाहरलाल नेहरू यांना "भूमिका" लिहिण्याची विनंती केली. पंडितजींनी मोठ्या आनंदानं संमती दिली व छपाई झाल्याबरोबर पुस्तक पाठविण्या-विषयी त्यांनी सांगितलं. परंतु परमेश्वराला हे देखील मंजूर नव्हतं. पुस्तकाची छपाई होण्यापूर्वीच तेही आमच्यावर रागावून कायमचे निघून गेले.

अचानकच माझं लक्ष हिन्दी साहित्य क्षेत्रातील विख्यात साहित्यिक श्री. हजारीप्रसादजी द्विवेदी यांच्याकडे गेलं. पंडितजी या सुमारास पंजाब युनिवर्सिटीमध्ये हिन्दी विभागाचे प्रमुख आहेत. मी मोठ्या मुदैवी की पंडित द्विवेदी यांनी माझी विनंती आनंदाने मान्य केली आणि पुस्तकासंबंधी "दोन शब्द" लिहून त्यांनी मला उपकृत केलं.

पुस्तक प्रकाशनासंबंधी मला अनेक मित्रांनी सूचना केल्या. काही प्रकाशकांनी मागितलं परंतु व्यावसायिक प्रकाशकाकडे हे काम देण्याऐवजी मी माझी आत्मकहाणी स्वतःच प्रसिद्ध करावी, असं ठरवलं. माझी मुलगी "प्रज्ञा" हिच्या नावानं स्थापन केलेल्या "प्रज्ञा प्रकाशना" तर्फे हे पुस्तक प्रसिद्ध करण्यात आलं.

पुस्तकाच्या छपाईचं काम "राजस्थान राज्य सहकारी मुद्रणालय लिमिटेड" जयपूर या प्रेसला सोपवण्यात आलं. माझे एक स्नेही या प्रेसशी संबंधित होते. प्रेसच्या व्यवस्थापकांनी व अन्य कर्मचाऱ्यांनी मोठ्या निष्ठेने व आत्मीयतेने, ग्रंथाच्या छपाईकडे लक्ष पुरवलं व कुठलीही उणीव राहू दिली नाही. छपाईच्या या कामात कितीही काळजी घेतली तरी काही मुद्रण-दोष राहूनच जातात. फार मोठे मुद्रण-दोष राहिलेले नाहीत, किरकोळ दोष आहेत. वाचक या सर्व गोष्टींकडे उदार मनाने बघतील, या अपेक्षेने हे पुस्तक त्यांच्या हाती देत आहे. पुढील आवृत्तीतून हे दोष काढून टाकण्याचा अवश्य प्रयत्न करू.

ही सारी कहाणी सांगत असताना पुष्कळशा महत्त्वाच्या पत्रांसंबंधी मी विस्तारभयास्तव फारसं सांगू शकलो नाही. अशी पत्रं आणि अन्य काही बाबी, ज्यांचा पुस्तकात समावेश करता आला नाही, त्यांचं परिशिष्ट पुस्तकाला जोडलेलं आहे. बारकाईनं वाचणाऱ्या वाचकांनी ही पत्रंही वाचावीत, अशी माझी विनंती आहे. यांपैकी काही पत्रं व पुस्तकात उद्धृत केलेली काही पत्रं मूळ हिंदीतच लिहिलेली आहेत. अनेक पत्रांचा हिंदी अनुवाद प्रसिद्ध केलेला आहे.

पृथ्वीसिंह.

# अनुक्रमणिका

स्वातंत्र्य : ज्योतीवर झेपावलेल्या पतंगांना

## बाळपणची आठवण १

ह्या विश्वामध्ये प्राणिमात्राचे अस्तित्वच त्याच्या 'अहं' ची स्थापना करते. जीवनाच्या वाटचालीमध्ये या 'अहं' ची पुष्टी तरी होते किंवा त्याला नष्ट करून टाकण्याचे प्रयत्न चालू राहतात. सृष्टीच्या प्रारंभीही हेच 'अहं' तत्त्व अस्तित्वात असते. माझी आत्मकथा सांगत असताना, या 'अहं' चा मला पदोपदी आश्रय घेणे भागच आहे. या 'अहं' ला पुसून टाकण्याचा मी किती प्रयत्न केला, का केला, ही सर्वच हकीकत पुढील पृष्ठांमधून आपोआपच सुस्पष्ट होईल.

जगामधली बहुतेक बालकं आपापल्या कुटुंबातील अमूल्य रत्नं म्हणूनच जन्माला येतात. माझ्या या जगातल्या पहिल्या टाहोनं माझ्या माता-पित्याच्या मनातही आनंदलहरी निर्माण केल्या. ज्या स्थळी माझं बाळपणाचं हसू-रडू निनादलं, ते भारताचं लाडकं स्थान होतं 'लालडू'. चला, मी तुम्हाला आता लालडूला घेऊन जातो.

आपण पंजाब प्रांतातील अंबाला-कालका सडकेने चाललो आहोत. अंबाला शहरापासून आपण सात मैल दूर पोचलो आहोत—एका छोटयाशा खेडयात दाखल झालो आहोत—हे छोटं खेडं म्हणजेच लालडू. या गावात चौधरी मंडळींची आळी विशेष प्रसिद्ध आहे. या चौधरी मंडळींपैकी एक घराणं फाडिया नावाचं आहे—या घराण्याचे एक पुत्र होते चौधरी शादीराम—हेच माझे वडील.

माझे आजोबा अर्जुनसिंह—ते एकूण चार भाऊ होते. त्यांची आर्थिक परिस्थिती समाधानकारक नसली तरी त्यांची शारीरिक संपत्ती डोळ्यात भरण्यासारखी होती. अंगापिंडाने ते मजबूत बांध्याचे होते. आजूबाजूच्या गावांतील लोक त्यांच्या शारीरिक बळाला वचकून होते. योजना बळ आणि वीरता त्यांना वारसाहक्कानेच प्राप्त झाली होती. धन-संपत्तीची उणीव असली तरी चौधरी घराण्याच्या शौर्याची परंपरा त्यांनी सांभाळली. गावात अपराध करणाऱ्याला शासन करण्याचा अधिकार सर्व गावकऱ्यांनी या चौधरी घराण्याला बहाल केला होता. गोऱ्या 'साहेबां' विषयी प्रथमपासूनच त्यांच्या मनात घृणा होती.

एके दिवशीची ही हकिकत आहे—माझे आजोबा निहालसिंहजी आपल्या बंधूसाठी भाकरीचे गाठोडे घेऊन शेताला निघाले. आजूबाजूच्या शेता-शिवारात शिकारीच्या प्रयत्नात असलेल्या चार गोऱ्या शिपायांवर त्यांची दृष्टी पडली. या गोऱ्या मंडळींना सत्तेची नशा चढलेली होती. या गोऱ्या शिपायांनी आजोबांना त्रास द्यायला सुरुवात केली. आजोबांनी

भाकऱ्यांचे गाठोडे एका लाठीच्या टोकाला बांधून, खांद्यावर घेऊन ते निघाले होते. गोऱ्या शिपायांबरोबर सामना करण्यासाठी त्यांच्यापाशी लाठीशिवाय अन्य कुठलेच शस्त्र नव्हते. त्यांनी गोऱ्या शिपायांवर वेगाने लाठीचे प्रहार केले—लाठीच्या प्रहारांनी गोरे शिपाई निळे-पिवळे पडले. त्यांना तसेच गाफील-कुंथत ठेवून आजोबा चपळाईने कुठेतरी निघून गेले. या घटनेनंतर गावात पोलीस आले. त्यांनी तरुण मंडळींना एकत्र जमवून झाल्या प्रकाराची चौकशी केली. काही मंडळींना लाथा-बुक्क्यांचा प्रसादही दिला, परंतु कुणाच्याही तोंडून 'ब्र' देखील निघाला नाही. असा होता माझ्या आजोबांचा दरारा गावातल्या लोकांवर!

माझी आई चौहान वंशाची स्त्री होती. नाव होतं तिचं चमेली. डोंगरी नदी-काठावरील सर्कपूर-टावर नावाच्या गावात तिचा जन्म झाला होता. माझ्या आईला चार भाऊ होते. या माझ्या सर्वच मामांना जंगली श्वापदांची शिकार करण्याची विलक्षण आवड होती. शौर्याबद्दल त्यांची त्या विभागात विशेष ख्याती होती.

भारतीय परंपरेनुसार पहिल्या अपत्याचा जन्म बहुधा त्याच्या आजोळी होतो. बाळंतिणीचं आणि नवजात बालकाचं चांगलं संगोपन व्हावं—असा या मागे दृष्टिकोण होता. माझा जन्म माझ्या आजोळी १५ सप्टेंबर, १८९२, रोजी झाला. माझे आई-वडील दोघेही देखणे होते, सुदृढ बांध्याचे होते. भट्टी वंशात अशी प्रथा रूढ आहे की मुलाचा जन्म झाल्याबरोबर त्याला तलवारीच्या धारेचा स्पर्श केलेली घुटी पाजण्यात येते. हेतु हा की पुढील काळात या मुलाने तलवारीच्या साहाय्याने मूल्यवान गोष्टींचे रक्षण करावे—मुलगा शूर निपजावा. मुलगी जन्मली असेल तर तिला दीपज्योती दाखवण्यात येते. दीपज्योती ही प्रकाशाचे आणि सतित्वाचे प्रतिक मानली जाते.

असं म्हणतात की जवळपास तीनशे वर्षांपूर्वी माझ्या घराण्यातील पूर्वजांना दुष्काळी परिस्थितीमुळे आपली मातृभूमी "जैसलमेर" (राजस्थान) सोडून अन्यत्र जावे लागले होते. अगदी अशाच परिस्थितीमुळे माझ्या वडिलांना—शार्दूलसिंह यांना—आपले जन्म-गाव "लालडू" हे सोडावे लागले. त्यांचे थोरले बंधू, माझे काका नारायणसिंह, हे बर्मा (ब्रह्मदेशात) मध्ये सैन्यात पोलिस अधिकारी म्हणून काम करत होते—माझे वडील त्यांच्याकडे गेले. गावातल्या एका सावकाराकडून वडिलांनी ३० रुपये कर्ज म्हणून काढले व त्याआधारे ब्रह्मदेशापर्यंतचा प्रवास त्यांनी केला. गावात बलशाली म्हणून ओळखल्या जाणाऱ्या माझ्या पित्याला दुष्काळी परिस्थितीचे चटके असह्य झाले. हातपाय चोरत जीवनाचा त्याग करणेही त्यांना जमले नाही. वडिलांनी काढलेल्या ३० रुपये कर्जाची रक्कम चक्रवाढ व्याजाने रु. ८०० च्या घरात जाऊन पोचली. वडिलांनी पुढील काळात ही सर्व रक्कम फेडली व ते कर्जमुक्त झाले.

अत्यंत हलाखीच्या परिस्थितीमुळे वडिलांना निरुपायानें जेव्हा घराचा त्याग करून बाहेर पडावें लागलें तेव्हा मी अगदीच लहान बालक होतों. वडील ब्रह्मदेशाला निघून गेल्यानंतर दुष्काळामुळे ज्या शारीरिक व मानसिक यातना माझ्या वाट्याला आल्या—त्या मला आजही चांगल्या आठवतात.

माझे आजोबा 'श्री. तुकाराम' हे एक सुदृढ बांध्याचे शेतकरी होते. ते भल्या पहाटेच उठून घराबाहेर पडत व जंगलांत तीस-चाळीस मैलांची पायपीट करून सायंकाळीं घरीं परत येत. हा त्यांचा नेहमीचाच दिनक्रम बनला होता. दिवसभर ते कुठंतरी मोलमजुरी करत—मजुरी मिळाली नाहीं तर क्वचित चोरीही करत. माझ्या आईच्या व आम्हा दोघा भावंडांना जगवण्यासाठीं ते कांहीं न कांहीं घरीं घेऊन येत. ते जे पदार्थ आणत असत, त्यातल्या भाकऱ्यांची आजही मला आठवण आहे. भाकर कुटून बारीक करत व ते पाण्यात टाकून शिजवण्यात येत. दुष्काळाच्या त्या भयंकर दिवसांत, आजोबांनी आणलेल्या या कंदमुळांचं भक्षण करून आम्ही जीव वाचवण्यास समर्थ झालो होतो.

चमेली (जाईचें फूल) कडक उन्ह कसं सहन करणार? माझी आई चमेली देखील दुष्काळाच्या यातना अधिक काळ सहन करू शकली नाहीं. ती हळूहळू कोमेजू लागली; खंगू लागली आणि एके दिवशीं अळमद फांदीवरून गळून पडली. वडाखालीं झाकलेलं तिचं पार्थिव आजही माझ्या डोळ्यांपुढं येतं—ती आठवण मला अस्वस्थ करून सोडते.

बाळपणातील फारच थोडे दिवस मी लाखडू या गांवीं काढले. त्या काळांत घडलेली एक भयंकर घटना आजतागायत माझ्या मनात ठाण मांडून बसली आहे. सिमल्याला जाणाऱ्या गोऱ्या फौजांचा तळ कांहीं काळ लाखडू येथे पडलेला होता. फौजांचा तळ उठला म्हणजे गावातली मुलं त्या ठिकाणीं जाऊन विविध वस्तू गोळा करत. कांहीं नाणीं, चाकू, बटनं, बुटांचे दोर, कागद, पेन्सिली इ. वस्तू मुलांना सापडत. मीही माझ्या सवंगड्यांसमवेत फौज उतरली होती त्या जागी जायचो. एके दिवशीं उकिरडा शोधत असतांना एक काडतूस मला गवसलं. काडतूस घेऊन सरळ मी घराची वाट धरली. माझ्यापाशीं काडतूस आहे, ही गोष्ट मी कुणालाच सांगितली नाहीं. माझ्या असं ऐकिवात होतं की काडतुसात दारू भरलेली असते आणि त्याला अग्नीचा स्पर्श झाला की त्यातून गोळी बाहेर पडते. ही गोष्ट प्रयोग करूनच सिद्ध करावी असं मी मनोमन ठरवलं. घरात चूल पेटलेली होती. माझी आजी चुलीपुढं बसून स्वयंपाक करत होती. मी हळूच चुलीजवळ जाऊन बसलो व हातातलं काडतूस विस्तवावर ठेवून दिलं. तात्काळ मोठा स्फोट झाला आणि काडतुसातील गोळी बाहेर पडून आजीच्या पायात घुसली. आजीला गोळी लागताच तिच्या पायातून रक्ताची धार निघाली. स्फोटाचा प्रचंड आवाज बाजूच्या घरातील लोकांच्याही कानांवर पडला. आजूबाजूच्या सर्व स्त्रियांची आमच्या स्वयंपाकघरात एकच गर्दी उसळली. या घटनेने भयभीत होऊन मी घराबाहेर पळ काढला.

रात्री उशीरापर्यंत मी इकडे तिकडे भटकत राहिलो परंतु पोटात जेव्हा कावळे "काव-काव" करू लागले तेव्हा मी निमूटपणे घरी परतलो. आजी-आजोबांनी साध्या शब्दानेही मला झाल्या प्रकाराबद्दल जेव्हा विचारलं नाही, तेव्हा माझ्या आश्चर्याला पारावार राहिला नाही. त्यांची सहनशीलता व नातवंडांविषयीची ममता, या बाबींनी माझ्या मनात कायमचं घर केलं. ते दृश्य मी कधीच विसरू शकत नाही.

धनुष्य-बाण घेऊन खेळण्याची मला भारीच आवड होती. हा खेळ खेळताना मी, माझा धाकटा भाऊ दीप्तिसिंह यालाही सामील करून घेत असे. एकेदिवशी आम्ही दोघांनीही धनुष्य हाती घेऊन, अणकुचीदार टोकांचे बाण त्याला जोडून आम्ही एकमेकांच्या समोर बसलो. मी जोरात बाण सोडला, तो माझ्या भावाच्या पोटात घुसला. बाणाच्या आत घुसलेल्या टोकाचा त्याला त्रास होऊ लागला म्हणून तो जोरजोरात किंचाळू लागला. मी बाणाचे ते तीक्ष्ण टोक कसेबसे बाहेर काढले व तिथून धूम ठोकली. मग मी दिवसभर लपून बसलो. सायंकाळी पोटात भूक कुरतडू लागली तेव्हा मी निमूटपणे घरी परतलो. आपल्याला सर्वांची बोलणी बसणार अशी आशंका होती परंतु कुणी शब्दानेही झाल्या प्रकाराबद्दल विचारले नाही. ह्यामुळे तर मला स्वतःची खूपच लाज वाटली. आजी-आजोबा माझ्यावर खूप प्रेम करत होते. आई-वडिलांच्या मायेला मुकलेल्या माझ्या-सारख्या पोरक्या मुलाला दरडावणे किंवा शिक्षा करणे उचित नव्हे, असाच बहुधा त्यांचा दृष्टिकोण असावा.

आमच्या गावात तसेच आजूबाजूच्या गावांत देखील माझ्या आजोबांचा चांगला दरारा होता. त्यांच्या ताकदीची बरोबरी करणारा कुणी नव्हताच. दुष्काळी परिस्थितीत त्यांनी आमचं संगोपन केलं होतं. आजोबा आणि आजी देवाघरी निघून गेल्यानंतर आम्हाला कुणाचाच आधार राहिला नाही. मामा आले व ते आम्हाला आजोळी घेऊन गेले. वयाची जी दहा वर्षे आम्ही तिथं काढली, ती माझ्या भावी जीवनाचं एक अभिन्न अंग बनली. कुठल्याही आपत्तींनी डगमगून जायचं नाही, हा धडा मला बालपणीच शिकायला मिळाला.

आमच्या मामींनी व आजीने मोठ्या प्रेमाने आम्हाला सांभाळलं. मामा सकंपूर टाबर या गावी राहत होते व तिथं शाळा नव्हती. अगदी जवळची शाळा "राणीचं रायपूर" या गावी होती व हे ठिकाण आमच्या गावापासून पाच मैलांच्या अंतरावर होतं. आमच्या गावातील मोठ्या वयाची मुलं या शाळेत जात होती मात्र आमचं छोटं वय ध्यानात घेऊन दररोजची दहा मैलांची पायपीट मामांनी आमच्या वाट्याला येऊ दिली नाही. त्यांनी आम्हाला शाळेत दाखल केलं नाही. शारीरिक कष्ट वाचले पण दहा वर्षांचा होऊनही मला अक्षर ओळख झाली नव्हती.

मामा जेव्हा शिकारीसाठी बाहेर पडत तेव्हा ते मलाही जंगलात घेऊन जात. जंगली श्वापदांपासून शेताची राखण करण्याचं काम माझ्या वाट्याला आलं होतं. रात्रीच्या वेळी अंधारात देखील मला शेतावर जेवण पोचवावं लागे. या दिनचर्येमुळे मी अखंड सावधानता बाळगायला शिकलो. आरोग्य, शक्ती आणि साहस मला लाभलं. या काळात एक खेळ माझ्या विशेष आवडीचा होता. शेजारच्या गावातली चरायला मोकळी सोडलेली घोडी पकडायची व त्यांच्या पाठीवर स्वार होऊन त्यांना खूप पळवायचं. एके दिवशी असाच मी एका घोडीवर स्वार होऊन शिवारात भटकत होतो. त्या घोडीनं दौड लगावताच तिचे दोन्ही पाय जमिनीत घुसले. घोडी एकाएकी थांबल्यामुळे मी फेकला गेलो तो एकदम तिच्या पुढ्यात. घोडीनं माझ्यावरून पुढे उडी घेतली. तिचे पाय जर का माझ्या छातीवर पडले असते, तर ही आत्मकहाणी इथेच पूर्ण झाली असती!

लहानपणी झाडांवर चढून (सूर-पारंबी) या एकमेकांना शिवण्याचा खेळ खेळण्याची मला भारी हौस होती. या खेळात एक मुलगा लाकडी दंडुका पाय फाकवून दूर भिरकावून द्यायचा व बाकीची मुलं झाडावर चढायची. दंडुका भिरकावून त्या मुलाने झाडावर चढणाऱ्या मुलांपैकी कुणाला पकडलं की मग तो मुलगा दंडुका शोधून तो दूर फेकायचा व शिवण्यासाठी झाडाकडे धावत यायचा. एके दिवशी माझा एक सोबती मला पकडण्याच्या प्रयत्नात होता. त्याला चुकविण्याच्या धांदलीत मी झाडाच्या टोकापर्यंत वर गेलो आणि एका बारक्याशा फांदीवर येऊन पोचलो. फांदी खूपच बारीक असल्यामुळे ती माझ्या ओझ्याने कडकन मोडली मी खाली आपटलो. खाली कोसळताना झाडाची एक जाड फांदी माझ्या चेहऱ्याला घासटून लागली व माझ्या गालाला चांगलाच मार बसला. तेव्हाची ती खूण आजही माझ्या चेहऱ्यावर विद्यमान आहे. नशीब की माझं एखादं हाड मोडलं नाही. खाली आपटताच मला झालेल्या जखमेतून रक्त येऊ लागलं. खेड्यात अशा पडण्या-झडण्यावर वैद्यकीय उपचार कुठून होणार? घरच्या मंडळींनी धाक-दपटशा दाखवला. तो सहन करणे भागच होते. लहान मुलांची अचाट नैसर्गिक शक्ती हाच त्यांचा खरा आधार असतो.

डांगरी नदीच्या पलीकडच्या किनाऱ्यावर दोन गांव आहेत. बरवाला आणि बतोड. दोन्ही गावातील गुराखी आपली गुरं नदीकाठी चरायला घेऊन येत. गुरं मजेत चरत राहायची आणि आम्ही वाळवंटात घोडी दामटायचे. आमच्या त्या आनंदी जीवनात तहान-भूक, थकावट यांना अजिबात स्थान नव्हते. हसण्या-खिदळण्यात सर्व श्रमाचा विसर पडे आणि भूक लागली की सरळ म्हशींचे सड पिळून दूध प्यायचे. असा आमचा खाक्या असे.

चातुर्मास आटोपला म्हणजे नदीच्या काठावरील गवत खूप उंच वाढलेले असे. कनावर त्या उंच गवतात गडप होत असत आणि मग आम्ही शेजारच्या खेड्यातील गुराख्यांवर चढाई करत असू. त्यांच्या काठ्या हिसकावून घेत असू. क्वचित तेही आमच्यावर मात करत.

एके दिवशीची गोष्ट, मी आमच्या गुरांचा शोध घेत जरा पुढं निघून गेलो. माझ्या हातात काठी होती आणि मनात पोरवयाची घमेंड होती. मी स्वतःला अगदी तिसमारखान समजत होतो! बघता बघता मुलांच्या एका टोळक्यानं मला घेरलं. माझी काठी त्यांनी हिसकावून घेतली व मला बेदम चोप दिला. त्यांच्यापासून कशीबशी सुटका करून घेऊन मी तडक माझ्या मामाकडे त्यांची तक्रार घेऊन गेलो. मामांनी माझीच खरडपट्टी काढली. ते म्हणाले, "त्या मुलांची तक्रार करायला तुला लाज नाही वाटत? अरे! तू चौहानचा भाचा आहेस. चेहरा पडायला काय झालं?"

मामांनी दरडावताच माझ्याही मनात चौहान कुटुंबाचा जोश जागृत झाला. काही दिवसांनी माझे घाव बुजले, जखमा बऱ्या झाल्या. मी माझे साथीदार एकत्र केले व आमच्या टोळक्याने शेजारच्या गावातील मुलांवर चढाई केली. ज्या मुलांनी मला पिटलेलं होतं त्यांना मीही चांगलं पिटून काढलं. सर्वांच्या काठ्या आम्ही हिरावून घेतल्या. मी मनात म्हटलं चला. आता मामांची तक्रार आपण दूर केली !

आजोळी माझे दिवस अगदी मजेत गेले. माझ्या मनातून सर्व प्रकारची भीती नाहीशी झाली होती. जंगली जनावरांना पकडणं, जखमी श्वापदांचा पाठलाग करणं, ह्या गोष्टीत मी अगदी तरबेज झालो. येथल्या वातावरणानं माझ्या हृदयात साहसपूर्ण आत्मविश्वास निर्माण केला. आजोळी मला लाभलेली ही एक देणगीच होती.

आईचं निधन माझ्यासमोरच झालं होतं. वडील कुठे आहेत व ते आम्हाला कशी मदत करणार, याचा काहीच पत्ता नव्हता. एक दिवस आम्ही दोघे भाऊ नदीकाठाने गुरं राखत होतो तेव्हा अचानकच लालडू गावचा एक माणूस आम्हाला भेटला. त्यानं आम्हाला एक विलक्षणच हकिकत सांगितली. तो म्हणाला "अरे मुलांनो! तुमच्या वडिलांनी तुमच्यासाठी शंभर रुपये मनीऑर्डरने पाठवले आहेत. गेल्या साठ वर्षांत लालडू गावात कुणाला शंभर रुपयांची मनीऑर्डर क्वचितच आली असेल." जत्रा वगैरेच्या निमित्तानं कधी एक-दोन पैसे माझ्या हातात पडले असतील मात्र शंभर रुपयांची मनीऑर्डर ही गोष्ट माझ्या कल्पनाशक्तीच्या पलीकडची होती. शंभर रुपये हातात पडणार या नुसत्या बातमीने एका शेतकरी कुटुंबातील मुलाच्या मनात काय काय तुफान निर्माण झालं असेल ह्याची कल्पना करणं सोपं नाही.

मी अगोदरच सांगितलं होतं की आमचे वडील दुष्काळी परिस्थितीमुळे हतबल होऊन त्यांचे बंधू नारायणसिंहजींकडे ब्रह्मदेशात निघून गेले. नारायणसिंह चौधरी सैन्यात नोकरी करत होते. त्यांनी "पोलो" या खेळात ख्याती प्राप्त केली होती. इंग्रज अधिकाऱ्यांना त्यांच्याविषयी आदर होता. या अधिकाऱ्यांनी माझ्या वडिलांना बघितलं तेव्हा ते खूश झाले. माझ्या वडिलांनीही सैन्यात भरती व्हावं असा त्यांनी सल्ला दिला. माझ्या

वडिलांनाही हा सल्ला पसंत पडून ते तीन वेळा सैन्यभरतीच्या ऑफिसात गेले परंतु त्या अधिकाऱ्यांची व त्यांची गाठच पडली नाही. शेवटी कंटाळून त्यांनी सैन्यात भरती होण्याचा नाद सोडून दिला. माझ्या काकांनी व त्या अधिकाऱ्यांनी नंतर परत माझ्या वडिलांवर खूप दबाव आणला परंतु वडील बधले नाहीत—आपल्या निर्धारावर ते ठाम राहिले. वडिलांच्या या निश्चयामुळे चौधरी नारायणसिंह त्यांच्यावर रुष्ट झाले व भावा-भावात बराच तणावही निर्माण झाला. शेवटी गोष्टी या थराला जाऊन पोचल्या की नारायणसिंह यांनी वडिलांना कुठल्याही प्रकारे मदत करायची नाही, असं ठरवलं. वडिलांनी स्वतःच आपली योजना तयार केली. त्यांनी आपल्या मित्राकडून काही पैसे घेऊन चार गायी खरेदी केल्या आणि दुधाचा धंदा सुरू केला. वडील एक अडाणी शेतकरी होते व व्यापार-धंद्याचा त्यांना बिलकूल अनुभव नव्हता. सैन्यात भरती होण्याची कल्पना तर त्यांनी सोडूनच दिली होती. दुधाच्या धंद्याव्यतिरिक्त अन्य कुठलाच व्यवसाय त्यांच्या दृष्टिपथात आला नाही. ते जन्मजात शेतकरी होते म्हणून गायींचं पालन-पोषण हे काम खूपच सोपं होतं. बर्मी लोकांना दुधाचा वापर करण्याची सवय नव्हती, यामुळं तिथं गेलेल्या भारतीय सैनिकांना दूध मिळणं दुष्कर होतं. या सैनिकांमुळे वडिलांचा दुधाचा धंदा चांगला चालला. धंद्यात बरकत होऊ लागली तसे ते अधिकाधिक गायी खरेदी करू लागले. अधिक दुधामुळे त्यांचे उत्पन्नही वाढले.

नारायणसिंह चौधरींचा विवाह झाला नव्हता. वडिलांनी आपल्या प्राप्तीतून विशिष्ट रक्कम त्यांच्या हवाली केली व आपल्या प्रांतात जाऊन लग्न करण्याची त्यांना सूचना केली. तिथे गेल्यावर आपल्या दोन मुलांच्या शिक्षणाची सोय करण्यासही त्यांनी सांगितले व ब्रह्मदेशात परत येते वेळी आम्हा मुलांना सोबत आणण्यास सांगितले.

नारायणसिंहजी लालडूला येऊन पोचले आणि आम्हा दोघा भावांना कपडे शिवण्यासाठी टाकायचे म्हणून 'टावर' गावाहून बोलावून घेतले. दारिद्र्य आणि दुष्काळाने आमचे कपडे हिरावून घेतले होते. आम्हाला अधिकात अधिक तीन कपडे मिळायचे—एक छोटासा अंगरखा, एक कुर्ता आणि डोक्यावर टोपी किंवा क्वचित साफा (मुंडासे). कमरेला लंगोटी आणि डोक्याला काहीच नाही, असेच बहुधा घडायचे.

आमच्या गावी पोचताच नारायणसिंहजींनी अम्बाला येथून आमच्यासाठी कापड मागवले व कपडे शिवायला दिले. अशाप्रकारचं कापड आम्ही या अगोदर पाहिलं देखील नव्हतं, अंगावर घालण्याची गोष्ट तर अलाहिद्राच. अम्बाला शहरातून आणलेली कपड्यांची पेटी आम्हा भावंडांना मिळाली तेव्हा आमच्या आनंदाला पारावार राहिला नाही. स्वच्छ, नवे कोरे व रंगी बेरंगी कपडे घालून आम्ही जेव्हा गावात भटकू लागलो, तेव्हा गावातले लोक विचित्र नजरेने आमच्याकडे बघत होते.

पाचव्या इयत्तेपर्यंत शिक्षण देणारी एक शाळा लालडू येथे होती. या शाळेत आमची नावं घालण्यात आली. लालडू गावातली ही शाळा म्हणजे हुबेहूब आजही एखाद्या खेड्यातली शाळा असते, तशीच होती. शाळेच्या चार भिंतींच्या जगात खाली जमिनीवर बसून मूळाक्षरे मी शिकू लागलो. शाळेची एकच खोली होती आणि पाचही वर्ग तिथेच भरत. शिवाय शिक्षकही एकच होते. शाळेतल्या इतर मुलांच्या तुलनेत मी व माझा भाऊ अंगा-पिंडाने थोराडच होतो. यामुळे त्यांच्या समवेत बसून शिकायचा आम्हाला संकोच वाटू लागला. दहा वर्षांच्या काळात मी कधी पाच मिनिटं एका जागी शांतपणे बसलो नव्हतो मात्र आता शाळेत पाच तास बसावे लागले. हे तर फारच त्रासदायक होते. आज जेव्हा मी प्राथमिक शाळेची पाहणी करण्यासाठी दौऱ्यावर निघतो आणि शाळेत निमूटपणे बसलेली लहान लहान मुलं पाहतो तेव्हा मला माझं बाळपण आठवतं. ही मुलं देखील माझ्या प्रमाणेच आपल्या आई-वडिलांना, शिक्षकांना, मनातल्या मनात शिव्या मोजत असली पाहिजेत. पाच दिवसांनंतर पतियाळाहून शाळा-तपासणीसाठी एक अधिकारी गावात आले. ते यायच्या आधी गुरुजींनी आम्हा सर्व मुलांना शाळेची साफ-सफाई करण्याच्या कामास जुंपले. माझा बांधा आणि चांगले कपडे बघून अधिकाऱ्याचे माझ्याकडे लक्ष गेले व त्याने माझ्यासंबंधी शिक्षकांना काहीबाही विचारले. शिक्षकांनी त्यांना काय सांगितले, हे मला समजू शकले नाही मात्र आमच्याकडे लक्षपूर्वक बघून त्या अधिकाऱ्याच्या तोंडून जे उद्गार बाहेर पडले ते माझ्या आजही आठवणीत आहेत. तो म्हणाला—"मास्तरसाहेब, ह्या मुलावर नीट लक्ष ठेवा !"

नारायणसिंहजींचा विवाह झाला. आम्ही दोघंही वरातीत सामील झालो. या अगोदर वरातीबरोबर मिरवण्याची आम्हाला कधीच संधी मिळाली नव्हती. मिष्टान्नावर मी तर अगदी तुटून पडलो. याच कारणामुळं लग्नसमारंभ आणि वरातीच्या इतर सर्व गोष्टींचा मला विसर पडला.

## लालडूहून रंगूनला

चौधरी नारायणसिंहजींची रजा संपली व ते आम्हा दोघा भावांना सोबत घेऊन ब्रह्मदेशाकडे निघाले. रेल्वेने प्रवास करण्याची माझी ही पहिलीच वेळ होती. तसं बघितल्यास रेल्वे-स्टेशन आमच्या गावाजवळच होतं आणि आगगाड्या दररोज आमच्या डोळ्यादेखतच धावत होत्या परंतु त्या गाडीत बसून प्रवास करण्याचं भाग्य अजून आम्हाला लाभलं नव्हतं. ज्या वडिलांनी आमच्यासाठी पैसे पाठवले व नवीन आकर्षक रंगांचे कपडे आम्हाला बनवून दिले, त्यांच्या भेटीसाठीच आम्ही आता निघालो होतो. काकांच्या समवेत आम्हाला बोलावून, ते आमच्या शिकण्या सवरण्याचीही व्यवस्था करणार होते. आमची भेट झाल्यावर ते आमचे कसे लाड करतील याची तर मी कल्पनाही करू शकत नव्हतो. मनात राहून राहून एकच विचार येत होता किती किती चांगले असतील आमचे बाबा'!

रेल्वेची तिसऱ्या वर्गाची बसण्याची बाकडी खूपच निरुंद होती. आमची बसण्याची व झोपण्याचीही व्यवस्था याच बाकड्यांवर केली होती. चौधरी नारायणसिंहजी सैनिकी पोषाखात होते. त्यामुळे आमच्या डब्यात शिरण्याची कुणाचीच छाती नव्हती. दोन दिवसांच्या प्रवासानंतर आम्ही कलकत्त्याला पोचलो. कलकत्त्या इथं आम्ही प्राणिसंग्रहालय बघितलं. या प्रवासातली आठवण म्हणजे आम्ही झोपेत अनेकदा बाकाहून खाली पडलो होतो. कलकत्त्याहून पुढं आम्हाला जहाजात बसून वडिलांकडे जावं लागलं. समुद्रमार्गे प्रवास करणं हे तर आमच्या कधी स्वप्नात देखील नव्हतं. मात्र जहाजामध्ये बसून प्रवास करायला मिळावा याची मला खूप हौस होती.

एके दिवशी जहाज आम्ही प्रत्यक्ष बघितलं आणि त्यात बसून आम्ही ब्रह्मदेशाकडे निघालो. [रंगूनला पोचण्याआधीच जहाज थांबवण्यात आलं. जहाजातील काही प्रवाशांचं आजारामुळं निधन झालं होतं. त्यामुळं एक आठवड्यासाठी जहाजातील उतारूंना अन्य एके ठिकाणी थांबवून ठेवण्यात आलं. प्रवाशांना जहाज कंपनीतर्फे शिधा देण्यात येत असे आणि उतारू आपापला स्वयंपाक तयार करून तिथं थांबले होते. आम्ही दोघे भाऊ, इतर मुलांसमवेत दंगामस्ती करण्यात गढून गेलो. आम्हाला थांबवलं होतं त्या ठिकाणचं हवामान उत्तम होतं. भूक लागली की, आम्ही काकांकडे खायला मागू लागलो. त्यांना स्वतःच स्वयंपाक करावा लागायचा म्हणून ते आमच्यावर चिडत. काकांच्या दरडावण्यामुळं आम्ही गप्प बसायचो व वडिलांचं प्रेम आम्हाला केव्हा लाभणार याची प्रतीक्षा करायचो. त्यांचं वात्सल्य केव्हा बरं आमच्या वाट्याला येणार?

## शादीरामांचा मृत्यू

एकदाचे आम्ही रंगूनला पोचलो आणि नंतर 'चिंडविन' नदीकाठी आलो. या नदीमधून आमचा प्रवास आगबोटीतून सुरू झाला. चिंडविन नदीच्या दुतर्फा घनदाट जंगल होते. आगबोट वळणं घेत घेत पुढे चालली होती. स्टीमरमध्ये बसून भोवतालचे डोंगर बघत, जंगलं न्याहाळीत आमचा प्रवास मजेत चालला होता. आम्ही आनंदात होतो. तीन दिवसांच्या प्रवासानंतर आम्ही 'मोनेवा' इथं येऊन पोचलो. आमच्या आगमनाची कुणालाच खबर नव्हती. काका सैन्याच्या छावणीत येऊन थांबले. त्यांच्या 'पोलो' खेळण्याची तयारी होती. त्यांची मित्रमंडळी भेटायला आली. गप्पा मारता मारता खूपच रात्र झाली. आमच्या डोळ्यांवर झोपेची झापड पडली. अर्धवट झोपेत 'शादीराम यांचं निधन झालं' या शब्दांनी माझी झोप कुठल्या कुठे पळाली. डोकं गरगरायला लागलं आणि डोळ्यात अश्रू दाटून आले, मात्र कुणाला काही विचारण्याचं मला धाडस झालं नाही. आता आपले काय हाल उभे राहतात, हीच विवंचना मनाला पडली. मामांचा आधार सुटला होता, आता आम्हाला कुणाचा बरं आश्रय मिळणार? माझ्यासारख्या छोट्या मुलाच्या मनावर या अशुभ शब्दांनी काय आघात केला, याचं कुणीही अनुमान करू शकेल.

काका सर्वांसमवेत जागचे उठले व आम्हाला सोबत घेऊन निघाले. धाकटा भाऊ तर पूर्णपणे अचेतन होता, तोही जागा झाला व आमच्या सोबत तेथून निघाला. माझ्या मानसिक स्थितीची कुणाला काहीच कल्पना नव्हती. माझ्या डोळ्यांवाटे अश्रूंची झड लागली होती तरीही मी निमूटपणे सर्वांसमवेत निघालो. जिना उतरून खाली जायचं आहे, याचंही मला भान नव्हतं. माझं पाऊल चुकून पडलं आणि तीस पायऱ्यांहून खाली मी घरंगळत येऊन पडलो. माझ्या मागं जी माणसं येत होती त्यांना देखील काय घडलं हे कळलं नाही. काकांची थैली मी माझ्या खांद्याला लटकावली होती. मी खाली आपटलो तेव्हा काकांची थैली नेमकी माझ्या छातीखाली आली आणि त्यामुळं मला अजिबात मार बसला नाही. जणू काहीच घडलं नाही अशा थाटात मी उठून उभा राहिलो. मी जागचा उठून उभा राहिलो याचा सर्वांनाच आनंद झाला. सर्वजण पायऱ्या उतरून खाली आले आणि त्यांनी मला चाचपून बघितलं. मला कुठेच लागलेलं नव्हतं. जी एक अशुभकारक बातमी मी ऐकली होती त्या बातमीनं माझी काय मानसिक दशा बनली, ह्याचा कुणालाच थांगपत्ता नव्हता.

नंतर आम्ही छावणीमधून बाहेर पडलो. आमच्या वडिलांचं राहण्याचं ठिकाण तेथून मैलभर दूर होतं. काका आमच्या सोबत येऊ शकले नव्हते. काही शिपायांसमवेत त्यांनी आम्हाला पाठवलं. आम्ही दोघेजण वडिलांच्या घरी पोचलो. वडिलांनी, ही कुणाची मुलं? म्हणून विचारणा केली. शिपायांना विनोद सुचला त्यांनी आम्ही कुणा तरी सुभेदाराची मुलं आहोत, असं उत्तर दिलं. मुलांना फिरायला घेऊन निघालो आहोत, असंही त्यांनी सांगितलं. मग काय विचारता? सुभेदाराच्या मुलांना गरमा-गरम दूध प्यायला मिळालं. एवढ्यातच काका येऊन पोचले आणि सुभेदाराच्या मुलांचं रहस्य उलगडलं! आम्हाला आता कुठं समजलं की ज्या भाऊ रामांच्या मृत्यूची बातमी मी ऐकली होती—ते काकांचे एक दुसरेच मित्र होते.

दुष्काळी परिस्थितीमुळे वडिलांना जेव्हा गाव सोडून परक्या ठिकाणी यावं लागलं होतं तेव्हा त्यांना आपल्या मुलांची कधी भेट होईल, ह्याची काही कल्पनाच नव्हती. आमच्या मनात मात्र वडिलांच्या भेटीची अंधुकशी आशा तेवत होती परंतु आम्ही भेटू शकू अथवा नाही किंवा केव्हा आणि कुठं भेट होईल, ह्याचं कुठलंच उत्तरं आमच्यापाशी नव्हतं. पित्याच्या प्रेमाचा मला आता अनुभव आला.

## ब्रह्मदेशातील दिवस

दुसरे दिवशी वडिलांनी आम्हाला सर्व गायी दाखवल्या आणि विचारलं," गुराखी होणार का शाळेत जाऊन शिकणार ?" वडिलांच्या पाशी ६० गायी आणि ३०० शेळ्या-मेंढ्या एवढं पशुधन जमा झालं होतं. गायी व शेळ्या-मेंढ्यांची राखण करणं हे काम अत्यंत

मोलंदारी-हेच काम करण्यात तर आमच्या बाळपणाचा काळ गेला होता. मला लागून शिकणं ही भाव तेरी नव्हती कारण आमच्या घराण्यात कुणी शिकल्या-सवरलेला कुणाला आठवत नाहीत. माझ्या मनाचा, का कोण जाणे, निश्चय होऊन चुकला की, "मला तर शिकण व्हायचंय". मी माझा हा निश्चय वडिलांना सांगितला. त्यांना मोठा आनंद झाला; माझ्या सगळेतच राहायचं हे धाकट्या भावाने धारण केले-म्हणून त्यांनीही शिकण्याचीच इच्छा प्रकट केली.

शिक्षणासाठी आम्हाला मिशन हायस्कूलमध्ये दाखल करण्यात आलं. शिक्षणाचं माध्यम बर्मी व इंग्रजी होतं. शाळा घरापासून दीड मैलाच्या अंतरावर होती. आमच्या घरी नोकर-चाकर नव्हते. वडील स्वतः स्वयंपाक-पाणी वगैरे करीत व आपला धंदाही सांभाळायचे. शिकण्याबरोबरच मी त्यांना त्यांच्या प्रत्येक कामात जमेल ती मदत करू लागलो. दिवसभर शाळा करायची व सकाळी-संध्याकाळी घरातील कामं पार पाडायची, हा माझा दिनक्रम बनला. शाळासोबत्यांबरोबर खेळण्यासाठी मला सवडच नव्हती. शिकण्याची मला खूप आवड होती आणि माझी स्मरणशक्ती उत्तम होती. शाळेत सर्वांना माझ्याविषयी आदर होता. लहानपणी बरोबरीच्या मुलांशी खेळायला न मिळाल्यामुळे मला इतर मुलांप्रमाणे कुठल्या सवयीही लागल्या नाहीत.

शिक्षणात माध्यम बर्मी आणि इंग्रजी भाषा असल्यामुळे मी याच भाषांतून शिकू लागलो परंतु का कुणास ठाऊक मला माझी मातृभाषाही यायला पाहिजे, असं मला वाटू लागलं. मन करायचा, इच्छा तिथे मार्ग, या न्यायाने मी रात्रीच्या वेळेत काटछाट करून मोठ्या प्रयत्नानं मातृभाषेचे धडे गिरवू लागलो. रात्रीचं जेवण आटोपताच मी माझ्या वडिलांच्या एका मित्राकडे मातृभाषा शिकण्यासाठी जायला सुरुवात केली.

आमच्या घरा शेजारीच एक गुरुद्वारा व ठाकूरजींचं मंदिर होतं. मी दोन्ही ठिकाणी जाऊन उत्साहाने धर्मविषयक ज्ञान हस्तगत करू लागलो. या वातावरणामुळे बालपणी धर्मासंबंधी माझ्या मनात श्रद्धा उपजली होती. धर्मविषयक श्रद्धा वाढीस लागली आणि मातृभाषेचंही मला चांगलं ज्ञान झालं. मिशन स्कूलमध्ये पाद्र्यांकडून मला ख्रिस्ती धर्माचीही माहिती मिळाली. त्यांचाही माझ्या मनावर प्रभाव पडला परंतु त्या धर्माकडे मी फार लक्ष दिलं नाही.

कोणत्या न कोणत्या गंभीर गोष्टीत मी अधिक रस घेत होतो, यामुळं शिस्त आणि संयम यांना माझ्या जीवनात विशेष असं स्थान निर्माण झालं.

माझे वडील मोठे बाणेदार होते. त्यांचं जीवन मोठं अद्भुत होतं. ते सत्य बोलणारे व चोख व्यवहार करणारे होते. त्यांनी बऱ्यापैकी संपत्ती कमावूनही ऐश्वर्यसंपन्न जीवनाला त्यांच्या लेखी महत्त्व नव्हतं. ते अशिक्षित होते. निर्भयता आणि पौरुष त्यांच्या ठिकाणी होतं आणि त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा माझ्या मनावर सखोल संस्कार होत होता. त्यांना आदर्श मानून माझंही जीवन आपोआपच त्यांचं अनुसरण करू लागलं. वडील मला अबोलपणे काही शिकवत होते आणि त्यांची शिकवण माझ्या व्यक्तिमत्त्वाचं अभिन्न अंग बनली. धिप्पाड शरीरयष्टी असलेली त्यांची मूर्ती आजही माझ्या डोळ्यांसमोर उभी राहते.

आमचं घर लोकवस्तीपासून दूर एका जंगलापाशी होतं. त्याकाळी तेथील जंगलात सर्व प्रकारची हिंस्र श्वापदं होती. आमच्या घराचं अंगण प्रशस्त होतं आणि घराभोवती काटेरी वाडेचं कुंपण होतं. तरीही हिंस्र पशू कधी कधी आत घुसायचे. वडिलांनी एक भला मोठा कुत्रा पाळला होता त्याला आम्ही "कल्लू" म्हणून बोलवायचो. कल्लूला मी खूप खायला द्यायचा त्यामुळं तो माझ्यावर खूश होता व माझ्या सर्व आज्ञांचं तो पालन करायचा. हातात भाला घेऊन कल्लू सोबत सायंकाळी देखील जंगलात जायला मी अजिबात घाबरत नसे. मात्र जंगली जनावरांशी झटापट करण्याची वेळ माझ्यावर आली नाही.

आमच्या घराच्या आजूबाजूस पुष्कळशी डबकी होती. त्यामुळं डासांचा सुळसुळाट होता. या डासांमुळे आम्हा दोघा भावंडांना मलेरियाचा आजार झाला. देखरेख करण्यासाठी घरी दुसरं कुणीच नव्हतं. नशीबानंच आम्हाला साथ दिली. आम्हाला ताप आळीपाळीनं यायचा एकाचा, ताप उतरायचा तेव्हा दुसऱ्याला ताप चढायचा यामुळं आम्ही दोघे भाऊ एकमेकांची सेवा शुश्रूषा करू लागलो.

धाकट्या भावाला शिकण्याची विशेष आवड नव्हती. त्यानं शिक्षण सोडलं, तो चांगला धष्टपुष्ट होता. शिक्षण सोडून तो वडिलांना त्यांच्या कामात मदत करू लागला. त्यामुळं मी शाळेकडे अधिक लक्ष देऊ लागलो. मला अधिक वेळ मिळू लागला.

इंग्रजी विषयाचं जे पुस्तक आम्हाला नेमलेलं होतं, त्यातली ही कविता आम्हाला मुखोद्गत करायला सांगितली.

Breathes there the man
With Soul so dead
Who never to himself hath said
This is my own my native land

[ज्याला न आत्मगौरव आहे न स्वदेशाभिमान आहे ; असा माणूस, माणूस नसून पशू आहे, मृतांपैकीच आहे.]

ही कविता लाखो लोकांनी वाचलेली असेल, मात्र त्यांपैकी एखादीच व्यक्ती अशी असेल जिनं या कवितेच्या प्रभावानं आपलं संपूर्ण जीवन क्रांतिकारी बनविलं, जीवनात परिवर्तन घडवून आणलं. मी ही कविता पाठ करत गेलो आणि त्या कवितेचा आशय माझ्या व्यक्तिमत्वात भिनत चालला. माझ्या जीवनाची दिशाच बदलून गेली. मला माझ्या मातृभूमीसाठी काय करता येईल, या दिशेने मी विचार करू लागलो. माझ्या मनात हा विचार तर उफाळून आला परंतु त्याला प्रत्यक्षात उतरवण्यासाठी माझ्याजवळ साधनांचा अभाव होता. शाळेत जी पाठ्यपुस्तकं होती त्यांच्या व्यतिरिक्त अधिक वाचन करण्यासाठी कुठलीच पुस्तकं नव्हती. आपल्या देशासंबंधी अधिक माहिती करून घ्यायची असेल तर देशी भाषांचं आपणास अधिक ज्ञान होणं आवश्यक आहे, असा विचार माझ्या मनात आला. ही साठ वर्षांपूर्वीची हकिकत आहे. त्याकाळी भारतभर घोर अज्ञान होतं. लोक निरक्षर होते. पोटासाठी वणवण भटकणाऱ्या लोकांपैकी क्वचितच कुणी शिकला सवरलेला असेल. "शोधा म्हणजे सापडेल" या म्हणीचा मला प्रत्यय आला. वडिलांचे एक मित्र सैन्यात हवालदार होते. त्यांच्या मदतीनं मी माझी प्रांतभाषा उर्दू शिकायला प्रारंभ केला. हवालदार साहेबांना शिकवण्यात उत्साह वाटू लागला. काही दिवसांतच मी उर्दू पुस्तक वाचू लागलो. भारतीय वृत्तपत्रांचं वाचन करणं मला शक्य झालं. माझ्या शिक्षणाच्या १९०५ ते १९०८ या कालखंडात भारतात पुष्कळच जागृती निर्माण झाली होती. पोलिस व सैन्यातील अधिकारी वर्तमानपत्रं मागवत. ती वाचून त्यांची आपसात चर्चा चाले. अधिकारीवर्गात माझ्या काकांना चांगला मान होता. त्यांच्याकडे त्यांची मित्रमंडळी जमा व्हायची आणि त्यांच्या आपसात जोरदार चर्चा व्हायच्या देशाच्या परिस्थितीसंबंधी ते बोलायचे. त्यांच्या चर्चा व गप्पा मी मन लावून श्रवण करत असे. एखादी गोष्ट मला समजली नाही तर मी त्यांना त्या संबंधी विचारायचा.

रशियातील १९०५ सालातील अयफल क्रांती, रशिया-जपान युद्ध—एका आशिया खंडातील देशाचा—जपानचा विजय, आफ्रिका खंडातील बोअर जमातीचा क्रांती-संग्राम देशभक्तीची उसळलेली लाट, बंग-भंगाचं आंदोलन, सरदार अजीतसिंग यांचं लोकप्रिय कवन "पगडी संभाल जट्टा", लाला लाजपतराय यांची देशत्यागाची कृती, लोकमान्य टिळकांची अटक, त्यांचा ब्रम्हदेशामधील मंडाले येथील तुरुंगवास, या सर्व बातम्यांची वृत्तपत्रांतून चर्चा चाललेली असे. या सर्व घटना मला नीट कळत नव्हत्या परंतु त्यांच्याविषयी मला गोडी उत्पन्न झाली होती. मनात एक चित्र आकार घेऊ लागलं. पंजाब मध्येही काही घटना घडत होत्या. पंजाबी शेतकरी जागृत होत आहे. पंजाबच्या दोन महान नेत्यांना हद्दपार व्हावं लागलं आहे. देशप्रेमाखातर त्यांना शिक्षा भोगावी लागत आहे. ह्या गोष्टी ऐकून, वाचून माझं रक्त उसळू लागलं. मनात खळबळ माजली देशप्रेमाचे तरंग मनात उमटू लागले.

त्या विचाराबरोबरच आणखी एक चित्र माझ्या मनात उमटू लागलं. माझ्या वडिलांना साधू-संतांची सेवा करण्यात विशेष मजा होती. दररोज अनेक बौद्ध भिक्षू आमच्या घरी भिक्षा मागण्यासाठी येत. मी चांगले-चांगले खाद्य पदार्थ तयार करून त्यांच्या झोळीत टाकायचा.

वडिलांकडून एके दिवशी मी राम-नामाचा महिमा ऐकला. मी या गोष्टीनं एवढा प्रभावित झालो की माझी अगदी श्रद्धानंदी टाळी लागली. मी शाळेतून घरी येई, थोडंस खाणं-पिणं आटोपून जंगलात एका सरोवराच्या काठी बसून राम-नामाचा जप करत राही. सूर्यास्त होऊन अंधार पडला तरी मला त्याची शुद्ध नसे. त्या सरोवरावर सायंकाळच्या वेळी जंगली श्वापदं पाणी पिण्यासाठी यायची—परंतु माझा मात्र साधू-संतांच्या वचनांवर विश्वास होता. संतांनी म्हटलं होतं "जे परमेश्वराची भक्ती करतात, परमेश्वर त्या भक्तांचं रक्षण करतो". या विश्वासाबरोबरच मी डोळे मिटून परमेश्वराचं ध्यान करत होतो. अनेकदा मला असा भास होई की एक पांढरीशुभ्र दाढी असलेला साधू, माझ्या खांद्यावर हात ठेवून आपल्या पाठीशी उभा आहे. तो अत्यंत बलशाली आहे. त्यामुळं माझा विश्वास अधिक दृढ होई—मी सर्व दृष्टींनी सुरक्षित आहे, असंच मला वाटे.

बौद्ध भिक्षूंकडून भगवान गौतमबुद्धही वनात जाऊन तप करत बसले, असं मी ऐकलं होतं. माझ्या मनावर या घटनेचा खूपच प्रभाव पडला. एका भावाकुल मनःस्थितीत एके दिवशी मी जंगलातून मार्ग क्रमीत एका पर्वतावर येऊन पोचलो. पर्वतावर वृक्षांची दाटी होती. मी तिथं एका प्रशस्त खडकावर समाधी लावून बसलो. सायंकाळ होऊ लागली—तहान-भूक मला व्याकुळ करू लागली. जंगलामध्ये त्या बाजूला एक लाकूड-तोड्या मला दिसला. त्या निर्जन-स्थानी समाधी लावून मी बसलो होतो. त्यानं मला प्रश्न केला—"तू इथं कसा काय पोचलास?" मी भक्ति मार्गाला लागलो आहे, हे त्याला कसं समजावणार? माझ्या परीनं मी त्याला सांगण्याचा प्रयत्न केला पण त्याला त्यातलं काहीच समजलं नाही. शेवटी त्यानं मला वडिलांचं नाव विचारलं. वडिलांचं नाव समजताच त्याला माझ्या बोलण्याचं आणखीनच कौतुक वाटलं. वडिलांना तो ओळखत होता. माझ्या काकांना त्यानं नुकतंच त्या बाजूला फिरताना बघितलं—असं त्यानं सांगितलं. एका सैनिक तुकडीबरोबर ते होते व काहीतरी शोधत होते, असं तो म्हणाला. हे ऐकून मी जरा अस्वस्थ झालो. तहान-भूक लागलेलीच होती. मी सरळ उठलो आणि गावाचा रस्ता पकडला. समोरच्या बाजूने मुला-मुलींचं एक टोळकं सरळ माझ्या दिशेनं आलं आणि त्या सर्वांनी मला पकडलं. सर्वांचे डोळे अश्रूंनी डबडबले व प्रत्येक जण माझ्यावर प्रश्नांचा वर्षाव करू लागला.

मला घरी परतायला जसजसा विलंब होऊ लागला तस-तसा सर्वांना शंका-कुशंका येऊ लागल्या. कुणाला तर असंही वाटलं की जंगलात माझी बहुधा हत्या झाली असावी.

अशी घटना यापूर्वी त्या भागात घडली होती. घरची मंडळी माझ्या मृत देहाचा शोध घेत फिरत होती. वडीलही त्याला सुचेल त्याप्रमाणे माझा शोध घेण्यासाठी बाहेर पडले होते. त्यांनी अनेक ठिकाणं धुंडाळली परंतु माझा शोध न लागल्यामुळे शेवटी त्यांनी पोलिसकडे जाऊन आपलं गाऱ्हाणं सांगितलं. पोलीस अधिकाऱ्यांनी त्यांना चांगली दमदाटी केली. पोलीस म्हणाले—तुम्ही मुलाला खूप बडवलं असेल ? वडील ही सर्व दमदाटी ऐकून घेऊन गुपचुप पोलीस चौकीबाहेर पडले. नदी, नाले, जंगल माझ्या शोधासाठी त्यांनी पालथी घातली आणि निराश होऊन ते परत निघाले. पित्याच्या मनाला या घटनेनं किती क्लेश झाले असतील, ह्याची कल्पना फक्त पिताच करू शकतो.

मित्रांनी मला पकडलं आणि घरात उचलूनच नेलं. माझे पाय जमिनीला लागूच द्यायचे नाहीत, असंच जणू त्यांनी ठरवलं होतं. आमच्या घरी येऊनच मग ही मिरवणूक थांबली. मुलांचा गिल्ला ऐकून वडील खाटेवरून उठून उभे राहिले. मला बघताच त्यांनीही माझ्यावर प्रश्नांचा भडिमार केला. मी सर्व हकीकत अगदी सरळ-सरळ सांगून टाकली. जो साधूबोवा मला पर्वतावर भेटला होता तोही एव्हाना तिथे येऊन पोचला आणि त्याने वडिलांना मी कसा समाधी लावून बसलो होतो—हे मोठ्या कौतुकानं सांगितलं. या दृश्यानं मी अगदी चाटच पडलो, असंही तो म्हणाला.

दोनचार दिवसात ही गोष्ट सर्व शाळेत समजली. भगवान बुद्धाप्रमाणे तपश्चर्येसाठी मी घराबाहेर पडलो, ह्याची जो तो चर्चा करू लागला. बौद्धभिक्षूंनाही ही हकीकत समजली. ते मोठ्या प्रेमानं मला येऊन भेटू लागले आणि मला उपदेश करू लागले. आतापर्यंत लोक मला सर्वसामान्य मुलगा समजत होते परंतु या घटनेनंतर ते माझ्याकडे निराळ्या दृष्टीने पाहू लागले. माझ्याबाबत त्यांना एक आगळं प्रेम वाटू लागलं. माझ्या हृदयातही एक निराळी प्रतिक्रिया निर्माण झाली. मी लोकांच्या समोर अगदी गंभीर होऊन वागू लागलो—मी कुठल्यातरी विचारानं भारावल्यासारखा झालो व मला स्वतःलाही आपण जरा उंचीवर पोचलो आहोत, असं वाटू लागलं. हळूहळू मला या वातावरणात राहणं नकोसं वाटू लागलं. माझे सगेसोयरे माझ्यावर प्रेम करत परंतु माझ्या उदासीन वृत्तीचा त्यांना अर्थबोधच होईना. माझं जीवन तसं आनंदी स्वरूपाचं होतं—त्यामुळे ते मला आता गर्विष्ठ वृत्तीचा समजू लागले. माझ्या मित्रपरिवारात मला कुणीच समविचारी दिसत नव्हता म्हणून मी माझ्याच मस्तीत गढून गेलो. रात्रीच्या वेळी आकाशातील ताऱ्यांवर माझी दृष्टी खिळलेली असे आणि दिवसा मी आकाशातील ढग न्याहाळू लागलो. मी जेव्हा तरुण-तरुणींना प्रेम करताना बघे तेव्हा माझ्या ध्यानात येई की ही मंडळी लग्न वगैरे करून संसारी बनू इच्छितात—दांपत्यजीवनाच्या आनंदासाठी ते हपापले होते. माझ्या लेखी त्यांचा हा सर्व व्यवहार मूर्खपणाचा होता.

## मातृभूमीचं प्रेम

काही काळानंतर माझ्यावर एक नवलाच परिणाम घडून आला. "देशप्रेमाची" ज्योत माझ्या अंतःकरणात प्रज्वलित झालीच होती. आता मी भावनाशील बनून स्वतःशीच विचार करू लागलो. ह्या विचारांनी मला माझ्या मित्रमंडळीपासून तोडलं—त्यांच्या माझ्यात अंतर निर्माण केलं. काही भारतीय तरुण बर्मी मुलींबरोबर विवाह करून धंदा-पाण्याला लागत होते, हे मी बघत होतो. त्यांची ही स्थिती बघून माझ्या मनात विचार यायचा—माझंही असंच तर व्हायचं नाही? बर्मी मुली माझ्याकडेही आकृष्ट होत होत्या. त्यांचा प्रीतिभाव बघून मी स्वतःलाच विचारी—"अरे तू यांचं प्रेम स्वीकारलंस तर तुझ्या मनातील देशप्रेमाचं काय बरं होणार?—"

त्यावेळी माझं वय पंधरा वर्षांचं होतं. जीवनातली ही अवस्था—पंधरा-सोळाचं वय—क्रांतिकारी असतं. ह्याच काळात तरुण मनाला पंख फुटतात आणि खूप उंच झेप घ्यावी वाटते. अशा अवस्थेत कुणी चांगला मार्गदर्शक दैवयोगानं लाभला तर जीवनाचा मार्ग प्रकाशानं उजळून निघतो नाही तर हीच भरारी अंधाऱ्या गर्ती—गोंधळात नेऊन पोचविते. माझ्या मित्रांपैकी मला कुणाच्याच ठिकाणी देश-प्रेम आढळत नव्हतं. माझ्या मनात मात्र देशप्रेम उचंबळून आलं होतं. त्यामुळं सांसारिक प्रेमभावनेविषयी मला उबग वाटू लागली.

एके दिवशी ठाकुरबाडीमध्ये एक भैय्या रामायणाच्या चौपाया गात बसला होता. श्रीरामानं रावणावर विजय मिळवला होता आणि लंकेचं राज्य सांभाळण्याचा प्रसंग, तो गात होता. भोवतालच्या अनेक सुहृदांनी श्रीरामाला विनंती केली की प्रभूवर, आपणच लंकेचं राज्य सांभाळा आणि अयोध्येला परत जायचा विचार सोडून द्या. सोन्याची लंका सोडून कुठं जाणार? प्रभु रामचंद्रांनी त्यांना जे उत्तर दिलं, त्याचा आशय होता—

"पूर्वजांकडून मिळालेली भूमी दारिद्र्यानं भरलेली असली तरी ती सुखाचा महान ठेवा असते. हे लक्ष्मणा! ही लंका सोन्याची असली तरी मला तिचा मोह वाटत नाही."

देशप्रेमाच्या या महान आदर्शाचा माझ्या मनावर खोल ठसा उमटला.

खरं तर आता मला कोणत्याच गोष्टींची उणीव नव्हती. अंगात तारुण्य सळसळत होतं. वडिलांची आणि भावाची माझ्यावर अपार माया होती. माझे समवयस्क दोस्त माझ्यावर प्रेम करत होते परंतु या सर्वांना पाठ फिरवून आपल्या प्रदेशात पंजाबात जायची माझ्या मनाची ओढ होती. माझ्या गावी मी परत जाऊ

इच्छित होतो. त्याच भागात आणि त्याच पंजाबात जिथं मी उगाच पोरगा राहत होतो—तिथं जायला आता मी उत्सुक होतो. दूरच्या नातेवाईकांशिवाय तिथं माझं असं कुणीच नसतानाही व आपल्याला कुठं जाऊन राहावं लागणार, अशी वस्तुस्थिती असतानाही मला तिकडं जावंसं वाटत होतं. सगळं सोडून, आपण आपल्या मातृ-भूमीकडेच गेलं पाहिजे याच एका भावनेनं माझं मन भारावलं होतं. या गोष्टीच्या परिणामी मी अतिशय अन्तर्मुख होऊन स्वतःतच तल्लीन होऊन राहू लागलो. माझ्या चेहऱ्यावरचं हसू लोप पावलं—माझी ही उदासीनता मला फार काळ लपवता आली नाही. वडिलांना हे सर्व सांगावं कसं? हाच प्रश्न होता. आणि समजा, मी त्यांना सर्व काही सांगितलं तर ते अनुमती देतील काय? माझा वियोग त्यांना सहन होणार नाही, अशीच माझी समजूत होती. शेवटी मला जेव्हा सर्व गोष्टी असह्य झाल्या तेव्हा निरुपायानं वडिलांना मी माझ्या मनातील भावना सांगून टाकली. माझं म्हणणं त्यांनी शान्तपणे ऐकून घेतलं—काहीच उत्तर न देता ते गप्प राहिले. त्यांच्या चेहऱ्याकडे बघून माझा विचार त्यांना पसंत पडलेला नाही, हे मी ओळखलं. भावालाही मी त्याला सोडून दूर जाऊ इच्छितो हे समजलं, तेव्हा त्याच्यावरही मोठाच आघात झाला. मित्रांनाही माझा विचार पसंत नव्हता. ह्या प्रतिक्रियांनी मी बिलकुल विचलित झालो नाही—माझ्या निर्णयावर मी ठाम होतो. शेवटी वडिलांनीही मला माझ्या कर्मावर सोडायचं असंच ठरवलं. पंजाबात मी कुठे राहणार, माझ्या पालन-पोषणाची जबाबदारी कोण स्वीकारणार—ह्याची मला यत्किंचितही फिकिर नव्हती. मातृभूमीचं प्रेम मला तिकडे खेचत होतं. मातृ-भूमीविषयी एवढं प्रेम माझ्या मनात कसं काय निर्माण झालं—ह्याचं उत्तर त्यावेळीही माझ्याजवळ नव्हतं—आज देखील नाही.

वडिलांना माझ्याजवळ शेवटी म्हणावं लागलं की कुणाची सोबत मिळाली तर त्याच्यासमवेत तुला पाठवीन. मी सोबतीचा विचार करत होतो तोच सैनिकांची एक तुकडी रेल्वेनं पंजाबला निघाल्याचं मला कळलं. त्यांच्यापैकी काहीजण वडिलांचे मित्रच होते. मी त्यांच्या समवेत निघालो. माझे सर्व मित्र निरोप देण्यासाठी स्टेशनवर आले. ते सर्वजण माझ्याकडे बघत होते आणि माझी नजर दूरवर असलेल्या पंजाब प्रांतावर खिळली होती. माझ्या मित्रांच्या डोळ्यांत अश्रू दाटून आले होते पण का कुणास ठाऊक मला मात्र एकदाही आपल्या प्रियजनां-पासून आपला वियोग होतो आहे, असं वाटलं नाही. उलट मी माझ्या मातेच्या कुशीत विसावण्यासाठी निघालो आहे, असंच मला वाटत होतं. देशप्रेमानं माझ्या-वर अगदी चेटूक केलं होतं. हे प्रेमबन्धन असं विचित्र होतं की आज देखील मी यापासून मुक्त होऊ शकलो नाही. ती मोठी विलक्षण नशा होती—त्या नशेत मी सारं काही केलं आणि साहिलंही.

आम्ही सर्वजण जहाजात चढून बसलो. साठ वर्षांपूर्वीच्या काळात जहाजातील तिसऱ्या वर्गाच्या उतारूंना काय यातना सहन कराव्या लागत, ह्याची कल्पना त्या काळात ज्यांनी जहाजातून प्रवास केला असेल, त्यांनाच येऊ शकेल. मी सर्व प्रकारचे त्रास सहन केले मात्र एक विशिष्ट प्रकारचा त्रास सहन करणे माझ्या कुवतीच्या बाहेर होतं. जहाजात जे संडास होते—त्यांना दारं नव्हती. इतरांच्या समोर संडासात जाऊन बसणं मला अवघड वाटू लागलं. मी लघुशंका कशीबशी आटोपत होतो मात्र शौचास जायच्या कल्पनेनेच मी पांढरा फटक पडत होतो. ह्या भीतीनं मी तीन दिवस चक्क उपाशी पोटी राहिलो. तीन दिवसांनंतर जेव्हा जहाज किनाऱ्यावर पोचलं तेव्हा कुठं मला मुक्ती मिळाली. सैनिकांसह मी कलकत्त्यात फेरफटका मारला. काही बघण्यात मला स्वारस्य नव्हतं. नंतर त्यांच्यासमवेत रेल्वेनं मी पंजाबकडे निघालो. अम्बाला शहरापर्यंत त्यांनी मला आरामात पोचवलं. अम्बाला येथून टांग्यानं मी माझ्या गावी—भालडुला आलो. गावात पोचल्यावर प्रश्न पडला—'कुठं जावं? कुणाला बरं भेटावं? मला कुणी ओळख तरी दाखवतील का?' छोटीशी वळकटी आणि पेटी डोक्यावर घेऊन मी आमच्या घराच्या दिशेनं निघालो. या सहा-सात वर्षांत मी खूपच उंच झालो होतो. आपल्या समवेत ब्रह्मदेशाला मला घेऊन जाणारे माझे चुलते मखमलसिंह व नारायणसिंह हे देखील मला चटकन ओळखू शकले नाहीत. मी त्यांना माझं नाव वगैरे सांगितल्यानंतर त्यांनी मला मोठ्या प्रेमानं घरात घेतलं. त्यांचं प्रेम अनुभवताना मला माझ्या वडिलांची व भावाची आठवण होऊ लागली. मी स्वतःशीच विचार करू लागलो, आता मी माझ्या घरी, माझ्या गावी आलो आहे. मी चहूकडे बघतो आहे—सर्व परिस्थिती समजून घ्यायचा प्रयत्न करतो आहे, परंतु मातृभूमीचं असं कोणतं वैशिष्ट्य आहे की ज्यामुळे मी तिच्याकडे आकृष्ट झालो आहे? हे मात्र मला काही केल्या समजेना. मी येथली प्रत्येक गोष्ट, प्रत्येक माणसांकडे बघून त्याला समजून घेण्याचा प्रयत्न करतो आहे व स्वतःलाच विचारतो आहे की येथल्या कोणत्या गोष्टीसाठी मी माझ्या वडिलांना, भावाला सोडून निघालो? त्यांचं प्रेम बाजूस सारलं? ह्याच गोष्टींचा विचार करत असताना मी माझ्या गावाकडे बघत होतो—गावात जिकडे तिकडे घाणीचं साम्राज्य पसरलं होतं. मळक्या चेहऱ्याच्या स्त्रिया तिथं दिसत होत्या. त्यांना बघून मला प्रश्न पडे, हीच माझी ती मातृभूमी? ज्या मातृभूमीखातर श्रीरामानं सोन्याची लंका क्षणात सोडून अयोध्येकडं तो घाईनं परत निघाला—ज्या मातृभूमीचा गुण-गौरव कवींनी आपल्या काव्यातून केला—ती हीच मातृभूमी? शेवटी मातृभूमीचं असं कोणतं वैशिष्ट्य विशेष आहे जे मी इतके दिवस शोधतो आहे?—ह्या विचारात मी खूप गंभीर झालो. मातृभूमीसंबंधीचं प्रेम मला तिथं कुणाच्याही ठिकाणी दिसत नव्हतं. मी कुणालाही मातृभूमीच्या प्रेमानं मला इथं

वेचून टाकलं आहे हे जाणू शकत नव्हतो. मातृभूमीच्या प्रेमापायी मी पित्याची माया, भावाचं प्रेम हे सर्व सोडून इथं आलो होतो. त्या सुमारास मातृभूमीवर प्रेम करणारा माझ्यासारखा कुणी मला भेटला असता तर माझ्या जीवनाला निश्चितच वेगळी दिशा मिळाली असती.

मला आता स्पष्टपणे उमगलं की ज्या जगात मी येऊन पोचलो आहे, ते एक निराळंच जग आहे. हे माझ्या स्वप्नातलं जग नव्हतं. गावातल्या समवयस्क तरुण मुलांशी मी जेव्हा देशप्रेम, मातृभूमी यासंबंधी बोलायचो तेव्हा त्या मुलांना मी कुठल्या तरी अगम्य भाषेत बोलतो आहे, असंच वाटायचं. मला जेव्हा पूर्णपणे कळून चुकलं की माझ्या समवयस्क मुलांना माझ्या मनातील भाव समजणं अशक्य आहे—त्यांच्या माझ्या विचारात कुठलाच मेळ नाही—तेव्हा आता मलाही त्यांच्याप्रमाणेच जीवन जगणं भाग आहे, असं जाणवू लागलं. विचार देखील मला त्यांच्याच पद्धतीनं करावे लागणार. ह्यामुळे मी या मुलांसमवेत शालेय शिक्षण घेण्याचं ठरवलं.

माझ्या गावच्या एका प्रतिष्ठिताचा छोटा मुलगा करमसिंह हा मिशन स्कूलमध्ये शिकत होता. एके दिवशी मी त्याच्यासमवेत त्या शाळेत गेलो व तिथंच प्रवेश घेतला. ब्रह्मदेशात असताना माझं शिक्षण इंग्रजी माध्यमातून चालू होतं त्यामुळं मी इंग्रजीतून उत्तम प्रकारे संभाषण करू शकत होतो. ब्रह्मदेशामध्ये सातव्या इयत्तेचा अभ्यास हा मॅट्रिकचा अभ्यास मानला जात होता. माझ्यापाशी सहावीची परीक्षा पास झाल्याचं प्रमाणपत्र होतं—त्या आधारे मला आठव्या वर्गात प्रवेश हवा होता. परंतु वर्गशिक्षकांनी आठव्या वर्गात प्रवेश मला नाकारला. मी त्यांच्याशी जेव्हा इंग्रजीतून बोलू लागलो तेव्हा ते मला सरळ मुख्याध्यापकांकडे घेऊन गेले. मी त्यांच्याशीही इंग्रजीतूनच बोललो, त्यामुळे ते अतिशय आनंदित झाले परंतु ते मला म्हणाले—"बेटा! मामला नाजूक आहे—तू उर्दू व हिंदी विषयांत फारच कच्चा आहेस—" विचार करून मी त्यांना म्हणालो—मास्तरसाहेब! आपलं म्हणणं अगदी योग्य आहे—पण आपणास माझी एक विनंती आहे—मी आपल्या आज्ञेनुसार सहाव्या वर्गातच प्रवेश घेईन मात्र दर तीन महिन्यांनी आपण माझी परीक्षा घ्यावी—मी परीक्षेत उत्तीर्ण झालो तर मला लगेचच वरच्या वर्गात प्रवेश द्यावा—" ह्या अटीवरच मी सहाव्या वर्गात दाखल झालो.

माझी विचार करण्याची पद्धती आणि माझ्या काही सवयी निराळ्याच प्रकारच्या असल्यामुळे मी पूर्णपणे माझ्या बरोबरच्या विद्यार्थ्यांशी समरस होऊ शकत नव्हतो. मी निरोगी होतो, उंचापुरा व धडधाकटही होतो, तरीही शाळेतील खेळांत मला

रुची नव्हती. माझ्यापेक्षा वयानं मोठ्या असलेल्या मुलांत माझी ऊठ-बस होऊ लागली. ती अशीच मुलं होती—एकाचं नाव होतं चौधरी हंसराज—पाळवा माजरी गावचा व दुसरा होता डाक्टर तेगसिंग–दुर्ग येथील राहणारा. या दोघांशी माझी मैत्री जडली.

इ. स. १९०७-०८ साली पंजाबात आर्यसमाजाची चळवळ खूप जोरात होती. देशावर प्रेम करणारा आणि इंग्रजांचा द्वेष करणारा प्रत्येक हिंदू स्वतःला आर्यसमाजी मानत असे. आर्यसमाजाचे थोर थोर उपदेशक आणि गायक मोठमोठ्या सभा-संमेलनांतून स्फूर्तिदायक भाषणं द्यायचे आणि देशभक्तीची गीतं गायचे–त्यांनी वातावरण अगदी भारून टाकलं होतं. मी आर्यसमाजाचा कधी सदस्य झालो नाही परंतु स्वतःला मात्र आर्यसमाजीच म्हणवत असे. आर्यसमाजी पुढाऱ्यांच्या भाषणांचा आणि गीतांचा माझ्यावर खूपच परिणाम होत होता. १९०७ मध्ये मी एका पुढाऱ्याचं फारच प्रभावित करणारं भाषण ऐकलं. त्या भाषणाचा आशय असा होता की तरुण वर्गाने कुठल्याही नाच-गाण्याच्या कार्यक्रमात रस घेऊ नये—कारण यामुळं त्यांचं चारित्र्य बिघडतं. मला तर या गोष्टी अतिशय प्रिय होत्या. त्या काळी नाचण्या-गाण्याचा धंदा खालच्या स्तरातील स्त्रिया करायच्या. भाषणाचा माझ्यावरही परिणाम झाला व मी तात्काळच निर्णय घेऊन टाकला की येथून पुढे मी नाच-गाण्याच्या बिल्कूल नादी लागणार नाही बराच काळ माझ्या मनावर हा परिणाम टिकून होता. माझ्या काही मित्रांना नाच, गाणं, सिनेमा यांची आवड होती. त्यांच्या समवेत राहूनही १९३१ पावेतो मी मात्र माझ्या निश्चयावर ठाम होतो. या वर्षीच मी रशियात एक चित्रपट बघितला—चित्रपटात रशियातील १९०५ साली जी क्रांती असफल ठरली होती– ती दाखवलेली होती.

त्या सुमारास माझ्या जीवनात अनेक भावनातरंग उचंबळून आले होते. यामुळेच त्या काळी भारताच्या राजकीय व सामाजिक जीवनात जे विचारप्रवाह उत्पन्न झाले होते त्यांचाही माझ्या मनावर परिणाम होत होता. बंग-भंग, स्वदेशी आंदोलन, 'पगडी संभाल जट्टा', लोकमान्य टिळक, लाला लाजपतराय आणि सरदार अजितसिंग यांना झालेली अटक, बंगाल मधील बॉम्बस्फोट, जपानने रशियावर केलेली मात, जपानी वीर सैनिकांची बहादुरी, आफ्रिकाखंडातील बोअर-युद्ध– या सर्व गोष्टी ब्रह्मदेशातील वृत्त-पत्रांतून मी वाचल्या होत्या. या घटनांनी संबंध भारत देश ढवळून निघाला आहे, ह्याचा मला प्रत्यय आला. त्या दिवसांत राजपूत वीरांच्या पराक्रमाची गाथा गाणारे भाट पंजाबातही येत– ह्या सर्व गोष्टींचा माझ्या मनावर एक वेगळाच परिणाम घडून येत होता. अशा रोमांचकारी वातावरणात वावरत असतानाच माझं शालेय शिक्षणही सुरू होतं. शिक्षण हे माझं ध्येय होऊ शकलं नव्हतं. आपल्याला आरामाचं आयुष्य काटण्याला यावं किंवा आपण खूप पैसे वगैरे कमवावे, ह्या गोष्टींचं मला फारसं आकर्षण नव्हतं. माझा बहुतेक वेळ एकांतवासात जायचा. रात्रीच्या वेळी निर्जन भागातून

मी एकटाच भटकत राहायचा. माझ्या जीवनाची स्वप्नं काही निराळीच होती. मात्र ती स्वप्नं काय होतो हे अजून मलाच समजत नव्हतं. माझ्या मनात काहीसा गोंधळ होता— स्पष्टता नव्हती.

हेडमास्तरसाहेबांनी मान्य केल्यानुसार परीक्षा देण्याची मुभा सवलत कायम होती. तीन-चार महिन्यांनी परीक्षेला बसून मी वरच्या वर्गात प्रवेश मिळवत होतो. माझा वर्गसोबती आणि वर्गशिक्षक माझ्यावर खूश होते. जीवनात तसा मी समाधानी होतो. परंतु वाढत्या वयाबरोबरच माझ्या मनातली अस्वस्थताही वाढत होती.

एके दिवशी उर्दू विषय शिकवणाऱ्या मौलवीसाहेबांनी आम्हाला जपान-रशिया युद्धावर एक निबंध लिहायला सांगितले. त्या सुमारास भारतातील विविध चळवळींनी गोऱ्या इंग्रजांविषयी लोकांच्या मनात द्वेषाची भावना निर्माण केली होती आणि जपान हा आशिया खंडातील देश वीर-राष्ट्र म्हणून मानानं तळपत होता. मी निबंध लिहिला— जपान हा एक छोटासा देश आहे. तेथली माणसंही दिसायला छोटीच आहेत. परंतु या छोट्या बांध्याच्या माणसांनी रशिया सारख्या मोठ्या देशाला आणि तेथल्या धिप्पाड सैनिकांना हरवलं आहे. यापुढं ज्वलंत राष्ट्रवादी भावनेनं भारावून मी लिहिलं— गोऱ्या वंशाचे शेकडो शिपाई आशिया खंडातील वीरांसमोर टिकाव धरू शकणार नाहीत— हे या युद्धानं सिद्ध केलं आहे. आपणही यापासून योग्य बोध घेतला पाहिजे. मूठभर गोरे लोक कोट्यावधी भारतीयांवर राज्य करतात— यापेक्षा लज्जास्पद गोष्ट आणखी कोणती? भारतवासियांनी दृढ निश्चय केला तर ब्रिटिशांचं राज्य उखडून ते देश स्वतंत्र करू शकतात. आपलं त्या सुमाराचं देशप्रेम अपेक्षेपेक्षा कमी आहे का अधिक आहे, ह्याचं मला भान नव्हतं. मौलवीसाहेबांनी माझा निबंध वाचला आणि माझ्या वरील ओळी लाल पेन्सिलीने अधोरेखित केल्या. मार्जिनमध्ये कोण्या जागेत खूण ही केल्या. मला त्यातलं काहीच समजलं नाही. स्पष्ट शब्दांत त्यांनी मला काही सांगितलंही नाही— मात्र पुढे केव्हातरी मला भीती वाटावी अशाप्रकारे ते म्हणाले— तू अशाप्रकारे विचार करत राहिलास तर संपूर्ण जीवनभर हालअपेष्टाच तुला सहन कराव्या लागतील!

वरच्या वर्गातील मुलांनीही माझा निबंध वाचून मला समजावण्याचा प्रयत्न केला. या सर्वांच्या उपदेशाचा माझ्यावर काहीच परिणाम झाला नाही. माझ्या ठिकाणी भीती निर्माण करून मी हा मार्ग सोडून द्यावा, असा त्यांचा प्रयत्न होता. त्यांनी जर मला नीट समजून सांगितले असते तर कदाचित मलाही काही समजले असते. या सर्वांचा परिणाम म्हणजे मौलवीसाहेबांविषयी माझ्या मनात कुठलाच आदरभाव राहिला नाही. त्यांनी जी भीती बोलून दाखवली होती—ती मात्र खरी ठरली. सबंध जीवनभर हाल-अपेष्टा आणि दुःखच माझ्या वाट्याला आलं!

या घटनेनंतर हेडमास्तरसाहेबांनी पूर्वीच्या वचनानुसार वरच्या वर्गात प्रवेश देणं बंद केलं. त्यांचं हे वागणं मला अप्रशस्त वाटलं. माझा एक मित्र राजपुरा येथील मिड्ल स्कूलमध्ये होता—त्याची मदत घ्यायचं मी ठरवलं. तेथील हेडमास्तरांनी मला सर्टिफिकेटस् आणायला सांगितलं. माझा स्वभाव थोडा कारस्थानी होता—मी हुषारीनं माझी प्रमाणपत्रं हस्तगत केली. राजपुरा येथे मिडल पेक्षा अधिक शिक्षणाची सोय नव्हती परंतु अम्बालाला परतायला माझं मनही तयार नव्हतं.

मातृभूमीच्या प्रेमाखातर मी पंजाबला परत आलो होतो ते स्वप्न पुरं झालं होतं. दोन वर्षं राहिल्यानंतर मला मातृभूमीच्या रंग—रूपाचं यथार्थ आकलन झालं—जगातल्या महापुरुषांनी मातृभूमीला स्वर्गाहूनही महान असं म्हटलं होतं— मातृभूमीचं ऋण फेडण्या-साठी सर्व काही करावं लागणार. या सर्व गोष्टींचा विचार केल्यानंतर माझ्या ध्यानात एक गोष्ट आली होती की मातृभूमीच्या नुसत्या दर्शनानं काहीच घडून येत नाही. मातृभूमीला संपन्न करण्यासाठी अनेक प्रकारची साधना करणं आवश्यक होते. आपलं संपूर्ण जीवन तिला समर्पित करावं लागेल. माझ्या मनात हे सर्व विचार आले खरे परंतु कार्याची रूपरेषा मला निश्चित करता आली नाही.

## पुन्हा ब्रह्मदेशात

एके दिवशी वडील आजारी पडल्याची बातमी येऊन धडकली. गुरांच्यामध्ये साथीचा आजार फैलावल्याने शेकडो गायी आणि शेळ्या-मेंढ्या मरण पावल्या आहेत, हेही समजलं. वडिलांचं सर्व उत्पन्न जनावरांवर अवलंबून होतं. शारीरिक आजार आणि जनावरांच्या मृत्युमुळे वडील पार खचून गेले. त्यांच्याकडून मला होणारी मासिक मदत थांबली व काही बातमीही नव्हती. त्यांच्या आर्थिक मदतीशिवाय माझे व्यवहार चालणे मुष्किलीचे झाले. सभोवतालच्या गोष्टींनी मन आधीच उद्विग्न झालं होतं— मनात नाना प्रकारच्या शंकाकुशंका येऊ लागल्या. या गोंधळातच आपण आता लौकरात लौकर वडिलांकडे जावं, असा मी निर्णय घेतला. त्याप्रमाणं मी वडिलांकडे येऊन पोचलो.

तिथं आल्यावर जे काही दृष्टीस पडलं त्यानं माझ्या मनाला खूप दुःख झालं. वडील आजारातून तर बचावले परंतु आर्थिक संकटांनी त्यांचं कंबरडंच खचलं. माझ्या पुढल्या शिक्षणाची दारं इथंही बन्दच दिसली. वडिलांनी, यापुढे ते मला आर्थिक मदत करू शकणार नाहीत, हे स्पष्ट केलं. ते म्हणाले— तू पंजाबात परत जा व तिथं शिक्षण पुढे चालू ठेव. आपली जी काही जमीन आहे, ती विकण्याचा प्रयत्न कर. वडिलांची ही सूचना मला फारशी पटली नाही. माझं मन शिक्षणावरून पार उडालं होतं. मी जेवढं शिक्षण घेतलं होतं त्यावरून मी या निर्णयाला येऊन पोचलो की आणखी शिकण्या-सवरण्यात मी माझा वेळ व श्रम वाया घालवू नयेत. शिकून—सवरून नोकरी मळवणे आणि पैसा कमावणे, यात मला रुची नव्हती.

मी देशाला स्वतंत्र करण्याची स्वप्नं पाहू लागलो. परंतु त्या दिशेनं पाऊल टाकण्यायोग्य क्षेत्र माझ्या नजरे पुढं येत नव्हतं. मला कुणी मार्गदर्शक नव्हता, कुणाचं मार्गदर्शन नव्हतं आणि कार्याची रूपरेषा मी आखली नव्हती. आर्थिक तंगीमुळं उदरनिर्वाहासाठी शेवटी मला नोकरी शोधणं भागच पडलं. सेनादल, पोलीस आणि रेल्वेखात्यात माझ्यासारख्या तरुणांना वाव होता. सैनिकी जीवनासंबंधी माझ्या मनात तिटकारा होता कारण ब्रिटिश सैन्यातील हिंदी सैनिक इंग्रजांची गुलामगिरी स्वीकारून अन्य देशांतील लोकांची निर्घृणपणे हत्या करून त्यांना गुलाम बनवत होते. रेल्वे कर्मचारी गैरमार्गांनी कमाई करून पैसे कमावत होते– ते एखाद्या लुटारूप्रमाणे वागत होते– म्हणून रेल्वे खात्यात शिरायलाही मी उत्सुक नव्हतो. पोलिसाची नोकरी मात्र मला बरी वाटत होती. माझ्या भाबड्या मनाची अशी समजूत होती की पोलीस चोर-दरोडेखोर यांना पकडून लोकांचं त्यांच्यापासून रक्षण करतात. माझा एक बर्मी मित्र मला एका इंग्रज पोलीस –अधिकाऱ्याकडं घेऊन गेला. माझी उंची-पुरी, धडधाकट शरीरयष्टी बघून तो अधिकारी खूश झाला. माझी थोडीशी मुलाखत घेतल्यानंतर त्यानं मला पोलीस ट्रेनिंग स्कूलमध्ये शिक्षणासाठी भरती करून घेतलं. चाळीस रुपयांच्या शिष्यवृत्तीवर मला मंडाले येथे प्रशिक्षणासाठी जाण्याचे आदेश मिळाले. मी खूप आनंदित होतो. चोर-डाकूंना पकडण्याचं शिक्षण घ्यायची माझी खूप इच्छा होती. मी वडिलांना संमती मागितली. त्यांना फार दुःख झालं. ते म्हणाले की पोलिसच्या नोकरीत माणूस अगदी खालच्या पायरीपर्यंत पोचतो. पोलीस अपराध्यांकडून लाचलुचपत घेऊन त्यांना सोडून देतात आणि निरपराध लोकांना तुरुंगात घालतात. वडिलांच्या कथनात कितपत सत्य होतं, ह्याचा मला त्यावेळी कुठलाच अंदाज नव्हता– मात्र मी पोलीसमध्ये भरती होऊ नये, अशी त्यांची इच्छा दिसली. यामुळं मी पोलीस प्रशिक्षणासाठी जाण्याचं रद्द केलं. यानंतर दुसरी कुठली नोकरी मिळवावी याची मला चिंता पडली. माझ्या एका मित्रानं मला पोस्ट ऑफिसात कारकुनाची जागा मिळवून दिली. या नोकरीला वडिलांचा विरोध दिसला नाही.

उदरनिर्वाहापुरते पैसे मिळण्याची सोय तर झाली, परंतु माझं चंचल मन परत मला दुसरीकडं भरकटत नेऊ लागलं. मी जेव्हा मोनेवा येथे शिकत होतो तेव्हा माझा अनेक मुलां-मुलींशी स्नेह जमला होता. परंतु पंजाबातून परतल्यानंतर मात्र मला कुणाशीच मैत्रीसंबंध वाढवता आले नव्हते. माझा रूक्षपणा सर्वांना जाणवत होता. माझी मानसिक अवस्था बघून वडिलांना माझी सतत चिंता वाटत होती. ते आपल्या मित्रांशी बोलताना आपला हा मुलगा इथं फार काळ रमू शकणार नाही– असं म्हणायचे. मी फार झपाट्यानं अंतर्मुख व्हायला लागलो होतो. मला कुणाविषयीच विशेष अशी आस्था नव्हती.

खाण्या-पिण्याबाबतही माझ्या विचारांत क्रांती घडून आली. बाळपणापासून मांसाहाराची व शिकारीची मला खूप आवड होती. ब्रह्मदेशात सुरुवातीला आल्यानंतर

मी अनेक बकऱ्या व कोंबड्या स्वतः मारून फस्त केल्या होत्या. दररोजच्या जेवणात मला मटण हवं असे. एके दिवशी मी तीन कोंबड्यांची मान पंजात पकडून जोरात मुरगाळली आणि त्या तिन्ही कोंबड्या मान टाकून गतप्राण झाल्या. मान मुरगाळून कोंबडा मारण्याचा हा प्रयोग मी त्या अगोदर अनेकदा केलेला होता. तडफडणाऱ्या त्या कोंबड्यांकडे बघून मला अजिबात करुणा उत्पन्न होत नव्हती. परंतु त्या दिवशी मात्र त्या तीन कोंबड्यांच्या शरीराची तडफड व मृत्यु बघून माझ्या मनाला एका चमत्कारिक ग्लानीचा भास झाला. आपण पाप केलं आहे, असं मला प्रतीत झालं. प्राण जाण्यापूर्वीची शेवटची धडपड करणाऱ्या त्या कोंबड्या मी एका टोपलीखाली झाकून टाकल्या. उपाशीपोटी चादर पांघरून मी झोपून राहिलो. स्वतःही काही खाल्लं नाही व इतरांसाठीही मी स्वयंपाक केला नाही.

वडिलांच्या सर्व प्रकार ध्यानात आला परंतु त्यांनी मला शब्दानंही विचारलं नाही. उलट माझी मानसिक व्यथा बघून त्यांनाच भीती वाटू लागली. त्यांनी मनोमन ही साधुत्वाची लक्षणं आहेत– हे ओळखलं. माझ्या मनात मात्र साधुत्वाचा लवलेशही नव्हता. माझ्या मनात एक संघर्ष धुमसत होता. प्राणिमात्रांवर दया करावी, हा विचार जरूर माझ्या मनात आला होता. ह्याचा परिणाम म्हणून बराच काळ मी मांसाशन सोडून दिलं. माझ्या मानसिक अवस्थेवर मित्रांनी काढलेला तोडगा म्हणजे मी एखाद्या ब्रह्मी मुलीबरोबर विवाह करावा– म्हणजे सगळे प्रश्न संपून जातील, असं ते म्हणत. त्यांच्या सूचना मी हसण्यावारी नेत असे. या प्रकारानंतरही तेथील वातावरणात राहणं दिवसेंदिवस मला अवघड वाटू लागलं. तेथून पळून जाण्याच्या युक्त्या मी शोधू लागलो. घरचा सर्व जमा-खर्च मीच बघायचा. शंभर रुपये मी जमवले आणि मित्राला भेटायला जायचं आहे असं वडिलांना सांगून मी ते वातावरण सोडलं.

## अमेरिकेच्या मार्गावर

माझी एकदाची सुटका तर झाली, परंतु मनाच्या आकाशात विचारांचे ढग गर्दी करू लागले. कोणत्या देशात जाऊन राहावं? जीवन कुठल्या प्रकारे व्यतीत करावं ह्याचा जेव्हा विचार करू लागलो तेव्हा मला एक जुनी गोष्ट आठवली. पंजाबमध्ये होतो तेव्हा मी असं ऐकलं होतं की पुष्कळसे भारतीय युवक शिक्षणासाठी अमेरिकेला जातात, तिथं जाऊन ते पैसे कमावतात व शिक्षणही प्राप्त करून घेतात. अमेरिकेला जायचा विचार माझ्याही मनात उसळून आला पण केवळ शंभर रुपयांच्या बळावर मी अमेरिकेला कसा पोचणार? मनात विचार आला, चालायला तर लाग– आणि माझ्या गतीनं मी निघालो.

मोनेवा सोडून मी रंगूनचा मार्ग स्वीकारला. रस्त्यामध्ये अनेक भारतीय तरुण भाकरीच्या शोधात घर-दार सोडून निघालेले मला भेटले. त्यांच्यापैकी काहींनी आपल्या सोबत चलण्याची मलाही सूचना केली. मी त्यांचा साथीदार कसा बनणार?

मी काही उदरनिर्वाहाच्या काळजीनं घराचा त्याग केला नव्हता. माझ्या मनात आता एकच विचार होता. अमेरिकेविषयी माझ्या असं ऐकिवात होतं की पैसे मिळवण्यासाठी हा देश फारच उपयुक्त होता. शिवाय, जगभरच्या सर्व क्रांतिकारकांचा तिथंच वास्तव्य होतं. हा देश स्वतंत्र असल्यामुळे तिथं सर्वप्रकारचं स्वातंत्र्य होतं.

ह्याच गोष्टीत हरवून गेलो असतानाच, छोटी वळकटी आणि एक पेटी बगलेत घेऊन मी रंगूनच्या बंदरावर येऊन पोचलो. याच वेळी एक जहाज पीनांगकडे निघायचं होतं. मी त्या जहाजाचं तिकिट खरेदी केलं आणि जहाजावर चढण्याची मार्ग प्रतीक्षा करत तिथंच थांबलो. मनात नाना तऱ्हेचे विचार येत होते. कुठे जावं, काय करावं, कुणाचं साहाय्य घ्यावं– वडिलांना व भावाला माझ्यासंबंधी काहीच कळलं नाही, तर त्यांना काय वाटेल, त्यांचं मन माझ्यासाठी किती व्याकूळ होईल– किती नानातऱ्हेच्या शंकाकुशंका त्यांच्या मनात येतील– ह्या विचारांनी मी पार भांबावून गेलो होतो.

बंदरावर व रेल्वेने प्रवास करणाऱ्या उतारूंविषयी पोलीस मोठ्या सावधगिरीनं चौकशी करत असत. माणसाची चाल-चलणूक, चेहऱ्यावरील भाव व डोळे यांचं बारीक निरीक्षण करून त्यांना बरोबर समजून येई की कोण चोर-भुरटा आहे व खून करून कोण पळून जाण्याच्या प्रयत्नात आहे. एक पोलीस हवालदार याच उद्देशानं बंदरावर टेहळणी करत होता. त्याची माझ्यावर दृष्टी पडली. त्याला स्वच्छपणे दिसून आलं की मी भावनाविवश होऊन कुठंतरी निघालो आहे व मी एकटाच आहे. तो माझ्यापाशी येऊन बसला व माझ्याशी बोलू लागला. संभाषणाच्या ओघात मी एक भारावलेला तरुण आहे हे त्यानं ताडलं. मला न नोकरीची विवंचना होती न संपत्ती कमावण्याचा मोह होता– हे त्याला माझ्याकडूनच समजलं. मोठ्या प्रेमानं तो मला समजावू लागला– तू एक वेडा तरुण आहेस, असंही तो म्हणाला. माता-पित्याचा आधार सोडून अज्ञात जगात तू प्रवेश करू इच्छितोस– परंतु तुझ्यासारख्या भोळ्या-भाबड्या तरुणाला पावला-पावलावर ठेचाळावं लागेल– बदमाश व विश्वासघातकी लोकांशी तुला चार हात करावे लागतील खूप वेळ तो मजबरोबर बोलत बसला व परोपरीनं माझी समजूत काढण्याचा त्यानं प्रयत्न केला. त्याची शिकवण पुढील आयुष्यात माझ्या खूपच उपयोगी पडली. एखाद्या पित्याच्या वत्सलतेनं मला त्यानं शेवटी निरोप दिला. त्या सज्जन माणसाची मूर्ती आजही अनेकदा माझ्या डोळ्यापुढे उभी राहते.

जहाजामध्ये अधिकतर प्रवासी चिनी होते. मी भाकरीसोबत बिस्किटांचा मला थोरला डबाच विकत आणलेला होता. मी असं समजून चाललो होतो की दोन दिवस आपण बिस्किटांवर गुजराण करू शकू. जहाजाच्या छतावर सतरंजी अंथरून मी झोपी गेलो. रात्री मी लघवीसाठी जाऊन परत आलो तोपर्यंत माझा बिस्किटांचा डबा नाहीसा झाला होता. प्रवासातला माझ्यावरचा हा पहिला आघात होता. जहाज पीनांगला

जायचं होतं. जहाजावरील दुकानात जे काही मिळेल ते खाऊन मी प्रवास पुरा केला. पीनांग येथे उतारूंना उतरण्याची परवानगी मिळाली नाही. एका वेगळ्या ठिकाणी आम्हा सर्वांना उतरवण्यात आलं. सात दिवसांसाठी आम्हाला "क्वारंटीन" (प्लेग वगैरेसारख्या साथीच्या आजारांची प्रतिबंधक लस टोचून इतर लोकांपासून अलग ठेवण्याची जागा) मिळाली. जहाज कंपनीकडून लोकांना शिधा मिळत असे. प्रत्येकाने आपला स्वयंपाक स्वतःच करून घ्यावा, अशी सूचना होती. मी काही प्रवाशांच्या गटात सामील झालो व अशा तऱ्हेने स्वतः स्वयंपाक करण्याच्या त्रासातून मी बचावलो.

"क्वारंटीन" चा आमचा अवधी एकदाचा संपला. पीनांग शहरात जाण्याची आम्हाला अनुमती मिळाली. चौकशी करतांना असं समजलं की तिथं चटकन नोकरी मिळू शकते. मी अनेक दुकानांवर आणि व्यापारी पेढ्यांवर जाऊन आलो तेव्हा तिथं सुशिक्षित तरुणांची गरज आहे, हे माझ्या लक्षात आलं परंतु माझं मन तिकडे ओढच घेत नव्हतं.

पीनांग येथील गुरुद्वारामध्ये उतरलेले काही प्रवासी सिंगापूरकडे जाऊ इच्छित होते. मीही त्यांची साथ पकडली. सिंगापूरला पोचल्यानंतर माझ्या ध्यानात आलं की ते एक मोठं व्यापारी केन्द्र आहे. हिन्दी व्यापारी, मजूर आणि पोलीस तिथं मोठ्या संख्येने होते. सिंधी व्यापाऱ्यांची रेशीम कापडाची अनेक दुकानं होती. त्यांच्या दुकानांवर मी नोकरी करावी, यासाठी मला अनेक प्रलोभनं दाखवण्यात आली. परंतु माझं मन त्या ठिकाणीही रमलं नाही.

एक भलं मोठं प्रवासी जहाज हाँगकाँगकडे जायचं होतं. तिकिट घेऊन मी त्या जहाजावर चढलो. जहाजात जवळपास १५०० प्रवासी असावेत——त्यांपैकी काही हिन्दीही होते. जहाजाच्या तिन्ही मजल्यांवर प्रवासी खच्चून भरलेले होते. मी सर्वांत वरच्या मजल्यावर माझं सामान ठेवून तिथं बसलो. मला बघून काही हिंदी प्रवासी माझ्याजवळ आले. सिंगापूर-हाँगकाँग, प्रवास एकूण सहा दिवसांचा होता. दिवस पावसाळ्याचे होते. जहाज हिंदकळत पुढे पुढे जाऊ लागलं. जहाजाच्या हेलकाव्यामुळे प्रवाशांना उलट्या होऊ लागल्या त्यामुळे सगळीकडे दुर्गंधी पसरली. स्वच्छतेची कुठलीही व्यवस्था नव्हती. प्रवासाच्या चौथ्या दिवशी आमचं जहाज वादळात सापडलं. खवळलेल्या समुद्राच्या तुफानी लाटांमुळे जहाज सतत हेलकावत होतं—जहाज बुडतं की काय असं वाटू लागलं. अशक्त आणि आजारी असलेले चिनी प्रवासी मोठ्या संख्येने मरू लागले. जहाजावरील खलासी त्यांची प्रेतं वर नेऊन जेव्हा समुद्रात फेकायचे तेव्हा माझं मन विलक्षण बेचैन व्हायचं——त्या विलक्षण

तुफानाचा माझ्या मनावर खोल परिणाम व्हायचा व अनेक भय-भावना माझ्या मनात निर्माण व्हायच्या. माझ्या शेजारीच पडलेले दोन हिंदी प्रवासी समुद्राच्या लाटांच्या तडाख्यात सापडले आणि मी शेवटी एकटाच उरलो. जहाजाचा मोठा दोर हाच आता माझ्या जीवनाचा आधार होता. बळकटी गुंडाळून व ती पेटीवर ठेवून मी बसून राहिलो. लाटांचे प्रहार जहाजावर होत होते, परंतु मी दोर घट्ट पकडून बसून राहिलो. प्रत्येक क्षणी मला विकाळ मृत्यूचं दर्शन घडत होतं. वारंवार माझ्या मनात एकच विचार येत होता—याच अवस्थेत आपणास मृत्यू तर येणार नाही? वडिलांची आणि भावाची आठवण येऊ लागली. मला याचंही भान होतं की मी स्वेच्छेने जीवनाचा हा मार्ग स्वीकारला आहे. जीवनाच्या मार्गावरील सर्व यातना सहन करणं मला भागच आहे.

जहाजाच्या कप्तानानं प्रवाशांना स्पष्टपणे सांगितलं की जगण्याची फारशी आशा नाही. जहाज बुडणार आहे. परंतु तरीही जहाज टिकून राहिलं—सुखरूप बचावलं नाही तर तब्बल तेरा दिवसांनी आम्ही हाँगकाँग बंदराजवळ येऊन पोचलो. संबंध चार दिवस आम्हाला खायला-प्यायला मिळालं नव्हतं. समुद्राच्या लाटांच्या तडाख्यांनी संबंध शरीर ठणकत होतं. मृत्यूच्या दारातून परत आलो हे खरं परंतु आता जागचं उठायचं कसं? चालायचं कसं? आणि उतरल्यावर जाणार कुठं? जहाज जेव्हां हाँगकाँगच्या खाडीत पोचलं तेव्हा घरं आणि छोटे छोटे पर्वत नजरेच्या टप्प्यात आले. ते सर्व दृश्य मोठं मोहक होतं. बघता बघता अनेक चिनी व्यापारी जहाजात घुसले. त्यांच्यापाशी खाद्यपदार्थ आणि स्वादिष्ट फळं होती. त्यांच्याकडून घेतलेल्या ताज्या, गोड आणि सुमधुर फळांच्या आस्वादाने मला चांगली तरतरी आली. माझी छोटी बळकटी आणि पेटी बगलेत पकडून इतर हिंदी मुसाफिरांसमवेत मीही जहाजावरून बाहेर पडलो.

फिरत फिरत सर्वजण शिखांच्या एका गुरुद्वाराजवळ येऊन पोचले. हा गुरुद्वारा आकाराने खूप प्रचंड होता कारण हाँगकाँग येथे आलेल्या शिखांनी आणि हिंदू लोकांनी तो बनवलेला होता. हिंदुस्थानातून येथे आलेले सर्वच प्रवासी भाडे वगैरे काही न देता या ठिकाणी राहू शकत होते. कुणी आपल्या बायका-मुलांसह तिथं आले तर त्यांच्यासाठी स्वतंत्र खोल्या होत्या आणि सड्या मुसाफिरासाठी तिथं एक मोठा हॉल होता. त्या हॉलमध्ये ते थांबू शकत होते.

सर्व प्रवाशांच्या समवेत मीही गुरुद्वाराचाच आश्रय घेतला. दिवस उन्हाळ्याचे होते त्यामुळे रात्री त्या मोठ्या हॉलमध्ये झोपणं अशक्य होतं. त्यामुळे सर्वजण मोकळ्या आवारात झोपायला निघाले व मी ही त्यांच्या बरोबर झोपायला बाहेर पडलो. हाँगकाँगला

येईपर्यंत माझ्यापाशी शंभर रुपयांतून आता पासष्ट रुपये शिल्लक राहिले होते. माझ्या जवळ एक छोटीशी पेटी होती व त्यात पैसे ठेवून मी त्या पेटीला कुलूप लावलं होतं. सकाळी उठल्यानंतर मी बघितलं तेव्हा माझ्या पेटीचं कुलूप तोडलेलं होतं आणि सगळी रक्कम कुणीतरी लंपास केली होती. ज्यानं कुणी चोरी केली होती तो गृहस्थ फारच सज्जन असावा कारण ६५ रुपयांपैकी ५ रुपये त्यानं माझ्यासाठी मागे ठेवले होते. ते पाच रुपये वजून माझे पैसे चोरीला गेले, याचासुद्धा मला विसर पडला. मला असंच वाटत राहिलं की कुणीतरी स्वतःच्या खिशातले पाच रुपये मला देऊन गेला आहे. मी चोर देखील शोधून काढला परंतु पोलिस ठाण्यात नेल्यावर त्यानं चक्क कानांवर हात ठेवले. पुरावा काही नव्हताच—त्यामुळे माझी रक्कम मला परत मिळाली नाही आणि चोराला शिक्षाही झाली नाही. माझ्या समवेत तिथे थांबलेले अनेक प्रवासी मला सहानुभूती दाखवू लागले. मी विचार करू लागलो, आता आपल्यापाशी अवघे पाच रुपये आहेत. कुणी सखा-सोबती आपल्या बरोबर नाही. कुणाची ओळख-पाळख नाही. आपली गुजराण कशी व्हायची ? ६० रुपये माझ्यापाशी असते तर एखादा महिना सहज काढता आला असता. एवढ्या अवधीत नोकरी मिळवता आली असती किंवा वडिलांकडून आर्थिक मदत मिळवता आली असती.

पिनांग व सिंगापूर येथे भारतवासियांची मोठी संख्या होती. त्यांची दुकानंही बरीच होती आणि सुशिक्षित माणसाला चटकन नोकरी मिळू शकत होती. परंतु हाँगकाँगमध्ये नोकरी मिळणे कठीण होते. पोलीसात किंवा सैन्यात भरती होता आले असते—परंतु या नोकऱ्या मला पसंत नव्हत्या. शेवटी एका सोडावॉटर फॅक्टरीत मला चौकीदाराची नोकरी मिळाली. दररोजच्या भाकरीपुरते पैसे मिळू लागले. डाळ, पीठ खरेदी करून मी स्वतःचा स्वयंपाक करू लागलो. गुरुद्वारामध्ये रोज नवे नवे मुसाफिर उतरायला यायचे. मी त्यांची विचारपूस करायचा. काही लोकांशी मैत्रीसंबंधही ठेवायचा. एक दिवस लाहोरच्या डी. ए. व्ही. कॉलेजात शिक्षण घेणारे दोन हिन्दी तरुण गुरुद्वारात थांबले, लौकरच माझी त्यांची घसट वाढली. त्यातल्या एकाचं नाव होतं बलवन्तसिंह—तोही माझ्यासारखाच घरातून पळून आला होता—माझ्याप्रमाणेच निष्कांचन होता. तोही मोठा बेफिकिर वृत्तीचा होता. त्याला गाण्याची आवड होती. त्याचा आवाज गोड होता व देखणा तोही रंगेला होता. आम्ही दोघेही सारखेच वेडे होतो व एकाच मार्गाचे प्रवासी होतो—त्यामुळे आम्ही अत्यंत घनिष्ट मित्र बनलो. त्याच्या दुसऱ्या साथीदाराचं नाव होतं प्यारेलाल. त्याच्यापाशी अमेरिकेला जाण्यासाठी पैसे होते परंतु कपडे नव्हते. मी माझा कोट व पँट त्याला देऊन टाकली. बलवन्तसिंहाची भेट झाल्या-नंतर मला दोन वेळ जेवणाचीही भ्रांत पडू लागली नाही. आम्ही दोघे एक वेळ जेवून दिवस काढू लागलो.

माणूस एखाद्या संकटाशी सामना करू शकतो—पण जेव्हा सर्व बाजूंनी संकटं माणसावर तुटून पडतात तेव्हा मग डोकं गरगरायला लागतं. आम्ही दोघेही देशप्रेमाची गाणी गायचो आणि अन्य लोकांशी सतत देशप्रेमासंबंधीच बोलायचो. या गोष्टी पोलिसांच्या ध्यानात आल्या. परंतु त्यांनी असा विचार केला की एकच वेळ जेवायला मिळत असल्या-मुळे उपासमारीला कंटाळून आम्ही एक न एक दिवस पोलिसात भरती होऊ—मग आम्हाला वठणीवर आणणं अगदीच सोपं होईल. अशी अटकळ बांधूनच पोलिसांनी मला नोकरीवरून काढून टाकायला भाग पाडलं. आम्ही दोघंही उपासमारीला तोंड देता देता जिकिरीला आलो. काही दिवसांनी बलवन्तसिंहाला आर्थिक मदत मिळाली व तोही अमेरिकेला निघून गेला.

तो निघून गेला—मी एकटाच मागे उरलो. मी पोलिसांच्या डोळ्यांवर आलो होतो म्हणून मला कुठं नोकरीही मिळत नव्हती. गुरुद्वारात राहणारे सर्वजण मला ओळखत होते. भोजनाच्या वेळी कुणी न कुणी मला बोलवायचा व आपल्याबरोबर जेवू घालायचा. माझी हलाखीची स्थिती सर्वांनाच समजली—माझ्या मनात कोणत्या भावना वसत आहेत हेही त्यांना माहीत होतं. दर रविवारी शेकडो हिंदी सैनिक गुरुद्वारामध्ये दर्शनासाठी यायचे. हाँगकाँगमध्ये सात नंबरची राजपूत रेजिमेंट होती—अनेक राजपूतही दर्शनाला यायचे. त्यांनाही माझी परिस्थिती समजली. त्यांनी माझी भेट घेतली—ते मला मित्र मानू लागले. ते तिथून पाच मैलांच्या अंतरावर राहात होते. जाण्या-येण्यासाठी आठ आणे भाडं पडे. त्यांनी माझ्या भाड्याची सोय केली व आपल्या समवेत माझी जेवणाचीही व्यवस्था केली. खाण्या-पिण्याचा प्रश्न सुटल्यामुळे मी दररोज शहराचा फेरफटका मारू लागलो.

एक दिवस सकाळच्या प्रहरी बाजाराकडे मी निघालो होतो—रस्त्यातील चौका-चौकात लांब केसांचे ढीगच्या ढीग पडल्याचे मला दिसून आले. हे कसं काय घडलं—काहीच समजेना. तपास केला तेव्हा सर्व गोष्टी समजल्या. प्रकार असा होता. चीनवर मांचू वंशाची जुल्मी राजवट राज्य करत होती—ती सर्व प्रजेचा छळ करत होती. चीनचे महान नेते डॉ. सनयातसेन यांनी लोकांना स्वातंत्र्य मिळावे यासाठी एक योजना बनवली होती. पुरुषांनीदेखील लांब केस ठेवले पाहिजेत असं शाही फर्मान होतं. गुलामीचं ते एक ठळक असं प्रतीक होतं. डॉ. सनयातसेननं आपल्या क्रांतिकारी गटाच्या मदतीनं एक गुप्त योजना तयार केली. त्या योजनेप्रमाणं चीनमधील सर्व पुरुषांनी रात्रीतून आपल्या लांब केसांचं मुंडण करून केसांचे ढीगच्या ढीग चौका-चौकात रचून ठेवले. चीनच्या लोकांनी एक क्रांतीच घडवून आणली होती. मला राजकारणात फारसं कळत नव्हतं, क्रांती कशी असते, कोणत्या उद्देशानं ती करण्यात येते, तिची योजना कशी बनवली जाते, कोण योजना तयार करतो आणि योजनेप्रमाणे सगळं कार्य कसं पार पडतं, या सर्व गोष्टींचं त्या सुमारास मला काहीच ज्ञान नव्हतं. हा प्रकार मी जेव्हा बघितला तेव्हा

मनात विचार आला यांचं घराणं चिनीच होतं, ते कुठल्या परक्या देशातलं नव्हतं परंतु चिनी प्रजेवर ते अत्याचार करू लागलं त्यामुळे प्रजेला राजसत्तेविरुद्ध अखेर बंड करावं लागलं. सर्व देशातील लोकांची गुप्ततेनं तयारी करून, एका विवक्षित रात्री, एका विशिष्ट योजनेनुसार एकाच प्रकारची कृती त्यांच्याकडून करून घेणं किती सहजासहजी त्यांना शक्य झालं. शासनाच्या गुप्तचर खात्याला ह्याचा पत्ता देखील लागला नाही. चिनी गुप्त-चरांना, चिनी लोकांमध्ये वावरत असताना या गोष्टीची माहिती मिळवणं फार काही अवघड नव्हतं. मी विचार करू लागलो—चीनमध्ये एवढी बिकट कामगिरी इतक्या सोप्या पद्धतीने पार पाडता येते तर मग हिंदुस्थानातही गुप्त पद्धतीनं एखादं कार्य करणं कठीण होऊ नये. इंग्रज परक्या देशाचे होते-त्यांचं रंग-रूप, त्यांची भाषा सर्व गोष्टी निराळ्या आहेत. हिंदी लोकांत मिसळून त्यांना त्यांच्या मनातील गुप्त गोष्टींचा कुठून थांगपत्ता लागणार? शेकडो वर्षांच्या गुलामगिरीमुळं हिंदी लोक किती खालच्या पातळीपर्यंत पोंचले आहेत. आपल्या स्वार्थासाठी ते काय वाटेल ते करतील, याची माझ्या मनाला शंका सुद्धा आली नाही. चिनी लोकांच्या या यशस्वी कृतीमुळे माझी विचार करण्याची पद्धतीच बदलून टाकली. मनात विचारांचं वादळ उठलं. चिनी जनतेला एवढ्या महान आणि देशव्यापी कार्यासाठी इतक्या सहजतेनं संघटित करता येतं तर हिंदुस्थानात असं एखादं कार्य का नाही करता येणार? ह्याच गोष्टीवर मी जेव्हा माझ्या मित्रांशी चर्चा करू लागलो तेव्हा त्यांनी मला जाणीव करून दिली की चीनच्या जनतेनं जी कृती केली तशी सफलता हिंदुस्थानात मिळू शकणार नाही.

हाँगकाँगमध्ये वास्तव्य करून असलेले चिनी जे शाळा-कॉलेजातून शिकत होते, त्यांच शिक्षणाचं माध्यम इंग्रजी होतं. हाँगकाँगमध्ये माझ्या डोळ्यादेखत चिनी लोकांनी जी क्रांती घडवून आणली होती त्याअगोदर चिनी लोकांविषयी माझ्या मनात विशेष अशी आस्था नव्हती. मी त्यांना दुबळे, अशक्त व घाणेरडे समजत होतो. त्या दिवशी चौकातून केसांचे ढिगारे जेव्हा मी बघितले व त्या पाठीमागचे कारण मला समजलं, तेव्हापासून चिनी लोकांविषयी माझ्या मनात आदर निर्माण झाला. समवयस्क तरुण मंडळींशी मी कधी कधी चर्चा करत राही. त्यांच्याकडून मला समजलं की अमेरिकेत स्थायिक झालेले चिनी लोक, चीनमधील आपल्या बांधवांसाठी विशिष्ट राजकीय तत्त्वज्ञान त्यांच्यापर्यंत पोंचवून त्यांना कशाप्रकारे संघटित करत आहेत. अमेरिकेत जाऊन कोणत्या प्रकारचं शिक्षण मिळवता येईल, हेही मला त्यांनी सांगितलं. या सर्व गोष्टींनी प्रभावित होऊन लौकरात लौकर आपण अमेरिकेला गेलं पाहिजे, याची स्वप्नं मी बघू लागलो.

माझ्या मनांत स्वदेश-प्रेमाचं चित्र अद्यापही स्पष्ट नव्हतं तरी एखाद्या चुंबकाप्रमाणं मी त्याच्याकडे खेचला जात होतो. मी एका अज्ञात उद्दिष्टाकडे वाटचाल करू लागलो ते उद्दिष्ट अज्ञात असलं तरी मोहक होतं. पृथ्वी सूर्याभोवती भ्रमण करत होती आणि भ्रमणाचा तिचा वेग प्रचंड होता—व ती बेभान होती.

हाँगकाँगच्या गुरुद्वारांत जे प्रवासी उतरण्यासाठी येत— मी त्यांना सर्वतोपरी साहाय्य करायचा. ते सर्वच माझ्यावर खूष असायचे व माझ्यासंबंधी इतरांशी बोलायचे. गुरुद्वारात कुणी आला की त्याच्या ठिकाणी मी स्वतःलाच कल्पू लागलो. सैनिकी मित्रांनी माझ्या खाण्या-पिण्याची विवंचना मिटवली होती. वडिलांनीही मला मदत म्हणून ४०० रुपये मनिऑर्डरने पाठवले होते. आता मी जरा अधिकच मोकळेपणानं, आपल्या देशाला स्वतंत्र कसं करता येईल ? यासंबंधी विचार करू लागलो.

एके दिवशी माझी श्री. बसंतसिंहांशी भेट झाली. ते चीनमध्ये पुढेतरी नोकरी करत होते. ती नोकरी सोडून अधिक कमाईसाठी ते अमेरिकेला जाऊ इच्छित होते. मी अधिक जवळून जेव्हा त्यांच्या संपर्कात आलो तेव्हा मला कळलं की त्यांच्याही मनांत देशप्रेमाची भावना ज्वलंत होती. ते अतिशय सज्जन गृहस्थ होते. थोड्याशाच अवधीत आम्ही एकमेकांचा विश्वास संपादन केला. अमेरिकेला जाण्यासाठी 'मनीला' खेरीज अन्य मार्ग नव्हता. श्री. बसंतसिंहांचा मी जोडीदार बनलो आणि त्यांच्या समवेत 'मनीला' येथे पोचलो.

फिलिपाईन्स द्वीपांवर अमेरिकेचंच अधिराज्य होतं. तेथील वातावरण मला हाँगकाँगपेक्षा अधिक अनुकूल वाटलं. तेथले रहिवासी भारतीयांबरोबर मोकळेपणाने वागत होते. अशा भेटी-गाठीत दोन्ही देशांच्या स्वातंत्र्यासंबंधी चर्चा होई. या विषयावर वृत्तपत्रांतूनही चर्चा चाले. या वातावरणानं माझ्यातील क्रांतिकारी विचारांना पार ढवळून काढलं. फिलिपाईन्सचे तरुण नेते काय कामगिरी बजावत आहेत व कोणत्या योजना आखत आहेत— हे सर्व जाणून घेण्यासाठी मी त्यांचे लेख वाचू लागलो व भाषणं लक्षपूर्वक ऐकू लागलो. माझ्या डोक्यात नवा प्रकाश पडला आणि माझी उत्सुकता वाढत गेली. एके दिवशी मी एका तरुणाचं भाषण ऐकलं. त्याच्या ओजस्वी भाषणातलं एक वाक्य तर कायमचं माझ्या मनावर कोरलं गेलं. तो म्हणाला— आपले विचार तेव्हाच कृतीत उतरू शकतील जेव्हा आपल्या हाती बंदूक असेल. विचारांना शस्त्रांचं पाठबळ हवं. मनीलाच्या स्वतंत्र वातावरणाचा तेथल्या तरुणांवर बराच परिणाम झालेला होता. माझ्या बोलण्याकडे ती मंडळी लक्ष देत आणि मला मोठ्या आदरानं व प्रेमानं वागवीत. त्यांनी मला आर्थिक साहाय्यही केलं. त्यामुळेच मी श्री. बसंतसिंहांचं कर्ज फेडून टाकू शकलो.

मनीला येथे स्थायिक झालेले भारतीय वेगवेगळ्या व्यवसायांत विभागलेले होते. पंजाबातून आलेले लोक कारखान्यांतून—गोदामांवर चौकीदार म्हणून काम करत किंवा कपड्यांचे गठ्ठे पाठीवर वाहून, निरनिराळ्या ठिकाणी जाऊन, विक्री करीत. काही श्रीमंत सिंधी लोकांची रेशमी कपड्याची दुकानं होती. हिन्दी बांधवांच्या मदतीनं मीही काही माल खरेदी करून, पाठीवर लादून, त्यांच्या समवेत मनीलाच्या खेड्यांतून

विकायला सुरुवात केली. अवघ्या दोनच महिन्यांत मी मित्रांच्या कर्जाची परतफेड केली. मी स्वतःच्या कमाईवर तिथं टिकू शकलो असा विश्वास माझ्या मनात निर्माण झाला. पैसे कमावणं हे काही माझं ध्येय नाही, हे माझ्या भागीदारांच्या लक्षात आलं तेव्हा या फेरीवाल्याच्या धंद्यातून माझी सुटका कशी करावी, याचा ते विचार करू लागले. माझ्या जीवनाचं स्वप्न हळूहळू त्यांच्या लक्षात येत चाललं. तरीही तीन महिने मी फेरीवाल्याचा धंदा केला. या तीन महिन्यांतील अनुभवांनी माझ्या मनोवृत्तीत खूपच बदल घडवून आणले. असं म्हणतात की बोलघेवड्या माणसाच्या बाराचीही विक्री होते— आपल्या धंद्यात मी दोन्ही दृष्टींनी सफल ठरलो— कपड्यांची विक्री करताना मी लोकप्रिय बनत चाललो आणि माझं देशप्रेम अधिकाधिक उत्कट बनत चाललं.

एके दिवशी मी असाच फिरत फिरत निघालो. एका दूरवरच्या खेड्यात मला तीन शीख भेटले. माझा सर्व माल विकला होता. मनीलाकडे परत निघालो तेव्हा मी त्यांच्या समवेत होतो. आम्ही सर्वजण एका गावातील रस्त्याने चाललो होतो. त्या गावांतील मुलांनी बहुधा या अगोदर कधी आमच्याप्रमाणं डोक्यावर केस बांधलेले, पगडी धारण केलेले, लांब दाढी वाढवलेले लोक बघितले नसावेत. एखाद्या मदाऱ्याच्या पाठीमागे मुलं लागतात, त्याप्रमाणं ती मुलं आमच्या मागून चालू लागली. मदाऱ्याच्या अस्वलाला किंवा माकडाला ग्राम्य मुले त्रास देतात— असाच काहीतरी त्यांचा हेतू असावा. वस्तुतः शिखांप्रमाणे माझ्या डोक्यावर पगडी नव्हती, माझी दाढीही वाढवलेली नव्हती, तरीही मोठ्या वयाच्या मुलांना आमची थोडी काढण्याची लहर आली. शीख बांधवांच्या पगड्या त्यांनी ओढून काढल्या व त्या परत बांधून दाखवण्यास त्यांना त्यांनी सांगितलं. त्यांचं असं वागणं सहनशीलतेच्या पलीकडचं होतं. मुलांना दोन-दोन थपडा आम्ही लगावल्या. मुलं रडत रडत पळाली आणि एका शिपायाला त्यांनी बोलावून आणलं. शिपाई तेथलाच होता व वयानंही तरुण होता. येताक्षणीच त्यानं माझ्या साथीदारांचा दंडुक्यानं समाचार घेतला. मला त्याचं असं वागणं असह्य झालं. मी त्या पोलिसाला मारहाण वगैरे केली नाही मात्र त्याच्या हातातील दंडुका हिसकावून घेतला. त्यानं जोरात शिट्टी फुंकली. शिट्टी ऐकून आणखी तीन पोलीस आपले दंडुके सावरत आमच्याकडे पळत आले. आधीच्या पोलिसानं माझ्याकडे खूण केली आणि ते तिघेही माझ्यावर तुटून पडले. आता मलाही स्वतःचा बचाव करणं भागच होतं. मी काठी-लाठीचे हात जाणणारा असल्यामुळे मी त्यांचा वार चुकवला. माझ्या प्रतिकारामुळं त्यांनाच मार बसला. माझे साथीदार गुपचूप उभे राहून हे दृश्य बघत होते. हळूहळू बघणाऱ्यांची तिथं गर्दी जमली. माझा जीव धोक्यात होता. पळायलाही जागा सापडत नव्हती. मी मग असा विचार केला की पोलिस ठाण्याखेरीज दुसरं कुठलंच सुरक्षित ठिकाण नाही. पोलिसांपैकी कुणापाशीच बंदूक नव्हती. पोलिसांच्या चिथावणीमुळे

गावकरी लोक आपल्यावर तुटून पडतील की काय याची मला धास्ती पडली. मग मात्र काही बरं नव्हतं. आम्हाला ठाण्यावर घेऊन चला, असं मी त्यांना म्हणालो. माझी ही सूचना त्यांनी मान्य केली. आम्ही सर्वजण ठाण्यावर पोंचलो. तेथल्या पोलिस अधिकाऱ्याला मी सर्व हकीकत इंग्रजीतून कथन केली. त्यानं कुणाचीच बाजू घेतली नाही. मला त्यानं एका कोठडीत डांबून बाहेरून कुलूप ठोठावलं. सोबत आलेल्या शिपायांपैकी एकजण हातात शस्त्र घेऊन बाहेर पहाऱ्यावर थांबला. रात्रीच्या वेळी त्या ठाण्यात आमच्या दोघांखेरीज अन्य कुणीही नव्हतं. वारंवार तो तरुण शिपाई माझ्या-समोर येऊन उभा राहायचा व मला ठार मारण्याची धमकी द्यायचा. त्याच्या धमकीला मी जोरात हसून त्यालाच म्हणालो— "हे बघ—मघा तर तुझ्याच दंडुक्यानं तुला पिटून काढलं आहे— आता जर तू काही करण्याचा प्रयत्न केलास तर तुझ्याच हातातील शस्त्राने तुझी सांडोळी करून टाकीन". आमच्यात असा संवाद पुष्कळवेळ चालला होता.

ते काही फारसं मोठं गाव नव्हतं. सायंकाळच्या या घटनेनं सगळ्या गावात खळबळ माजली. गावच्या प्रमुखाच्या कानावरही घटना पडली. त्या प्रमुखाचा मुलगा मनीला येथे कॉलेजात शिकत होता. तो नेमका त्याच वेळी गावी आला होता. त्या प्रमुखानं विचार केला की एक सुशिक्षित हिन्दी तरुण ठाण्यात पकडून ठेवलेला आहे, त्याच्यासंबंधी आपण सर्व माहिती मिळवली पाहिजे. आपल्या मुलाला त्यानं ठाण्यावर जाऊन माझी भेट घ्यायला सांगितलं. ठाण्यात जातेवेळी काही खाद्य पदार्थ सोबत न्यायचीही त्याने मुलाला सूचना केली. प्रमुखाचा मुलगा रात्री दहा वाजता ठाण्यात आला. कोठडीचं दार उघडून त्यानं मला बाहेर काढलं व आग्रहपूर्वक त्यानं आणलेले पदार्थ खाऊ घातले. खाणं आटोपल्यावर मी त्याला विस्तारानं सर्व हकीकत कथन केली. माझी कहाणी सत्य होती. गावकरी व तिथली मुलं त्याला साक्षी होती.

माझ्या बरोबरचे तिन्ही दोस्त हातोहात पोलिसांपासून कसेबसे बचावून तेथून निसटले. मनीला येथे पोंचल्यानंतर त्यांनी माझ्या मित्रांना सर्व हकीकत सांगितली. बरकतअलीखान चौधरी, हल्लवारा गावचे राजपूत मुसलमान होते. ते माझ्या परिचयाचे होते. बातमी समजताच एका वकिलाला बरोबर घेऊन ते तडक मजकडे निघाले. पोलिस अधिकाऱ्याला तार पाठवून आपण येत असल्याची त्यांनी सूचना केली. पोलिसांना ही बातमी समजली तेव्हा ते सर्वच जण विचारात पडले. माझ्याविरुद्ध साक्ष देण्यासाठी पोलिसांना कुणीही सापडेना. आता ते माझ्याशी तडजोडीची भाषा करू लागले. बरकतअलीखान चौधरी व वकील साहेब आल्यानंतर आमच्यात तडजोड झाली. पोलिस ठाण्यात सर्वांच्या समवेत मी जेवण केलं आणि एकमेकांना आलिंगन देऊन मी त्यांचा निरोप घेतला.

'मनीसोटा' या नावाचं एक भलं मोठं जहाज मनीलाहून अमेरिकेकडे निघालं होतं. पस्तीस हजार टन वजनाच्या या जहाजानं प्रवास करायला अनेकजण उत्सुक होते. अमेरिकेला जाण्याच्या उद्देशानं मनीला येथे जमा झालेले सर्व भारतीय प्रवासाच्या तयारीस लागले. काही मित्र मलाही चलण्याविषयी विचारू लागले. अमेरिका वारी-संबंधी विचार करणं ही माझ्यासाठी एक समस्याच होती. माझी स्थिती पंख छाटलेल्या पक्षासारखी होती. उड्डाण करण्याची माझी इच्छा होती परंतु पंखच नव्हते. जहाज निघायला सबंध एका महिन्याचा अवधी होता. या महिन्याच्या कालखंडातच आणखी एक-दोन घटना घडल्या.

एक वेळ एक शीख तरुण माझ्यासह निघाला होता. जहाजमार्गे आम्ही एका खेड्यात चाललो होतो. शीख तरुणाच्या डोक्यावरचे केस लांब होते परंतु त्याला दाढी-मिशा नव्हत्या. त्याचा चेहरा मुलायम होता. मलाही दाढी-मिशा नव्हत्या, डोक्यावर केस होते. ते एक छोटंसं गाव होतं. तिथल्या काही मुलींना अशी शंका आली की माझा जोडीदार पुरुष नसून स्त्रीच आहे. तेथील खेड्यातील स्त्रिया डोक्याला कपडा बांधत असत. मुलींनी माझ्या साथीदाराची पगडी काढली— त्याच्या डोक्यावरील लांब-लांब केस बघून त्यांची शंका अधिकच बळावली. एक मुलगी, मुलाचा वेष धारण करून का फिरते आहे, हे जाणून घ्यायची त्यांची इच्छा होती. काही तरुण मुलींनी आणखी दूरवरचा विचार केला. माझ्या सोबत्याला पकडून त्यांनी एका घरात नेलं. हा सर्व तमाशा बघत मी नुसता बसून राहिलो. खेड्यातील त्या तरुणी होत्या, त्यांनी बळजबरी करून माझ्या साथीदाराच्या अंगावरील सर्व कपडे काढले. सत्य समजलं तेव्हा त्या किंचाळत व जोरजोराने हसत त्या घरातून बाहेर आल्या. कपडे पूर्वीप्रमाणेच अंगावर चढवून माझा साथीदारही बाहेर आला. त्याच्यावर ओढवलेला प्रसंग त्यानं मला सविस्तरपणे सांगितला. सायंकाळी गावातील सर्व तरुण-तरुणींनी आम्हाला घेरलं आणि आम्हाला पाहुणचार केला.

माझ्या एका शीख साथीदाराचं नाव गुरुनामसिंह असं होतं. आम्ही दोघांनी बराच माल खरेदी केला. दोन मण मालाच्या गठड्या स्टीमरमध्ये चढवून आम्ही मनीलाहून निघालो. आम्ही एका खेडवळ बंदरावर उतरलो. गावात फेरी मारून आम्ही मालाची विक्री सुरू केली. आमच्या जवळचा माल आम्ही सांगू त्या किमतीला विक्री होत होता. पैसे मिळवण्याच्या लालसेने आम्ही दुसऱ्या एका खेड्यात शिरलो. त्या गावात आम्हाला आणखीनच फायदा झाला. तेथून आम्ही आणखी पुढं निघालो. तिन्ही गावात मिळून आमच्या जवळच्या निम्म्या मालाची विक्री झाली. पुष्कळच नफा मिळाला. मालाची विक्री करता करता सायंकाळ झाली. आमच्याजवळ पुष्कळच पैसा जमा झाला. गावातील लोकांनाही आमच्यापाशी मोठी रक्कम आहे हे ठाऊक होतं. रात्री त्या गावी थांबणं धोक्याचं होतं. परत जाण्यासाठी आम्ही त्या गावाहून निघालो

तेव्हा गावातील लोकांनी रात्रभर तिथंच राहण्याचा सल्ला दिला. रस्त्यात जंगली जनावरांचं भय होतं. परंतु आम्हाला भीती होती. कुणी आम्हाला लुटतील की काय? आम्हा दोघापाशी नकली पिस्तुलं होती. खिशातून आम्ही पिस्तुलं काढून त्यांना दाखवली व त्यांच्या आवाजानं जंगली जनावरं धाबरून पळ काढतील, असं आम्ही त्यांना सांगितलं.

अंधार पडला होता. गावापासून थोड्या अंतरावर आम्ही पोचलो आणि आम्ही वाट चुकलो. आकाशात ढग जमा झाले होते, त्यामुळे सर्व दिशा काळोखात बुडाल्या होत्या. चालून चालून हात-पायही खूपच थकून गेले. कुठल्याच बाजूनं गावातील दिवे दिसत नव्हते. एक-एक मणाचं ओझं आमच्या पाठीवर होतं. आमचं चालण्याचं बळ संपुष्टात आलं होतं. तहानेनं–भुकेनं आम्हाला व्याकूळ करून सोडलं होतं. ओझं थोडावेळ खाली टेकवावं व परत पाठीवर घेऊन चालायला लागावं, असा आमचा क्रम चालला होता. आमच्यापाशी गोठवलेल्या दुधाचा डबा होता. तो अशावेळी कामाला आला. ते खाऊन शरीरात थोडी ताकद आली परंतु तहानेनं घशाला कोरड पडली. आम्ही पार थकून गेलो होतो– पडत-झडत, एकमेकाला आधार देत आम्ही मार्गक्रमणा करत होतो. एवढ्यातच कुठूनतरी कुत्र्यांच्या भुंकण्याचा आवाज कानावर पडला. वस्ती जवळ आली आहे असे समजून, आम्ही भुंकण्याचा आवाज ज्या बाजूनं आला, त्या दिशेनं चालू लागलो. थोड्याच वेळात गावातील दिवे आमच्या दृष्टीस पडले. तो प्रकाश बघून आमच्याही मनात आशेचा किरण निर्माण झाला. आम्ही ज्योती एकरूप झाल्या. रात्रीचे बारा वाजून गेले असावेत. कुत्री गावकऱ्यांना सुचवीत होती की बघा कुणीतरी परकी माणसं गावात येत आहेत, उठा, जागे व्हा! कुत्र्यांच्या इशाऱ्यानं तिथला चौकीदार जागा होऊन आमच्या स्वागतासाठी समोर उभा राहिला. तो आपल्या भाषेत काही तरी विचारू लागला– मी इंग्रजीतून उत्तरं देऊ लागलो. आमच्या भाषा भिन्न होत्या त्यामुळं काहीच समजेनासं झालं. त्यानं खूण केली व आम्ही त्याच्या मागं मागं चालू लागलो. एका मोठ्या घरापाशी आम्ही येऊन पोचलो. त्या घरमालकाला झोपेतून जागं करण्यात आलं. त्यानं उठून दार उघडलं व आम्हाला घरात घेतलं. तो मालक वयानं तरुणच दिसत होता. त्याला इंग्रजी भाषा उत्तम रीतीनं अवगत होती. त्यानं आपल्या पत्नीला जागं केलं. तीही तरुणच होती. घरात त्या दोघांखेरीज तिसरं कुणीच नव्हतं. आमच्या बाबतीत त्यांनी जे अगत्य व प्रेम दाखवलं त्यामुळं आमचा सगळा शीण कुठल्या कुठे पळाला. तहानेनं आम्ही अगदी व्याकूळ बनलो होतो. आम्ही आधी तहान भागवली. दुसरे दिवशी मोठ्या आनंदानं आम्ही त्या गावाहून पुढे निघालो.

सकाळी आम्ही होडीत बसून दुसऱ्या गावाकडे निघालो. तेथून आम्ही जहाज पकडून मनीलाला निघणार होतो. चार-पाच मैल जेमतेम आम्ही पुढे गेलो न गेलो तोच अचानक वादळ सुरू झालं. नावाड्याचा होडीवर ताबा राहिला नाही. नशीब एवढंच की होडी उलटली नाही. नावाडी खूपच निराश दिसत होता. आम्ही

वाचू किंवा नाही, काय घडेल हा सर्व विचार करणे व्यर्थ होतं. नाव जाता जिथं कुठं जाऊन पोचेल तोच आमचा किनारा ठरणार होता. त्या जंगली भागात लोक आम्हाला कसं वागवतील, हा विचार करणंही व्यर्थच होतं. सुदैवाने आमची नाव एका जंगली टापूत पोचली व तिथंच थांबली. नावेला बांधून आम्ही अन्न-पाण्याच्या शोधात गावाच्या दिशेने निघालो. गावात भली मोठी यात्रा भरलेली दिसत होती. खाद्यपदार्थांची दुकानं तिथं होती. आमच्यापाशी जो माल शिल्लक होता-त्याचीही तिथं विक्री झाली.

जत्रेमध्ये कोंबड्यांना झुंजवण्यात येत होतं. आपल्याकडं ज्याप्रमाणं मोठ-मोठ्या नामांकित पैलवानांची कुस्ती बघण्यासाठी प्रेक्षकांच्या झुंडीच्या झुंडी जमा होतात त्याप्रमाणं इथं कोंबड्यांची झुंज बघण्यासाठी लोकांनी गर्दी केली होती. कोंबड्यांचे मालक रंगी-बेरंगी पोशाखात नटलेले होते. कोंबड्यांच्या पायांना छोट्या छोट्या तीक्ष्ण सुऱ्या बांधलेल्या होत्या. झुंज लढवणारे पंच, कोंबड्यांचा इतिहास जाणून घेऊन त्यांच्या जोड्या निश्चित करत होते. झुंज बघण्यासाठी तिकिट खरेदी करावं लागत होतं. तिकिटं काढून आम्ही आंत दाखल झालो. कोंबड्यांसमोर जीवन मरणाचा प्रश्न होता. कोंबडे एकमेकांच्या अंगावर तुटून पडत होते—झटापटीनं ते रक्तबंबाळ व्हायचे. दमून शेवटी ते बाजूस सरायचे व लोक खूश व्हायचे. एखादा कोंबडा मैदान सोडून पळ काढू लागला की लोक नुसता कल्लोळ करत होते. काही कोंबडे तडफड करत जागेवरच गतप्राण होऊन पडत व त्यामुळं लोकही श्वास सोडत, त्यांच्या जिवात जीव येई. प्रेक्षकांपैकी अनेकजण कोंबड्यांवर पैसे लावत होते. चांगल्या जोडीवर हजारोंची बाजी लागत होती.

हा खेळ बघून झाल्यानंतर आम्ही पुन्हा नावेत जाऊन बसलो आणि मनीला इथं परत आलो. मनीलामध्ये माझे अनेक मित्र होते. त्यांच्यापैकी अनेकजण अमेरिकेला जाऊ इच्छित होते. मीही त्यांच्यासह अमेरिकेला जावं असं त्यांचं मत होतं. नशिबानंही आता साथ दिली होती. मी माझ्यासाठी काही वस्तूंची खरेदी केली व मोठ्या झोकात अमेरिकेच्या प्रवासाची तयारी केली. अमेरिकेला पोचलेल्या प्रत्येक प्रवाशाला किमान पन्नास डॉलर्सची रक्कम आपल्यापाशी आहे, असं सिद्ध करावं लागायचं. ज्याच्यापाशी एवढी रक्कम नसेल त्याला अमेरिकेत थांबण्याची परवानगी मिळत नसे. पाच मित्रांनी माझ्या पन्नास डॉलर्स रकमेची व्यवस्था केली. मी आता अगदी निश्चिंत बनलो. हे खरं होतं की अंतिम उद्दिष्टा-पर्यंत पोचण्यासाठी दृढनिश्चयाखेरीज माझ्यापाशी दुसरं काहीच नव्हतं. माझा निर्धार पक्का होता आणि मी त्यावर ठाम होतो. जो कुणी माझ्या निकट संपर्कात येई त्याला हे समजे की मी कुठल्याही स्वार्थासाठी नव्हे तर केवळ देश-प्रेमाखातर घरादाराचा त्याग केलेला आहे.

इ. स. १९१२च्या अखेरच्या सुमारास मी पन्नास अन्य साथीदारांसह पंचवीस हजार टन वजनाच्या 'मरो मांटा' नामक जहाजावर चढलो आणि नव्या जगाच्या दिशेनं प्रस्थान ठेवलं. ते जहाज एखाद्या मोठ्या गावाप्रमाणं वाटत होतं. तेथल्या भोजनालयाच्या दालनात पहिल्या वर्गाच्या प्रवाशांसाठी पाचशे खुर्च्या ठेवलेल्या होत्या. भोजनाच्या वेळेस वाद्यसंगीत ऐकवलं जाई. आमच्यासारखे तिसऱ्या वर्गाचे प्रवासी हा सर्व थाटमाट फक्त डोळ्यांनी बघू शकत होते. जहाजाचा प्रवास आनंदानं चालला होता. तिसऱ्या वर्गाच्या प्रवाशांचीही भोजनव्यवस्था उत्तम होती. सर्वांचं जेवण एकत्रच बनवण्यात येई. आम्ही आळी-पाळीनं आपलं भोजन स्वतःच बनवत होतो आमच्या भोजनाचा आस्वाद घेण्यासाठी जहाजावरील चिनी व अमेरिकेचे खलाशी मोठे उत्सुक असत. आमचे खाद्यपदार्थ पौष्टिक व रुचकर असत. खाल्लेलं अन्न पचवण्याशिवाय आम्हाला अन्य काहीच उद्योग नव्हता. यामुळं मनोरंजनासाठी आम्ही दररोज नवे-नवे कार्यक्रम ठरवायचो. समुद्र प्रवासाला आम्हाला संपूर्ण महिना लागला. जवळजवळ वर्षभर मला शारीरिक व मानसिक यातना सहन कराव्या लागल्या होत्या. एका महिन्याच्या या प्रवासात माझं मन उल्हसित झालं. सर्व हाल-अपेष्टांचा विसर पडला. शरीराच्या कणा-कणातून तारुण्याचा जोम प्रकटत होता. माझ्या बरोबरच्या लोकांत माझ्याएवढं इंग्रजी व स्पॅनिश भाषेवरचं प्रभुत्व अन्य कुणाचंच नव्हतं. त्यामुळं आर्थिक व्यवहार मला सोपवण्यात आले. जहाजावरील बँकेत पैसे जमा करणं अथवा बँकेतून पैसे काढणं ही माझीच कामं होती.

आमचं जहाज हाँगकाँग, शांघाई, नागासाकी, योकोहामा आणि हवाई द्वीप या मार्गानं चाललं होतं. यामुळं अनायासेच ही रमणीय स्थळं बघण्याची संधी मला मिळाली होती. या सर्व स्थळांत, नागासाकी बन्दराचं सौंदर्य आपल्यापरीनं निराळं होतं. मागच्या महायुद्धाच्या अखेरीस अमेरिकेनं नागासाकीवर बॉम्ब हल्ले केल्याचं मी वर्तमानपत्रातून वाचलं तेव्हा अमेरिकेनं नागासाकीचं सौंदर्य बघितलेलं नसावं पाहिजे, असंच मला वाटून गेलं. एकदा जरी ते सौंदर्य बघितलं तर ते उध्वस्त करण्यासाठी पाषाणाचंच काळीज हवं. परंतु तिथं बॉम्बवर्षाव झाला, हे संपूर्ण सत्य होतं. कुणीही सुसंस्कृत माणूस अमेरिकेच्या या दुष्कृत्याकडे क्षमेच्या दृष्टिकोनातून बघू शकत नाही—ही घटना तो विसरू शकत नाही. परंतु राजकीय बुद्धिलम्पट कोणतंही क्रूर कृत्य करायला बिलकूल मागे-पुढं बघत नसतात. कंस राजानं नाही का निष्पाप बालकांना दगडावर आपटून निर्घृण हत्या केली ? दुःशासनानं द्रौपदी सारख्या अबलेचं भरदरबारात वस्त्रहरण नाही का केलं? असे विचार मनात उसळले म्हणजे आजही मनाचा गोंधळ उडतो. एवढं खरं!

प्रवास संपला, अमेरिकेच्या शॅटल बन्दरावर जहाज थांबलं. बन्दरावर पाऊल ठेवण्यापूर्वी वैद्यकीय तपासणीला तोंड द्यावं लागतं. जमा केलेली हत्यारं (?) रक्कम तपासून बघतात. कस्टमचे अधिकारी नियमाप्रमाणं विचारपूस करतात. त्यांना समाधानकारक उत्तरं मिळाली नाहीत तर जहाजातून खाली उतरणं अवघड होऊन बसतं. प्रवाशांचं म्हणणं ऐकून घेण्यासाठी दुभाषाचं साहाय्य घेतलं जातं. या कामासाठी बॅनकोव्हर बन्दरामध्ये एका इंग्रज दुभाषाला बोलाविण्यात येई. हा इंग्रज कॅनडामध्ये भारतातील ब्रिटिश शासनाचा गुप्तचर होता. त्याला दुभाषा म्हणून एवढ्याचसाठी बोलावलं की भारतातून आलेले सर्व हिंदी लोक त्याला डोळ्यांखालून घालता यावेत. काही कारणाने त्यादिवशी तो इंग्रज दुभाषा येऊ शकला नव्हता. आता जोपर्यंत दुसरा दुभाषा तिथं पोचणार नाही—तोपर्यंत जहाजावरच मुक्काम करणं भाग होतं. त्या सुमारास जहाजावरील काही लोकांनी जहाजातील एक प्रवासी चांगलं इंग्रजी जाणतो असं कस्टमच्या अधिकाऱ्यांना सांगितलं, तेव्हा असा कोण माणूस आहे असं त्यांनी विचारलं, त्याला आमच्याकडे घेऊन या. असंही ते म्हणाले, मला अधिकाऱ्यांसमोर हजर करण्यात आलं. त्यानं मला काही प्रश्न विचारले. माझ्या उत्तरांनी तो संतुष्ट झाला आणि मला दुभाषा म्हणून तात्पुरतं त्यानं स्वीकारलं.

एका पाठोपाठ एक प्रवासी तिथं येऊ लागले आणि त्यांना प्रश्न विचारण्यात आले. प्रश्न अत्यंत मामुली स्वरूपाचे होते—

१. तुमचा धर्म कोणता?
२. तुम्ही धर्मांतर करायला तयार आहात काय?
३. तुमचा विवाह झाला आहे अथवा नाही?
४. इथं तुम्ही विवाह करणार आहात काय?
५. इथं तुमचं वास्तव्य किती वर्षं राहील?
६. आपल्या आर्थिक कमाईचा तुम्ही विनियोग कसा करणार? इत्यादी.

माझ्या सोबतचे सर्व सहप्रवासी साधेसुधे पंजाबी शेतकरी होते. प्रश्नांची उत्तरं देताना ते मला स्पष्टपणे बजवायचे—"आम्हाला काय ठाऊक आहे-उत्तर काय द्यायचं ती—तूच योग्य उत्तरं देऊन टाक". मी मग स्वतःच योग्य वाटतील ती उत्तरं त्यांच्यासाठी देऊ लागलो. ही गोष्ट मला तशी धोक्याची होती. त्यांच्या उत्तरांचा खरा अनुवाद मी केला असता तर प्रवाशांना त्यापासून धोका होता. मी माझ्या निश्चयावर ठाम होतो. माझ्या मनाप्रमाणं मी त्यांच्या प्रश्नांची उत्तरं देत राहिलो. एका पाठोपाठ एक करत सर्व प्रवासी जहाजावरून खाली उतरले. आता शेवटी माझी पाळी होती. मला पहिला प्रश्न विचारण्यात आला, कोणत्या उद्देशानं तुम्ही या देशात आला आहात? प्रश्नाचं थेट उत्तर मी शिताफीनं टाळलं. उत्तरादाखल

पाच मिनिटांचं एक छोटेसं भाषणच मी त्यांना ऐकवलं. अधिकाऱ्याने डोळे मिटून शांतपणे माझं भाषण ऐकून घेतलं. माझ्या भाषणाचा थोडक्यात सारांश होता—मी माझ्या मातृभूमिला—भारत देशाला—इंग्रजांच्या गुलामगिरीच्या शृंखलेतून मुक्त करू इच्छितो—अमेरिकेनं इंग्रजांचे पाश झुगारून स्वातंत्र्य मिळवलं आहे. त्यांनी ज्या प्रकारांनी स्वातंत्र्य प्राप्त करून घेतलं—त्या राजकीय तत्त्वप्रणालीचं शिक्षण घेण्यासाठी मी इथं आलो आहे. माझं भाषण आटोपलं तरी तो गंभीरपणानं तसाच बसून राहिला. शेवटी डोळे उघडून त्याने माझ्याकडे बघितलं आणि तो जोराने हसला. माझी पाठ थोपटत तो म्हणाला—मी तुला यश चिंतितो. माझे साथीदार व्याकूळ होऊन माझी वाट बघत तिथंच ताटकळले होते. मी परत आल्यावर एकमेकांना आलिंगन देऊन आम्ही निरोप घेतले व आपापल्या ठरल्या ठिकाणांकडे निघालो. मी माझ्या काही निवडक साथीदारांसमवेत शहरात फेरफटका मारण्यासाठी निघालो.

## स्वतंत्र भूमिवर

आज मी एका स्वतंत्र देशाच्या भूमिवरून चालत होतो. आपल्या मातृभूमीला स्वतंत्र करण्याच्या कल्पनेनं माझं मन भारावलेलं होतं. रात्रीच्या वेळी विजेच्या झगमगाटात सगळं शहर स्वप्नवत वाटत होतं. रात्रभर आम्ही बेफिकिरीनं भटकत राहिलो. त्यावेळी दोन गोष्टींचा माझ्या मनावर विलक्षण प्रभाव पडला. एक म्हणजे त्या शहरातली स्वच्छता आणि दुसरी गोष्ट म्हणजे अमेरिकेला येणाऱ्या प्रवाशांची बारकाईनं होणारी तपासणी कुणाही रोगी माणसाला शहरी जीवनात स्थान नव्हतं. पहिल्या रात्रीच माझ्या निदर्शनास आलं की तेथील रस्ते भरपूर पाणी टाकून स्वच्छ करण्यात येतात. ही पन्नास वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. आपल्या देशात मात्र सकाळच्या वेळी रस्ते फक्त झाडण्यात येतात. झाडल्या-नंतर थोड्याच वेळात रस्त्यावर कचरा जमा होतो आणि वारा सुटला की तो अवती-भवती पसरत जातो. झाडूच्या मदतीनं विशिष्ट कचराच साफ करता येतो परंतु वातावरणातील जंतू, ज्यामुळे माणसाची फुफ्फुसं दूषित होतात, ते जंतू पाण्यामुळेच नष्ट होऊ शकतात. १९१२ च्या अखेरीस सॅटल शहरातील स्वच्छता बघून माझ्या मनावर ही गोष्ट कायमची कोरली गेली की घरांची आणि रस्त्यांची सफाई केवळ झाडूनं करणं पुरेसं नाही.

पुढल्याच दिवशी कॅलिफोर्नियाला सकाळच्या गाडीनं आम्हाला निघायचं होतं, त्यामुळे फिरत फिरत आम्ही स्टेशनवर येऊन पोचलो. काचेच्या फ्रेम्समध्ये तिथं अनेक छाया-चित्रं लावली होती. एका फोटोवर माझी दृष्टी पडली. ते चित्र फारच सुंदर होतं. त्या चित्राच्या अवती भोवती फिरून मी त्याच्या पुढ्यात उभा राहिलो तेव्हा ते चित्र माझ्या-कडं बघून हसत असल्याचा भास झाला. मी अतिशय आश्चर्यचकित झालो. लाज वाटून मी खाली दृष्टी वळवली. त्या चित्रावरून नजर दुसरीकडे वळवली. ते चित्र

नसून तिथं एक टेलिफोन ऑपरेटर बसली आहे हे नंतर लक्षात आलं. माझ्याकडे हसऱ्या चेहऱ्यानं बघून, ती काही मेणाची मूर्ती नाही, हे तिनं जाणवून दिलं. सकाळी गाडीत बसण्यासाठी मी जेव्हा प्लॅटफॉर्मवर आलो तेव्हा तिथं दुसरंच चित्र दिसलं—नवी मुलगी कामावर आली होती.

कॅलिफोर्नियाला जायला गाडीत बसण्यापूर्वी माझ्या मनात विचार येऊन गेला की माझ्यापाशी जर हाँगकाँग ते अमेरिका प्रवासासाठी पुरेसे पैसे असते आणि एका वर्षापूर्वीच मी जर इथं पोचलो असतो, इथल्या बुद्धिजीवी लोकांच्या संपर्कात आलो असतो तर माझा जीवन-प्रवास योग्य मार्गानं झाला असता. मी या निर्णयावर येऊन पोचलो की योग्य संधी मिळाल्याशिवाय मानवी जीवन विकसित होत नाही हेच खरं.

या प्रवासाच्या वेळीही, माझ्या मदतीस पूर्वीचेच साथीदार माझ्या समवेत होते. कॅलिफोर्नियातील स्टॉकटन शहरी आम्ही सर्वजण पोचलो. माझे साथीदार हे बाबा ज्वालासिंह आणि बाबा सन्त विसाखासिंह त्यांच्या नात्यातील होते. ते सरळ त्यांच्याकडे गेले. मीही त्यांच्याबरोबरच गेलो. दुसऱ्या दिवशी माझ्या मित्रांनी नातलगांपाशी मला कुठे पेऊन जावं, यासंबंधी विचारविनिमय केला. स्टॉकटन शहराजवळच्या नदीतील एका बेटावर माझी रवानगी करण्यात आली. तिथं बटाट्याची लागवड होत होती. या घटनेला खूप वर्षं उलटून गेल्यामुळे ते ठिकाण नेमकं कोणतं होतं, याची आता आठवण नाही. आठवतं ते इतकंच की शेतीचा मालक जपानी होता. त्यानं शेतावर काम करणाऱ्या भारतीय मजुरांसाठी लाकडाची बॅरॅक उभी करून तिथं राहण्याची व्यवस्था केली होती. त्या बराकीत सर्वजण आपलं अंथरूण पसरून झोपत असतं. तिथं पंचवीस भारतीय मजूर कामावर होते. त्यांच्यापैकी एकजण सर्वांसाठी जेवण तयार करायचा.

मी तिथं पोचलो तेव्हा संध्याकाळ होऊन गेली होती. सर्वजण कामावर गेलेले होते, म्हणून माझी कुणाचीच भेट झाली नाही. रात्री भोजनाच्या वेळी सर्व भेटले. त्यांच्यापैकी एकजण तरुण वयाचा होता. बाकी सर्वजण चांगले प्रौढ होते. त्या तरुणाचं नाव होतं हरनामसिंह. मी त्याच्या सोबत राहू लागलो. अमेरिकेत जे पंजाबी लोक स्थायिक झाले होते ते बहुतेक शेतकरी होते. भोजनाचे वेळी त्यांच्यापैकी बहुतेकजण मद्यप्राशन करत. मद्य अनेक प्रकारचे होते. कडू, सपक किंवा सरबतासारखं गोड. द्राक्षापासून बनवलेली व गोड चव असलेली दारू सर्वजण पीत होते. काही लोक कडवट चवीची दारू पीत होते. माझा तरुण मित्र द्राक्षाची गोड चवीची दारू पीत होता. तो मला म्हणाला—"अरे, बाबा—हे एक प्रकारचं सरबत आहे—ही दारू नव्हे." ते ऐकूनहीं एक छोटासा ग्लास भरून पणात रिकामा केला. मी सरबत समजूनच प्यालो. मला पिताना बघून सर्वजण हसू लागले. या अगोदर मी कधी दारूला स्पर्श केला नव्हता.

पिताना मला बरं वाटत होतं मात्र थोड्याच वेळात त्या सरबतानं माझ्यावर आपला परिणाम दाखवायला सुरुवात केली. मी निःसंकोचपणे, त्यांना माझ्या मनातील गोष्टी सांगू लागलो त्यांच्याशी मनमोकळ्या गप्पा मारू लागलो. ऐकणारी मंडळी माझ्या दुबळेपणाचा फायदा घेत होती. ते मला मनोरंजनाचं साधन मानू लागले. एक ग्लास प्राशन केल्याबरोबरच माझा दुबळेपणा प्रकट झाला परंतु माझ्या मनातलं गुपितही बाहेर पडलं. मी काय करू इच्छितो व कोणत्या उद्देशानं अमेरिकेत आलो, हे त्यांना पुरेपूर समजून चुकलं.

त्या भेटीचा परिणाम माझ्या संदर्भात एकूण चांगलाच ठरला. सर्वजण मोठ्या प्रेमानं मजकडे बघू लागले. तो शीख तरुण तर माझा कायमचा मित्र बनला. रात्री जेवते वेळी एक ग्लास घेतल्याबरोबर मी कसा बेभान झालो व त्यांच्यासमोर मी एक जोरदार भाषण कसं ठोकलं, ही सर्व हकिकत त्या तरुण मित्रानं दुसरे दिवशी मला सांगितली. ती खरोखर गोष्ट होती. मला माझ्या दुबळेपणाची लाज वाटली. मी कुणाशी काही बोललो नाही. त्या माझ्या गप्प राहण्यानं आणि गंभीर बनण्यानं त्यांनी रात्री माझ्याशी जो खोटेपणा केला होता—हे एकूण बरं झालं नाही—हे त्यांनाही कळून चुकलं.

माझे सर्व सोबती पंजाबातील शेतकरी होते. सकाळी ते एकदम उठत. भागीदारांपैकी एकाला स्वयंपाक करायला सांगून ते कामावर निघत. तिन्ही वेळचं जेवण तो तयार करी व त्यालाही इतरांइतकीच मजुरी मिळे.

थंडीचे दिवस होते. नाश्त्यासाठी दोन-दोन पराठे व चहा असे. तो आटोपून ते कामावर निघून जात. मीही त्यांच्याप्रमाणे पोषाख चढवून त्यांच्यासह कामावर जाई. अशा प्रकारचं मजुराचं जीवन जगण्याची माझी मानसिक तयारी झाली होती. श्रमाचं मूल्य माझ्या मनाला पटलेलं होतं—परिश्रम करण्यानंच माणसाला प्रतिष्ठा मिळते, याचीही योग्य जाणीव मला होती. शारीरिक कष्टांची मला पूर्वीपासूनच सवय होती. मला निरोगीपणाचं व सशक्तपणाचं वरदान होतं. मात्र बटाट्याच्या शेतात आठ-आठ तास बटाटे काढणं व ते गोण्यांत भरून-गोण्या उचलून गाड्यांमध्ये एकावर एक रचून ठेवणं, यात जे कष्ट पडतात, त्याची कल्पना ते काम करणारांनाच येऊ शकते. जमिनीतून बटाटे काढणं, हे सोपं काम नव्हे. लोखंडी पंजाच्या मदतीनं जमिनीतून बटाटे काढावे लागतात. मग त्यांचे ढीग तयार करतात—गोण्यात भरून गोण्यांची तोंडं बांधावी लागतात. गोण्या घोडा-गाडीवर चढवून नदीच्या काठावर घेऊन जाव्या लागत आणि तेथून आगबोटीत त्यांची निरनिराळ्या व्यापारी केंद्रांवर रवानगी करायची. इच्छा आणि शक्तीच्या पाठबळावर मी कसेबसे काम तर करू लागलो मात्र या कामात मी चांगलाच थकून जाऊ लागलो. पहिले दिवशी तर मी एवढा थकून गेलो की भोजनाचीही मला इच्छा

होईना. सर्व अंग ठणकायला लागल्यामुळे रात्री मला झोप देखील येईना. दुसऱ्या दिवशी मळमळत्येत कामावर जाण्याची मी तयारी केली. कामाचं किंवा थकावटीचं मला विशेष असं काही वाटत नव्हतं. भीती या गोष्टीची वाटत होती की आपला कमकुवतपणा इतरांच्या लक्षात येतो की काय ? त्या दिवशी अतिश्रमानं मला रुपारून ताप भरला—परंतु नशीबानच माझी ऐनवेळी मदत केली—दुसऱ्या दिवशी रविवार होता. सुट्टी असल्यामुळे माझे साथीदार चांगले-चांगले पोषाख चढवून मौज-मजा करण्यासाठी शहराकडे निघाले. मी मात्र थकून गेल्यामुळे व अंगात तापही असल्यामुळे बिन्हाडावरच झोपून राहिलो. दिवसभराच्या विश्रांतीमुळे ताप उतरला व थकावटही राहिली नाही.

या भारतीय मजुरांपैकी एकालाही क्रांतीसंबंधी प्रेम नव्हतं. अमेरिकेला ते केवळ खाण्या-पिण्यासाठी व खूप कमाई करण्याच्या उद्देशाने आले होते व आपल्या मर्यादित उद्दिष्टात ते सफल झाले होते. रविवारी सर्व मजूर आठवड्याचे श्रम—शारीरिक व मानसिक—शहरात जाऊन मौज-मजा करून विसरून जात. सायंकाळीच ते परत येत. आठवड्याची संपूर्ण कमाई काहीजण उधळून टाकत. काही जण अशा अवस्थेत परत येत की दुसऱ्या दिवशी कामावर जाण्याची त्यांची स्थिती नसे. मला मात्र एखाद्या भरल्या सभेत आपणच एकाकी आहोत असं वाटू लागलं. मी अन्य साथीदार शोधू लागलो—मला ते लौकरच सापडले. हे साथीदार म्हणजे वृत्तपत्र होतो. मी वर्तमानपत्र वाचू लागलो. साथीदारांनाही त्यातल्या काही बातम्या, लेख वाचून दाखवू लागलो. या गोष्टीचा एक चांगला परिणाम असा घडून आला की आमच्या गप्पांचे विषय बदलून गेले.

आठ वर्षांपूर्वी मी मांसाशन सोडलं होतं. येथलं पाणी चांगलं नसल्यामुळे त्याचा माझ्या प्रकृतीवर परिणाम झाला. एके दिवशी थंडीच्या काळात माझी कंबरच आखडली. त्रास खूपच वाढला. डॉक्टरांनी सल्ला दिला की मी एकतर हे स्थान सोडून निघून जावं किंवा अंडी, मांस ब्रँडी असा आहार सेवन करावा. मी अमेरिकाही सोडू इच्छित नव्हतो आणि माझा निश्चयही सोडू इच्छित नव्हतो. शेवटी डॉक्टरांचा आहार विषयक सल्ला मान्य करून मी मांस-मच्छी खायला सुरुवात केली. एक औंस ब्रँडीमध्ये चार अंडी मिसळून मी दररोज घेऊ लागलो. पंधरा दिवसांत माझ्या सर्व तक्रारी नाहीशा झाल्या. एका महिन्यानंतर मी ब्रँडी घेणे बंद करून टाकले मात्र मांस, मासे व अंडी हा आहार कायम ठेवला. या आहारामुळे मी चांगलाच सशक्त झालो. बटाट्याची गोणी १५० पौंड वजनाची असे. आता मी आठ आठ तास अशा गोण्या सहजतेने गाड्यांवर चढवू लागलो. एवढी मेहनत करूनही मी मुळीच थकत नसे.

माझ्या साथीदारांना मी चांगला स्वयंपाक करू शकतो, हे जेव्हा समजलं तेव्हा स्वयंपाकाचं काम त्यांनी मजवर सोपवलं. बटाट्याचा हंगाम संपल्यानंतर शक्कर-कंदांच्या शेतावर काम मिळालं. या कंदापासून साखर तयार करण्यात येते. ह्या ठिकाणाचं हवामान उत्तम होतं. मजुरीचे दरही अधिक होते. दररोजचा खर्च तीन रुपयांचा होता आणि रोजची मिळकत १८ रु. होती. मिळकत वाढल्याबरोबर माझ्या साथीदारांचं मद्य-सेवनाचं प्रमाणही वाढलं. दारूड्या मंडळींच्या अनेक गमती मला बघायला मिळाल्या. त्यांनी आपसातील भांडण सोडवताना मी अनेकदा त्यांना पिटून काढत असे. अनेकदा रविवारच्या दिवशी दारूनं बेशुद्ध झालेल्या एखाद्या साथीदाराला आम्हाला अक्षरश: उचलून न्यावे लागे. प्रत्येक रविवारी झिंगणारे दारूडे स्वतःच्या ऐश्वर्याचे प्रदर्शन करायचे. एकेदिवशी एका टोळीतील दारूडा दुसऱ्या टोळीतील दारूड्याला आव्हान देऊन म्हणू लागला की, गावी पोचल्यावर दारू पिऊन सांडणीच्या पायात घुंगरं बांधून व तो तिच्यावर स्वार होऊन गावातून मिरवत जाणार आहे. दुसऱ्या टोळीतील दारूडा त्याला प्रत्युत्तर देऊन आपल्या गावातील रस्त्याने तो कसा काय जातो हे बघून घेऊ असं म्हणू लागला. सांडणीस्वार आपली जागा सोडून त्याच्या गावातील रस्त्याने जाण्यासाठी त्याच्या दिशेने निघाला. दुसरा दारूडा त्याच्या पुढ्यात येऊन उभा राहिला. दोघांची खूप जुंपली. सकाळ उजाडल्यावर सर्व गोष्टी विसरून जाऊन ते एकमेकांच्या गळ्यात पडत. सकाळच्या समेटाचा आनंद सायंकाळी परत दारूचे ग्लास भरून साजरा केला जाई. अशा गंमतीच्या गोष्टी फक्त रविवारीच घडत.

या मजुरांच्या टोळ्यांमध्ये काही भाविक सज्जन प्रवृत्तीचे लोकही असायचे. फावल्या वेळात ते पूजा-अर्चा करून वेळ सत्कारणी लावायचे. टोळ्या टोळ्यांनं शेतीची कामं करणे ह्याला गँग-लाईफ म्हणत. गँग-लाईफमध्ये केव्हा केव्हा चमत्कारिक घटना घडत. एके दिवशी दारूने झिंगलेले दोघेजण माझ्या वयाच्या एका तरुणाला भलतेच सतावू लागले. तो तरुण चांगला सुदृढ बांध्याचा होता. तो कुणाच्याच टोळीतला नव्हता. भांडण वाढत गेलं. त्या दारूड्यांना समजावण्याचा खूप प्रयत्न केला परंतु त्याचा काहीच उपयोग झाला नाही. मला भीती पडली मारहाणीमुळं तो तरुण पंगू होईल की काय? मी त्या तरुणाच्या बचाव करण्यासाठी पुढं सरसावलो तसे ते दारूडे आता माझ्याशी भांडू लागले. शेवटी लांब पळत जाऊन मी माझं रिव्हॉल्वर बाहेर काढून त्यांच्यावर रोखलं. माझा जोडीदार हरनामसिंहही आपलं रिव्हॉल्वर काढून माझ्या मदतीला धावून आला. मी दोन बार हवेतच काढले. गोळ्यांच्या आवाजांनी दोघांचीही नशा खाडकन उतरली. मात्र त्या दिवसापासून गँगच्या जीवनाला मी पार उबगलो. आम्ही दोघांनीही तिथला हिशेब चुकता केला आणि त्या टोळीचा निरोप घेऊन आम्ही तेथून बाहेर पडलो. आम्ही दोघांनी कंत्राटी पद्धतीनं शेतीची कामं करायला सुरुवात केली. सर्व जंजाळातून आम्ही मुक्त झालो. आम्ही खूप पैसे मिळवू लागलो व शिक्षणासाठीही वेळ काढू लागलो

कंत्राटी पद्धतीत कामं करताना काही अडचणीही निर्माण होऊ लागल्या. आमच्या राहायच्या जागेपासून द्राक्षांची बाग चांगली १२ मैल दूर होती. मी एक सायकल खरेदी केली. तीन दिवसांत सायकलवर बसायला शिकलो. चौथ्या दिवशी सायकल-वर स्वार होऊन मी फिजनो शहराकडे निघालो. सायकलवर बसण्याचा अजून मला पुरेसा सराव नव्हता;—रस्त्याने जाता जाता मी एका ट्रामवर जाऊन धडकलो. सुदैवाने सायकलीची काहीच मोडतोड झाली नाही. माझे हात-पायही शाबूत राहिले. सायकल उचलून मी तेथून निसटलो. "जान बची लाखो पाये".

## क्रांतिकारकांशी संपर्क

कामामुळं चार पैसे गाठी पडू लागले. सर्व कर्जाची परतफेड करून मी गँगजीवन सोडलंच होतं. अमेरिकेत स्थायिक झालेले अनेक भारतीय नागरिक आपापल्या पद्धतीनं देश-हिताचा विचार करत होते. त्यातल्या काही मंडळींनी पक्ष-संघटनाही, निर्माण केल्या होत्या. ऑरिगन राज्यातील शहरातून व ग्रामीण भागातून जे भारतीय लाकडांच्या कारखान्यात कामे करत होते त्यांची आर्थिक स्थिती कॅलिफोर्नियातील भारतीयांपेक्षा पुष्कळच चांगली होती. यामुळं एकत्र बसून चर्चा करण्यासाठी त्यांना सवड मिळत होती. तेथल्या जागृत कामगारवर्गाशी बोलण्याचीही त्यांना संधी मिळत होती. रशिया, चीन आणि युरोपातील क्रांतिकारकांशी त्यांचा या ना त्या कारणाने संबंध आला होता. भारत व भारतीयांसाठी अनेक प्रकारच्या योजनांचा ते विचार करत होते. स्वदेशाच्या कल्याणाचा विचार ते सदोदित करत होते.

एका मित्राला भेटण्यासाठी मला सॅटल येथे जायचं होतं. या प्रवासात देश-प्रेमानं भारावून गेलेल्या काही भारतीय बांधवांच्या मी संपर्कात आलो. आपला देश स्वतंत्र बनवावा, यासाठी अनेक योजनांवर ते विचार करत होते. त्या देशभक्तांची नावं होती—बाबा केसरसिंह, श्री. उधमसिंह व श्री. बलवन्तसिंह. बाबा केसरसिंह यांचं व्यक्तिमत्त्वं मोठं प्रभावशाली होतं. मर्दुमकी, वीरता, पवित्रता, व देशप्रेम यांची ती साक्षात मूर्ती होती. श्री. ऊधमसिंह निराळ्याच प्रकारचं व्यक्तिमत्त्व होतं. मोठ्या सावधगिरीनं ते तुरुंगाच्या भिंती वरून उड्या मारून अफगाणिस्तानात आपल्या सहकाऱ्यांना जाऊन मिळाले होते. क्रांतिकारकांचा गट निर्माण करण्याच्या कामात त्यांनी या ना त्या प्रकारे मदत केली होती. एकदा भारतातून अफगाणिस्तानात जातांना एका पठाणाच्या विश्वासघातामुळे ते मृत्यू पावले. पठाणानं त्यांना ठार केलं. या सर्व घटना विचित्र आणि रोमांचकारी होत्या. त्यांची जीवन-गाथा पौराणिक व्यक्तींप्रमाणं वीररसानं ओथंबलेली आहे. अशा वीर पुरुषांचं सार्वजनिक स्मरण होऊ नये, हे आपल्या देशाचं दुर्भाग्यचं म्हटलं पाहिजे.

श्री. बलवन्तसिंह सदाचारसंपन्न देशभक्त, आणि वीरवृत्तीचे आदर्शच होते. देशाची सेवा करत करत त्यांनाही हौतात्म्य प्राप्त झालं. बलवन्तसिंहांची माझी हाँगकाँगला गाठ पडली होती.

बाबा केसरसिंह, ऊधमसिंह, आणि बलवंतसिंह यांच्या मुळं माझ्या जीवनाला नवीन दिशा लाभली. आपला देश स्वतंत्र कसा करावा, याचे विचार माझ्या डोक्यात गर्दी करू लागले. माझं राजकारणाचं ज्ञान बेताचंच होतं आणि क्रांतिकारकांच्या इतिहासाची मला जाणीव नव्हती, विशेष असं ज्ञान नव्हतं.

श्री. जी. डी. कुमार आणि श्री. तारकनाथ हे दोन विद्वान अमेरिकेत स्थायिक झालेल्या भारतीयांमध्ये प्रख्यात होते. या दोन विद्वानांकडूनच मी राजकीय तत्त्वज्ञान शिकलो. ते अत्यंत स्फूर्तिप्रद भाषणं द्यायचे. वृत्तपत्रांतून त्यांचे लेख प्रसिद्ध होत. या विद्वानांनी मी प्रभावित झालो खरा, परंतु माझी चित्तवृत्ती वेगळ्याच प्रकारची होती.

लाकूड-कटाईच्या कारखान्यांत कामं करणाऱ्या भारतीय मजुरांनी एक संघटना स्थापन केली होती. त्या संघटनेचं नाव होतं "हिंदुस्थान असोसिएशन ऑफ पॅसिफिक कोस्ट" या संघटनेकडेही मी विशेष आकर्षित झालो नाही.

अमेरिकेला पोचल्यानंतर मी अनेक गोष्टींनी प्रभावित झालो होतो. चीन मधील क्रांती हाँगकाँग येथे असताना मला बघायला मिळाली होती. फिलिपाईन बेटातील देशप्रेमी आपल्या मुलुखाला ऐश्वर्यसंपन्न बनवण्यासाठी ज्या नाना प्रकारच्या योजना आखत होते त्या सर्व बाबींचा मला परिचय झाला होता.

ज्या काळात मी हिंदुस्थानला स्वतंत्र कसं करता येईल याचा विचार करत होतो, त्या सुमारासच भारताच्या भूमीवर आश्चर्यकारक घटना घडल्या होत्या. या घटनांमुळे जगभरच्या प्रगतिशील व्यक्तींचं भारताकडे लक्ष वेधलं गेलं. या घटना अर्ध—शतकापूर्वीच्या आहेत. या घटनांच्या नंतर ज्या नाना प्रकारच्या क्रांत्या झाल्या अनेक आश्चर्यकारक घटना घडल्या, त्या वरील घटनांच्या तुलनेत सामान्य प्रतीच्या ठरतील. मात्र ह्या घटनांनी झोपलेली भारतीय जनता खडबडून जागी झाली होती.

कलकत्ता ब्रिटिश सरकारची राजधानी होती. बंगालमधील बंडखोर तरुणांच्या कृत्यांनी सबंध देशांत व विशेषत: कलकत्त्यात वातावरण तापवलं होतं. इंग्रजांना असं वाटत होतं की जोवर दिल्ली येथील लाल किल्यातील सिंहासनावर जॉर्ज पंचम विराजमान होणार नाहीत तोपर्यंत भारतावर ब्रिटिश सत्तेचा अंमल उमटून दिसणार नाही. इंग्रज अधिकारी ही योजना आखण्यात गढून गेले.

कलकत्त्यामधून दिल्लीला धाईनं पळणाऱ्या इंग्रजी शासनाचा बंगाली तरुणांनी सर्व शक्तीनिशी पिच्छा केला. ज्या सुमारास दिल्लीला भव्य शाही मिरवणूक निघाली, तेव्हा तिथं एक रोमांचकारी दृश्य लोकांना बघायला मिळालं. ह्या मिरवणुकीत लॉर्ड हारडिंग हा व्हाइसरॉय हत्तीवर अंबारीत आरूढ होऊन चाललेला होता, त्यावेळी गल्लीतील एका घरातून व्हॉईसरॉयवर बॉम्ब टाकण्यात आला. दिल्लीच्या जनतेनं ब्रिटिश सरकारचं स्वागत कसंही केलं असो, क्रांतिकारकांनी बॉम्ब स्फोट करून जे स्वागत केलं, तो स्फोट सर्वांच्या कानी पडला. त्या स्फोटानं सगळा देश हादरला. या घटनेला भारतीय क्रांतिकारकांच्या इतिहासात गौरवाचं स्थान मिळालं. बॉम्बच्या भयानक स्फोटानंही समारंभात कसलीच खळबळ निर्माण झाली नाही. शाही दरबार भरला. समारंभाला अनेक संस्थानिक राजे-महाराजे आलेले होते, दरबारात त्यांनी हजेरी लावली होती. अनेक शतकं ज्यांच्या माना ताठ होत्या त्या ब्रिटिश शासनापुढे नम्रतेनं खाली झुकल्या. स्वत:ला 'राजे-महाराज संबोधणाऱ्या भारतातील जवळ जवळ पाचशे संस्थानिकांनी इंग्रजी सत्तेला खाली लवून मुजरा केला. त्यांच्या पैकी केवळ एकाच 'नर-केसरीनं' गुडघे टेकवून अभिवादन करायला नकार दिला. तो अभिमानाच्या तोऱ्यात इंग्रज बादशाहाच्या प्रतिनिधी समोरून ताठपणे दरबारातून बाहेर पडला.

या दोन्ही घटना जगातील सर्व प्रगतिशील व्यक्तींचा चर्चाविषय बनल्या. या दोन्ही घटनांनी दोन गोष्टी स्पष्टपणे समोर आल्या. मानी स्वभावाच्या सयाजीरावांसारख्या राजानं, आपल्या स्वाभिमानी कृत्यानं ब्रिटीश राजसत्तेच्या प्रतिनिधीला स्पष्टपणे बजावलं की मी तुम्हाला माझ्यासारखाच एक माणूस समजतो. भारतातील तरुणांनी राजसत्तेचं आव्हान स्वीकारून आपल्या कृत्यानं जणू सूचित केलं की एक न एक दिवस आम्ही तुम्हाला आणि तुमच्या सत्तेला मातीमोल करून टाकू.

या दोन घटनांनी काळ बदलल्याचं जाणवून दिलं. पीडित जनता कसा उठाव करते हे चीन मधील क्रांतीनं दाखवून दिलं होतं, आशियाखंडातील लोक युरोपमधील गोऱ्या लोकांशी कसा शौर्यानं सामना देतात, ही गोष्टही सर्वांच्या समोर आली होती. छोट्याशा जपान मधील छोट्या शरीरयष्टीची माणसं अमेरिकन लोकांना कसं आव्हान देत होती. कोरिया मधील पीडित लोक जपानच्या विरुद्ध दंड थोपटून उभे राहत होते, या घटनांनी भारतीयांचं रक्त तापत होतं.

अमेरिकेतील स्वतंत्र वातावरणाचा माझ्या मनावर वेगान परिणाम घडत होता. कुणाही तरुणाचं जीवन, एखाद्या सुंदर घटनेनं सुंदर आकार धारण करू शकत नसतं किंवा एखाद्या वाईट घटनेनं ते बिघडतही नसतं. माझ्या जीवनात अत्यंत स्फूर्तिदायक घटना घडत होत्या आणि माझ्या जीवनातील उग्रता, प्रक्षोभ द्रुतगतीनं वाढत होता.

इ. स. १९१२ पर्यंत अमेरिकेत स्थायिक झालेले भारतवासी वेगळ्याच तऱ्हेने विचार करणारे होते. आपले शारीरिक व मानसिक कष्ट कमी कसे होतील, अन्य मजुरांप्रमाणे आपलेही अधिकार सुरक्षित कसे होतील, बस्स याच गोष्टीभोवती त्यांचे विचार चालू असत. मात्र याचमंडळीमध्ये काही पुरोगामी विचारांची माणसं जरूर होती ज्यांना त्यांच्या देशात नागरी अधिकार मिळालेले नव्हते. परंतु अमेरिकेत मात्र त्यांना नागरी अधिकार प्राप्त व्हावेत, असं वाटत होतं. नव्हे, त्याबद्दल ते आग्रही होते.

इ. स. १९०८ ते १९१२ दरम्यान भारतातील कॉलेजातून ज्या तरुणांनी शिक्षण घेतलं होतं तो सुशिक्षित वर्ग व जे भारतीय राजकीय दृष्ट्या जागृत होते ते, अशी सर्व मंडळी लाला हरदयाल यांना ओळखत होती. त्यांच्या विचारांनं प्रभावितही झालेली होती. अमेरिकेत वास्तव्य करणारे सर्व सुशिक्षित भारतीयही लाला हरदयालांविषयी आदर बाळगून होते. लाला हरदयालजींचं शिक्षण एम. ए. पर्यंत झालेलं होतं. देश-प्रेम, त्याग, तीक्ष्ण बुद्धीमत्ता, वक्तृत्व, लेखनशैली या सर्वच दृष्टींनी ते अजोड होते. अमेरिकेतील पुरोगामी विचारवंत, लेखक आणि विद्वानांना त्यांच्या विषयी खूपच आदर होता. अमेरिकेतील भारतीयांनी श्री. जी. डी. कुमार यांच्या नेतृत्वाखाली "हिन्दुस्थान असोसिएशन ऑफ पॅसिफिक कोस्ट" या संघटनेची स्थापना केली होती. परंतु कुमारजींच्या आजारीपणामुळं ते विशेष असं कार्य करू शकले नव्हते. लोकांच्या ठिकाणी जागृती निर्माण झाली होती. लोक आता स्वस्थ बसू शकत नव्हते. 'ओरिगन' राज्यात स्थायिक झालेल्या भारतीय कामगारांना लाला ठाकूरदास धुरीवाले यांनी सल्ला दिला की संघटनेची धुरा सांभाळण्यासाठी तुम्ही कॅलिफोर्निया येथून हरदयाल यांना बोलवा. ज्या बांधवांनी संघटना स्थापन केली होती त्यांच्यातर्फे लाला हरदयाल यांना निमंत्रण पाठवण्यात आलं. त्यांनी निमंत्रण स्वीकारलं परंतु ते येऊ शकले नाहीत. शेवटी १२ मार्च १९१३ रोजी लाला हरदयाल 'सेन्ट जोन' येथे येऊन पोचले. भाई परमानन्दजीही त्यांच्या समवेत होते. मोठ्या संख्येने लोक कार्यक्रमासाठी आले. आपणाला काय केलं पाहिजे, व कशातऱ्हेनं केलं पाहिजे, यासंबंधी सभेत बरीच चर्चा झाली. भाई परमानन्दजी सुधारणावादी होते. ते सर्वांना आपल्या मार्गाने घेऊन जाऊ इच्छित होते परंतु लाला हरदयालांना मात्र १८५७ च्या सशस्त्र क्रांतीचा मार्ग पसंत होता. क्रांतीचा मार्ग स्वीकारून ते भारताला स्वातंत्र्य मिळवून देऊ इच्छित होते. त्यांनी स्पष्ट शब्दांत सर्वांना सांगितलं की आपल्या सर्व दु:खांचं मूळ कारण परकीयांचं शासन, हेच आहे. आपण जो पर्यंत आपल्या देशात गुलाम म्हणून जगत राहू तोपर्यंत आपल्याला कुठेच मान-सन्मान व प्रतिष्ठा मिळणार नाही.

त्यांनी सांगितलेली ही सोपी गोष्ट पंजाबी माणसांना तावडतोब कळली. इंग्रजांच्या तावडीतून भारताला मुक्त कसं करता येईल, यावर नंतर बराच खल झाला. ह्या एका महान प्रश्नाभोवती इतर अनेक प्रश्न लोकांच्या पुढे उभे राहिले. सशस्त्र क्रांतीसाठी

लोकांना संघटित कसं करायचं? लोकांच्या ठिकाणी राजकीय जागृती निर्माण करण्यासाठी कोणत्या गोष्टी कराव्या लागतील? कार्यकर्ते कसे तयार होतील? संघटना-प्रमुख कुणाला करायचं? सर्व निर्णय प्रत्यक्ष कृतीत कसे काय आणता येतील?

## युगान्तर आश्रम आणि गदर

असं ठरवण्यात आलं की कॅलिफोर्नियातील महानगर सॅनफ्रान्सिस्को इथं "युगान्तर", नावाचा आश्रम सुरू करायचा व तेथून "गदर" नावाचं साप्ताहिक प्रकाशित करायचं. ह्या साप्ताहिकाद्वारे भारतातील लोकांना तसेच अमेरिकेत प्रवासी म्हणून आलेल्या भारतीयांना क्रांतीचा विचार द्यायचा– अशी योजना आखण्यात आली. ही घटना मार्च १९१३ ची आहे. राजकीय, आर्थिक आणि सामाजिक बदलांचा जागरूक व्यक्तींवर परिणाम होतो. हिन्दुस्थानात त्याच प्रमाणे ज्या ज्या ठिकाणी भारतीय होते– त्या सर्वांना "गदर" मधल्या विचारांनी उत्तेजित केलं– त्यांच्या हृदयाच्या तारा छेडल्या गेल्या. लोकांच्या मनातील भावांना शब्दरूप मिळू लागलं. शेतकरी आणि मजूर वर्गातील लोकांनी आणि लोककवींनी आपल्या लेखणींनी इंग्रजी राजवटीतील अत्याचारांचं स्पष्ट चित्र रेखाटलं. जगाच्या कानाकोपऱ्यातून प्रेरणादायक संदेश येऊ लागले. लोकांचं आर्थिक साहाय्यही मिळू लागलं. देशोदेशींचे अनेक देशभक्त या संबंधी आपसात बोलू लागले. जे भारतीय पोट भरण्यासाठी देश सोडून अन्य देशात गेलेले होते, त्यांच्या मनात राष्ट्रीयत्वाची भावना उदित झाली. आता सर्व गोष्टींचा ते राष्ट्रीय संदर्भात विचार करू लागले. जगातील पुरोगामी व क्रांतिकारी लोकांशी त्यांचे संबंध येऊ लागले. प्रत्येक जण आपापल्या मगदुरानुसार, देश स्वतंत्र कसा करता येईल, यासंबंधी विचार करू लागला. लाला हरदयाल यांनी सर्वांच्या मदतीनं आणि स्वतःच्या पुरुषार्थानं "गदर पार्टी" ची स्थापना केली. पार्टीच्या "गदर" या मुखपत्राद्वारे लोकांच्या मनात उचंबळून येणाऱ्या भावनांना त्यांनी राजकीय अर्थ प्राप्त करून दिला.

बाबा ज्वालासिंह, संत विसाखासिंह, बाबा सोहनसिंह भकना, बाबा केसरसिंह, बाबा निधानसिंह चुग्गा, बाबा करमसिंह चूहड़चक, बाबा प्यारासिंह तसेच बाबा शेरसिंह ह्या भारतीयांनी आपल्या सेवामय जीवनानं, सदाचार, देशप्रेम आणि त्यागानं आपल्या भोवतालच्या लोकांच्या मनात आदराचं स्थान निर्माण केलं. लोकांना जेव्हा हे स्पष्ट झालं की लाला हरदयालजी सारख्यांचं नेतृत्व त्यांना लाभलं आहे तेव्हा त्यांनी त्यांच्या मार्गदर्शनानुसार कार्य करण्याची तयारी दर्शवली. तेव्हा स्वाभाविकच हरदयालजी विषयी सर्वांच्याच मनात आदरभाव निर्माण झाला. "गदर" साप्ताहिक आणि "युगान्तर आश्रम" चालवण्यासाठी कधीही आर्थिक अडचण निर्माण झाली नाही. अनेक धाडसी लोक कार्यकर्ते म्हणून कष्ट उपसू लागले.

"गदर" पत्र तसंच "गदर की गुंज" या शीर्षकाचा देशभक्तीपर कवितांचा संग्रह या व्यतिरिक्त गदर पार्टीच्या प्रचारकांनी ब्रिटिश राजवटीच्या अत्याचाराचं स्वरूप स्पष्ट करण्यासाठी अनेक प्रकाशनंही प्रसिद्ध केली. त्यांना खूप मागणी येऊ लागली. बाहेरच्या देशांत वास्तव्य करणाऱ्या भारतीयांना तेथल्या राजवटी आपल्या नागरिकांशी कसं वागतात, हे दिसू लागलं. त्यांच्या ध्यानात ही बाब स्पष्टपणं आली की, देशातील जनतेचं कल्याण करणं हेच कुठल्याही शासनाचं मुख्य कर्तव्य आहे, यासाठीच शासनाचं अस्तित्व आहे. शासकीय अधिकारी जनतेचे सेवक आहेत– देशातील जनता आणि साधन-संपत्ती ही सत्तेवर असणाऱ्या लोकांच्या भोग-विलासासाठी नसते॰ लोकांच्या हेही ध्यानात आलं होतं की शारीरिक बळ, सामान्य ज्ञान, सदाचार, परिश्रम आणि दिलदारपणाची वृत्ती या सर्व बाबी "गदर पार्टी" च्या कार्यकर्त्यांच्या ठिकाणी होत्या आणि कुणाही गोऱ्या माणसापेक्षा हे कार्यकर्ते या दृष्टीने कमी प्रतीचे नव्हते, त्यांच्याशी तुल्यबळ होते. व्यक्तिगतरीत्या आणि आपापल्या टोळीसह त्या सर्वांनी या महान कार्याचं महत्त्व समजून चुकलं होतं. कॅनडामध्ये स्थायिक झालेल्या भारतीयांनी या संदर्भात अधिक उत्साह दाखवला. आपल्या कल्याणाचा मार्ग त्यांना स्पष्ट दिसत होता आणि त्या मार्गाने ते जात होते. पैसा, वेळ आणि शक्ती कशाचीही गरज असो, ते तत्परतेनं पुढं येत होते. एवढं सर्व करूनही स्वदेशाच्या यातना केव्हा संपतील, देशाच्या मुक्तीचा राजमार्ग अजून त्यांना सापडत नव्हता. अशा एका टप्प्यावर लाला हरदयाल यांनी सर्वांना राजकीय विचारानं एकत्र आणलं. त्यांना असं प्रतीत होऊ लागलं की लालाजींनी त्यांच्या मनातील भाव-भावनांना शब्दांचं आणि वाणीचं रूप प्राप्त करून दिलं आहे.

जगाच्या इतिहासावरून हेच स्पष्ट होतं की जनतेच्या कल्याणाचं आंदोलन कुणाच्या तरी प्रेरणेतून निर्माण होतं. अशा व्यक्तिमत्त्वामुळंच आंदोलन गतिमान बनतं. लोकांच्या पाठिंब्यामुळं आंदोलनाला योग्य दिशा प्राप्त होते. भारतामध्ये "गदर" ची––क्रांतीची––लाट उसळण्यासाठी काही योगायोग जुळून आले होते. कोणत्याही गोष्टीसाठी विशिष्ट वेळ यावी लागते, हा सृष्टीचा नियमच आहे. भारतीय स्वातंत्र्यासाठी आता अनुकूल परिस्थिती निर्माण झाली होती.

"गदर" ची चळवळ सफल बनावी यासाठी मीही माझी सर्व शक्ती पणाला लावली. माझ्यापुढे जी कामं होती, त्यांत क्रांतीची लाट सर्वत्र पोचवणं, "गदर" साप्ताहिकाला अधिकांत अधिक वर्गणीदार मिळवून देणं, क्रांतीसंबंधीच्या प्रचारसाहित्याची विक्री व प्रचार, पार्टीच्या कार्यासाठी निधी जमा करणं, इत्यादींचा समावेश होता. युगान्तर आश्रमातील कार्यकर्त्यांना कुठलेही वेतन देण्यात येत नव्हते. अमेरिकेत येऊन मला थोडेसेच दिवस झाले होते, यामुळं माझ्यापाशी पैसा जमा झालेला नव्हता. मी अधिका-अधिक परिश्रम करून पैसे जमवायला सुरुवात केली. हेतू हा की, पुरेसा पैसा जमा

झाला म्हणजे सर्व कामधाम सोडून मी गदर पार्टीच्या कार्याला स्वतःला वाहून घेऊ शकेन. युगान्तर आश्रमात पोंचायची माझी इच्छा होती. या उद्देशानं मी कॅलिफोर्नियातील फ्रिजनो शहराजवळच्या द्राक्षांच्या मळ्यातील द्राक्षं तोडण्याचं कंत्राट घेतलं. मळ्याच्या जवळपास राहण्याची व्यवस्था नव्हती—बारा मैलांच्या अंतरावर मी राहू लागलो. माझ्या जोडीदाराची—हरनामसिंहाची सायकल होती. त्याला डबलसीट घेऊन मी त्याच्यासह द्राक्षांच्या बागेत जात असे. दहा तास मळ्यात काम करून आम्ही सायंकाळी परत निघत असू. दिवसभर एवढे कष्ट केल्यानंतर घरी परत आल्यावर मलाच स्वयंपाक करावा लागे. जोडीदार मला मदत करायचा. भोजन वगैरे आटोपेपर्यंत रात्रीचे बारा वाजून जायचे. सकाळी सहाच्या आत आम्ही मळ्यावर जाऊन काम सुरू करायचे. मी एक-एक पैसा वाचवू लागलो—त्याच्या बळावरच मला युगान्तर आश्रमात जाणं शक्य होणार होतं. याच सुमारास भारतातून आलेल्या इंग्रजांशी माझी गाठ पडली.

अमेरिकेत अनेक गौरवर्णी माणसं होती ज्यांनी भारताचा प्रवास केला होता. एखाद्या फेटाधारी पंजाबी माणसावर त्यांची दृष्टी पडली की ते जोरात ओरडायचे—"कलकत्ता बॉम्बे". या शहरांचा उल्लेख एवढ्यासाठी व्हायचा की त्यांनी ही शहरं बघितलेली आहेत, असं ते सुचवीत. आमचे भोळे बांधव असं कुणी म्हणू लागलं की पळत पळत जाऊन त्यांच्याशी हस्तांदोलन करायचे. एकमेकांना पंजाबी भाषेत सांगायचे—"अरे! हा साहेब आपल्या देशाला जाऊन आला आहे." मोठ्या प्रेमानं मग ते त्याला शेजारच्या बारमध्ये न्यायचे आणि दारू पाजून त्याला पाहुणचार करायचे.

ब्रिटिशांनी भारतात जो धिंगाणा घातला होता त्याचं स्पष्ट चित्र "गदर" या मुखपत्रात रेखाटण्यात आलं होतं. "गदर" साप्ताहिकातून आणि "गदर की गूंज" मधील काव्यामधून ब्रिटिशांचे अत्याचार भारतीयांसमोर मांडण्यात येत होते. ज्या हिन्दी लोकांनी हे चित्र बघितलं होतं ते गोऱ्या लोकांना आपले शत्रू मानू लागले. आता जेव्हा केव्हा त्यांना भारतात जाऊन आलेले गोरे लोक भेटत—तेव्हा त्यांना ते पूर्वीप्रमाणेच बारमध्ये घेऊन जात—परंतु आता प्रकार निराळा होता. आता ते त्यांना कडक मद्य पाजून ते चांगले झिंगले की त्यांना बेदम मारहाण करू लागले. बारमध्ये मद्यप्राशन करून जे लोक भांडणं करत किंवा मारहाण करत त्यांना अमेरिकन पोलीस पकडतही नसत किंवा त्यांना थोपवतही नसत. आमचे बांधव त्यांच्याशी जेव्हा या प्रकारे वागू लागले तेव्हा कलकत्ता, मुंबई या शब्दोच्चाराबरोबर वाट्याला येणारे अगत्य कुठल्या कुठे जाऊन लोपले—ती आता गत काळातली बाब बनली.

अशा प्रकारे मोठ्या वेगानं "गदर" वृत्तपत्राचा प्रभाव वाढू लागला. भारताबाहेर क्वचितच असा देश असेल, जिथं "गदर" आणि "गदर की गूंज" ही प्रकाशनं पोचली नसतील. तेथल्या भारतीयांच्या मनावर आणि बुद्धीवर त्यातल्या विचारांनी

सखोल परिणाम केला होता. इंग्रजी राजवटीतील अधिकारीवर्ग व त्यांच्या हस्तकांना याची पुरेपूर जाणीव झाली की "गदर" मधील प्रचार अशाच वेगानं वाढत राहिला तर भारतीय जनता व भारताबाहेरच्या देशांतील हिन्दी लोक इंग्रजी राजवटीचे कट्टर शत्रू बनल्याखेरीज राहणार नाहीत. त्यांनी विचार केला—लाखो भारतीय भारताबाहेर वास्तव्य करून आहेत, परंतु त्यांनी "गदर" सारखी चळवळ यापूर्वी भारतामध्ये कधी केलेली नव्हती. ही गोष्ट देखील त्यांच्या ध्यानात आली की, लाला हरदयाल यांनी भारतीयांच्या डोक्यात, भारतामधून इंग्रजी राजवट हटविल्याखेरीज भारत देशाचं दुर्दैव संपुष्टात येऊ शकत नाही, ही गोष्ट पूर्णपणे बिंबवली होती. परिणामी इंग्रजी राजवटीनं लाला हरदयाल यांना भारतीयांपासून अलग करून अन्यत्र पाठवणं आवश्यक आहे, असं मनोमन ठरवलं. इंग्रजी राजवटीचा नोकरवर्ग तसेच त्यांची मध्यस्थी करणारे जे लोक अमेरिकेत होते त्यांनाही भारतातील ब्रिटिशांशी विचारविनिमय करण्याची गरज वाटू लागली. परंतु यात त्यांना म्हणावं तसं यश आलं नाही. त्यामुळं लाला हरदयाल यांना अमेरिकेतून बाहेर काढून टाकण्यासाठी एक षड्यंत्र रचण्यात आलं. शासनाच्या दलालांनी अमेरिकेतील क्रांतीच्या विरोधकांच्या मदतीनं लाला हरदयाल यांचं अमेरिकेतून उच्चाटन करण्याची एक योजना बनवली. अमेरिकेतील व भारताबाहेरील अन्य देशांतील हिंदी लोकांना या षड्यंत्राचा जेव्हा पत्ता लागला तेव्हा त्यांच्या मनात तीव्र संताप निर्माण झाला. प्रत्येक हिन्दी माणसाला असं वाटू लागलं की भारताला स्वतंत्र करण्यासाठी लाला हरदयाल यांनी जो मार्ग सांगितला आहे, तोच अत्यंत योग्य आहे. यामुळेच इंग्रजी राजवट लालाजींना अमेरिकेतून बाहेर पाठवण्याच्या उद्योगाला लागली आहे.

इंग्रजांचं अनुमान होतं की लालाजींना बाजूस काढलं तर क्रांतीची लाट ओसरून जाईल. परंतु लाला हरदयाल हे काही क्रांतीच्या लाटेचे जनक नव्हते. इंग्रजांची कारस्थानं आणि अत्याचार यांच्यामुळेच क्रांतीची भावना भारतीयांच्या मनात उत्पन्न झाली होती. ब्रिटिशांचं षड्यंत्र, जनतेच्या मनात आदराचं स्थान असलेल्या आणि ज्यांनी लोकांच्या मनात विश्वास निर्माण केला होता अशा नेत्यांवर त्यांनी वार करणं, म्हणजे लोकांच्या भावनांना अधिकच भडकवणारं होतं.

जुलै १९१३ मध्ये लालाजींना अटक करण्यात आली. त्यांना अमेरिकेतून हलवल्यानंतर ब्रिटिश सत्तेच्या हिंदी दलालांनी मोठ्या वेगानं अशी बातमी पसरवली की "गदर पार्टी" च्या अन्य सदस्यांची लालाजींसारखीच गत होईल. ह्या बातमीचा परिणाम मात्र नेमका उलटा घडून आला. अनेक धाडसी तरुण युगान्तर आश्रमात गर्दी करू लागले. मी स्वतः तर या घटनेच्या पूर्वीपासूनच आश्रमात यायच्या प्रयत्नात होतो. बातमी कानावर येताच मी अधिक विलंब न करता तातडीनं

आश्रम गाठला. माझे सहाध्यक्ष आणि साथीदार श्री. बसंतसिंह त्यांच्या मदतीमुळंच मी मागे मनीलाला जाऊ शकलो होतो—हेही आश्रमात येऊन पोचले होते. आश्रमात पाऊल ठेवताच बसंतसिंहजींनी वृत्तपत्राच्या छपाईचं काम आपल्याकडं घेतलं. मीही त्यांचा मदतनीस बनलो. आम्ही दोघांनी वृत्तपत्राची छपाई संपूर्णपणे सांभाळली.

आश्रमातील जीवन एखाद्या तपस्व्याप्रमाणं होतं. क्रांतिकारकांचा विश्वासपात्र माणूस म्हणून मी आश्रमात प्रवेश केला होता. सर्वांच्या परीक्षेतून मला पास होणं जरुरीचं होतं. कामाच्या वेळी मी कधीही थकून जायचा नाही. आरामाची आणि ऐश्वर्याच्या जीवनाची तिथं कल्पना देखील करता येत नव्हती. विश्रांतीला तिथं अवसरच कुठं होता?

आश्रमातील सर्वांना त्यांचे स्वतःचेच कपडे होते. महिन्याभराच्या खर्चासाठी दोन डॉलर्सही मिळायचे. दर आठवड्याला सार्वजनिक स्नानगृहात जाऊन या पैशानं गरम पाण्यानं स्नान करता येई. आश्रमातील सर्व सेवक खाली फर्शीवर झोपत व मजुराप्रमाणे भोजन करत. बाहेरचे अनेक कामगार आश्रमातील सेवकवर्गाच्या भेटीसाठी येत. त्यांचा जीवनक्रम बघून त्यांना खात्री पटे की त्यांच्या कमाईतून त्यांनी दिलेल्या देणग्यांचा अतिशय उचित असा उपयोग होत आहे. त्यांच्या संतोषा-मुळं आणि आमच्यावरील विश्वासामुळं आम्हाला दुप्पट बळ येई.

लाला हरदयाळजींना तेथून उचलून नेल्यानंतरही क्रांतीच्या लाटेला यत्किंचितही धक्का पोचला नाही. 'की तोडिला तरू फुटे आणखी भराने' अशीच परिस्थिती झाली. या घटनेनं लोक अधिकच खवळले. अनेक सन्माननीय व्यक्ती लालाजींचं कार्य करण्यासाठी धावून आल्या आणि सर्वच जण दुप्पट उत्साहाने कार्यास लागले. आधीच्याच योजनेनुसार एक कमेटी कायम करण्यात आली आणि तिचं कार्य सुरू झालं. परंतु कमेटीचं एकदिलानं चाललेलं कार्य विरोधी मंडळींच्या डोळ्यांवर आलं. लाला हरदयाळजी आणि त्यांच्या सहकाऱ्यांच्या स्वप्नातही ही गोष्ट आली नव्हती की इंग्रजी राजवट अमेरिकन राजवटीच्या साहाय्यानं क्रांतीची लाट थोपवण्याचा प्रयत्न करील.

वातावरणाच्या प्रभावानंच मानवी जीवनात क्रांती घडून येते. ज्या विचारांच्या मुशीत मानवी जीवन ढाळलं जातं, ते विचार देखील माणूस वातावरणातून ग्रहण करतो. १९११ साली ब्रिटिश राजवटीत लक्षावधी भारतीयांना पोट भरण्यासाठी, परदेशगमन करावं लागलं होतं. व्यापार क्षेत्रात आपल्या नशीबाची परीक्षा पाहण्या-साठी आणि विभिन्न प्रकारच्या हस्तकला शिकण्यासाठी भारतीय लोक दूर-दूरच्या प्रांतात पोचले होते. ते जिथं जिथं म्हणून गेले तेथल्या राजकीय वातावरणाचा

तसेंच सामाजिक जीवनाच्या त्यांच्यावर परिणाम घडून आला. नागरिक अधिकार ही माणसाला मिळालेली एक देणगी आहे. आपल्या अधिकारांबाबत माणसाला सदैव जागरूक राहण्याची कशी गरज आहे, त्यांच्या रक्षणासाठी प्रसंगी कुठल्याही त्यागाची त्याला कशी तयारी ठेवावी लागते—नागरी स्वातंत्र्याचं काय मोल आहे आणि विचार-विमर्षामुळं जीवन किती सुकर बनतं ह्या सर्व गोष्टींचा परिणाम इंग्लंडला आलेल्या हिंदी बांधवांवर झाला होता.

अत्याचारी राजवटीला उखडून फेकण्यासाठी काय करावं लागेल, समाज म्हणजे काय, त्यातल्या एखाद्या सामान्य व्यक्तीचं स्थान काय, क्रांतीची भावना कोणत्या परिस्थितीत उत्पन्न होते. जनता चळवळ करून एखादी राजवट उलथून टाकून आपल्याला हवी ती राजवट कशी निर्माण करते, हे विचार फ्रान्समध्ये वास्तव्य करणाऱ्या काही बुद्धिवादी लोकांच्या मनात आले. फ्रान्सच्या भूमीवर "स्वतंत्रता, बंधुता आणि समानता" हे शब्द जिकडे तिकडे निनादत होते. या शब्दात विलक्षण जादू भरलेली होती. तेथील वातावरणात वॉल्टेर व रूसो यांचे विचार सतत कानावर पडत होते. एखादाच बुद्धीवादी कदाचित या वातावरणानं प्रभावित झाला नसेल.

मलाया, बर्मा, चीन, आफ्रिका, ऑस्ट्रेलिया, न्यूझिलंड आणि दक्षिण अमेरिका या देशांत लक्षावधी भारतीय पोचले होते. या देशातील राजकीय वातावरणात कुठलीच उल्लेखनीय बाब नव्हती. म्हणून या देशात गेलेले लोक व्यापारधंद्यात गुंतून पडले.

कॅनडामधील ब्रिटिश वसाहतीतही हजारो भारतीय पोचलेले होते. त्यातले बहुसंख्य पंजाबातील शेतकरी होते. कॅनडात देखील इंग्लंडप्रमाणेच नागरिक अधिकार सुरक्षित होते. त्यामुळेच तिथं जाऊन स्थायिक झालेल्या भारतीयांना या अधिकारांची यथोचित जाणीव होती. सामाजिक दृष्ट्याही ते संघटित होत होते. कॅनडामधील, गोऱ्या कामगारांना जे अधिकार आहेत तेच अधिकार आपणासही असले पाहिजेत अशी त्यांनी जोरदार मागणी केली. आपल्यावर होणाऱ्या या अन्यायाकडं भारतीय राजांचं, इंग्रज राजांचं आणि व्हॉईसरॉयचं लक्ष वेधण्यासाठी त्यांनी आपली शिष्टमंडळंही त्यांच्याकडे नेली होती. मात्र त्यांचा हा लढा त्यांच्या स्वतःच्या मागण्यांपुरताच मर्यादित होता.

अमेरिकेच्या भूमीवर जगभरच्या क्रांतिकारकांचं संमेलनच भरलेलं होतं. युरोप खंडातील एखादाच देश असा असेल, जेथील श्रम करणारा कामगार अमेरिकेत कामासाठी गेलेला नसेल. या नव्या जगात वास्तव्यासाठी आलेल्या लोकांनी तेथली इंग्रज सत्ता उखडून टाकली होती. तिथं लोकांची सत्ता प्रस्थापित झाली होती. आता कामगारांचे आणि शेतकरी वर्गाचे हक्क पुरेसे सुरक्षित बनले होते.

श्रमजीवी लोकांच्या मध्ये एक प्रकारचा बंधुभाव निर्माण झाला होता. प्रत्येक देशातून तिथं आलेला माणूस, तेथल्या एकूण परिस्थितीची आपल्या देशातील परिस्थितीशी तुलना करू लागला, म्हणजे त्याला त्यातं्रं महत्तर, जाणवू लागलं. अमेरिकेतली परिस्थिती बघून प्रत्येक जागरूक माणसाला असा प्रश्न पडे की, अशी आदर्श व्यवस्था आपल्या देशात का बरे अस्तित्वात नाही?

अमेरिकेत आलेल्या लोकांत रशिया, चीन, बलकान, इटली व आयर्लंड येथल्या लोकांचाही समावेश होता. तिथल्या सुखी जीवनाने तेही प्रभावित झाले होते. प्रत्येक देशातील लोकांच्या समूहांनी आपल्या समजुतीप्रमाणे आणि कुवतीप्रमाणे आपापल्या देशात परिवर्तन आणण्याचे प्रयत्न केले. बलकान मधील राज्यांवर तुर्की सुलतानांनी आपला अंमल बसवला होता. तेथली जनताही स्वातंत्र्याचा मार्ग चोखाळू लागली. रशियात तर अनेकदा लोकांचे उठाव झाले परंतु तिथल्या झारशाहीने ही आंदोलनं दडपून टाकली. अमेरिकेतील परिस्थितीनं चीनचे लोकही प्रभावित झाले होते व त्यांनीही आपल्या देशात परिवर्तन घडवून आणलं.

१९०७ नंतर अमेरिकेत अनेक भारतीय यायला प्रारंभ झाला. जे लोक तिथं स्थायिक झाले होते त्यांच्यावर अमेरिकेतील परिस्थितीचा चांगला प्रभाव पडत चालला होता. ते संघटित होऊन आपला फायदा कशात आहे, ह्याचा विचार करत होते. त्यातले काही लोक आपल्या देशावर प्रेम करणारेही होते. काहीजण बुद्धिजीवी होते. ते सर्वजण काही न काही करू इच्छित होते, भारावलेले होते. देशहिताच्या प्रेरणेने त्यांना जेव्हा काही करण्याची संधी मिळाली तेव्हा दीपज्योतीकडे झेपावणाऱ्या पतंगाप्रमाणं ते सर्वजण संघटित झाले.

● ● ●

## गदर पार्टीचा इतिहास——एक दृष्टिकोण .. .. .. २

कॅनडा आणि अमेरिकेच्या संयुक्त राष्ट्रांत वास्तव्य करणाऱ्या भारतीयांसंबंधी बरंच काही लिहिलं गेलं आहे. गदर पार्टीच्या प्रमुख नेत्यांच्या प्रेरणेनं गदर पार्टीचा जो इतिहास लिहिला गेला आहे, त्यात भारतीयांच्या जीवनाच्या विविध पैलूंवर प्रकाश टाकण्यात आला आहे. ही सर्वच हकीकत मोठी गंमतीची आहे. गदर पार्टीचा आणि या परक्या देशांत वास्तव्यासाठी आलेल्या भारतीयांचा इतिहास अगदी वेगळ्याच प्रकारचा आहे. मात्र, मी या ठिकाणी गदर पार्टीच्या इतिहासाशी निगडित असलेल्या अशाच बाबींचा उल्लेख करणार आहे, ज्या विशेष करून माझ्या जीवनाशी संबंधित आहेत.

मी ह्यापूर्वी म्हटल्याप्रमाणं क्वचितच असा एखादा सुशिक्षित भारतीय असेल जो लाला हरदयाल यांच्या नावानं परिचित नसेल—किंवा त्यांच्या असामान्य बुद्धीनं दिपून गेलेला नसेल. लाला हरदयालांना गणितशास्त्राचा विशेष व्यासंग होता. त्यांची कुशाग्र बुद्धी लक्षात घेऊनच ब्रिटीश सरकारनं आय. सी. एस. च्या अभ्यासासाठी शिष्यवृत्ती देऊन त्यांना इंग्लंडला सन्मानपूर्वक पाठवलं होतं. शेकडो भारतीय तरुण या प्रकारे पाठवण्यात आले होते. परंतु या तरुणांच्या तीक्ष्ण बुद्धीला ह्याचं कधीच आकलन झालं नाही की इंग्रजांनी त्यांना अक्षरशः खरेदी करून, आपलं शासन स्थिर करण्यासाठी त्यांना सहभागी करून घेण्याचा त्यांचा डाव आहे. हरदयालजींची बुद्धिमत्ता मात्र असाधारण होती. कोणत्याही गोष्टीच्या तळापर्यंत ती पोचू शकत होती. इंग्लंडच्या वातावरणात जाऊन पोचताच त्यांच्या हे ध्यानात येऊन चुकलं की भारतीयांचं आणि इंग्रजांचं उद्दिष्ट परस्परांहून भिन्न आहे. वातावरणाचा परिणाम तसा सर्वांवरच होतो. परंतु ज्यांचं अंतःकरण मृदु असतं आणि मन संवेदनशील असतं ते फार लौकर परिस्थिती ओळखतात. प्राप्त परिस्थितीत कसं वागायचं याबाबतही ते तत्पर असतात. तिथल्या वातावरणानं प्रभावित होऊन अनेक तरुण असे निघाले ज्यांनी हिन्दुस्थानला स्वतंत्र कसं करता येईल यासंबंधी नानाविध योजना आखल्या होत्या. त्यापैकी काहीजण पुढे भारतीय स्वातंत्र्य संग्रामात पुढारी म्हणूनही सुविख्यात झाले. त्यांच्या जीवनातील अनेक प्रसंग आणि घटना अजूनही आपल्या मनात कोरलेल्या आहेत. यांच्यापैकी ज्यांनी सशस्त्र क्रांतीचा मार्ग पत्करला आणि जे आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर व बलिदानामुळं जगद्विख्यात झाले, ते सर्व भारतीय स्वातंत्र्याच्या इतिहासात अजरामर झाले. लाला हरदयाल, वीर विनायक दामोदर सावरकर, अरविन्द घोष, चट्टोपाध्याय, मदनलाल धिंग्रा, ऊधमसिंह तसेच भाई परमानन्द ह्याच त्या महान विभूती आहेत ज्यांच्या त्यागामुळं भारताला स्वातंत्र्य प्राप्त झालं आहे.

अमेरिका एक स्वतंत्र देश होता. ब्रिटिशांच्या राजवटीतून मुक्त झाल्यानंतर क्रांतिकारकांचं ते एक महत्त्वाचं केन्द्र बनलं. कार्ल मार्क्सनं तिथं राहूनच आपले सिद्धान्त जगापुढे मांडले. मार्क्सवाद याच भूमीत जन्माला आला. चीनचा उद्धार करणारा प्रख्यात नेता सनयातसेन यानं अमेरिकेत बसूनच चीनच्या स्वातंत्र्याची योजना आखली आणि चिनी जनतेची पोलादी संघटना तिथं राहूनच केली. इटलीचा वीर पुरुष व प्रख्यात क्रांतिकारक गॅरिबाल्डीनंही इथंच वास्तव्य करून आपल्या देशाला स्वतंत्र करण्याच्या योजना बनवल्या.

इंग्रज सरकार हे पुरेपूर ओळखून होतं की लाला हरदयाल हेच गदर-पार्टी आणि "गदर" पत्राचा केंद्रबिंदु आहेत. हे सरकार त्यांचं बळ ही जाणत होतं. सरकारनं हर प्रयत्नानं लाला हरदयाल यांना अमेरिकेबाहेर काढण्यात यश मिळवलं. त्यासाठी त्यानं अनेक कुटिल डाव अवलंबिले. अमेरिकेच्या स्वतंत्र सरकारलाही नीच प्रकारच्या ढोंगीपणाचा अवलंब करावा लागला आणि ब्रिटिशांच्या दबावामुळं लालाजींना अटक करावी लागली. तेथल्या भारतीयांच्या हे ध्यानात आलं की अमेरिकन सरकार ब्रिटिशांच्या इशान्यावर वागत आहे. त्यांच्या इशान्यानं अटक केलेल्या हरदयालजींना ते इंग्रजांच्या हवाली करायला मागपुढं पाहणार नाहीत. स्वातंत्र्यवीर सावरकरांनाही अशाच प्रकारे पकडण्यात आलं होतं. तो इतिहास तर फारच रोमांचक आहे.

क्वचितच असा कुणी देशप्रेमी असेल जो वीर विनायक दामोदर सावरकरांच्या उज्ज्वल जीवनाशी परिचित नसेल. त्यांनी अनेक ग्रंथ लिहिलेले आहेत. "स्वातंत्र्य संग्राम" हा तर त्यांचा जगद्विख्यात ग्रंथ आहे. या ग्रंथाच्या लेखनामुळं, क्रांतिकारकांच्या इतिहासात त्यांना मानाचं स्थान लाभलं आहे.

इंग्लंड मधील वास्तव्यात ज्या सुमारास मदनलाल धिंग्रानं कर्झन विलीवर गोळ्या झाडल्या त्याच प्रकरणात सावरकरांनाही पकडण्यात आलं. त्यांच्यावर राजद्रोहाचा आरोप ठेवून त्यांच्या वरील खटला चालविण्यासाठी, सैनिकी पहान्यात त्यांना जहाजामधून भारतात आणण्यात येत होतं. तेव्हा वीर सावरकरांनी त्यांना आपल्या शक्तीची चुणूक दाखवली होती. सर्वांगाला तेल चोपडून, कंबरेला लंगोट लपेटून, सर्वांगाला साबण चोपडून त्यांनी आपलं संबंध शरीर निसरडं बनवलं. जहाजावरील छोट्या-छोट्या खोल्यात बाहेरचा वारा आत येण्यासाठी छोटेसे झरोके ठेवलेले असतात. त्या सवण्यातून त्यांनी महत्प्रयासानं आपलं संबंध शरीर बाहेर काढलं आणि समुद्रात उडी घेतली. समुद्राच्या लाटांवर आरूढ होऊन, पोहत पोहत त्यांनी फ्रान्सचा किनारा गाठला. शिपायांच्या ही गोष्ट जेव्हा लक्षात आली तेव्हा त्यानं त्यांच्यावर गोळ्या झाडल्या व आरडा ओरड केला. जहाजावरून होड्या समुद्रात उतरवण्यात आल्या व होड्यातून सावरकरांचा त्यांनी पाठलाग केला.

किनाऱ्यावर उभ्या असलेल्या फ्रान्सच्या पोलिसांची मदत मिळविण्याचा सावरकरांनी प्रयत्न केला. ब्रिटिश पोलिस तेवढ्यातच तिथं येऊन थडकले. बळाचा वापर करून त्यांनी सावरकरांना पकडलं आणि त्यांना परत जहाजावर चढवलं. एका क्रांतिकारी व्यक्तीला फ्रान्सच्या भूमीवर पकडून इंग्रजांनी त्यांना परत बन्दिवासात टाकलं. फ्रान्सच्या शासनानं कुठलाही विरोध केला नाही.

पहिल्या महायुद्धाच्यापूर्वी जगात, इंग्रजांनी आपला दरारा निर्माण केला होता. त्यांना आव्हान देण्याची कुणाचीच हिंमत नव्हती. सावरकरांच्या बाबत जो प्रकार घडला त्याचा विचार करताना आमचा अमेरिकन राजसत्तेवरचाही विश्वास पार उडाला. अमेरिकन सरकारनं लालाजींना जर, इंग्रजांच्या हवाली केलं तर त्यांनाही सावरकरांच्या प्रमाणं 'काळ्या पाण्यावर' पाठवण्यात येईल, अशी शंका आम्हाला येऊ लागली. ह्या भीतीपोटी आम्हाला एक युक्ती सुचली. एक हजार डॉलर्सचा जामीन भरून आम्ही लालाजींना सोडवून आणलं. आम्ही असंही ठरवलं की आणखी एक हजार डॉलर्स जमा करून लालाजींना अन्यत्र हलवण्याचा प्रयत्न करायचा. अशा तऱ्हेनं अमेरिकेतील क्रांति-कारकांच्या मदतीनं, न्यूयॉर्कहून जहाजानं लालाजींची आम्ही स्वित्झर्लंडला रवानगी केली.

गदर चळवळीत आम्हा भारतीयांना आमचं स्वतःचं आणि देशाचं भवितव्य दिसत होतं. लालाजींच्या स्थलांतरानंतरही चळवळ पूर्ण वेगाने पुढे चालली होती. क्रांतीच्या लाटेचा मूळ स्त्रोत लोकांच्या मनात होता. जनता आता चांगली जागृत झाली होती. एखाद्या तांब्याच्या तारेतून विजेचा प्रवाह दौडावा त्याप्रमाणं क्रांतीची लाट जनतेमध्ये पसरत होती.

गदर पार्टीच्या ज्या मंत्रानं भारतीयांच्या मनात विजेचा संचार झाला होता तो अमर मंत्र होता—

"जेतै प्रेम खेलन का चाव, सिरधर तली गली मोरी आव."

(ज्याला परमेश्वराच्या भक्तीची आवड आहे, त्यांनं शिर नम्रतेने झुकवून आलं पाहिजे)

गुरूंच्या या अमूल्य शब्दांनी देशभक्तांच्या अंतरात्म्याला जागे करून त्यांच्या मनात 'प्रेम खेलन का चाव' (परमेश्वर भक्तीची इच्छा) उत्पन्न केली होती. मला स्वतःला प्रेमाचा हा खेळ खेळणाऱ्यांच्या सहवासात राहण्याचं भाग्य मिळालं होतं. ते खरोखरच 'मजनू' होते. प्रेम-रंगी रंगलेले हे देशभक्त या सुवर्णभूमीत सोनं कमवायला आले होते, परंतु सोन्याकडं पाठ फिरवून देशप्रेमाची नशा त्यांना चढली आणि त्यात ते स्वतःलाही पार विसरून गेले.

गदर पार्टीच्या नेत्यांच्या प्रेरणेनं पार्टी मधील देशभक्तांचा इतिहास लिहिला गेला आहे. स्वतंत्र भारतातील तरुणांना स्वातंत्र्याचं मोल जाणून घ्यायचं असेल तर त्यांना हा इतिहास काळजीपूर्वक वाचावा लागेल. या इतिहासामध्ये माझाही एक विनम्र सहभाग आहे. जगामधील क्रांतीचे बहुतेक इतिहास मी वाचले आहेत. इतिहासाच्या विद्यार्थ्याच्या भूमिकेतूनच मी गदर पार्टीचा इतिहास वाचला आहे. ह्या इतिहासात गदर-पार्टीच्या वीरांच्या मनोरथांचं आणि त्यांच्यात उत्पन्न झालेल्या भावांचं चित्रण ज्या भाषेत केलेलं आहे ती भाषा साम्यवादी तत्त्वज्ञानाची आहे–राष्ट्रवादी नाही. ह्याचं प्रमुख कारण हे की त्या इतिहासाचे लेखक, प्रेरणा देणारे आणि साहाय्य करणारे सर्वजण प्रायः साम्यवादी होते. यामुळेच त्यांनी त्यांच्या सुध्दा शेतकऱ्यांचं आणि कामगारवर्गाचं चित्रण साम्यवादी पद्धतीनं करण्याचा प्रयत्न केला आहे. रशियन क्रांतीच्याही पूर्वी जणू ते साम्यवादी रंगात न्हाऊन निघाले होते. ही गोष्ट संपूर्णपणे सत्य आहे की गदर पार्टीमधील अनेक वीर पुरुष अद्यापही ह्यात आहेत व हेही खरं आहे की, त्यांच्यापैकी अनेक जण आजही साम्यवादीच आहेत. गदर-पार्टीच्या संघटनेत सामील होऊन ज्यांनी अनेक कामं केली होती परंतु आज मात्र जे राजकारणापासून अलिप्त आहेत त्यांना मात्र देशाच्या राजकारणात आता काहीच स्थान उरलेलं नाही. त्यांचा कुणावर प्रभावही नाही. परंतु ज्यांनी साम्यवादी तत्त्वज्ञानाचा स्वीकार केला होता ते बरेच जागरूक आहेत व अजूनही समविचारी लोकांची संघटना धरून आहेत. त्यांच्यापैकी अनेकजण उत्तम प्रकारचे लेखक आणि वक्ते म्हणूनही नावारूपाला आलेले आहेत. ह्या कारणामुळेच अनेक इतिहासकारांनी गदर-पार्टीमधील ह्या वीरांचं त्यांच्यापैकी जे ह्यात आहेत त्यांचं लोकांच्यापुढं असंच चित्र उभं केलं आहे की ही मंडळी प्रारंभापासूनच जणू साम्यवादी दृष्टिकोणाची होती. ह्याचं कारण कदाचित असंही असू शकेल की ही मंडळी गेली काही वर्षं साम्यवादी दृष्टिकोणाचा स्वीकार करून वावरत आहेत आणि त्यामुळं त्यांच्या मनाची जडण-घडण ही तशाच प्रकारची बनून गेली आहे. पन्नास वर्षांपूर्वीचा इतिहास लिहितानाही त्यांना साम्यवाद आठवला आहे. ज्या रंगाचा चष्मा डोळ्यांवर असतो सगळं जग अशा माणसाला त्याच रंगाचं दिसतं. त्यांच्या या इतिहासात त्या काळी ज्या अनेक संकटांना तोंड द्यावं लागलं त्याचा उल्लेखही नाही. गदर पार्टीच्या कार्यकर्त्यांना अनेक अडचणीतून मार्ग काढावा लागला होता याचीही जाणीव त्यांनी बाळगली नाही. ह्यामुळे त्यांचा हा इतिहास आम्हाला गदर पार्टीचा अधिकृत इतिहास म्हणून स्वीकारता येत नाही.

बाबा केसरसिंह आणि बाबा सन्त विसाखासिंह यांच्या प्रेरणेनं जगजीतसिंह यांनी बरेच परिश्रम करून गदर पार्टीचा आणखी एक इतिहास लिहिला होता. हा इतिहास १९५५ साली प्रकाशित झाला होता. "आजादी की लहर" या नावाचं आणखी एक पुस्तक ग्यानी नाहरसिंह यांनीही लिहिलं होतं. हे दोन्ही इतिहासग्रंथ राष्ट्रवादी दृष्टिकोणातून लिहिण्यात आले होते. अतिशय बारकाईनं वाचन करताना या पुस्तकात काही उणीवा आढळतील हे शक्य आहे परंतु तरीही ही पुस्तकं वाचण्यायोग्य निश्चितच आहेत.

जालंधर येथील "देशभक्त यादगार कमेटी" नं जो इतिहास प्रकाशित केला आहे त्यातही अनेक महत्त्वपूर्ण घटनांचा उल्लेख राहून गेला आहे. विस्मरणामुळं काही गोष्टी नमूद करावयाच्या राहून गेल्या असतील, हे शक्य आहे किंवा आणूनबुजून त्या वगळण्यात आल्या असण्याचाही संभव आहे.

हरयाणा येथील पंडित जगतराम भारद्वाज यांना या इतिहासग्रंथात जे स्थान मिळायला हवं होतं, ते अजिबात मिळालेलं नाही. गदर-पार्टीचा प्रेस यशस्वीपणे चाल-विण्यात आणि पार्टीचं मुखपत्र जगातील काना-कोपऱ्यात गुप्ततेनं पोचविणं, ही त्यांचीच कामगिरी होती. "गदर" हे वृत्तपत्र कुणा-कुणाला व कोणकोणत्या गावी पाठविण्यात येतं त्याचा शोध इंग्रज गुप्तचर सतत घेत. वर्गणीदारांची नोंद ज्या रजिस्टरमध्ये केलेली असेल, ते रजिस्टर रिव्हॉल्वरच्या संरक्षणात पंडित जगतराम यांच्या ताब्यात होतं. त्या नोंदवहीचं त्यांनी प्राणपणानं रक्षण केलं होतं. आपल्यापाशी पिस्तूल असूनही हे रजिस्टर हिसकावून घेऊन जाण्याची शक्यता त्यांच्या लक्षात आली तेव्हा त्यांनी सर्व नावं आणि पत्ते मुखपाठ करून टाकले! त्यांची स्मरणशक्ती खरोखरच अद्भुत होती.

"गदर की गूंज" या शीर्षकाखाली ज्या कविता प्रसिद्ध होत असत त्या सर्व पंजाबी भाषेत होत्या आणि सर्व पंजाबी लोकांच्या ओठावर त्या असायच्या. पंडित जगतराम ही एक मोठे कवी होते. त्यांच्या लेखणीमध्ये आणि वाणीमध्ये चांगलाच तिखटपणा होता. त्यांनी १८५७ मधील वीरांच्या स्मरणार्थ उर्दूमध्ये एक अतिशय ओजस्वी कविता लिहिली होती. त्या कवितेच्या चार ओळी पुढीलप्रमाणे होत्या.—

आज का दिन दस मई है, दिन वही यह आजका।
जबकि शरबत था शहादत का बुजुर्गोंने पिया ।।
गूँज आती थी यही, मारो फिरंगी आज तुम।
कौम के झण्डे को गाडो, थाम तख्तो ताज तुम ।।

जेव्हा सरदार करतारसिंह हे १६ नोव्हेंबर १९१५ रोजी विष्णु गणेश पिंगळे आणि अन्य साथीदारांसह हुतात्मा झाले, तेव्हा ही बातमी समजताच तुरुंगवासाची शिक्षा झालेल्या पंडित जगतराम ह्यांनी तुरुंगाच्या कोठडीत एक कविता लिहिली. आम्ही सर्वचजण तुरुंगात निरनिराळ्या खोल्यांत बंदिवान होतो. आपल्या खोलीत उभे राहून पंडित जगतराम यांनी आपली कविता मोठ्या आवाजात वाचून दाखवली.——

सन उन्नीस सौ बहत्तर, माहे मग्गर दूसरी।
गदर की पलटन का दस्ता मुक्ति को पाता है आज ।।
है जगाया हिन्द को करतार तेरी मौत ने।
कसम हर हिन्दी तुम्हारे खून की खाता है आज ।।

पंडित जगतराम जेव्हा गदरच्या युगान्तर-आश्रमात दाखल झाले तेव्हापासून त्यांच्या तापट स्वभावामुळे ते सर्वच बाबतींत अग्घाडीवर होते. गदर संघटना मजबूत करण्यात त्यांचा फार मोठा वाटा होता.

"पहिल्या लाहोर कट खटल्यात" सरदार करतारसिंह सराबा ही प्रमुख व्यक्ती होती. ही ठळक बाब स्वीकारत असतानाच आणखी एक गोष्ट स्वीकारण्यात कुठलीच अडचण नव्हती. ती बाब म्हणजे गदर-पार्टीतील कार्यकर्त्यांनी स्वतःला एका उच्चतम ध्येयाच्या परिपुर्तीसाठी कशा प्रकारे घडवलं होतं आणि "प्रेम खेलन का चाव" ही वृत्ती त्यांच्या रोमा-रोमांत कशी भिनलेली होती. ही वस्तुस्थिती स्पष्ट करण्यासाठी ओजस्वी शैलीमध्ये जे लेखी निवेदन तयार करण्यात आलं होतं, ते पंडित जगतरामांनीच तयार केलं होतं.

पंडित जगतराम काळ्या पाण्याची शिक्षा भोगत असताना दोन वर्षेपर्यंत तुरुंगातील जुलुमांविरुद्ध टक्कर देत होते. मानसिकदृष्ट्या आपली हिंमत खचू न देण्याचं ठरवून सुद्धा, शरीराला ते सहन झालं नाही. ते आजारी पडले. आजारी पडल्यामुळे संघर्षा-विरुद्ध उभे राहण्याबाबत त्यांचा इलाज चालेना. तुरुंगातील अधिकाऱ्यांनीही त्यांच्या प्रकृतीमुळे त्यांच्या सुटकेसाठी प्रयत्न केले परंतु गदर-चळवळ अधिक बळकट बनवण्या-मागे पंडित जगतराम यांचेच प्रयत्न होते म्हणून इंग्रज सरकार त्यांना चांगलंच वचकून होतं. त्यांच्यावर विश्वास ठेवायची कुणाची तयारी नव्हती. क्रांतिकारकांच्या तुरुंगवासाच्या इतिहासात असा एखादाच क्रांतिवीर असेल, ज्यानं बंदिवासाच्या काळात तुरुंगाच्या नियमांचं योग्य तऱ्हेनं पालन केलेलं असेल, ज्याच्या सुटकेसाठी तुरुंगातील अधिकाऱ्यांनी जोरदार शिफारशी केल्या असतानाही ज्याला वीस वर्षे तुरुंगात खितपत पडावं लागलं. अशी वस्तुस्थिती असतानाही, गदर-पार्टीच्या इतिहासात पंडित जगतराम सारख्या थोर क्रांतिकारकाचा योग्य असा उल्लेख नव्हता. आणि याचं एकमेव कारण म्हणजे त्यांनी साम्यवादी तत्त्वज्ञान स्वीकारण्यास नकार दिला होता. मृत्यूपर्यंत ते राष्ट्रवादीच राहिले. त्यांच्या ठिकाणच्या गुणामुळे-- त्यांचं तेजस्वी जीवन सरळ स्वभाव, क्रांती संबंधीचा उत्साह, विचारातील मस्ती, काव्यासंबंधीची रसिकता, उच्च विचारसरणी आणि सदाचार, या सर्वांमुळे लोकांना त्यांनी आपल्याकडे विलक्षण तऱ्हेनं आकृष्ट केलं होतं. पंडितजी किती श्रेष्ठ विद्वान होते, विचारवंत आणि एक समर्थ लेखक होते, हे त्यांचं साहित्य वाचूनच समजू शकेल.

असेच आणखी एक क्रांतिकारक होते. त्यांचं नाव श्री. भगवानसिंह ग्रंथी असं होतं. मी १९११ साली त्यांच्या सान्निध्यात आलो. त्या सुमारास ते तरुण वयाचे होते. मीही एकोणीस वर्षांचा धट्टाकट्टा युवक होतो. ग्रंथीजींच्या प्रत्येक शब्दातून आणि कार्यातून त्यांचं देशप्रेम व्यक्त होत होतं. त्यांच्या रोम-रोमांत इंग्रज आणि त्यांची

राजवट यांच्यासंबंधी तिरस्कार भरलेला होता. आपल्या देशप्रेमाच्या कविता जेव्हा ते सुरेल आवाजात म्हणायचे तेव्हा गारुड्याच्या पुंगीसमोर नाग डोलतो– तशा श्रोत्यांच्या माना डोलायच्या.

कॅनडा येथे आधीपासूनच गुरुद्वारे होती. भगवानसिंहांनी तिथे पोचताच, या गुरुद्वारांना क्रांतिकारी विचारांची केंद्रं बनवून टाकली. यामुळं ग्यानीजींचं तिथलं वास्तव्य इंग्रज सरकारला धोकादायक वाटू लागलं, असह्य झालं. सरकारनं क्रूरपणे त्यांना फरफटत कॅनडाबाहेर हाकून लावलं. भाई भगवानसिंह डगमगले नाहीत. शर्थ करून ते अमेरिकेतील सॅनफ्रान्सिस्को महानगरात पोचले व तिथल्या गदर-पार्टीच्या मेळाव्यात येऊन दाखल झाले. लाला हरदयाल यांच्या उचलबांगडीनंतर तिथं जी पोकळी निर्माण झाली होती ती ग्यानीजींनी आपल्या कार्यानं भरून काढली. तिथल्या क्रांतिमय जीवनात योग्य ती खबरदारी घेऊन त्यांनी एक नवजीवन आणि नवा जोश निर्माण केला. कॅनडा येथील वास्तव्यात त्यांनी जे कार्य केलं होतं त्यामुळं त्यांची कीर्ती सर्वत्र दुमदुमत होती देशावर प्रेम करणारा प्रत्येक भारतीय क्रांतिकारक त्यांचे क्रांतिविषयक विचार मोठ्या आस्थेनं ग्रहण करू लागला. गदर-पार्टीच्या वतीनं "एलान-ए-जंग" (युद्धाची घोषणा) हे जे प्रकाशन प्रसिद्ध करण्यात आलं होतं, त्याचे जनक हेच होते. युद्ध जो पर्यंत चालू होतं तेव्हा सर्वांच्या मनात हीच आशा वसत होती की इंग्रजी राजवटीच्या समाप्ती-नंतर, त्यांचं नशीब उघडेल. युद्धाच्या समाप्तीनंतरही जेव्हा इंग्रज सरकार भारतात आपलं पाऊल घट्ट रोवून उभं राहिलं ते बघून सर्वांची घोर निराशा झाली. ह्यानंतर सर्वांचाच कमकुवतपणा उघडा पडू लागला. भाई भगवानसिंहही निराश मनानं बाजूस सरले. त्यांनी "नवी बिटी-नवा दाडू" चं धोरण स्वीकारलं. त्यांचं नेता म्हणून असलेलं महत्त्व कमी झाल्याबरोबर त्यांनी क्रांतिकारकांच्या संघटनेतून काढता पाय घेतला व आरामाचं आयुष्य ते घालवू लागले. सर्वच क्रांतिकारकांच्या मनातून ते उतरले. त्यांचं असं पार्टीमधून निघून जाणं, योग्य का अयोग्य, ह्याचा निर्णय मी करू इच्छित नाही. मात्र मला हे मान्य करावंच लागेल की गदर-चळवळ जगद्विख्यात बनविण्यात त्यांचाही मोठा वाटा होता. क्रांतिकारकांपासून आणि देशप्रेमी भारतीयां-पासून ही सत्य गोष्ट लपवणं, म्हणजे सत्याचा गळा घोटण्यासारखं आहे. एका ऐति-हासिक घटनेला इतिहासातून साफ वगळणं, हे कुणाही इतिहासकाराला शोभादायक नाही.

भाई भगवानसिंह गदर-पार्टीशी सर्व संबंध तोडून एखाद्या तत्त्ववेत्त्याचं जीवन जगू लागले. गदर-पार्टीच्या प्रत्येक सदस्याला या गोष्टीवर टीका करण्याचा अधिकार आहे, परंतु घडलेल्या सत्य घटनांवर पडदा टाकण्याचा मात्र कुणालाच अधिकार नाही जर भाई भगवानसिंह यांनी साम्यवादी तत्वज्ञान स्वीकारलं असतं तर त्यांचं चित्रण, निराळ्याच पद्धतीनं झालं असतं.

गदर-पार्टीतील आमचे एक साथीदार रामचन्द्र या नावाचे होते. ते इंग्रजांच्या कट्टर विरोधात होते. ते एक चांगले वक्ते व लेखक होते. ते अमेरिकेत आले व गदर-पार्टीत सामील झाले. गदर-पार्टीचा इतिहास लिहिणाऱ्यांनी मोठा चिकित्सकपणाचा आव आणला आहे. त्यांना हे सद्गृहस्थ– रामचन्द्र—भारतामधून मुद्दाम पाठवण्यात आलेले इंग्रज सरकारचे गुप्तचर होते, याचा पुरावा कुठं मिळाला ? ही गोष्ट कधी कुणी पुराव्यानं सिद्ध केली आहे का की १९१४ साल पावेतो गदर-पार्टीत राहून त्यांनी इंग्रज सरकारची हेरगिरी केलेली आहे ?

लाला हरदयालजींना चळवळीतून बाजूस सारण्यात आल्यानंतर हे महाशय रामचन्द्र खूपच चमकले होते. त्यांच्या लेखणीत आणि वाणीत जादू भरलेली होती. सर्व ठिकाणी सरळ आपला अधिकार कसा प्रस्थापित करावा यात ते फारच निपुण होते. मरेपर्यंत त्यांनी आपला अधिकार कायम ठेवला.

परंतु गदर-पार्टीच्या इतिहासात ज्या पद्धतीनं या रामचन्द्र महाशयांचं चित्रण करण्यात आलं आहे, त्यामुळं अनेक वाईट विचार मनात येतात. ते इंग्रज सरकारचे पगारी हेर होते असं ठरवून त्यांच्या हत्येचं समर्थन करण्यात आलं आहे. जो माणूस आयुष्यभर देशाची सेवा करतो, त्यालाच देशद्रोही ठरवून ठार मारण्यात येतं ! ठार मारणाऱ्यांच्या मनात द्वेषाची भावना असू शकते– अमूक एकाला ठार करण्याची प्रेरणा त्यांना होणं शक्य आहे परंतु इतिहासकार जेव्हा अशा हत्येच्या समर्थनार्थ लेखन करतो तेव्हा त्याचं हे कर्तव्य असतं की त्यानं सर्व पुरावे देऊन आपलं म्हणणं सिद्ध करावं. आपण सर्वचजण एकमेकांवर आरोप-प्रत्यारोप करतो, शक्य झाल्यास आपण शिक्षाही करतो. परंतु यथार्थ स्वरूपात व भक्कम पुराव्याशिवाय कुणाची हत्या करणं किंवा करविणं, ही गोष्ट इतिहासात नेहमीच निंदनीय मानली गेली आहे. इतिहासाचे अभ्यासक अशा घटनांचा तात्पर्यार्थ हाच काढणार की कुठलं तरी सत्य दडवण्यासाठीच अमुक व्यक्तीला ठार मारण्यात आलं किंवा तशी व्यवस्था करण्यात आली.

जगद्विख्यात लेनिन सुद्धा अशा आरोपातून सुटला नव्हता. भांडवलदारांच्या आणि जहागिरदारांच्या सरकारच्या मते तो जर्मन राजवटीचा खरेदी केलेला दलाल होता. असा खोटा आरोप करण्यात आला होता. दिसताक्षणीच त्याच्यावर गोळी झाडण्याचा आदेश होता. अशा प्रकारच्या नीच पातळीवरील प्रचाराला बळी पडून तसं काही झालं असतं तर मानवी समाजाचा वर्तमानकाळ आणि भविष्यकाळ काही निराळाच झाला असता.

आज शासकीय कार्यालयातून आपण मुक्तपणे वावरू शकतो. या इतिहासकारांनी शासकीय दप्तरांतील इंग्रजांच्या इतिवृत्तांचं व्यवस्थित संशोधन करून सत्यस्थिती समजून घेतली पाहिजे. लिखित स्वरूपाच्या दस्तऐवजांच्या आधारावर पुराव्यानिशी "महाशय रामचन्द्र गद्दार होते, देशद्रोही होते म्हणून त्यांना ठार मारण्यात आलं" असं म्हटलं

पाहिजे. कुठलाही पुरावा न देता, काहीही सिद्ध न करता, इतिहासात अशी घटना नोंदवली तर अभ्यासकांना ही बाब निंदनीय वाटणार आणि हे कृत्य पूर्वग्रहदूषित मानलं जाणार.

रामचन्द्र यांच्या पत्नीनं आणि मुलीनं सबंध भारतभर फिरून अनेक पुढाऱ्यांना त्यांच्या हत्येच्या संदर्भात निवेदनं सादर केली आहेत. त्यांनी असं प्रतिपादन केलं आहे की श्री. रामचन्द्र यांची हत्या ही देशद्रोहाची काळीकुट्ट घटना आहे. यामुळं ज्या लोकांनी स्वार्थापोटी त्यांना ठार करण्याची व्यवस्था केली, त्यांचं हे नीचकृत्य देशभक्तीपोटी झालेलं नाही. या संदर्भात संपूर्ण सत्य समोर आलं पाहिजे. त्यांच्या हेरगिरीच्या प्रकरणावर पूर्ण प्रकाश पडला पाहिजे म्हणजे मग त्यांच्या हत्येच्या समर्थकांना त्यांच्या बाजूनं किंवा समर्थन करण्याच्या उद्देशाने काही बोलण्याचं किंवा लिहिण्याचं धाडस होणार नाही.

गदर-पार्टीतील शूर कार्यकर्त्यांनी पार्टीचं नाव सबंध जगात विख्यात केलं होतं. लोकांकडून त्यांना बरंच साहाय्य मिळालं होतं. भारतात क्रांती व्हावी म्हणून १९१४-१५ च्या दरम्यान जर्मनीनं देखील आर्थिक साहाय्य केलं होतं, असं म्हटलं जातं. अशा प्रकारे जमा केलेल्या निधीतून पार्टीसाठी काही स्थावर मालमत्ता खरेदी करण्यात आली होती. आता क्रांती करण्याचा प्रश्न दृष्टीपुढे राहिला नव्हता. गदर-पार्टीच्या नेतृत्वाच्या प्रश्नावर भाई भगवानसिंह आणि श्री. रामचन्द्र यांच्यात संघर्ष निर्माण झाला होता. या स्पर्धेत श्री. रामचंद्र यशस्वी ठरले व भाई भगवानसिंह यांना बाजूस व्हावं लागलं. ह्याचा बदला काढण्यासाठी भाई भगवानसिंहांच्या समर्थकांनी नवीन योजना बनवली आणि कोर्टाच्या आवारात रामचन्द्र यांना गोळ्या घालून ठार करण्यात आलं. हा सर्व प्रकार भाई भगवानसिंह यांच्या अनुमतीनेच झाला होता, असं म्हटलं जातं.

अशा परिस्थितीत जर रामचन्द्र यांच्याबरील हेरगिरीचा आरोप जर सिद्ध करता आला नाही तर त्यांच्या हत्येबद्दल भाई भगवानसिंह यांच्यावर दोषारोप केला जाऊ शकतो.

लाला हरदयाल यांच्यासंबंधीही सदर इतिहास लेखकांनी पुस्तकाच्या शेवटी-शेवटी काही मजकूर दिलेला आहे. वाचकांना लालाजीं विषयी अजिबात आदर वाटू नये याची काळजी घेऊनच त्यांनी लेखन केलेलं आहे, हे स्पष्ट होतं. हा इतिहास लिहिणारे किंवा त्यांच्याकरवी लिहवून घेणारे लोक— एक गोष्ट साफ विसरून गेले आहेत की कुणीही सुशिक्षित भारतीय, विशेषतः पंजाबी माणूस, लालाजींच्या तेजस्वी जीवनानं एकेकाळी अतिशय प्रभावित झाला होता. लोकांच्या मनातून लालाजींचं स्थान पुसून टाकण्याचं त्यांचं हे कृत्य त्यांच्या हीन मनोवृत्तीचंच निदर्शक आहे. भारताच्या अशा सुविख्यात महापुरुषावर चिखलफेक करणं, हा नीचपणा आहे. बाबा सोहनसिंह भकना यांनीही आपल्या लेखांतून, भाषणातून आणि चर्चांमधून लाला हरदयाल यांचा अवमान करण्याचाच प्रयत्न केला आहे. बाबा सोहनसिंह यांचं व्यक्तिमत्त्व ऋषितुल्य आहे म्हणूनच त्यांच्या सारख्यांना कुणाचा द्वेष करणं शोभून दिसत नाही.

● ● ●

यापुढे मी जी हकीकत सांगणार आहे– तो काळ दुसऱ्या महायुद्धाला तोंड फुटण्या-पूर्वीचा आहे. जपान आणि जर्मनी या देशांतील तरुण वर्ग जागा होत होता. आपल्या समाजाच्या रक्षणासाठी आणि आपल्याला हव्या असलेल्या भू-प्रदेशावर आपला हक्क प्रस्थापित करण्यासाठी, हा समाज आव्हाने देत होता, आव्हाने स्वीकारीत होता. असं वागण्याचा आपणास अधिकार आहे– अशी त्यांची भूमिका होती. जगभरचे जे समाज अन्य देशांतून विखुरलेले होते– आणि गरजेपेक्षा अधिक भूभाग बळकावून बसले होते– ते या दोन देशांतील लोकांची वाढती ताकद बघून आपल्या ठिकाणी भयभीत झाले होते. आपलं राष्ट्र आणि त्याच्या अधिपत्याखाली असलेला भूप्रदेश यांचं रक्षण करण्यासाठी हेही लोक जोरदार तयारी करू लागले. या दोन देशांतील लोक सगळ्या जगाचंच पुनर्वाटप करण्यासाठी आपल्या बळाचा वापर करण्याची मनीषा बाळगून होते. आकाशात युद्धाचे ढग जमू लागले. "युद्ध अटळ आहे"– ही भावना दृढ झाली होती– परंतु ते केव्हा होणार हे मात्र निश्चितपणे सांगता येत नव्हते.

जागतिक राजकारण जेव्हा अशा प्रकारच्या वातावरणात प्रवेश करू लागलं तेव्हा आम्हीही आपणास काय करता येईल, कशाप्रकारे योजना आखता येतील, त्या अमलात कशा आणता येतील– ह्याचा विचार करू लागलो. जागतिक परिस्थितीचा आपणास कशाप्रकारे उपयोग करून घेता येईल– असा विचार करू लागलो. ही गोष्ट आमच्या चटकन लक्षात आली होती की भारतावर इंग्रज शस्त्रबळाच्या जोरावरच राज्य करत आहेत. निःशस्त्र प्रजेच्या देशप्रेमाच्या भावना आणि संघटना शस्त्रबळाशी सामना करायला पुरेशा नाहीत. मेंढ्यांची संख्या कितीही मोठी असो, व त्या कितीही संघटित असोत– वाघाला काही त्या ठार करू शकत नाहीत किंवा त्याच्याशी लढूही शकत नाहीत. ही गोष्ट आम्हाला पुरतेपणी समजून चुकली. मग सशस्त्र क्रांती करायची असेल तर तिची पूर्वतयारी कशी करावी? आधुनिक युद्धाचं तंत्र कसं आत्मसात करावं? युद्धाची तयारी कशाप्रकारे करावी? या सर्व गोष्टींचा विचार करणे भाग होते. दुसऱ्या देशांतील क्रांतिकारकांनी आम्हाला ह्याची जाणीव करून दिली की आम्हाला सैनिकी शिक्षण घ्यावं लागेल. जे विज्ञानाचे विद्यार्थी आहेत त्यांनी स्फोटक शस्त्रे बनवण्याचा अभ्यास करावा. ह्या सल्ल्यानुसारच मी सैनिकी शिक्षण घ्यायला सुरुवात केली आणि श्री. करतारसिंह सराबा यांनी विमानाचे सुटे भाग जोडण्याचे शिक्षण घेतले.

अशा प्रकारे आम्ही जेव्हा आमच्या योजना प्रत्यक्ष अंमलात आणण्याची सुरुवात केली तेव्हाच महायुद्धाला तोंड फुटलं आणि "कोमागाटामारू" च्या घटनेनं आमच्या योजनांवर पाणी पडलं. मनानं आम्ही क्रांतिकारक होतो परंतु क्रांती यशस्वी होण्यासाठी कोणत्या गोष्टी कराव्या लागतील, योजना कोणती असावी, ती कुणी तयार करावी कार्यकर्त्यांच्या ठिकाणी कोणती दक्षता असायला हवी, मार्गात कोणकोणत्या अडचणी उभ्या राहतील, ह्या सर्व बाबींचा विचार करण्यास आम्ही असमर्थ होतो. गदर-पार्टी-मध्ये अनुभवी, सदाचारसंपन्न, शक्तिमान, उत्तम वक्ते, लोककवी आणि लेखक होते परंतु सर्व प्रकारचं नेतृत्व करू शकेल असा कुणी नव्हता. भूतकाळातील ते चित्र आजही जेव्हा माझ्या मनापुढं उभं राहतं– क्रांतिकारकांच्या त्या सिंहगर्जना, बलिदानासाठी सिद्ध व्हायचा त्यांचा उत्साह– यांनी मी आज देखील थराकून जातो. हे सर्व खरं असलं तरी मी त्या सर्वांना सच्च्या स्वातंत्र्यप्रेमी तरुणांची एक तुकडीच मानतो– क्रांतिकारकांची पद्धतशीर संघटना मानू शकत नाही.

कुणी एक प्रियकर आपल्या प्रेयसीला भेटण्यासाठी तिच्या घरात वर चढून गेला, ही प्रसिद्ध कथा सर्वांनीच ऐकलेली असेल. खिडकीच्या दिशेनं त्यानं जेव्हा वर दृष्टी टाकली, तेव्हा तेथून दोरासारखी वस्तु बाहेर लोंबत आहे, हे त्याला दिसलं. ती वस्तु बघून त्याचा असा समज झाला की आपल्या प्रेयसीनं आपण वर चढून यावं यासाठी दोर बांधून ठेवला असावा. तो दोर पकडून प्रियकर वर चढून गेला– वर चढल्यावर त्याच्या ध्यानात आलं की तो दोर नसून साप आहे! आमची अवस्था देखील त्या प्रियकरा-सारखीच होती. आम्ही स्वतंत्र अमेरिकेच्या भूमीवर उभे होतो– स्वर्गाहूनही प्रिय असलेल्या आमच्या मातृभूमीचा मार्ग किती बिकट आहे, हे आमच्या ध्यानातच नव्हतं. हिन्दुस्थानचा शत्रू आमची प्रत्येक हालचाल न्याहाळतो आहे, ह्या गोष्टीचा आम्हाला अजिबात पत्ता नव्हता. आम्ही मनातले मांडे मनातच खात होतो.

भारताकडे परत निघण्यापूर्वी सॅक्रेमेंटो या अमेरिकेतील एका मोठ्या शहरात १० ऑगस्ट १९१४ रोजी भारताला स्वातंत्र्य मिळावं असा विचार करणाऱ्या लोकांची एक मोठी सभा भरली होती. त्या सभेत आम्हाला काय हवं आहे, आम्ही काय करणार आहोत आणि कोणत्या प्रकारे आपली योजना कार्यवाहीत आणणार आहोत, यासंबंधी जाहीरपणे चर्चा घडून आली. आमच्या या महत्त्वाच्या सभेची विस्तृत बातमी ठळकपणे प्रसिद्ध झाली होती. सभेत संमत केलेल्या ठरावांवर क्वचित टीका-टिप्पणीही करण्यात आली होती.

आम्ही कोणकोणते ठराव पारित केले, कुणी काय भाषणं दिली– या सर्व गोष्टींचं इतिवृत्त युगान्तर-आश्रमाच्या दप्तरात सुरक्षित आहे. सभेच्या संदर्भात अमेरिकी आणि इंग्रज गुप्तचरांचे लेखी अहवालही उपलब्ध आहेत. ह्या विविध अहवालांचा बारकाईनं अभ्यास केल्यास ही गोष्ट स्पष्टपणे दिसते की सभेत शहाणपणाचं, बुद्धिमत्तेचं

असं कुठलंच कामकाज झालं नव्हतं. आमच्या शब्दाशब्दातून देशप्रेम व्यक्त होत होतं आणि आमच्या हृदयात क्रांतीच्या ज्वाळा भडकलेल्या होत्या, हे सभेला आलेल्या प्रत्येक माणसाला जाणवलं होतं परंतु आमच्यापैकी कुणाच्याही डोक्यात क्रांतीसंबंधी स्पष्ट असा विचार नव्हता. तरीही अमेरिकेतील जे भारतीय त्या सभेला उपस्थित होते, माझ्या मते भारतमातेची ती सर्व अमूल्य रत्ने होती.

मागील पन्नास वर्षे मी भारताच्या काना-कोपऱ्यात फिरून आलो आहे. त्या शूर-वीर तरुणांसारखे तरुण मला कुठेही बघायला मिळाले नाहीत. त्या क्रांतिकारकांनी क्रांतीच्या शास्त्राचा उत्तम अभ्यास केलेला होता व त्या सर्वांनी साम्यवादी तत्त्वज्ञानाचा स्वीकार केला होता, असं त्यांच्या विषयी लिहिणं किंवा बोलणं, ही बाब अगदीच निरर्थक आहे. त्यावेळी जे ठराव संमत करण्यात आले, जे लेख लिहिले गेले, कविता रचल्या गेल्या— त्या सर्वांमधून एकच अर्थ ध्वनित होत होता की इंग्रज हा भारताचा शत्रू आहे, सर्वांनी संघटित होऊन शस्त्रबळाच्या साहाय्याने क्रांती करून या शत्रूला देशाच्या बाहेर हाकलून दिलं पाहिजे आणि देश स्वतंत्र केला पाहिजे, देशासाठी प्राणार्पण करायला आम्ही सिद्ध आहोत.

बाबा सोहनसिंह भकना, बाबा केसरसिंह, पंडित जगतराम, भाई भगवानसिंह प्रो. मौलवी बरकतुल्ला, श्री. रामचन्द्र— हे सर्व गदर पार्टीचे नेते होते. या सर्वांच्या भाषणा-तून जोश ओसंडत होता. त्यांचा हा जोश मी ग्रहण करण्याचा प्रयत्न केला. तो कैफ मी आजवर जोपासला आहे. त्या आधारावरच मी आता पावेतो जिवंत आहे. या सर्वांचे विचार कुणी शब्दबद्ध केले तर ही गोष्ट स्पष्ट होईल की त्यांच्यापाशी भारतात सफल क्रांती घडवून आणण्याची योजना अशी काही नव्हती.

२४ ऑगस्ट १९१४ रोजी पहिलं महायुद्ध सुरू झालं. जर्मन फौजा वेगानं पुढे-पुढे सरकत होत्या. आकाशवाणी आणि वृत्तपत्रातील बातम्यांनी हे स्पष्ट होत होतं की जर्मनीचं बलाढ्य सैन्य लौकरच विरोधकांवर मात करणार आहे, त्यांना पराभूत करणार आहे. ब्रिटिशांच्या विराट सामर्थ्याचा पोकळपणा आम्हाला दिसत होता. इंग्रज साम्राज्याच्या भिंती कोसळायला लागल्या होत्या. या कोसळणाऱ्या साम्राज्यावर आपणही एक प्रहार करावा, यासाठी आम्ही अगदी उतावळे झालो होतो.

### स्वातंत्र्यप्रेमींची रवानगी

२६ ऑगस्ट १९१४ रोजी आम्ही 'प्रिन्सेस कोरिया" जहाजावर चढलो. माझ्या समवेतचे इतर १५० लोक काय विचार करत होते, याचा मला पत्ता नव्हता. त्यांच्या चेहऱ्याकडे बघून, त्यांचे डोळे बघून असं वाटत होतं की त्यांनी अत्यंत कडक दारू प्राशन केलेली आहे. मला आजही वाटत होतं की आम्ही सर्वजण एखाद्या वरातीत सामील होण्यासाठी निघालो आहोत.

भारताच्या स्वातंत्र्य-वेदीवर पतंगाप्रमाणे जळून जायला उत्सुक असलेले आम्ही बेफिकिर वृत्तीचे तरुण होतो. कोणत्याही गोष्टीचा गंभीरपणानं विचार करण्याची कुणाची कुवत नव्हती. ज्या पुढाऱ्यांच्या आदेशावर सर्वजण निघाले होते– त्यांनी कुणी तपशीलवार योजना तयार करून दिली नव्हती– काही विचारही केला नव्हता. गदर-पार्टीचे हे नेते ज्यांनी भारतीयांमध्ये जागृती निर्माण केली आणि स्वातंत्र्य-लढ्यात सहभागी होण्यासाठी त्यांची तयारी केली, हे नेते क्रांतीच्या इतिहासात अमर होतील. त्यांच्या या निर्णयावर कठोर टीकाही होईल की त्यांनी अनेक अमूल्य नररत्नं मागचा पुढचा विचार न करता, इंग्रज सरकारच्या भडकलेल्या अग्नीत टाकून दिली.

जगभरातील क्रांतीचे इतिहास वाचल्यावर हे लक्षात येतं की गदर-पार्टीच्या नेत्यांनी जशी योजना आखली– तशा प्रकारची योजना कोणत्याही देशानं आखलेली नव्हती. भारतात पोचल्याबरोबर सर्वजण क्रांती घडवून आणणार, असं वरवर दिसत होतं. या लोकांत ब्रिटिशांचे हेर किती आहेत, ह्याची मात्र कुणालाच कल्पना नव्हती.

“प्रिन्सेस कोरिया” हे जहाज प्रचंड होतं आणि खाण्या-पिण्याची उत्तम सोय होती. जेवण्या-झोपण्याशिवाय आम्हाला काहीच उद्योग नव्हता. सबंध दिवस भाषणं करणं, भाषणं ऐकणं आणि चर्चा करणं, यातच जात होता. माझे सर्वच साथीदार वयानं आणि अनुभवानं माझ्यापेक्षा मोठे होते म्हणून मी केवळ गप्प बसून त्यांच्या चर्चा ऐकायचो आणि त्यातच आनंदित व्हायचो. एके दिवशी माझ्या साथीदारांना थट्टा सुचली. त्यांनी मलाच भाषणासाठी उभं केलं. मी आतापर्यंत सांगितलेलं काम करावं, एवढंच जाणत होतो. भाषण द्यायची मला अजिबात आवड नव्हती. त्या दिवशी मला भाषण द्यायला मला सर्वांनी भाग पाडलं. काय बोलावं, मला काहीच सुचेना- परंतु बोलायला उभा राहिलो तेव्हा आपोआपच विचार सुचू लागले. मी बोलू लागलो माझ्या भाषणाचा सारांश पुढीलप्रमाणे होता– "आपण सर्वजण भारताला स्वतंत्र करण्यासाठी निघालो आहोत. आपल्याला भारत स्वतंत्र करायचा आहे. आपण देश स्वतंत्र करू शकू किंवा नाही, हे काही मी सांगू शकत नाही, परंतु एवढं मात्र निश्चितच सांगता येईल की स्वातंत्र्याच्या वेदीवर अभिमानपूर्वक बलिदान करावं लागणार आहे." माझं भाषण सर्वांना आवडलं. माझ्याकडे आता सर्वजण आदराने पाहू लागले. माझ्या पहिल्याच भाषणाचा प्रभाव बघून मीही मोठा आनंदित झालो.

काही दिवसांनंतर आमचं जहाज हवाई बेटावर येऊन पोचलं. हे बेट खूप सुंदर आहे व ते अमेरिकेच्या ताब्यात आहे. बंदरावर जहाज थांबताच आम्ही शहरामध्ये फेरफटका मारण्यासाठी निघालो. शहरात आम्ही एक वर्तमानपत्र विकत घेतलं आणि बागेत जाऊन ते वाचू लागलो. वर्तमानपत्र वाचण्यात मी अगदी गढून गेलो होतो. एवढ्यातच एक अमेरिकन माणूस धावत तिथे आला. त्यानं वर्तमानपत्र जवळ जवळ

हिसकावूनच घेतलं. वर्तमानपत्र हातात घेऊन ते फडफडवीत तो बेढंगा सुरात मला म्हणाला—"उठा-लौकर भारतात जा— इंग्रजांशी लढा करून त्यांना आपल्या देशातून पिटाळून लावा. तुम्ही असं काही शौर्य गाजवा की त्याच्या बातम्या आम्हाला वाचायला मिळाल्या पाहिजेत. तुम्ही नुसतं वाचत काय बसलात– उठा- काम करा." त्याचं वक्तव्य ऐकून मला एवढंच वाटलं की त्या सद्गृहस्थानं आज जरा जादाच घेतलेली आहे. नंतर जेव्हा तपास केला तेव्हा समजलं की ही स्वारी हवाई द्वीप नगरपालिकेची अध्यक्ष आहे. शिवाय, क्रांतिकारकांविषयी त्याच्या मनात आदरभावही आहे.

हवाई बेटांवरून आम्ही पुढं निघालो आणि जपान मधील "योकोहामा" बन्दरावर येऊन पोंचलो. आम्ही अमेरिकेहून परत निघालो ही बातमी वृत्तपत्रांत झळकली होती. "भारतीयांची एक मोठी तुकडी भारतामध्ये क्रांती घडवून आणण्याच्या उद्देशानं "कोरिया" जहाजानं भारताकडे रवाना झाली आहे." जपान मधील क्रांतिकारकांनी तसंच तिथं स्थायिक झालेल्या भारतीयांनी ही बातमी वाचली होती. आमच्या स्वागता-साठी ते जहाजावर आले. आम्ही तिथं पोंचण्यापूर्वीच "कोमागाटामारू" हे जहाज तेथून पुढे रवाना झालं होतं. सायंकाळच्या वेळी शहर बघण्यासाठी आम्ही बाहेर पडलो. तिथं हॉटेलात राहणाऱ्या एका भारतीय माणसाला आम्हाला भेटायचं होतं. तिथं जाऊन पोंचताच जपानी पोषाख केलेला एक भारतीय पळतच आमच्याकडं आला आणि त्यानं माझ्या गळ्याला मिठी मारली. एखादा जुना मित्र असल्याप्रमाणं तो आमच्याशी बोलू लागला. त्याचा तो भाव चुकीचा होता. त्याची आमची यापूर्वी कधीच गाठ पडली नव्हती, तो आमचा मित्र नव्हता. मात्र त्या दिवसांपासून आम्ही एकमेकांचे मित्र झालो. आज देखील भेट झाली म्हणजे तो तसाच गळ्यात मिठी मारतो. ती व्यक्ती म्हणजे भारतातील प्रख्यात क्रांतिकारी– झांशीचे पंडित परमानन्द! पंडितजींनी आयुष्यातील ३६ वर्षे तुरुंगवासात काढली आहेत.

योकोहामाहून आम्ही पुढं निघालो आणि फिलिपाईन्स बेटावरील राजधानीत-मनीलात येऊन पोंचलो. मोठ्या प्रेमानं आम्ही तिथल्या जुन्या मित्रांना भेटलो. त्यांनी हरप्रकारे मला साहाय्य केले होते. आमचं "गदर" हे वृत्तपत्र मनीलापर्यंत पोंचलं होतं. आमच्याप्रमाणेच देशप्रेमानं वेडे बनलेले काही लोक तिथंही होते. त्यांच्यापैकी काहीजण आमच्या सोबत निघाले आणि बाकीच्यांनी नंतर येऊन सामील होण्याचं आश्वा-सन दिलं.

मनीलाहून निघाल्यानंतर आमचा मुक्काम ब्रिटिश अधिपत्याखाली असलेल्या हाँगकाँग येथे होता. इंग्रजी राजवटीतील अधिकारी आमचं कशाप्रकारे स्वागत करतील, याचा आम्ही विचार करू लागलो. समुद्रावरून येणाऱ्या थंड वाऱ्याच्या झुळूकांनी शांतपणानं विचार करायला मदतच केली. त्या काळात अमेरिकेत पिस्तूल, रिव्हॉल्वर,

काडतुसं या गोष्टी अगदी स्वस्त दरात मिळत होत्या. त्यामुळं आमच्यापैकी जवळ-जवळ प्रत्येकापाशी एकेक पिस्तूल आणि काडतुसं होती. शांतपणे विचार करून आम्ही असं ठरवलं की आपल्या जवळची ही सर्व शस्त्रसामग्री समुद्राला अर्पण करून टाकली पाहिजे! याचं कारण असं की आम्ही जर हे केलं नाही तर तेथील ब्रिटिश अधिकारी शस्त्रे जवळ बाळगण्याचा आमच्यावर आरोप ठेवून आमची सरळ तुरुंगात रवानगी करण्याचा दाट संभव होता. आम्ही ज्यावेळी "कोरिया" जहाजामध्ये चढून बसलो व तेथून निघालो तेव्हा रामचन्द्र, मौलवी बरकतुल्ला आणि भाई भगवानसिंह यांना या सर्व मंडळींना आमच्यापाशी पिस्तुलं, रिव्हाल्वर्स इ. सामग्री आहे, हे माहीत होतं. आमचे प्रमुख म्हणून जे लोक आमच्या समवेत होते त्यांनाही ही गोष्ट माहीत होती. अशाप्रकारे शस्त्र जवळ बाळगून प्रवास करणं ही गोष्ट किती धोक्याची आहे, कुणाच्याच डोक्यात आलं नव्हतं. संकटापासून स्वतःचा जीव वाचवण्याचा प्रश्नच आमच्यापुढं नव्हता. आम्ही आमचं सर्वस्व गमावून संकटात उडी घेण्यासाठी तर निघालो होतो. हत्यारं फेकून देण्याचा निर्णय तर घेतला परंतु प्रत्यक्ष हत्यारं समुद्रात फेकली तेव्हा मात्र एखाद्या मुलाचं खेळणं हिसकावल्यानंतर ते जसं रडतं—तसं आम्हीही रडू लागलो.

दुसऱ्या दिवशी आम्ही हाँगकाँगला पोचलो. आमचा असा समज होता की जहाज बन्दरात दाखल होताच, सुसज्ज इंग्रज अधिकारी आमच्यावर तुटून पडतील. जहाजाकडे त्यांच्यापैकी कुणी फिरकलं देखील नाही, असं जेव्हा आमच्या निदर्शनास आलं तेव्हा आमचा भ्रमच निरस्त झाला. समुद्रात भिरकावून दिलेली शस्त्रं आम्हाला आठवू लागली. दुसरे दिवशी आम्ही शहरात फिरण्यासाठी जेव्हा परवानगी विचारली तेव्हा आम्हाला ती नाकारण्यात आली. आमची अस्वस्थता यामुळं आणखीनच वाढली. हाँगकाँगच्या गव्हर्नरांच्या डोक्यात काय घोळत आहे, याची आम्हाला काहीच कल्पना करता येईना. तिसऱ्या दिवशी सामान-सुमानासह जहाजावरून उतरण्याची आम्हाला आज्ञा करण्यात आली. कारण "कोरिया" जहाज हाँगकाँगहूनच मागे परतणार होतं.

इकडे आम्ही आम्हाला भारी क्रांतिकारक समजत होतो. आमच्या भोळसटपणाची बरोबरच कमाल होती. प्रत्यक्ष बन्दरावर पोचण्या अगोदरच आमच्यापैकी काही जणांना हाँगकाँग बेटावरील टेकड्यांवरील सैनिकी तळांचा शोध लागला होता. त्या सैनिकांना आम्ही क्रांतिकारक आहोत व भारतात क्रांती घडवून आणण्यासाठी निघालो आहोत, ह्याची जाणीव करून दिली होती. तेथील इंग्रज अधिकाऱ्यांपर्यंत ही बातमी पोचली होती. भारतीय सैन्याच्या तुकड्या आणि तेथील अधिकारीवर्ग आमच्या स्वागतासाठी सुसज्ज होता.

मला आता हे नीट आठवत नाही की आमचा हाँगकाँग येथे किती दिवस मुक्काम पडला. मात्र, त्या सुमारास जर्मनीची एक भली मोठी पाणबुडी नौका "एमडन" हिन्दी महासागरात गस्त घालत होती आणि शेकडो ब्रिटिश जहाजं तिनं बुडवली होती, हे पक्केपणानं आठवतं. यामुळंच ब्रिटिश जहाजं हिन्दी महासागरात प्रवेश करायला भीत होती. त्याच सुमारास जपानचं "टोसामारू" नावाचं जहाज भारताकडे निघणार होतं. त्या जहाजानं कलकत्त्यापर्यंत पोंचता येईल म्हणून आम्ही कलकत्त्याची तिकिटं काढली.

हाँगकाँग मधील वास्तव्यात काही लोकांनी आम्ही तिथं बंड करून ते बेट ताब्यात घ्यावं असा सल्ला दिला परंतु हा प्रस्ताव आम्ही स्वीकारला नाही. याचं कारण स्पष्टच होतं. आम्हाला दिल्लीच्या लाल किल्ल्यावर आपला झेंडा फडकावयाचा होता. परंतु लाल किल्ल्याचा रस्ता किती वळणा-वळणाचा व बिकट आहे, याची आम्हाला कल्पना नव्हती. राजकीय खाच-खळग्यांनी तो रस्ता भरलेला होता.

आम्ही सर्वांनी जेव्हा हे बघितलं की तेथील इंग्रज अधिकारी आम्हाला कुठेच अडवत नव्हते– जहाजावरून येता-जाताना किंवा जहाजावर प्रत्यक्ष येऊन त्यांनी आम्हाला हटकलं नव्हतं, आमची तपासणीही केली नव्हती, तेव्हा आमच्यातील काही उत्साही मंडळींनी हाँगकाँग येथे चिनी बनावटीची मिळतील ती पिस्तुलं आणि रिव्हॉल्वर्सची पण खरेदी केली. आमच्या नेत्यांनी कुणालाच थोपवलं नाही.

आमचं जहाज एकदाचं निघालं आणि आम्ही सिंगापूरला येऊन पोंचलो. सिंगापूर येथील भारतीय फौजांनी आमचं शानदार स्वागत केलं. सडकेवर आम्ही मोठ्या आवाजाने इंग्रजांच्या विरोधात बोलू लागलो. एकाही इंग्रजानं आमच्या निकट येण्याचं धाडस होत नव्हतं. भारतीय सैनिकांनी आपल्या मनाशी हे पक्कं ठरवलं होतं की जर्मनांविरुद्ध युद्ध करून मरण्यापेक्षा स्वदेशासाठी लढून मरण पत्करणं अधिक चांगलं आहे. त्यामुळं सिंगापूर येथील भारतीय सेनेनं आम्हाला बंड करण्याचाच सल्ला दिला. त्यांना आम्ही हाँगकाँगमधील सैनिकांना जे उत्तर दिलं होतं– तसंच उत्तर दिलं. त्यानंतर आम्हाला असं समजलं की त्या सैन्यानं बंड केलं आणि इंग्रजांनी ६०० भारतीय सैनिकांना गोळ्या घालून ठार मारलं.

सिंगापूरहून पुढं निघून आम्ही पिनांग इथं पोंचलो. या भागात हिन्दी महासागराचा जो भाग होता तिथं जर्मन पाणबुडी एमडन विषयी खूपच भीतीचं वातावरण होतं. पिनांगच्या गव्हर्नरांनी आम्हाला रंगूनला जाण्यापासून रोखून ठेवलं. यामुळं आम्हाला तिथं बरेच दिवस थांबावं लागलं. एका बिनतारी संदेशावरून आम्हाला असं समजलं की "कोमागाटामारू" जहाजावरील प्रवाशांबरोबर इंग्रजांनी फारच रानटी व्यवहार केला. ही बातमी ऐकून आम्ही बरेच अस्वस्थ झालो.

ही बातमी समजल्यानंतर खरं म्हणजे आम्ही विचारपूर्वक वागणं आवश्यक होतं. आम्ही सर्वजण समजूतदार आणि जबाबदार कार्यकर्ते म्हणून भारताकडे निघालो होतो. तिथं योग्य तऱ्हेनं पोचण्याची तपशीलवार योजना आम्ही आखू शकलो असतो. "कोमागाटामारू" वरील प्रवाशी हे तर बिचारे संकटात सापडले होते; ते काही कुणी क्रांतिकारक नव्हते. उदरनिर्वाहासाठी ते बिचारे बाहेर पडलेले होते. त्यांच्यासारख्या निर्दोष व निरपराध प्रवाशांवर इंग्रजांनी गोळ्या झाडल्या होत्या. तेव्हा ते आमचं स्वागत कसं करतील, हे आम्हाला समजायला हवं होतं. या दिशेनं आम्ही कुठलाच विचार केला नव्हता. आम्ही केवळ स्वतःचं बलिदान करायचं आहे एवढाच निर्धार केला होता. विचार करणं आम्हाला माहीतच नव्हतं. प्राणांची बाजी लावण्याचं साहस आमच्यात होतं त्याप्रमाणात विचार करण्याचीही आमची कुवत असती तर निराळाच परिणाम घडून आला असता. पिनांग आणि रंगून येथून लपत-छपत भारतात प्रवेश करण्याची एखादी योजना आम्ही करू शकलो असतो. आम्ही या दिशेनं कुठलाच विचार केला नव्हता.

पिनांगहून आम्ही रंगूनकडे निघालो तेव्हा रात्री बाराच्या सुमारास दूर अंतरावरून आम्हाला प्रकाश दिसला. जहाजावरील जवानी खलाशी तो प्रकाश बघून भयभीत झाले. आम्हाला असं समजलं की "एमडन" ही पाणबुडी प्रखर प्रकाश टाकून आपल्या "भक्ष्या" चा शोधात आहे. आमच्या जहाजावरून तो प्रकाशझोत दिसला खरा, परंतु आमचं जहाज त्याच्या टप्प्याबाहेर होतं. आमची फार इच्छा होती की "एमडन" नौका आमच्या समीप यावी किंवा आम्ही त्या नौकेच्या नजीक जाऊन पोचावं. आमचा मूळ हेतु हा की आमची आणि त्या नौकेची जर गाठ पडली तर जर्मन लोक आमचं "टोसामारू" जहाज ताब्यात घेऊन आमची रवानगी अंदमान बेटावर करतील. तिथं पोचून आपण वीर विनायक दामोदर सावरकर यांची सुटका करू व त्यांच्यासमवेत दुसऱ्या एखाद्या किनाऱ्यावर जाऊन पोचू. परंतु आमची इच्छा जागच्या जागीच राहिली. आम्ही अंदमानला पोचू शकलो नाही.

जेव्हा आम्ही अंदमान बेटाजवळून जात होतो, तेव्हाही आमच्या मनासमोर स्वातंत्र्यवीर विनायक दामोदर सावरकर यांचंच चित्र उभं राहिलं. आमचे सर्व साथीदार अंदमान बेट दृष्टिपथात आल्याबरोबर जहाजाच्या वरच्या भागात आले. सर्वांनी अतिशय गांभीर्यानं अशी प्रतिज्ञा केली की, आम्ही त्या सर्व वीरांना सोडवून आणू– त्यांची सुटका करू शकलो नाहीत तर आम्ही स्वतः त्या प्रयत्नात प्राणार्पण करू. दुर्दैवाने सगळ्यांची ठरून आम्हाला जिवंत राहावं लागलं तर आम्हीही हर प्रयत्नानं तिथं पोचून त्यांच्या सोबतच राहू.

अखेर एकदाचे आम्ही रंगूनला येऊन पोचलो. रंगूनच्या बन्दरामधून हजारो हिन्दी सैनिकांना जर्मनीविरुद्ध लढण्यासाठी जहाजांमधून पाठविण्यात येत होतं. आम्ही प्रचंड आवाजात घोषणा दिली-- "लढण्यासाठी जाऊ नका--" त्यांनीही प्रत्युत्तर म्हणून हाँगकाँग आणि सिंगापूर येथील भारतीय सैनिकांप्रमाणेच घोषणा दिली. परंतु आम्हाला पोचायचं होतं काळ किल्ल्यावर!

गदर-पार्टीच्या नेत्यांनी माझं कार्यक्षेत्र "बर्मा" (ब्रह्मदेश) हे ठरवलं होतं. बर्माशी माझी चांगली ओळख होती. येथल्या काही सैनिकी अधिकाऱ्यांशीही माझा परिचय होता. मला बर्मी भाषा अवगत होती. माझे वडील बर्मामध्येच होते. तेथल्या बर्मी लोकांवर त्यांचा चांगला प्रभाव होता. रंगून येथे जहाजामधून उतरल्या-बरोबर वडिलांना आणि भावाला भेटण्याची मला उत्सुकता होती. तिथं काम करण्याची मला सुसंधीच प्राप्त झाली होती. या सर्व गोष्टींमुळेच माझं बर्मा हे कार्यक्षेत्र माझ्या साथीदारांनी निश्चित केलं. माझ्या काही अन्य साथीदारांनी मात्र पुढे चालण्या-संबंधी सूचना केली. याउपर असं ठरवण्यात आलं की जर बर्मा या प्रदेशात काम करायचंच असेल तर भारताची एकूण परिस्थिती लक्षात घेऊन त्यानंतरच हे निश्चित करावं.

"कोमागाटामारू" या जहाजावरील प्रवाशांशी इंग्रज राजवट ज्या पद्धतीने वागली होती त्यावरून ते अधिकारी आमचं स्वागत कसं करतील, याचं अनुमान आम्ही करू शकत होतो. तेव्हा आम्ही मृत्यूच्या दाढेत शिरत आहोत, याच भावनेनं पुढं निघालो होतो.

कलकत्ता बन्दराजवळ आमचं जहाज इशारा देऊन थांबवण्यात आलं. बन्दरावरील काही अधिकारी जहाजावर आले. सर्व प्रवाशांना जहाजाच्या छतावर उभं राहण्यास सांगण्यात आलं. जहाजावरील अधिकारी आपण डॉक्टर्स आहोत व कुणाला भयंकर स्वरूपाचा काही आजार आहे का, हे आपण तपासत आहोत असं त्यांनी भासविलं. आम्ही रांगेत उभे होतो आणि अधिकारी आमचे कपडे व शरीर काळजीपूर्वक तपासत होते. आम्ही कुठं हत्यारं तर लपवली नाहीत ना, ह्याचा त्यांना तपास करायचा होता.

आमच्या साथीदारांनी जी पिस्तुलं हाँगकाँगला खरेदी केली होती, ती सगळी पिस्तुलं त्यांनी पंडित जगतराम यांच्याकडे कलकत्त्याला पोचण्याअगोदरच देऊन टाकली होती. त्यांनी सर्व शस्त्रं एका पेटीत बंद करून ती पेटी मोठ्या शिताफीनं "तोसामारु" जहाजावरील बंगाली डॉक्टराच्या खोलीत ठेवून दिली होती.

१९ ऑक्टोबर १९१४ रोजी जेव्हा आमचं जहाज जेटी बन्दरावर पोचलं आणि जहाजाच्या छतावर जाऊन आम्ही जेव्हा खाली बघितलं तेव्हा जहाजाच्या दोन्ही बाजूस इंग्रज आणि गुरखा सैनिक बन्दुकी घेऊन उभे आहेत, असं आढळलं. हे दृश्य बघताच-- ज्या प्रकाराची आम्हाला सतत शंका येत होती, ते मकं तसंच घडलं होतं.

जहाजावर शेकडो भारतीय प्रवासी होते, ज्यांचे चेहरे-मोहरे, शरीरयष्टी, उंची वगैरे आमच्याप्रमाणेच होती. आमच्यापैकी अनेक ज्यांची स्थिती देवीला अर्पण केल्या जाणाऱ्या बोकडांप्रमाणे होती. डोळ्यात भूक होती आणि चेहऱ्यावर जीवनाची झळाळी होती. आम्ही सर्वजण अमेरिकन पोषाखात होतो. इंग्रज पोलीस अधिकाऱ्यांनी निवडून निवडून आम्हाला बाजूला काढलं. आमच्यापैकी केवळ एकालाच जरा पुढचा विचार करता आला. त्यानं आपले उंची कपडे एका अन्य प्रवाशाला देऊन त्याचे मळके कपडे आपल्या अंगावर चढवले व तो त्यांच्यात जाऊन उभा राहिला. हा माणूस होता पंडित जगतराम भारद्वाज. पंडित जगतराम जहाजावरून उतरायला आता मोकळे होते. एवढ्यात त्यांच्या मनात विचार आला– आपण शस्त्रांची पेटी डॉक्टरांच्या केबिनमध्ये ठेवली आहे– ती तिथंच टाकून देऊन कसं काय निभायचं ? अशा नाजूक परिस्थितीत डॉक्टरांच्या खोलीत जाऊन पेटी आणणं हे काम अत्यंत धाडसाचं होतं. हे काम प्राणाशी खेळण्यासारखं होतं. पंडित जगतरामांनी मनोमन काही तरी निश्चय केला आणि ते तडक डॉक्टरच्या खोलीत शिरले. पेटी उचलून ते बाहेर येतात तोच पुढ्यात डॉक्टरच दत्त म्हणून उभे राहिले. तो पंडित जगतरामांना ओळखत होता– आमचा इतका दिवसांचा सहवास होता. परंतु मळक्या कपड्यामुळे डॉक्टरने त्यांना ओळखलं नाही. डॉक्टरांनी त्यांना दरडावून विचारलं– 'कोण आहात तुम्ही ? ही पेटी कुणाची आहे ? " हे ऐकल्याबरोबर पंडित जगतराम यांनी पेटी तिथंच टाकून तेथून पळ काढला. डॉक्टर खाली वाकून पेटी उचलू लागताच, पंडितजी दुसऱ्या प्रवाशांच्या गर्दीत शिरले आणि त्यांच्यासमवेत जहाजावरून खाली उतरले.

जहाज ज्या ठिकाणी थांबलं होतं तेथून जवळच रेल्वे उभी होती. गाडीच्या डब्यांत आम्हाला डांबण्यात आलं. इंग्रज सरकारच्या सेवेतील गुरखा सैनिक पहाऱ्यावर होते. इंग्रजांच्या बागगुलाने आमच्या हृदयात द्वेषाग्नीचा डोंब उसळला होता. आम्ही तोंड बंद ठेवून एकमेकांकडे बघत बसलो. प्रत्येकाचा चेहरा निराशेनं आणि दुःखानं काळवंडून गेला होता. राहून राहून एकच विचार आमच्या मनात येत होता– आम्हाला पोचायचं कुठं होतं आणि आलो कुठं ? सर्वांनीच आपली जीवन नौका वादळी समुद्रात सोडून दिली होती– विचार करण्यास, तर्क लढवण्यास मुळीच अवसर राहिलेला नव्हता. मनातल्या मनात काव्यपंक्ती आठवत होत्या—

किश्तिए हयात है यह बहरे फानीपर रवां ।
जिस तरफ बोह् जा लगी वही किनारा हो गया ॥

तिथं किनारा कुठं होता ? आमची स्थिती तर जाळ्यात अडकलेल्या पक्ष्यांसारखी होती. पंखांची फडफड करण्यापलीकडे आम्ही काहीच करू शकत नव्हतो. जगू तर स्वतंत्र होऊनच, हाच आमच्या अंतरात्म्याचा आवाज होता. हे झालं नाही तर मग

या नंतर शरीराची राख बनवून परत पुनर्जन्म व्हावा– असंच आम्हाला वाटत होतं. काही तासांच्या नंतर या सर्वच गोष्टींचा आम्हाला विसर पडला व आम्ही एकमेकांची चेष्टा करत हसू–खिदळू लागलो.

ज्या कंपार्टमेंटमध्ये मला चढवण्यात आलं होतं तिथं गदर पार्टीचा दुसरा कुणीही कार्यकर्ता नव्हता. ब्रिटिश सरकारचे सी. आय. डी. अधिकारी डब्या-डब्यातून चक्कर टाकून आपली शिकार शोधत होते. काही डब्यातून शिवी-गाळीसहित त्यांचं स्वागत व्हायचं. मी मात्र तिथं नव्हतो. त्याच डब्यात मग त्यांच्या चार-पाच चकरा व्हायच्या. बोलण्याच्या ओघातच ते त्यांना हवी ती माहिती काढून घेत होते. माझ्या डब्यात जे अन्य साथीदार होते, ते शांत स्वभावाचे होते. त्यांच्याकडे कुणी विचारपूस केली म्हणजे ते शांतपणे उत्तर देत. मला त्यांनी एकही प्रश्न विचारला नाही. माझ्या सुटा-बुटानं त्यांच्यावर काय परिणाम झाला, कुणास माहीत ? त्यांनी सर्वांची नावं लिहून घेतली. माझं नाव मात्र त्यांनी लिहून घेतलं नाही. त्यांना जी शिकार हवी होती, ती त्यांना सापडली आहे, हे मी ओळखलं.

मोगलसराय जंक्शनवर आमची गाडी पाणी व कोळसा घेण्यासाठी थांबली. प्लॅट-फॉर्मवर मी सहजच दृष्टी टाकली तेव्हा धोतर, सदरा व पगडी असा पोषाख केलेले पंडित जगतराम इकडे तिकडे फिरताना दिसले. कलकत्त्याहून मोठ्या शिताफीने ते निसटले होते व इथवर येऊन पोचले होते. बघताक्षणीच मी पंडितजींना ओळखलं. त्यांच्या चेहऱ्यावर धीर-गंभीर हास्य होतं. सर्वच डब्यांवरून त्यांनी अनेक चकरा मारल्या होत्या. सर्वांनी आपणास बघावं हा त्यांचा हेतु होता. सैनिकी शिपायांना त्यांचा मुळीच संशय आला नाही. पंडित जगतराम यांना त्याच प्लॅटफॉर्मवर सोडून आम्ही पुढं निघालो.

आमची गाडी यानंतर रायविंड स्टेशनावर थांबली. सायंकाळची वेळ होती. प्लॅटफॉर्मवर खूपच गर्दी होती. काही प्रवासी छाती पुढे काढून ऐटीत उभे होते. इतक्यात सैनिकी अधिकाऱ्यांच्या डब्याचं दार उघडलं. एक अधिकारी हातात यादी घेऊन खाली उतरला. त्यानं ज्यांची नावं पुकारली त्यांनाच खाली उतरण्याची परवानगी होती. मी एका दुसऱ्याच नावावर डब्याखाली आलो.

डोळ्याची पापणी लवायच्या आत मी तिथल्या गर्दीत घुसून मिसळलो आणि लगबगीनं प्लॅटफॉर्मच्या बाहेर आलो. माझ्या ज्या अन्य साथीदारांना उतरण्याची परवानगी मिळाली होती, ते तुकडा करून बाजारातून फिरत होते. गाडीतून बाहेर पडल्यानंतर मीही त्यांच्या घोळक्यात सामील झालो. एकदाचा मासा जाळ्याबाहेर निसटला होता. आम्ही सर्वजण लाहोरच्या दिशेनं निघालो. यानंतर कुठं, केव्हा आणि कशासाठी भेटायचं हे सर्व ठरवून आम्ही आपापल्या स्थळाकडे निघालो.

## क्रांतिकारी जीवनाचा प्रारंभ

मी गंभीरपणानं विचार करू लागलो. आपण पुढं कसं जायचं? आपण काय करावं आणि आपल्या मनातील गुप्त गोष्ट कुणाला सांगावी? ज्यांच्याशी विचार-विनिमय करून एखादी योजना आखली असती— त्या जोडीदारांचा शोध मुख्य होता. विचार केला, आता जो कुणी आपल्या मार्गात मदतीला धावून येईल, त्याला बरोबर घ्यायचं. तोच आपला येथून पुढचा साथीदार.

माझं वय पंचवीस वर्षांचं होतं. प्रत्येक कृतीतून अजूनही पोरकटपणा डोकावत होता. दोनच प्रकारचे लोक माझ्या परिचयाचे होते. नातेवाईक आणि माझे शाळा सोबती. पैकी नातेवाईकांशी मनातल्या गोष्टी बोलण्यात अर्थ नव्हता आणि शाळेतले मित्र इकडे तिकडे पांगले होते.

मी आमच्या लालडू येथील घराकडे निघालो. तिथं जाऊन सर्व नातेवाईकांची जोमतल्या मंडळींची भेट घेतली. नात्यातल्या लोकांशी बोलू लागलो म्हणजे ते मला अनेकांची उदाहरणं देऊन माझ्या विचारापासून मला परावृत्त करण्याचा प्रयत्न करत. तरुण्या-ताठ्या लोकांशी बोलू लागलो की, परत स्फूर्तीचा संचार होई. मोठ्या मंडळींना, "हे काही पोरा-सोरांचं काम नाही"— असंच वाटायचं. ते म्हणायचे अशी कामं पोक्त माणसानं करू द्यावी. त्यांचं ऐकून घेतल्यानंतर माझं मन व्याकूळ व्हायचं.

लाहोरला एकमेकांचे निरोप घेताना आम्ही परत भेटायचं ठरवलंच होतं. त्यानुसार मी पुन्हा लाहोरला गेलो. सर्वांनी मिळून असं ठरवलं की कार्यकर्त्यांची एक बैठक लाडोवाल स्टेशनाशेजारी घ्यायची. लाडोवाल हे स्टेशन लुधियानाजवळ आहे. ही गोष्ट नोव्हेंबर १९१४ मधली आहे. या बैठकीला बाबा निधानसिंह, बाबा चंदासिंह, सरदार करतारसिंह सराबा, पंडित जगतराम, अमरसिंह व अन्य काही जण उपस्थित होते.

तीन महत्त्वपूर्ण विषयांवर आम्ही चर्चा केली. पैसा कसा उभारावा? शस्त्रास्त्रं कशा तऱ्हेनं जमवावी? बंगालमधील क्रांतिकारकांशी कशा तऱ्हेनं संबंध प्रस्थापित करावे?

पैसा जमा करण्यासंबंधी खूप उत्साहानं चर्चा करण्यात आली. निर्णय असा झाला की पैसे तर घरोघर जाऊन मागता येणार नाहीत. असं केलं तर गोष्टी गुप्त राहणार नाहीत. करतारसिंहानं सूचना केली की दरोडे घालून पैसा उभा करावा. भाई निधानसिंह गंभीर प्रकृतीचे गृहस्थ होते. ते म्हणाले "दरोडे घालण्यानं अधिकच नुकसान होण्याची शक्यता आहे." त्यांनी आम्हाला या विचारापासून परावृत्त केलं. बैठकीमध्ये बाबा निधानसिंहांचं म्हणणं सर्वांनी मान्य केलं. मात्र प्रत्यक्षात तसं वागणं जमलं नाही. लूटमारीचा अवलंब करण्यात आला आणि त्यामुळं चळवळीचं बरंच नुकसानही झालं.

हत्यारं जमा करण्याचं आणि बंगाल मधील क्रांतिकारकांशी संपर्क प्रस्थापित करण्याचं काम माझ्यावर सोपवण्यात आलं. मी त्यासाठी बाहेर पडलो खरा, परंतु माझी कामगिरी सफल झाली नाही. परत एकवेळ प्रयत्न करण्याची मला संधीच मिळाली नाही.

कलकत्त्यापासून पेशावरपर्यंत सर्वत्र मोठ-मोठ्या पुलांवर सैनिकी पहारे बसवण्यात आले होते. हे पहारे राजपूत रेजिमेण्ट क्रमांक ७ कडे सोपवले होते. त्या रेजिमेण्ट मधील काही जण माझ्या ओळखीचे होते. सैन्याचं दळण-वळण, सैन्याचीच मदत घेऊन थांबविण्यात यावं, असा मला आदेश होता. त्यांच्या मदतीनं पूल उडवून टाकावे असं ठरविण्यात आलं. मी काही सैनिकांची या संदर्भात भेट घेतली. त्यांच्यापैकी अनेकांनी या संबंधी सहमती दर्शविली. परंतु तशी वेळ कधी आलीच नाही.

माझे एक जुने वर्गमित्र हंसराज चौधरी, जि. अम्बाला हे सहारनपूर रेल्वे कार्यालयात काम करत होते. त्यांची भेट घेऊन त्यांना मी कामाचं स्वरूप समजावून सांगितलं. त्यांनी मला साहाय्य करण्याचं मान्य केलं. त्यांनी आपल्या नातेवाईकांशी आणि मित्रांशीही माझी ओळख करून दिली. सहारनपूर जवळच्या गावातील काही जहागिरदारांनाही मी जाऊन भेटलो. त्यांच्यापैकी अनेकजण असे होते ज्यांच्या पूर्वजांनी १८५७ च्या स्वातंत्र्यसंग्रामात भाग घेतलेला होता. काही लोकांनी इंग्रजांची कुकर्मं आपल्या डोळ्यांनी बघितली होती. ते घाव अजूनही त्यांच्या मनात ताजे होते. मोठ्या आस्थेनं त्यांनी मला हरप्रकारे मदत करण्याचं आश्वासन दिलं. त्यांच्यापैकी राव बाजसिंह पौकीवाले, जि. सहारनपूर यांचं नाव विशेष उल्लेखनीय आहे. ते सर्वच जण मोठ्या अभिमानानं इंग्रजांचा बदला घेण्यासाठी उत्सुक होते. परंतु त्यांची मदत घेण्यासाठी मला परत त्यांच्याकडे जाण्याचा योग आला नाही.

जिथं जिथं माझे वर्गमित्र आता कॉलेजात शिकत होते, मी त्या सर्वांची भेट घेतली सनातन धर्म कॉलेज, दयालसिंह कॉलेज, डी. ए. वी. कॉलेज– या कॉलेजातील काही विद्यार्थ्यांशी आम्ही संबंध प्रस्थापित केले होते.

लाहोरमध्ये भाई परमानंद यांचं औषधालय हा आमचा एक मोठा अड्डा होता. भाई परमानंदजी व्यक्तिशः कुठल्याही क्रांतिकार्यात सहभागी झाले नव्हते परंतु त्यांना आमच्या कार्याविषयी खूप सहानुभूती होती.

पंडित जगतराम यांची सीमा भागात जाऊन कार्य करण्यासाठी रवानगी करण्यात आली. एकानं विश्वासघातानं त्यांना पकडून दिलं.

की हिन्दुस्थानात येऊन पोचल्याची खबर पंजाबच्या पोलिसांना देण्यात आली होती. माझा चहूकडे शोध घेणं जारी होतं. सरकारनं या कामासाठी अम्बाला-लाल्डू मार्गावर शिपायांची नियुक्ती केली होती. पोलिसांना हे समजलं होतं की माझं वास्तव्य अम्बाला भागात असतं. अम्बाला शहरात मी शेकडो तरुणांची गाठ घेतली होती. त्यांतल्या कुणीही पोलिसांना मदत केली नाही. मला पकडण्यासाठी ब्रिटिश राजवट मोठ्या कौशल्यानं जाळं पसरू लागली.

## राजपूत हॉस्टेलमधली घटना

७ डिसेंबर १९१४ रोजी रात्रीच्या वेळी मी काही जातभाईंना भेटण्यासाठी राजपूत हॉस्टेलवर गेलो. रात्रभर तिथंच मुक्काम केला. राजपुतांचे एक मान्यवर नेते सरदार लहनासिंह हेही त्या रात्री तिथंच थांबलेले होते. विद्यार्थ्यांनी त्यांना जाऊन सांगितलं की पृथ्वीसिंह आज इथंच आहेत. ऐकताक्षणीच ते मला भेटायला आले. आमच्या खूप गप्पा झाल्या. मात्र मी त्यांना माझ्या मनातील गुपितं सांगितली नाहीत. इंग्रजी सत्तेशी ते एकनिष्ठ आहेत, हे मला ठाऊक होतं. या निष्ठेमुळंच त्यांना "सरदार" हा किताब देण्यात आला होता. दुसऱ्या दिवशीही आमचं काही जुजबी संभाषण झालं. "आपण पुन्हा भेटू" असं म्हणून ते बाहेर पडले. काही कामा-निमित्त त्यांना तेथील पोलिस-अधिकाऱ्यांना भेटायचं होतं. त्या अधिकाऱ्यानं बोलण्याच्या ओघात माझा नामोल्लेख करून तो त्यांना म्हणाला– "तुमच्या जातीतील एका तरुणानं तुमच्या जातीला काळिमा फासला आहे– त्याचं नाव आहे पृथ्वीसिंह. तो लालडूचा राहणारा आहे. इंग्रजी सत्ता उखडून टाकण्यासाठी तो अमेरिकेतून पंजाबमध्ये आलेला आहे. त्यानं आपलं नाव बदललं आहे. मोठ्या धूमधडाक्यात त्याचं काम चाललं आहे. तो आमच्या हाती सापडत नाही. आपण काही मदत करा ना ?" हे ऐकताच सरदारसाहेबांच्या तोंडाला पाणी सुटलं. ते म्हणाले– "आपण जरा आधी मला बोलला असता तर किती बरं झालं असतं. मी त्याला आता तुमच्या स्वाधीन करतो. थोड्या वेळापूर्वी तर तो राजपूत हॉस्टेलमध्ये होता. मी परत जाईपर्यंत तो कुठं जाणार नाही. आपण पोलीस पाठवून त्याला पकडा." जवळच पोलिस इन्स्पेक्टर सरदार अमरसिंह उभा होता. त्याला हुकूम मिळाला– "तुम्ही जाऊन पृथ्वीसिंहशी बोलत बसा. पोलिस पार्टी तिथं लगेचच पोचेल."

मी शांत मनानं वर्तमानपत्र वाचत बसलो होतो. अचानकच मजबूत बांध्याचा एक शीख तरुण साध्या वेषात माझ्या जवळ आला. मला उद्देशून तो विचारू लागला– "शीख मुलांचं वसतिगृह हेच आहे काय ?" मी म्हणालो– "नाही." माझं उत्तर ऐकूनही तो तिथंच थांबला. वर्तमानपत्रावरून दृष्टी काढून मी जेव्हा त्याच्याकडे बारकाईनं पाहिलं तेव्हा त्याचा-माझा परिचय आहे, असं मला वाटलं. कुणी तरी आपला

मित्र भेटायला आला आहे, असा माझा समज झाला. मी त्याच्याकडे हसत हसत बघून विचारलं– "काहो, आणखी काही तुम्हाला विचारायचं आहे?" माझा हा प्रश्न ऐकून, शिकार आता आपल्या हातात आली आहे, याची त्याला खात्री पटली. नम्र भाव चेहऱ्यावर आणून तो मला म्हणाला– " मोठ्या लाचारीच्या परिस्थितीत मी तुमच्यापुढं येऊन उभा आहे. माझा धाकटा भाऊ क्रांतिकारकांच्या टोळीत अडकला आहे. मी असं ऐकलं आहे की तो शोध वसतिगृहात लपून-छपून राहतो. आपण माझ्याबरोबर तिथपर्यंत चला व माझी मदत करा." मी जे अनुमान केलं होतं ते बरोबरच होतं. मी त्याला म्हटलं– "आत खोलीत चला. मग आपण बोलू." मित्रत्वाच्या भावनेनं मी त्याला खोलीत घेऊन गेलो. खाटेवर त्याला बसवून मीही त्याच्या जवळच बसलो. एवढ्यातच माझे आणखी एक परिचित राजाद्पूरचे श्री. काहनसिंह तिथं येऊन धडकले. त्या पोलीस तरुणाला बघताच ते म्हणाले– "अहो! हा तर पोलिस शिपाई आहे". एवढं बोलून ते कसेबसे खोलीतून बाहेर निसटले. आता मला त्याच्यावर हल्ला करणं भाग होतं. मध्येच तो मित्र आल्यामुळे चढाई करण्याची संधी त्या पोलिसाला मिळाली. तो पोलिसवाला सर्व तयारीनिशी आला होता. त्यानं त्वरित हालचाल करून खिशातून रिव्हॉल्वर काढलं आणि माझ्यावर रोखलं. आम्ही दोघं एकमेकांच्या इतके निकट होतो की त्याला चाप ओढण्यासाठी अंतरच नव्हतं. आमच्यात थोडं जरी अंतर असतं तर त्यानं चाप ओढून मला गोळी घातली असती. त्यानं रिव्हॉल्वर काढल्याबरोबर मीही चपळाईनं त्याची नळी पकडून ठेवली आणि त्याचा हात खालच्या बाजूस दाबून ठेवला. तरुण मंडळींनी अमेरिकेतील लुटारूंचे चित्रपट बघितले असतील. त्या चित्रपटाप्रमाणेच काही काळ आमची झटापट चालली. आपल्या शक्तीच्या बळावर तो मला पुढ्यात उभा करून माझ्यावर गोळी झाडू इच्छित होता आणि मी त्याच्या पाठीमागे जाऊन त्याला पकडून त्याचं रिव्हॉल्वर हिसकावून घ्यायचा प्रयत्न करू लागलो. एक जोराचा हिसडा देऊन मी त्याच्या हातातून रिव्हॉल्वर हिसकावून घेतलं व आम्ही एकमेकांपासून दूर फेकले गेलो. मी परत त्याच्यावर उडी घेऊन त्याचे केस हातात पकडले. रिव्हॉल्वर मी दूर भिरकावलं. मी त्याच्यावर गोळी झाडू इच्छित नव्हतो, कुणाही भारतीयाचा वध करणं हे आमच्या संघटनेच्या धोरणात बसत नव्हतं. मी त्याच्या केसांना पकडून त्याला खोलीत कोंडून खोलीचं दार बंद करायच्या विचारात होतो. त्याचे दोन्ही हात मोकळे होते. मोठ्या चलाखीनं त्यानं माझ्यावर चाकूचा वार करण्याचा प्रयत्न केला. मी त्याचे केस सोडून दिले. केस सोडले नसते तर त्यानं चाकू माझ्या पोटात खुपसला असता. सरदार अमरसिंह एक सशक्त युवक होता. केस सोडून दिल्याबरोबर तो चाकूच्या साहाय्यानं माझ्यावर चाल करून आला. माझ्या मानेवर दोन्ही बाजूंनी त्यानं वार केले. त्यातला एक घाव चांगलाच मोठा होता. आणखी सूतभर जर तो खोल घुसला असता तर मला मृत्यूच आला असता.

अमरसिंहाच्या त्या घावांचे व्रण आजही माझ्या मानेवर आहेत. त्यानं माझ्यावर तिसरा वार केला तेव्हा तो मी हातावर घेतला. सुऱ्याचे वार जे तो खेळ खेळलेले असतात, त्यांनाच चुकवता येतात. माझ्या मानेवरील दोन्ही जखमांतून रक्ताच्या चिळकांड्या उडत होत्या. सावधानता बाळगून काम करण्याची मला सवयच नव्हती. मी त्याचा चाकू हिरावून घेतला व तोही दूर भिरकावून दिला आणि जखमी वाघा-प्रमाणं मी परत माझ्या शत्रूवर तुटून पडलो. त्याला एकदा भिंतीवर आदळलं, एकदा खाली जमिनीवर. त्याच्या तोंडातून एकच वाक्य बाहेर येत होतं– "मला असं मारू नका. मला ठार करा". मी उसळी घेऊन त्याच्या छातीवर बसलो. त्याचा गळा दाबून त्याला ठार करण्याचा विचार एकतेळ मनात येऊन गेला. त्याच्या गळ्यापर्यंत मी हात नेला देखील. परंतु माझा खूप रक्तस्राव झाल्यामुळं गळा दाबण्या इतकं बळ माझ्या हातात राहिलं नव्हतं. इतका वेळ मी शुद्धीवर होतो परंतु यानंतर मात्र मी बेशुद्ध झालो. त्यानंतर पोलीस केव्हा आले, त्यांनी आम्हाला दोघांनाही हॉस्पिटलमध्ये केव्हा नेलं, हे समजलंच नाही. पोलिसांच्या म्हणण्यानुसार आम्ही दोघेही बेशुद्धावस्थेत होतो. मी अमरसिंहाच्या छातीवर पडलेला होतो. सरदार अमरसिंहा-च्या चेहऱ्याचा एक भाग झाडाची साल निघावी त्याप्रमाणं आरपार निघाला होता. त्याचा एक कान देखील जायबंदी झाला होता. आम्हाला दोघांनाही ऑपरेशन टेबलवर नेण्यात आलं. माझ्या जखमांतून रक्त येत होतं तिथं पट्टी लावण्यात आली. सिविल सर्जन त्यानंतर अमरसिंहाचा इलाज करू लागले. एका बंडखोराची काळजी घेण्यापेक्षा शासनाचा एक कनिष्ठ नोकर हा त्यांना अधिक महत्त्वाचा होता. त्याला वाचवणं हे त्याचं आद्य कर्तव्य होतं. सिव्हिल सर्जन एक इंग्रज होता.

मला ऑपरेशन टेबलावर घेतल्यानंतर त्या इंग्रज हलकटानं माझ्याकडे बघून एक शिवी हासडली. त्यानं शिवी दिल्यामुळे त्याला मी अभिवादन करणं अशक्यच होतं. अमेरिकेत एक शिवी नेहमी सर्वांच्या तोंडी असे–(Son of a bitch) कुत्र्याची अवलाद). मी शिवीला प्रति-शिवीनं उत्तर दिलं. माझ्या आजुबाजूला जे भारतीय उभे होते, त्यांच्यासाठी शिवीचा हिंदीमध्येही अनुवाद केला! तो इंग्रज भारतात आल्यापासून त्याला पहिल्यांदाच शिवी मिळाली होती. यामुळं तो अगदी निरुत्तर झाला व उसळून आलेला संताप त्यानं कसाबसा गिळून टाकला. जवळच जिल्हाप्रमुख आणि पोलीस अधीक्षक उभे होते. तो सर्जन गावातील एखादा चांभार जुनी-पुराणी पादत्राणं शिवतो तितक्याच बेदरकारपणे तो माझ्या जखमांना टाके घालू लागला. ८ डिसेंबर १९१४ रोजी सायंकाळी ४ वाजता ही घटना घडली होती. स्थळ होतं सिव्हिल हॉस्पिटल. ते हॉस्पिटल आजही आहे. अम्बाल्यात इथं आजही त्या सडकेवरून जाताना ते हॉस्पिटल व तिथलं वसतिगृह बघताच या आठवणी मनात जाग्या होतात.

या घटनेची बातमी सर्वत्र आगीसारखी पसरली. दुकानं बन्द करण्यात आली. शहराची नाकेबन्दी करण्यात आली. शाळा-कॉलेजं बन्द झाली. तेथून सात मैलांच्या अंतरावर माझं गाव होतं. आजूबाजूस राजपूत वस्तीची गावं होती. या सर्व गोष्टी लक्षात घेऊन पोलिसांनी योग्य तो बन्दोबस्त केला. एवढा बन्दोबस्त करूनही सबंध रात्र मला हॉस्पिटलमध्ये ठेवणं पोलिसांना जोखिमेचं वाटत होतं. त्यामुळे रात्री १२ वाजता २० पोलिसांच्या पहाऱ्यात मला खाटेसकट उचलून तुरुंगाच्या चार भिंतीत कैद करून ठेवण्यात आलं.

तुरुंगात मला एका "काळ-कोठडीत" डांबण्यात आलं. बाहेरून दार बन्द करून माझ्यावर पहारा बसवण्यात आला. सकाळ झाल्यानंतर वरच्या झरोक्यातून सूर्याची किरणं कोठडीत पडली. जाग आल्यावर माझं ते विनभाड्याचं निवासस्थान मी बघितलं. आता माझं आयुष्यच तिथं जाणार होतं. खोलीची उंची १६ फूट, लांबी १२ फूट आणि रुंदी ८ फूट होती. एका कोपऱ्यात मातीचा ढीग पडलेला होता. पाणी पिण्यासाठी एक भांडं आणि लघवीसाठी दुसरं भांडं ठेवण्यात आलं होतं. ती भांडी मातीचीच होती व दिसायला सारखीच होती. माझा हा नूतन संसार बघून मला हसू आलं. सर्व प्रकारच्या हालअपेष्टा सहन करायला मी तयारच होतो· सूर्य थोडा वर आल्यावर एक काळा-कभिन्न जाडजूड माणूस माझ्या कोठडीत आला· त्याच्या हातात झाडू होता. दिसायला तो माणूस भारीच भयंकर होता. लहानपणी मी कहाणी ऐकली होती की पोलीस चोरांना पकडून नेतात आणि त्यांना तुरुंगात बन्द करतात. मी कहाणी सांगणाऱ्या आजीला प्रश्न विचारी की पोलीस चोरांना पकडत का नाहीत? तेव्हा आजी म्हणायची की चोर फार काळे-कुळकुळीत असतात– अंधाराप्रमाणं. म्हणून तर अंधारात ते कुणाला दिसत सुद्धा नाहीत. मी जेव्हा त्या चोराला बघितलं तेव्हा आजीच्या म्हणण्यातली सत्यता मला पटली.

ज्या सर्जननं माझ्या जखमांना टाके घातले होते तो तुरुंगाचाही डॉक्टर होता. तो माझी प्रकृती बघण्यासाठी आला आणि प्रकृती तपासून गुपचूप निघून गेला. माझी शिवी तो अजून विसरला नव्हता हे त्याच्या चेहऱ्यावरून स्पष्ट होत होतं.

थंडीचे दिवस होते. झरोक्यातून येणाऱ्या प्रकाशामुळं सायंकाळची वेळ आहे हे समजत होतं. शेजारच्या कोठडीतून दोन प्रकारचे आवाज येत होते. कुणाला तरी जोर-जोरात धमकावण्याचा, शिवी-गाळीचा आणि कुणाच्या तरी रडण्याचा, असे ते आवाज होते.

दुसऱ्या दिवशी सकाळी जेलमधल्या शिपायानं एका माणसाला पकडून माझ्या समोर आणलं. तो माझा सहाध्यायी होता. हॉस्पिटलमध्ये जखमी अवस्थेत मी दाखल झालो असताना तो माझ्यासाठी काही फळं घेऊन मला भेटायला आला होता. पोलिसांनी तो माझा साथीदार असून बंडात सामील आहे, असा त्याच्यावर आरोप

ठेवला होता. तो म्हणत होता की आपण मित्र आहोत व ते कबूल करायलाही तयार आहोत परंतु पोलिसांना मात्र तसं लिहून द्यायला तयार नाही आहोत. तसं कबूल केलं तर ते माझा सर्वनाश करतील. त्याच्या मते पोलिस अधिकारी मिस्टर गोल्डन फारच भयंकर होता. आपलं काही चालण्यासारखं असतं तर मी त्याला ठार केलं असतं. एवढं बोलणं झाल्यानंतर त्याला माझ्या खोलीतून बाहेर नेण्यात आलं आणि दुसऱ्या कोठडीत डांबण्यात आलं. सकाळ-संध्याकाळ शिव्या, धमक्या आणि रडण्या-ओरडण्याचे आवाज ऐकून मला एखाद्या नरकात येऊन पडल्यासारखं वाटत होतं.

ज्या रात्री मला तुरुंगात आणण्यात आलं त्या रात्री तुरुंगात कुणाला झोप आली नाही. सगळी घटना त्यांना समजली होती. दुकानं, शाळा-कॉलेजं बन्द ठेवण्यात आल्यामुळं आणि शहराची संपूर्ण नाकेबंदी केल्यामुळं त्यांना असं वाटत होतं की सर्व लोक बंड करून उठणार. तुरुंगावरही हल्ला होईल आणि आपली सुटका होईल. त्यांना याची कुठून कल्पना असणार की ज्याच्यामुळं हे सर्व घडलं होतं तो आता त्यांच्याप्रमाणेच इथं खितपत पडला आहे.

जेलमधले भंगी, पाणीवाले आणि स्वयंपाकी एव्हाना माझे चांगले मित्र बनले होते. या सर्व लोकांमुळं तुरुंगाच्या आवारातील सर्व बातम्या माझ्या कानांवर पडत. तुरुंगातील शिपायांना सक्त हुकूम होता की कुणीही मला भेटू नये किंवा बाहेरच्या जगातील बातम्याही माझ्यापर्यंत पोचू नयेत— माझ्या संबंधीच्या बातम्याही बाहेर कुणाला समजू नयेत. शिपाई मोठ्या निष्ठेनं आपलं कर्तव्य बजावत होते. काम हवं-नको एवढ्या पुरताच माझा कुणाशीतरी संबंध येत होता. एरव्ही कुणीही माझ्याकडे फिरकत सुद्धा नव्हतं.

एके दिवशी परत रडा-रडीचे आवाज कानावर आले. मला समजलं की पोलिसांनी श्री. काहनसिंह यांना पकडून आणलेलं आहे. मला पकडण्यासाठी ते आले असताना तो तिथून पळून गेला होता परंतु सरदार अमरसिंहाच्या सांगण्यावरून त्याला पकडण्यात आलं होतं. पोलिसांनी त्याला खूप भूलथापा मारण्याचा प्रयत्न केला. तो काहीच बोलेना, गेला तेव्हा त्यानं अमरसिंहाचं पाकिट मारून तो तिथून पळाला, असा त्याच्यावर आरोप ठेवून त्याला तिथं आणलं. तो माझा एक जुना शाळासोबती होता आणि माझ्याबद्दल प्रेम असलेला मित्रही होता. तो पूर्णपणे निरपराधी होता, हे सत्य होतं.

एक हलकट पोलिस अधिकारीच आपल्या वरिष्ठांच्या इच्छेनुसार, एखाद्या निरपराध माणसाला पकडून त्याचं जीवन उद्ध्वस्त करण्याचं नीच कृत्य करू शकत होता. मला त्या मित्राबद्दल खूप दया वाटे. पोलिसांनी पहिल्यांदा ज्याला पकडून आणलं त्याचं नाव अमरनाथ असं होतं. तो खूप चालाख होता. तुरुंगातील अडचणींनी मलाही विचार करायला प्रवृत्त केलं. तिथं आता कुणी साथी-संगती

नव्हता. कुणाशी चर्चा करण्याची संधी नव्हती. वाचायला पुस्तकं नव्हती लिहिण्यासाठी कागद-पेन्सिल देखील मिळू शकत नव्हती. मनातल्या मनात विचार करून त्यातच डुबक्या मारणं, एवढंच शक्य होतं. विचारसागरात पोहण्याचा मला चांगला सराव झाला. विचारामुळंच बुद्धीवरची झापडं बाजूस होतात. माझ्या बुद्धीवरली झापडं हळूहळू दूर होऊ लागली. माझी आणि चतुर लाला अमरनाथची मैत्री वाढू लागली. त्याला पोलिस अधिकाऱ्याचा खून करायचा होता व त्यासाठी तो माझी मदत मागत होता. मी त्याला कुठूनतरी पिस्तूल मिळवून द्यावं, अशी त्याची मागणी होती. मी त्याला बॉम्ब बनवण्याची कला शिकवावी, असाही त्याचा आग्रह होता. यासाठी तो अतिशय उत्सुक होता. एके दिवशी तो म्हणाला– 'सरकारला मला सोडून द्यावंच लागेल– कारण मी कुठलाच गुन्हा केलेला नाही. त्यांना काहीच पुरावा सापडला नाही". मी काही त्याच्याविरुद्ध पोलिसांना सांगणार नाही. सुटका झाल्यावर पोलिस अधिकाऱ्याला आपण ठार मारणार असंही तो म्हणायचा. पिस्तूल मी मिळवून देऊ शकलो नाही तरी चालेल, बॉम्ब बनविण्याची कला मात्र मी त्याला शिकवावी, असा त्याचा आग्रह होता.

मी त्याचं हे म्हणणं ऐकून न ऐकल्यासारखा करी. तो मग आपणही प्रश्न विचारी तुम्ही सर्वजण अमेरिकेतून इथं क्रांती करण्यासाठी आलात परंतु क्रांती तर झालीच नाही. पंडित भगतराम म्हणून कुणीतरी भेटले होते, ते तर म्हणत होते की दोन महिन्यांच्या आत क्रांती होईल. परंतु काहीच घडलं नाही. त्याचं हे बोलणं ऐकून मी जरा आश्चर्यचकित झालो. मला विचार पडला की पकडला जाण्यापूर्वी याला पंडित भगतराम कुठं बरं भेटले? ह्याला त्यांनी आपलं नाव कसं काय सांगितलं? सहजच विचारावं अशा तऱ्हेनं मी विचारलं– भगतराम केव्हा भेटला होता? तो म्हणाला– तीन महिने झाले असतील पेशावरला ते भेटले होते. हे ऐकल्याबरोबर सर्व गोष्टी स्पष्ट झाल्या. मी आता जरा विश्वासानं त्याच्याशी बोलू लागलो. थंडीमुळं पहारेकरी मला बाहेर उन्हात बसण्याची परवानगी देत होता आणि गप्पा मारण्यासाठी तो अमरनाथला तिथं पाठवून देत होता. एके दिवशी बॉम्ब कसा तयार करतात, हे सांगण्याचा त्यानं मला भलताच आग्रह केला. त्याचं खरं रूप मला कळून चुकलं होतं. मी त्याला म्हणालो की सर्व वस्तूंची यादी तुला पाठ कशी काय राहील? आणि बॉम्ब बनविण्याची कृतीही तुझ्या लक्षात नाही राहायची तेव्हा तू मला कागद-पेन्सिल आणून दे– मी सर्व लिहून देईन.

दुसऱ्या दिवशी एक सबंध ताव आणि पेन्सिल त्यानं आणली. मी त्याला खूप गंभीर व्हायला सांगितलं. त्याला अनेक प्रतिज्ञा करायला लावल्या, आणा-शपथा घ्यायला लावल्या, वचनं घेतली आणि शेवटी बॉम्ब बनविण्यासाठी ज्या वस्तू लागतात त्यांची यादी करण्यास त्याला सांगितलं. बॉम्ब बनविण्याची कृती मी त्याला या शब्दात सांगितली–

एका प्रशस्त, स्वच्छ खोलीत दारं-खिडक्या बन्द करून, अग्नी प्रज्वलित करावा. अग्नी चांगला पेटला म्हणजे त्यावर एक मोठी कढई ठेवावी. कढई चांगली लाल होईपर्यंत तापवावी. कढई लाल व्हायला खूप वेळ लागेल, तेवढ्या वेळात बॉम्बचे सर्व मसाले एकत्र करावे. मिश्रणासाठी एक शेर गंधक, एक शेर पोटॅश, एक शेर मनशिळ, (स्फोटकपदार्थ) एक शेर पोटॅशियमसं सयुग एक शेर साखर– या सर्व वस्तु वेग-वेगळ्या बारीक कुटाव्यात व नंतर त्यांचं मिश्रण बनवावं. कढई चांगली लाल तापल्यावर, आपलं मन शुद्ध करून, खोलीचं दार आतून बंद करून, सर्व मिश्रण एकदम कढईत ओतावं व ते चांगलं ढवळावं. एक तास आटवल्यानंतर एक बॉम्ब तयार होईल. तो बॉम्ब मग पोलिस अधिकाऱ्याच्या घरावर टाक म्हणजे कुणीही जिवंत राहणार नाही.

हे सगळं ऐकल्यानंतर लाला अमरनाथचा चेहरा पांढरा फटक पडला. तरीही वरवरचं हसण्याचा त्यानं प्रयत्न केला. तो म्हणाला– "भाई साहेब! असं मी केलं तर मीच जायच्या आधी ठार होईन की!" त्यावर मी म्हणालो– "हे बघ यार आम्हाला तर असंच शिकवण्यात आलं आहे. स्वतः मरण्याची तयारी ठेवली तरच दुसऱ्यांना मारता येतं." हे ऐकून त्याची मात्र घोर निराशा झाली.

एका तासानंतर पहारेकऱ्यानं मला येऊन सांगितलं की लाला अमरनाथची खोली रिकामी पडलेली आहे.

केवळ पोट भरण्यासाठी एका हिन्दी माणसानं काय काम केलं नव्हतं? सात दिवस तो शिव्या खात राहिला आणि जेलमधलं कदान्न त्याला खावं लागलं. ह्या घटनेचा माझ्या मनावर खूपच वाईट परिणाम घडून आला. माझ्या मनात चुकून सुद्धा असा विचार आला नाही की आपलाच एक देशबांधव, इंग्रज सरकारची नोकरी करून पोट भरण्यासाठी किती नीच पातळी गाठू शकतो.

काही दिवसांनंतर माझ्या जखमेचे टाके काढून टाकण्यात आले.

## खटल्याचं ढोंग

अम्बाला येथील न्यायालय खूप दूर अंतरावर होतं. यामुळं तुरुंगाच्या बाहेर न्यायालयापर्यंत मला न्यायला पोलिस घाबरत होते. तुरुंगाच्या आवारातच मग माझ्यावरील खटला चालवण्यात आला. सरदार बहादूर लहनासिंह यांना पोलिसांनी आपला साक्षीदार म्हणून उभं केलं. माझ्या डोळ्याला डोळा भिडवण्याचं धैर्य त्याला झालं नाही. एकदा का गुलामीची भावना मनात निर्माण झाली की ती माणसाला अगदी निर्लज्ज बनवते. तुरुंगाच्या आवारात खटला चालणार, याबद्दल जिकडे तिकडे आरडाओरडा झाल्यामुळं, भरपूर बन्दोबस्तात मग हा खटला खुल्या न्यायालयात चालू झाला.

बातमी समजल्यानंतर माझे चुलते नारायणसिंह चौधरी मला भेटायला आले. त्यांचं माझ्यावर खूप प्रेम होतं. आमच्या भेटीच्या वेळी ते मोठे दुःखी दिसले. त्यांना बघताच मलाही खूप वाईट वाटलं. वडिलांनाही मला पकडल्याची बातमी समजली होती. तेही तिथं येऊन पोचले. त्यांचं वय त्यावेळी ६० वर्षांचं होतं. माझ्या वडिलांची उंची ६ फूट २ इंच होती व ते मजबूत बांध्याचे होते. त्यांचं व्यक्तिमत्त्व रुबाबदार होतं. त्यांच्या ठिकाणी अजूनही चैतन्य सळसळत होतं. आमचं बाप-मुलाचं नातं ठाऊक नसलेल्या माणसाला ते माझे थोरले बंधूच आहेत असं वाटे. आम्ही परस्परांना आलिंगन दिलं. वडिलांच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले नाहीत. शब्दांनी सुद्धा त्यांनी आपलं दुःख प्रकट केलं नाही. एकूण माझ्या मनात काय करायचं आहे, हे जाणण्यास ते उत्सुक होते. पोलिसांच्या देखत मी त्यांच्याशी काय बोलणार? तुरुंगामध्ये माझ्याकडून बाॅम्ब बनविण्याची कला हस्तगत करणारा माझा चेला लाला अमरनाथ आमच्या जवळ येऊन बसला होता. आमच्या संभाषणाचा त्याला रिपोर्ट बनवायचा होता. मी न्यायाधीश महाराजांना म्हणालो– "मी माझ्या वडिलांशी माझ्या बचावाच्या संदर्भात काही बोलू इच्छितो. परंतु हा पोलिस आम्हाला एकांत मिळू देत नाही. इथून तो हलायलाच तयार नाही. त्याला येथून निघून जायला सांगा." माझी विनंती ऐकून न्यायाधीश हसू लागले. माझ्या ही गोष्ट लक्षात आली की ते त्याला तिथून हाकलू शकत नाहीत मीच शेवटी त्या पोलिसाला म्हणालो– आमचं बोलणं ऐकून तुम्हाला रिपोर्टच लिहायचा आहे ना– मग नोटबुक काढा व मी सांगतो ते सर्व लिहून घ्या. उगीच काही राहून जायला नको. त्यानं मोठ्या आनंदानं लिहून घेण्यासाठी वही बाहेर काढली. आम्ही दोघं बर्मी भाषेत एकमेकांशी बोलू लागलो. तो मग नुसता आमच्या चेहऱ्याकडे बघत बसून राहिला. शेवटी निराश होऊन तो तिथून उठला व निघून गेला.

मी वडिलांना माझ्या जीवनाचं उद्दिष्ट स्पष्टपणे सांगितलं. मी त्यांना समजावण्याचा प्रयत्न केला की क्षत्रियांनी नेहमीच देशाच्या रक्षणासाठी आपल्या पुत्रांचं बलिदान केलेलं आहे. आपणही मला या कामी आशीर्वाद द्यावे आणि माझ्या मार्गानं मला जायला उत्तेजन द्यावं.

मॅजिस्ट्रेटनं आमचा खटला वरच्या न्यायालयाकडे– सेशन कोर्टाकडे पाठवण्याचा हुकूम दिला. माझा बचाव करण्यासाठी माझे वडील एखादा चांगला वकील देऊ इच्छित होते. परंतु १९१४ सालचं वातावरणच काही वेगळं होतं. कुठला न कुठला भयानक आरोप ठेवून एखाद्या तरुणाचं जीवन उद्ध्वस्त करणं हे इंग्रजांचं धोरण होतं. असा खटला चालवायला वकीलही घाबरत. आपलाही असाच छळ होईल.

अशी त्यांना भीती पडे. माझा खटला चालवायला कुणीच वकील तयार नव्हता. लाला दुनीचन्द यांचं नाव देशभक्त म्हणून अम्बालामध्ये प्रसिद्ध होतं. प्रामाणिकपणा आणि बेडरपणा यामुळं लोक त्यांचा आदर करत. माझे वकील त्यांना जाऊन भेटले. त्यांनी माझे वकील म्हणून काम करण्याचं मान्य केलं.

माझ्यावर फौजदारी गुन्हेगारी कायद्याची ३०७ व ३५३ ही कलमं लावून आरोप ठेवण्यात आले आणि माझे मित्र काहनसिंहावर ३९५ कलमाखाली डाका घालण्याचा आरोप ठेवण्यात आला. इंग्रज राजवटीत पोलिस अधिकारी कुठलाही नीचपणा करू शकत होते. मात्र सेशन कोर्टापुढं त्यांची डाळ शिजत नसे. माझ्यावर असा आरोप ठेवण्यात आला की मी पोलिस अधिकाऱ्याचं पिस्तूल हिसकावत असताना आमची मारामारी झाली व हजारो एकर जमिनीचा मालक असलेल्या काहनसिंहानं पोलिसाचं पैशाचं पाकिट चोरलं! ह्या प्रकाराला कुणी साक्षीदार नव्हता, काही पुरावा नव्हता. तरीही इंग्रज न्यायाधीशानं हा सत्य म्हणून स्वीकारला. असे होते इंग्रज न्यायाधीश! तरीही त्यांच्या न्यायप्रियतेचा भारतीयांना अजूनपर्यंत कोण अभिमान आहे!

पोलिसांनी अनेकांची धरपकड करून त्यांना तुरुंगात डांबलं होतं. त्यांचा खूप छळ करण्यात आला होता. त्यांना आमिषही दाखवण्यात आलं. परंतु कुणीही बेईमान झाला नाही. रावसाहेब बाजसिंह, पीकेआलि जे खूप श्रीमंत होते, त्यांनाही खूप सतावण्यात आलं. माजरच्या हंसराज चौधरी यांना खूप आमिष दाखवण्यात आली, शारीरिक छळही केला. त्यांना झोपू देत नसत आणि सतत उभं करून ठेवलं. सात दिवस त्यांना झोपू दिलं नाही आणि तरीही या सच्चा भारतीयाच्या तोंडून आमच्याविरुद्ध एक शब्द देखील निघाला नाही.

मी जे कार्य स्वीकारलं होतं आणि निरनिराळ्या कार्यकर्त्यांशी वेळोवेळी मी जे काही बोललो होतो, ज्या कार्यासाठी मी त्यांना वचनबद्ध केलेलं होतं, त्या सर्व गोष्टी पोलिस यंत्रणेला माहीत होत्या. मात्र, पोलिसांनी ज्यांची धरपकड केली होती आणि नाइलाजानं पोलिसांच्या छळामुळं ज्यांनी ते सांगितील त्याप्रमाणं लेखी कबुली-जबाब दिले होते, साक्षीदार म्हणून उभे राहताना त्यांनी पुरावे जरी दिले—तर अशा शेकडो लोकांवर खटले भरावे लागले असते. ज्या ज्या गावात धरपकड झाली तिथं तिथं माझ्यासंबंधी सहानुभूतीचं वातावरण निर्माण झालं. गावातील सर्व लोकांची अशी इच्छा होती की कुणाच्या तोंडून एका शब्दानंही पृथ्वीसिंह क्रांतीच्या मार्गानं इंग्रज राजवट उलथून टाकणार आहे, ही गोष्ट बाहेर येऊ नये या संबंधी त्या सर्वांनी मोठी दक्षता बाळगली होती.

इंग्रजी राजवटीविषयी किंवा इंग्रजांविरुद्ध मी कधीही तिरस्कारानं बोललो नाही. कुणाबरोबरही बोलण्याचा प्रसंग पडला म्हणजे मी अतिशय नम्रपणानं बोलत असे. एकाही शब्दातून मी कधी इंग्रजी राजवटीविषयी तिरस्कार व्यक्त केला नाही. माझ्या मनातला तिरस्कार मी कधीच प्रगट होऊ दिला नाही. मी माझ्या निवेदनातून सतत हेच सांगत राहिलो की ज्या माणसाबरोबर माझं भांडण झालं तो पोलिसांच्या वेषात नव्हता. मी त्याला एखादा चोर समजूनच वागवलं कारण पिस्तुलाचा धाक दाखवून तो मला लुटण्याच्या प्रयत्नात होता.

सेशन जज्जांच्या समवेत तीन असेसर्स ( Assessors ) कोर्टात उपस्थित होते. न्याय्यपूर्ण निकाल व्हावा, यासाठी ते मदतनीस होते. न्यायाधीश आरोपीकडे न्यायबुद्धीनं बघेना गेला तर अशावेळी असेसर्सचं हे कर्तव्य असे की त्यांनी आपलं स्पष्ट मत न्यायाधिशाला सांगावं. माझा खटला सेशन जज्जांच्या कोर्टात अनेक दिवस चालला. पुराव्यादाखल साक्षीदारांना हजर करण्यात आलं. आपला निकाल देण्यापूर्वी न्यायाधीश महाराजांनी तिन्ही असेसर्सचं मत विचारलं. त्यांना त्यांचं मत बनवता यावं, म्हणून त्यांना तिघांनाच एकत्र विचार करण्यास पाठवण्यात आलं. या असेसर्सची नावं माझ्या लक्षात नाहीत—परंतु एवढं मात्र आठवतं की त्यांच्या पैकी एकजण चांगला शिकला-सवरलेला मुसलमान गृहस्थ होता आणि दुसरे दोघेजण शेजारच्या गावातील सावकारांपैकी होते. असेसर्स पाच मिनिटांत आपल्या खोलीतून बाहेर आले व त्यांनी एकमतानं आपलं लेखी मत न्यायाधिशासमोर ठेवलं. त्यांनी मत व्यक्त केलं की आमच्या मते आरोपी निर्दोष आहेत. दोन्हीही तरुण निर्दोष आहेत. पोलिसांनी त्यांना ताब्यात घेऊन त्यांचा खूप छळ केला आहे. असेसर्सचा अभिप्राय ऐकून पोलिस अधिकारी तर चाटच पडले. सगळीकडे नुसती शांतता पसरली.

सेशन जज्जांनी असेसर्सना विचारलं की कोणत्या पुराव्याच्या आधारावर त्यांनी आरोपींना निर्दोष ठरवलं आहे? सेशन-जज्जांच्या या प्रश्नाचं उत्तर देण्यासाठी एक असेसर उभा तर राहिला परंतु त्याच्या तोंडातून एकही शब्द उमटला नाही. तो घाबरा-घुबरा होऊन नुसता उभा राहिला. त्याच्या सर्वांगाला घाम फुटला. दुसऱ्या असेसरची अशीच दशा झाली. तिसरा असेसर, जो एक राजपूत मुसलमान होता त्यानं मात्र स्पष्ट शब्दांत सांगितलं की आरोपींच्यावर गुन्ह्याचा जो आरोप लावलेला आहे तो चुकीचा असून आरोपी निर्दोष आहेत. त्यांचं निरपराधित्व सिद्ध करण्यासाठी आपण एक गोष्ट सांगून हे सिद्ध करू, असंही तो म्हणाला. राजपूत मुसलमान अगदी बेडर होता. त्याच्या मनात फक्त परमेश्वराचं भय होतं. त्याचं म्हणणं ऐकून घेतल्यानंतर सेशन जज्जला देखील प्रश्न विचारण्याचं धैर्य झालं नाही. ज्या दोन असेसर्सना काहीच बोलता आलं नाही, ते पोलिसांना घाबरलेले आहेत ही गोष्ट

सेशन जज्जांच्याही लक्षात आली. यामुळं जज्जसाहेबांनी पोलिसांपैकी तिथं कुणीही थांबू नये अशी आज्ञा केली. आम्हा दोघा आरोपींना वकिलांच्या स्वाधीन करून, पोलीस तिथून बाहेर निघून गेले. त्यानंतर आधीचे दोन्ही असेसर्स म्हणाले— 'खान साहेबांनी जे सांगितलेलं आहे, ते अगदी यथार्थ आहे." हे ऐकून सरकारी वकिलाला काळजी पडली की असेसर्सचं म्हणणं जज्ज महाशयांनी स्वीकारलं तर काय होईल? या आरोपींना सोडून तर देण्यात येणार नाही? त्यानं आपल्या शेवटच्या युक्तिवादात परत हेच सांगितलं की पोलिसांच्या माहितीनुसार व निवेदनानुसार आरोपी गुन्हेगार आहेत, ही गोष्ट सिद्ध झालेली आहे व त्यांना शिक्षा झाली पाहिजे. जर पृथ्वीसिंह न्यायालयाला निर्दोष वाटत असेल तरीही त्याला तुरुंगात नजर कैदेत ठेवण्यात यावं. हा युक्तिवाद ऐकून सेशन जज्ज विचारात पडले व त्या दिवशी त्यांनी आपला निकाल दिला नाही. दुसऱ्या दिवशी सेशन जज्जांनी निकाल जाहीर केला. त्यांच्या निकालानुसार मला दहा वर्षांची सक्तमजुरी व काहनसिंगला दोन वर्षांचा कारावास—अशा शिक्षा ठोठावण्यात आल्या.

सेशन जज्जांचा निकाल ऐकल्यानंतर लाला दुनीचंद यांनी मला सल्ला दिला की हायकोर्टात जर अपील केलं तर सुटण्याची शक्यता आहे. मी त्यांचा सल्ला मानला नाही. मला जेव्हा अपील न करण्याचं कारण विचारलं तेव्हा मी म्हणालो की तुरुंगवास मला कठीण वाटत नाही. अशीही शक्यता आहे की मला फाशीची शिक्षा होईल किंवा तुरुंगातून बाहेर पडल्यानंतरही मला इथल्या राजवटीशी सामना करावा लागेल. माझं म्हणणं ऐकून ते गप्प राहिले.

लाला दुनीचंद यांची निर्भयता, त्यांचं देशप्रेम आणि प्रामाणिकपणा या गुणांमुळे माझा त्यांच्यावर विश्वास बसला. त्यांना पोलिसांनी सर्वप्रकारे घाबरवून सोडण्याचा, भीती दाखवण्याचा प्रयत्न केला होता. माझे वकील म्हणून त्यांनी काम करू नये असंही दडपण त्यांच्यावर पोलिसांनी आणलं होतं. त्यांना अशी धमकी सुद्धा देण्यात आली होती की ते जर त्यांच्या सल्ल्यानुसार वागणार नसतील तर त्यांनाही पृथ्वीसिंहाप्रमाणेच तुरुंगात डांबण्यात येईल. परंतु लाला दुनीचंद पोलिसांच्या धमक्यांना बिल्कुल घाबरले नाहीत. आपल्या स्वीकृत कार्यासाठी ते ठामपणे उभे राहिले आणि मी निरपराधी आहे हे सिद्ध करण्यासाठी त्यांनी अनेक पुरावे सादर केले. मी निरपराधी आहे, हे सिद्ध करण्याचा त्यांनी सर्वतोपरी प्रयत्न केला. जेव्हा मी त्यांना माझ्या मनातली गोष्ट सांगितली—माझं उद्दिष्ट स्पष्ट केलं, त्यानंतर मात्र त्यांनी मला अपिलाचा आग्रह केला नाही.

पोलिसांनी आम्हांला तुरुंगाच्या दारावर नेऊन सोडलं. शिपायांनी कागदपत्रं आमच्या जवळ होतीं. दारातच आम्हांला आमचे कपडे काढून कैद्यांचे कपडे चढविण्याचा हुकूम झाला. आमच्या समोरच एका कैद्याची सुटका होत होती. त्यानं काढून ठेवलेले कपडे तिथंच होते. तुरुंगातील अधिकाऱ्यानं ते कपडे घालण्याचं मला खुणेनं सांगितलं. अशा प्रकारचे कपडे आपणास घालावेच लागणार, हे मी मनोमन ठरवलं होतं. मी मुकाट्यानं ते कपडे उचलले. मी ते नीट बघितले तेव्हा त्या कपड्यांत बेसुमार उवा आढळल्या. कपडे झट-कताच शेकडो उवा खाली जमिनीवर पडल्या. मी हसत हसत तुरुंगाधिकाऱ्याकडे बघितलं. "हे तुम्ही बघितलं ना?" असं मी म्हणालो. आपली परवानगी असेल तर कोठडीत जाऊन मी कपडे बदलतो, असं मी त्याला म्हणालो. त्यालाही जरा कालवाकालव झाली. मला त्यानं अनुमती दिली. मी ते कपडे उचलले. त्यातला एक लंगोट घेऊन मी तो जमिनीवर खूप धोपटला. आता तो कपडा अंगात घालायला काही हरकत नाही, इतकी मला खात्री पटली तेव्हा मी ते कपडे अंगात घातले आणि माझे कपडे काढून टाकले. लंगोट नेसून होतो न होतो तोच ४० पौंड मका भरलेला डबा माझ्याजवळ ठेवण्यात आला. दुपारचे १२ वाजले असतील, सायंकाळी ५ वाजेपर्यंत तेवढं धान्य दळण्याचा मला हुकूम देण्यात आला. तेवढं धान्य मी दळू शकलो नाही, तर फटके खावे लागतील, असं मला बजावण्यात आलं.

ज्या क्षणी मी तुरुंगाच्या दारात येऊन पोचलो तेव्हा सर्व प्रकारचे कष्ट करण्याची मी शारीरिक व मानसिक तयारी केली होती. माझ्या मानेवरच्या सभा बंद झाल्यानंतर मी दररोज माझ्या हातांनी कोठडीतील लाकडं फोडत होतो. हेतू हा की हातांचा कोमलपणा जावा आणि ते भक्कम बनावेत. जात्यावर दळण दळण्यासाठी मी माझे हात चांगले मजबूत बनवले होते. लंगोट कमरेला बांधून मी पिसाईला प्रारंभ केला आणि ५ वाजण्या-पूर्वी मी ४० पौंड मका दळून टाकला. सतत दळण्याचे श्रम केल्यामुळे मला नंतर उठून उभा राहण्याचीही ताकद राहिली नाही. मी अतिशय थकून गेलो होतो. खाली जमिनीवर अंग टाकून मी कांबळी पांघरून झोपून राहिलो. घोंगडी पांघरताच माझ्या सर्वांगाला दरदरून घाम आला. ६ वाजता जेलचा अधिकारी माझ्याकडे आला तेव्हा मला झोपलेला पाहून व दळणाचा डबा तसाच पडला आहे असे समजून त्यानं मला दरडावलं. मी आता एक कैदी आहे, हे ही त्यानं मला जाणवून दिलं. असं केव्हाही झोपता येणार नाही, असं तो

म्हणाला. दळण दळावेंच लागेल. मी हसून विचारलें—दळण्याचें काम एकदांच करावें लागणार का दोन वेळा ? त्यानें डब्यांत डोकावून आत पाहिलं—डबा पिठानं भरलेला होता. त्याला विश्वासच वाटेना. त्याला वाटलं वरवर पीठ आहे आणि खालीं धान्य तसंच ठेवलं असेल. म्हणून त्यानें डब्यांत तळापर्यंत हात खुपसून खात्री करून घेतली, माझ्यावर पहारा करणाऱ्या शिपायांना त्यानें दरडावून विचारलें—"खरं सांगा—याचं धान्य कुणी दळून दिलं ?" मला त्याचा खूप राग आला. मी त्याला पुन्हांच म्हणालो—"तुमचा विश्वास बसत नसेल तर उद्यां तुम्ही स्वतःच इथं येऊन बसा आणि बघा कोण दळतं तें !"

ज्या डॉक्टरांनीं माझ्या अंगावर डाके घातले होते तोच तुरुंगाचा मुख्याधिकारीही होता. तो दररोज जेलमध्यें यायचा. मी त्याच्याशीं एक शब्दही बोललों नाहीं. एके दिवशीं मला दुसऱ्या एका कोठडींत नेऊन ठेवण्यात आलं. फाशीची शिक्षा झालेल्या कैद्यांची ती कोठडी होती. त्या कोठडींत माझी रवानगी कां करण्यात आली, हें कांहीं मला समजू शकलें नाहीं. फाशीची शिक्षा झालेले खुनी, दरोडेखोर यांच्यावर सक्त पहारा बसवलेला असतो. कदाचित मी तुरुंगाचे गज तोडून पळून जाईन, असं त्या मंडळींना वाटत असावं.

तुरुंगातील अधिकाऱ्यांनीं माझ्या कोठडींत एक जातं आणून ठेवलं. खालीं बसून दळण दळण्याचा त्रास कमी होणार. जेव्हां अधिकारी तिथं आला तेव्हां मी त्याला हें सांगितलं उभं राहून दळण्याची व्यवस्था केलीत तर बरं होईल, असं मी त्याला म्हणालों. माझ्याकडे बघून छद्मीपणानं हसत तो म्हणाला—तुम्हाला कष्ट करण्याची शिक्षा दिलेली आहे. हें ऐकून मीही त्याला उलटून म्हणालों—ठीक आहे ! या पुढं मी तुम्हाला कुठलीच अडचण सांगणार नाहीं व तक्रारीला वाव ठेवणार नाहीं. तुम्ही जी कष्टदायक कामं सांगाल—ती मी आनंदानं करीन.

तुरुंगातलं अन्न सकस नव्हतं. असलं अन्न खाऊन दररोज वीस शेर दळण दळणं सोपं नव्हतं. मी दररोज पावशेर पीठ पाण्यात कालवून पिऊ लागलो.

जेलचं जीवन अशा तऱ्हेनं चाललं होतं. जेवण आणून देणाऱ्या कैद्यांशीं आता माझा चांगला परिचय झाला होता. ते मला कधीं अधिक कालवण घालायचे, कधीं अधिक भाकरी द्यायचे त्यामुळं खाण्याची चिंता मिटली होती. मधून मधून ते मला गुळाचा एखादा खडाही द्यायचे.

२४-२५ फेब्रुवारी १९१५ मधली सकाळची हकीकत, जेलचा दरवाजा उघडताच एक अधिकारी माझ्या पुढ्यात येऊन उभा राहिला, हसत हसत माझ्याशीं बोलू लागला. तो म्हणाला कीं जो दिवस उजाडण्याच्या आशेवर तुम्ही ही शिक्षा भोगत आहांत. तो दिवस

कधीच उलटणार नाही. क्रांती करण्याच्या उद्देशानं इथं आलेले तुमचे एकूण एक साथीदार पकडले गेले आहेत. त्या सर्वांना आणि तुम्हालाही गोळ्या घालून ठार करण्यात येईल. तुम्हाला आपला जीव प्रिय असेल आणि तो वाचवायचा असेल तर सर्व गुप्त गोष्टी सांगून टाका. तुम्ही खरं खरं सांगितलंत तर तुमच्याविरुद्ध खटला सुद्धा भरला जाणार नाही. तुमची मरणाची शिक्षासुद्धा माफ होईल. तुमची इच्छा असेल तर सन्यात किंवा पोलिसमध्ये अधिकाऱ्याच्या पदावर तुमची नियुक्तीही होईल. त्याचं सगळं बोलणं ऐकून मी जोरात हसलो. मी त्यांना म्हणालो की तुमचं बोलणं मी ऐकलं पण त्याचा अर्थ मी नाही समजलो! क्रांतीच्या कार्यात माझा न कुणी साथी आहे न मी कुणाचा साथीदार आहे. तो पोलिस अधिकारी या आशेनं माझ्यापाशी आला होता की तो मला माफीचा साक्षीदार बनवील आणि कट उघडकीस आणल्याबद्दल शासनाच्या तर्फे त्याचा गौरव होईल. माझं उत्तर ऐकून त्याची घोर निराशा झाली. आल्या पावली तो तेथून परत गेला.

देश स्वतंत्र करायचा आहे ह्या आमच्या ध्येयावर विरजण पडल्यामुळे मीही खूप खचित होतो. काही दिवसांनंतर दोन इंग्रज अधिकारी मला भेटायला आले. त्यांच्यापैकी एक-जण इंग्रज सरकारच्या गुप्तचर खात्याचा प्रमुख होता-त्याचं नाव होतं पॅट्रिक. दुसरा अधिकारी बंगाल मधल्या क्रांतिकारकांना पकडण्यात यशस्वी झाला होता. अशी त्याची ख्याती होती—त्याचं नाव होतं डॅनहॅम. दोन्ही अधिकाऱ्यांचे चेहरे हसरे होते आणि त्यांच्या वाणीत मिठास होती. बोलण्या-बोलण्यात दुसऱ्याच्या मनाला मोहून टाकण्यात ते वाक-बगार होते. मला फुसलावण्याचा आणि लालूच दाखवण्याचा त्यांनी आटोकाट प्रयत्न केला. पहिल्याच दिवशी त्यांच्या बोलण्यावरून मी हे ताडलं की ते दोघेही अत्यंत धूर्त आहेत. माझ्याहून अतिशय चालाख आहेत. त्यांच्याशी चतुरपणे बोलून काहीही उपयोग नाही. आपण भोळे-भाबडे बनूनच त्यांच्याशी बोललं पाहिजे-असं मी ठरवलं. मी भोळा बनून त्यांच्या प्रत्येक प्रश्नाला "नाही". एवढंच उत्तर देऊ लागलो. "मला माहीत नाही!" एवढंच मी त्यांना सतत सांगू लागलो. सात दिवस पर्यंत दररोज येऊन ते मला छेडत होते. एकदा त्यांनी खुर्च्या मागवून ते माझ्या समोर बसले आणि म्हणाले- "पृथ्वीसिंग, ज्या दिवशी तुम्ही भारत सोडून बाहेर गेलात आणि तिथून परत भारतात आलात-ती सर्व हकीकत आम्हांला सांगा ना"- मी त्यांना माझी कहाणी सांगू लागलो. चार तास मी हकीकत सांगत होतो आणि ते लक्षपूर्वक ऐकत होते. मधून मधून ते प्रश्नही विचारायचे. शेवटी डॅनहॅम म्हणाला "you have told us a fine cock and bull story." (तुम्ही आम्हाला एक लहान मुलांची छान गोष्ट सांगितलीत).

मी गंभीर चेहऱ्यानं उत्तर दिलं- "आपण माझ्यावर विश्वास ठेवत नाहीत याचं मला खरोखरच वाईट वाटतं. मी आपणास जे काही सांगितले ते संपूर्ण सत्य आहे".

टेंडिक आणि गिहॅम यांच्या या भेटीनंतर माझी अशी खात्री झाली की यापुढं कुणी इंग्रज अथवा पोलिस अधिकारी मला येऊन प्रश्न करणार नाहीत. माझी एकंदर वर्तणूक बघून, त्यांच्या हे लक्षात आलं असावं की मी त्यांच्या जाळ्यात अडकणारा नाही. माझा निर्धार पक्का होता. देशप्रेमामुळं या पुढील आयुष्यात कधी सुख वाट्याला येईल, हे स्वप्नात देखील शक्य नव्हतं.

अम्बाला येथील मध्यवर्ती तुरुंगात कुविख्यात चोर-दरवडेखोर यांच्यासाठी असलेल्या त्या विशिष्ट कोठडीत माझी रवानगी करण्यात आली होती. रात्री चुना फासलेलं एक मडकं माझ्या कोठडीपुढं ठेवण्यात येई. पहारेकऱ्यांनी माझ्यावर विशेष लक्ष ठेवावं, यासाठी ही व्यवस्था होती. दर दोन तासांनी पहारेकरी मला जागं करून, मी तिथंच असल्याची खात्री करून घेत. जेव्हा पहारेकऱ्यांना ओरडून "ऑल्वेल" (सर्व काही ठीक आहे)—असा पुकारा करावा लागे तेव्हा ते माझ्या खोलीचा क्रमांक सांगून—'अमुक क्रमांक सुरक्षित आहे' असा पुकारा करायचे. एके दिवशी रात्री धोक्याची घंटा घणाणली. दुसरे दिवशी कैद्यांकडून समजलं की रात्री भिंती पलीकडून दगड येऊन पडत होते. जेलमधल्या अधिकाऱ्यांनी जाणूनबुजून हा प्रकार घडवून आणला होता. त्यांनी असा आभास उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला होता की जवळपासच्या गावातील लोक तुरुंगावर हल्ला करून पृथ्वीसिंगला तुरुंगाबाहेर काढण्याच्या प्रयत्नात आहेत. पृथ्वीसिंगला अन्यत्र हलविण्यात यावं, अशी त्यांची इच्छा होती. पोलिसांचा हा हेतु लवकरच साध्य झाला. मला लाहोर येथील मध्यवर्ती तुरुंगात त्वरितच हलविण्यात आलं.

अम्बाला जेलमधले बरेचसे शिपाई माझ्या परिचयाचे झाले होते. त्यांच्यातल्याच एकानं लाहोरला जाऊन माझी लाहोर येथे रवानगी होणार आहे, ही बातमी माझ्या वडिलांना सांगितली. ज्या गाडीनं मला नेणार होते, तिची वेळही त्यांना सांगितली. वडील त्याप्रमाणं स्टेशनवर येऊन पोंचले. माझ्यासमवेत तीन शिपाई होते. लाहोर येईपर्यंत मी व माझ्या सोबतच्या शिपायांनी पोटभर मिठाई खाल्ली. याचा परिणाम म्हणून मी तीन दिवस आजारी पडलो. लाहोर येथील तुरुंग पंजाबभर भयंकर कैद्यांचा तुरुंग म्हणून प्रसिद्ध होता. तिथल्या १४ क्रमांकाच्या कोठडीत मला डांबण्यात आलं. जेलमधल्या कर्मचाऱ्यांना माझ्यासंबंधी कुठलीच माहिती नव्हती. दिसायला मी एक कोवळ्या वयाचा तरुण होतो. सकाळ होताच माझ्या खोलीचं दार उघडल्यानंतर एक शिपाई माझ्यापाशी आला आणि माझ्या हातात झाडू देऊन, सगळ्या खोल्या झाडून काढण्याचं काम मला खुणेनं सांगितलं. ज्या कैद्यांना दुसऱ्या दिवशी फाशीवर लटकावण्यात येणार होतं—त्यांच्या खोल्यांत मी झाडू मारत मारत जाऊन पोंचलो. त्यांना बघून मला फार वाईट वाटलं. तिथं मला माझे

जुने सहकारी पंडित काशीराम दिसले. गदर-पार्टीचे ते खजीनदार होते. पंडितजींनी आपली लाखो रुपयांची संपत्ती पार्टीच्या कार्यासाठी दान केली होती. फिरोजपूर जवळ पोलिसांशी चकमक झाली तेव्हा ते पकडले गेले होते. त्यांना फाशीची शिक्षा ठोठावण्यात आली होती. आम्ही एकमेकांना ओळखलं—थोडं फार बोलणं झालं. मी मन लावून त्यांची कोठडी अधिक वेळपर्यंत झाडत राहिलो. हेतु हा की त्यांच्याशी खूप वेळ बोलता येईल. त्यांची हसरी मूर्ती आजही माझ्या डोळ्यांपुढे उभी राहते.

सायंकाळच्या वेळी तुरुंगाचा अधिकारी राऊंड घेण्यासाठी आला. त्यानं मला विचारलं की दिवसभरात तुम्ही काय काम केलं? मी जे काय खरं होतं ते सांगितलं. माझं ऐकून घेतल्यानंतर त्यानं शिपायांना दटावलं की यापुढं मला कोणत्याही कैद्याला भेटू देऊ नये.

मार्च महिन्यात एके दिवशी १४ नंबरच्या खोलीतून मला दुसऱ्या खोलीत नेण्यात आलं. मी जेव्हा त्या खोलीत पोचलो तेव्हा बाबा सोहनसिंह यांना धनोकून येताना बघितलं. थोड्या वेळानंतर पंडित जगतरामही तिथं येऊन पोचले. आम्ही एकमेकांच्या गळ्यात पडून भेटलो. त्यांची भेट घेत असताना राहून राहून माझ्या मनात विचार येत होता—यास्थळी पोचण्यासाठीच आम्ही सर्वजण अमेरिकेतून निघालो होतो का?

आणि अहमदाबाद येथील कामगारांशी संपर्क स्थापन करण्याचा अजिबात प्रयत्न केला नाही. पंजाबमध्ये जे शेतकरी बंधू बाहेरच्या देशातून परत आले होते, त्यांनी मात्र आपापल्या गावातून छोटी छोटी केंद्रं स्थापन केली होती. त्यांच्याच साहाय्यानं आमच्या काही साथीदारांनी २३ क्रमांकाच्या छावणीमध्ये प्रवेश केला होता. गदर-पार्टीच्या अन्तर्गत वर्तुळातून काही अमेरिकन हेरही घुसले होते. इकडे करतारसिंह सराबानं शाळेत शिकणाऱ्या युवकांना आपल्या बाजूस वळवलं होतं. ज्या क्रांतीबद्दल आम्हाला मोठा अभिमान होता, त्या संदर्भात परिस्थिती एकूण ह्या स्वरूपाची होती.

तिकडे महायुद्धात युरोपमध्ये ब्रिटिश फौजा सपाटून मार खात होत्या. अनेक जहाजं बुडवण्यात आल्यामुळं भारत आणि इंग्लंड यांच्यात दळणवळण राहिलं नव्हतं. पहिल्या महायुद्धापूर्वी जेवढी युद्धं झाली त्या युद्धांतील सैन्यात एवं भारतीय–विशेषत पंजाबी–मोठ्या आनंदानं भरती होत असत. त्या काळी त्यांना केवळ निःशस्त्र प्रदेशांशी लढावं लागत होतं. त्या युद्धांत स्वाभाविकच ते विजयी होत. विजयामुळे त्यांना जहागिरी बक्षीस म्हणून मिळत. मात्र या खेपेस महायुद्धात अगदीच वेगळी परिस्थिती होती. जर्मनांच्या विरोधात मोर्चेबंदीवर गेलेला एकही सैनिक परत येत नव्हता. गाजर-मुळ्यांप्रमाणे हे सैनिक कापले जात होते. जर्मनांची 'एमडन पाणबुडी' हिन्दी महासागरात टेहळणी करत होती म्हणून सैन्यानं भरलेली जहाजं समुद्रात चालणं कठीण होऊन बसलं होतं. सैन्य युरोपमध्ये पोचू शकत नव्हतं. हिंदुस्थानात लक्षावधी लोक बेकार होते परंतु आता सैन्यात भरती व्हायला ते तयार नव्हते. ब्रिटिश फौजेत भरती होऊन इंग्रजी राजवटीचं रक्षण करावं म्हणून महात्मा गांधींनी देशभर दौरा करून लोकांपुढे भाषणे दिली होती. ते सर्व वाचल्यानंतर इंग्रजांची परिस्थिती किती बिकट आहे, हे समजून येत होतं. भारतात केवळ १० हजारांच इंग्रज सैन्य होतं. इंग्लंडमधून कुमक येण्याची शक्यता नव्हती. त्यांना यायला कुठला मार्गच उरला नव्हता. ही होती आपल्या देशाची तेव्हाची परिस्थिती. इ. स. १९१४-१५ मध्ये इंग्रजांची मोठी गंभीर परिस्थिती होती. जर्मनांच्या युद्धामुळं ब्रिटिशांची दाणादाण उडाली होती. भारतीयांच्या मनात त्यांच्या बळाविषयी बिलकुल आदर उरला नव्हता. कुणीही फुंकर मारावी आणि त्यांना उडवून लावावं, अशी स्थिती झाली होती. परंतु फुंकर मारण्यासाठीही कुणी उभा राहिला नाही.

गदर-पार्टीचे शेकडो वीर उघड उघड गदर-पार्टीचं काम करत होते. इंग्रज सरकारच्या पोलिसांच्या डोळ्यात धूळ फेकून, बन्दरांवर उतरून ते पंजाबपर्यंत पोचले आणि तिथल्या खेड्यापाड्यातून पार्टीचं काम करू लागले. गदर-पार्टीचे लोक भारतीय सैन्याला आपल्या बाजूने वळवतील, ही बातमीही इंग्रज सरकारपर्यंत पोचली

होती. आम्ही सैन्याशी हातमिळवणी करण्यासाठीच २३ नंबरच्या छावणीत गेलो होतो आणि आम्ही यशस्वीही झालो होतो. या गोष्टीचा इंग्रज सरकारला पत्ता देखील नव्हता.

ज्या भारतीयांच्या देशप्रेमाच्या आवाहनामुळे आम्हाला क्रांतीसाठी उद्युक्त केलं–त्यांच्यापैकी कुणीही विश्वासघात केला नाही. 'गदर की गूंज' हे पुस्तक आता पंजाबमधील खेड्यापाड्यापर्यंत पोचलं होतं आणि पंजाबी शेतकऱ्यांच्या ओठा-ओठावर त्यातल्या कविता खेळत होत्या. टोळक्या-टोळक्यांनी लोक एकत्र बसून त्यातल्या कविता म्हणू लागले–'गदर की गूंज' गाजू लागले. 'गदर' या उर्दू वृत्तपत्राविषयी अन्य एक उर्दू वृत्तपत्राने 'जमींदार' ने लिहिलं होतं–

"अमेरिकेहून" 'काळानाग' या शीर्षकाचा अग्रलेख प्रसिद्ध झाला होता. त्यात म्हटलं होतं की अमेरिकेमधून 'गदर की गूंज' हिन्दुस्थानात पोचत आहे. भारतात जो कुणी ही कविता वाचतो त्याच्या रोमारोमात इंग्रज विरोधाचं विष भिनतं. या विषाला कुठलाच उतारा नाही. एखाद्या 'काळ्या नागाचं' विष जसं उतरवता येत नाही–तसंच हे आहे."

एकंदर अशी सर्व परिस्थिती असतानाही आम्ही सफल क्रांतीची योजना बनवू शकलो नव्हतो. या असफलतेच्या कारणांची नीट मीमांसा होणं जरूरीचं आहे. या असफलतेचं एक महत्त्वाचं कारण–जे आज स्पष्ट दिसतं–ते म्हणजे गदर पार्टीला कुणीही अनुभवी नेता लाभला नव्हता–योग्य वेळेतच मार्गदर्शन लाभलं नव्हतं. सर्वच कार्यकर्त्यांचं राजकीय प्रवाहांचं आकलन तोकडं होतं. इंग्रजांच्या संदर्भात आपण किती भोळसट व भाबडे आहोत, हे सुद्धा आम्हाला समजत नव्हतं.

त्यावेळच्या एकूणच राजकीय क्षेत्रात काम करणाऱ्या माणसांमध्ये भोळे-भाबडेपणा होता. जगाच्या इतिहासात याला कुठं तोड सापडणार नाही. इंग्रज सरकारचा हेर कृपालसिंह–कितीतरी सहजतेनं आमच्यामध्ये सामील झाला होता. तो जेव्हा कॅलिफोर्नियामध्ये होता–तेव्हाच तो ब्रिटिशांचा हेर असावा, असं बोललं जात होतं. तरीही त्याला आमच्या संघटनेत प्रवेश मिळाला. हा प्रवेश सुद्धा केव्हा मिळाला? तर आमच्या क्रांतीची २३ फेब्रुवारी १९१५ ही तारीख निश्चित झाल्याच्या केवळ पंधरा दिवस अगोदर!

गदर-पार्टीचा इतिहास लिहिणाऱ्यांनी आमच्यातील काही बुजुर्ग मंडळींचे दोष लपवण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु ज्या घटना घडल्या–त्या जशाच्या तशा इतिहास वाचणाऱ्यांना, त्यांचे दोष ठळकपणे दिसल्यावाचून राहणार नाहीत. दोषांना दोष म्हणून स्वीकारण्यात कुठलाच कमीपणा नसतो–उलट त्यात महानताच असते.

आम्ही अमेरिकेहून निघालो ते लाल किल्ल्यावर आपल्या देशाचा ध्वज फडकावण्यासाठी—परंतु पोचलो मात्र फाशीच्या तख्त्यावर! किंवा तुरुंगात खडत पडण्यासाठी कुठल्या वळणावर आमचा मार्ग चुकला? कुणाची चूक झाली?—या सर्व गोष्टी मोकळेपणानं सांगितल्या खेरीज भारतातील तरुणांना गदर-पार्टीच्या इतिहासाचं नीट आकलन होऊ शकणार नाही.

२३ फेब्रुवारी १९१५ नंतर ज्या धर-पकडी अमलात आल्या, त्याच्यापैकी नऊ जण माफीचे साक्षीदार बनले. आपली सुटका होईल या आशेवरच ते साक्षीदार बनले. ज्या नेत्यांनी क्रांतिकार्यासाठी त्यांची निवड केली, त्याच्यासंबंधी असं म्हटलं की क्रांतिसारखी कामगिरी पार पाडण्यासाठी जे मन लागतं, जी बुद्धिमत्ता लागते ती तपासल्याशिवाय ही निवड करण्यात त्यांची चूकच झाली होती. यात गैर असं काय आहे? आम्ही ज्याला अमूल्य रत्न म्हणून संबोधितो त्या करतारसिंग सराबाने—ज्या युवकांना जवळ केलं. ती सगळी कोवळ्या वयाची मुलं होती. त्या सर्वांना लाहोर येथील मुलांच्या तुरुंगात ' भरती करण्यात आलं. ते सर्वच फार कमकुवत निघाले.

त्या नऊ साक्षीदारांच्या जबान्यांमुळं ८५ भारतीयांविरुद्ध वॉरंटस् काढण्यात आली होती. त्यांच्यापैकी बहुतेक जण आधीच तुरुंगात डांबण्यात आले होते. खटल्याच्या वेळी ८५पैकी फक्त ६५ जणांनाच पोलिस कोर्टासमोर हजर करू शकले होते. लाहोर मध्यवर्ती कारागृहाच्या एका बॅरेकमध्येच कोर्ट भरविण्यात आलं. जिथं कधी कैदी बसले होते त्या जागी आता ब्रिटिश सरकारचे न्यायाधीश येऊन बसले होते.

गारुड्यासारखा खेळ तिथं उभा राहिला. त्यांना जे करायचं होतं त्याचा निर्णय अगोदरच झाला होता. खटला चालवून इंग्रज सरकार असं भासवण्याचा प्रयत्न करत होतं की जे भारतीय, इंग्रज सत्ता उलथून टाकण्याचा विचार करत होते त्यांचं हे कृत्य अतिशय मूर्खपणाचं आहे आणि ज्या भारतीयांनी अशा बंडखोरांना पकडून देण्यासाठी शासनाची मदत केली आहे—ते भारतीय अत्यंत एकनिष्ठ आणि प्रामाणिक आहेत. जी राजवट उखडून टाकण्याचा विचार ही मंडळी करत आहेत; ती राजवट प्रामाणिक भारतीय जनतेला सुरक्षित ठेवण्याच्या प्रयत्नात आहे. इंग्रज राजवटीची मुळं पातालापर्यंत खोलवर रुजलेली होती.

मिस्टर पॅटमन, लाहोरचे एक प्रख्यात फौजदारी वकील होते, त्यांना सरकार-पक्षातर्फे नियुक्त करण्यात आलं. त्यांची रोजची फी रु. २,००० होती. भारतीय जनतेच्या निढळाच्या घामानं मिळवलेला पैसा दररोज हे सिद्ध करण्यासाठी खर्च करण्यात येऊ लागला की देशप्रेमाचा जी मंडळी उदो उदो करत आहेत—ती देशभक्त नसून देशद्रोही आहेत आणि अशा देशद्रोही लोकांना जिवंत राहण्याचा मुळीच हक्क नाही.

गदर-पार्टीला बरीच प्रसिद्धी मिळाली होती. जगातील सर्व क्रांतिकारकांना हे कळून चुकलं होतं की गदर-पार्टीवाले भारतात क्रांती करून आपल्या देशाला इंग्रजांच्या तावडीतून मुक्त करू इच्छितात. आम्ही स्वहितासाठी बचाव दिला किंवा आम्ही गप्प राहिलो तो इंग्रज राजवट ही अत्यंत जुलमी आहे आणि आम्ही गदर-पार्टीच्या लोकांनी ही राजवट उलथून नाही टाकली तर देश कसा स्वतंत्र होणार असा आमच्यासमोर मोठाच प्रश्न उभा राहिला. ह्या गोष्टी मांडाव्यात का मांडू नयेत? आम्ही गप्प राहिलो तर गदर-पार्टीचं अस्तित्व जगाला कसं कळणार? ही बाब विचारात घेतल्यानंतर असा निर्णय घेण्यात आला आमच्यापैकी काही-जणांनी बुलंद आवाजात आम्ही भारतातील इंग्रज राज्यकर्त्यांचे कट्टे शत्रू आहोत—आमचं आपल्या देशावर प्रेम आहे आणि जुलमी राजवटीचा आम्ही तिरस्कार करतो, अशी जबानी द्यावी, आमचे सर्व साथीदार या मुद्यावर सहमत होते. ६५ पैकी ७ जणांनी गदर-पार्टीच्या चळवळीची सर्व जबाबदारी स्वतः स्वीकारावी असं ठरलं त्या साथीदारांची नावं होती—बाबा सोहनसिंह भकना, पंडित जगतराम भारद्वाज, हरयाणा, सरदार करतारसिंह सराबा, श्री. विष्णु गणेश पिंगळे, सरदार जगतसिंग, सरदार हरनामसिंह आणि पृथ्वीसिंह, लालडू—म्हणजे मी स्वतः.

सर्व साथीदारांनी सात जणांत माझं नाव समाविष्ट करण्याचं ठरवलं. सरदार करतारसिंह सराबा सोडल्यास वयानं मी सर्वांत छोटा होतो. श्री. विष्णु गणेश पिंगळे लोकमान्य टिळकांनी स्थापन केलेल्या समर्थ विद्यालय ह्या राष्ट्रीय शाळेचे विद्यार्थी होते. माझ्यावर पोलिसांनी विशेष असे गंभीर स्वरूपाचे आरोप लादलेले नव्हते जेव्हा अंबाला येथील लाला दुनीचन्द, सरकारी वकिलांना भेटून यांनी माझी खटल्याची फाईल त्यांना दाखवली तेव्हा सरकारी वकील श्री. पॅटमन त्यांना म्हणाले की माझी रु. २,००० फी जर तुम्ही दिली तर या कागदपत्रांच्या आधारे मी पृथ्वीसिंहाची सुटका करू शकेन. सरकारी वकिलाच्या मिस्टर पॅटमन यांच्या आश्वासनामुळे माझ्या वडिलांना रु. २,००० फी देऊन आपल्या मुलाची सुटका करून घ्यावी असा मोह निर्माण झाला होता. तुरुंगाच्या दाराशी त्यांनी माझी भेट घेऊन ही सर्व हकीकत सांगितली. अर्जही त्यांनी सादर केला होता. उत्तरादाखल मी त्यांना एवढंच सांगितलं की त्यांच्याकडून पैसे काढण्यासाठी सरकारी वकिलानं त्यांना भुरळ घातली आहे. "इंग्रज सरकार मला आपला कट्टा शत्रू समजतं सरकारी वकिलाच्या शिफारशीनं माझी सुटका होईल ही आशा सोडून द्या. तुम्ही बर्माहून इथपर्यंत आलात, माझ्या सुटकेसाठी प्रयत्न केलेत, मी तुम्हाला अडवत होतो परंतु तुम्ही माझं ऐकलं नाही. मी कधी एकाही शब्दानं इंग्रजांचा शत्रू आहे, हे तुम्हाला सांगितले नाही. माझ्या मनातल्या भावना लपवत राहिलो. अम्बाला येथील खटल्याच्या वेळी मी जर हे लपवलं नसतं तर माझे सर्व साथीदारा

एव्हाना फासावर लटकले असते. त्यांना वाचवण्यासाठी मी भोळेपणाचं सोंग घेतलं माझ्या तशा वागण्यानं मी यशस्वी ठरलो. आता मी माझ्या ६५ साथीदारांसवेत उभा आहे. आम्ही सर्वांवर इंग्रजी राजवट उलथून टाकण्याचा आरोप लावण्यात आला आहे. सरकारच्या नऊ साक्षीदारांनी जबानी देऊन हे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे की अमेरिकेत गदर-पार्टी बळकट करणाऱ्यांपैकी मी एक आहे आणि भारतात मी इंग्रजी राजवट उलथून टाकण्यासाठीच आलो आहे. मला हे चांगलं ठाऊक आहे की मी ज्या मार्गानं निघालो आहे त्या मार्गावर मृत्यू आहे. तुम्ही मला वाचवण्याची आशा सोडणं बरं. क्षत्रियांचा इतिहास हेच सांगतो की आपल्या पूर्वजांनी आपल्या मुलांना युद्धावर पाठवते वेळी आशीर्वाद दिले होते. मलाही तुमचा आशीर्वाद हवा आहे. सर्व प्रकारचा मोह सोडून तुम्ही बर्माला परत जा व शांततेनं आपलं जीवन व्यतीत करा". वडिलांनी माझं म्हणणं अत्यंत धैर्यानं ऐकून घेतलं आणि त्यानंतर एक शब्दही न बोलता ते शांतपणे तेथून उठले व निघून गेले.

सरकारी वकिलानं आपल्या प्रारंभीच्या युक्तिवादात असं सिद्ध करण्याचा प्रयत्न केला की आम्ही सर्वांनी इंग्रजी राजवट उलथून टाकण्यासाठी लढाई करण्याचा एक कट रचलेला आहे. आमच्या ह्या अपराधाबद्दल आम्हाला मृत्युदंडच मिळणं योग्य होईल. वर ज्या सात जणांचा नामोल्लेख करण्यात आला आहे त्या सर्वांनी असं पक्कं ठरवलं होतं की आपल्यातर्फे जे निवेदन देण्यात येईल ते भावनात्मक असेल आम्ही दहा जणांनी थोडीच आपलं म्हणणं मांडलं परंतु पंडित जगतराम यांनी मात्र विस्तारानं लिखित स्वरूपात आपली जबानी सादर केली. आपल्या लेखी निवेदनात त्यांनी इंग्रजांनी केलेल्या अनन्वित अत्याचारांचं चित्रच उभं केलं होतं. त्याच्या या अत्याचारांचा सूड प्रत्येक इंग्रजाला गोळ्या घालून ठार करूनच उगवता येईल, हाच आमचा निर्णय होता. त्यांची ही जबानी 'लाहोर कट खटल्यातील' कागदपत्रात आजही बघायला मिळू शकेल. आमच्या सर्वांच्याच हृदयातील भावनांचं ते चित्र होतं.

मी माझ्या जबानीत इंग्रज पोलिस स्वतःला सबंध जगात अत्यंत हुषार मानतात परंतु ते मूर्ख आहेत असं सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. मी इंग्रज जज्ज साहेबांना म्हणालो "एके दिवशी मी लाहोरच्या अनारकली बाजारातून जाते वेळी पंडित जगतराम यांना म्हटलं अरे यार! इंग्रज पोलिस फार हुषार आहेत, असं आपण ऐकत होतो. कुणीही देशभक्त त्यांच्या नजरेतून निसटू शकत नाही. आम्ही दोघांनी अमेरिकेत गदर-पार्टी ही संघटना मजबूत केली. अमेरिकेपासून कलकत्त्यापर्यंत बुलंद आवाजात आम्ही घोषणा दिल्या की आम्ही इंग्रजांचे शत्रू आहोत. भारतात पोचल्यानंतर इंग्रजांचा नायनाट करणं हे आमचं आद्य कर्तव्य आहे. एवढं सगळं उघड उघड बोललो असतानाही इंग्रज पोलिसांनी आम्हाला पकडलं नाही. त्यांनी साध्या भोळ्या गावकऱ्यांना जहाजावरच पकडून तुरुंगात डांबलं. ही पोलिसांची हुषारी!"

ज्या शब्दात आज मी माझी नेहमीची जबानी लिहून मांडत आहे त्या भाषेत तेव्हा मी नव्हतो. तेव्हा मी सरळ, माझ्या पंजाबी भाषेत आणि भोळेभाबडेपणाने म्हणालो होतो, 'इनां जट्टा बूटां नूं फड के जेल विच बन्द कर दित्ता'

या शब्दात बोलायचं कारणच हे होतं की त्यांनी मला एखादा गावंढळ समजून सोडून द्यावं. मी निर्दोष आहे हे त्यांना पटवावं.

माझ्या साथीदारांना माझी जबानी ऐकताच जोरात हसू फुटलं. त्यांनी टाळ्याही पिटल्या. इंग्रज जज्ज महाशय माझं म्हणणं ऐकून आणि सर्व प्रकार बघून अत्यंत क्रोधित झाले. त्यांना इंग्रजी सत्तेचा हा घोर अपमान वाटला. कोर्टात शांतता प्रस्थापित करण्यासाठी त्यांनी जोरात घंटा वाजवली. परंतु हास्याच्या आवाजात घंटेचा आवाज लुप्त झाला होता. "नगाऱ्याच्या आवाजापुढे पुंगी कुणाला ऐकू येणार?".

आपल्या या अशा जबानीने हा तरुण मृत्यूला आमंत्रण देतो आहे, हे सर्वांना समजलं. सरदार करतारसिंह सराबा वयानं माझ्यापेक्षा दोन वर्षांनं धाकटा होता. तो अतिशय निर्भय वृत्तीचा होता. आपल्या मनातल्या भावना त्यानं मोठ्या सुंदर रीतीनं व्यक्त केल्या. त्याचं निवेदन अतिशय ओजस्वी होतं. भारताच्या क्रांतीच्या इतिहासात त्याच्या निवेदनाला स्थान मिळालं पाहिजे. आमच्यापैकी अनेकांनी बचावासाठी स्वखर्चाने वकील दिले होते. वकीलांनाही मात्र कोर्टाच्या निकालापूर्वीच आपला काय निकाल आहे, हे ओळखत होतं. यामुळे स्वाभाविकपणेच कोर्टाच्या कामकाजाबद्दल सर्वजण बेफिकिर होते. इंग्रज सरकारला कायद्याचं नाटक करायचं होतं. कोर्ट खटला चालवणं हे सगळं नाटक होतं. सरकारतर्फे दररोज २०–२० रुपये खर्चून आमचा बचाव करण्यासाठी सहा वकील देण्यात आले होते. हे सगळे नवशिके, नुकतेच पास झालेले वकील होते. विरुद्ध बाजूस सरकारी वकील होता. त्याची दररोजची फी रु. २,००० होती. त्याने आम्हाला फाशीवर लटकावण्याचा निश्चयच केलेला होता.

मेंढूभूर रामसिंह राजपूतला सरकारपक्षाचा साक्षीदार म्हणून उभं करण्यात आलं. गदर-पार्टीच्या प्रारंभापासूनच तो माझा साथीदार म्हणून काम करत होता. आमचं एकमेकांवर प्रेम होतं—आम्ही एकत्रच राहत होतो. माझी कोणतीही गोष्ट मी त्याच्यापासून लपवली नव्हती. माझ्यासंबंधी जे जे त्याला माहीत होतं ते त्यानं पोलिसांना दिलेल्या निवेदनात लिहिलेलं होतं. माझ्याच्या साथीदारांना तीन वेळा आमच्यासमोर आणून त्यांच्यासंबंधी लेखी निवेदन दिलं होतं—त्या व्यक्ती म्हणजे आम्हीच आहोत का नाही, याची पक्की खात्री करून घेण्यात आली. तीन वेळा अमरसिंहाला पोलिसांनी आमच्या समोरून नेऊन त्याच्याकडून आमच्यापैकी प्रत्येकाचं नाव घेऊन

हेच ते लोक आहेत असं वदवून घेण्यात आलं. तिन्ही वेळा तो जेव्हा माझ्या पुढ्यात येऊन उभा राहिला तेव्हा माझ्या डोळ्याला डोळा भिडवण्याची त्याला हिंमत झाली नाही. तो तिथून पुढे निघून गेला. शेवटी जज्ज महाशयांनी त्याला जाणीव करून दिली. "तुम्ही अॅप्रूव्हर बनला आहात, सरकारपक्षाचे साक्षीदार आहात, आम्हाला असं समजलं आहे की, पृथ्वीसिंह प्रारंभापासून तुमचा साथीदार आहे, मित्र आहे. पृथ्वीसिंह या अपराध्यांमध्ये उभा आहे परंतु तुम्ही त्याला ओळखलं नाही. परत एकदा त्यांच्याजवळ जा व पृथ्वीसिंहाला ओळखून काढा". जज्जसाहेबांची धमकी ऐकून, जीव वाचवण्यासाठी सरकारपक्षाचा साक्षीदार बनलेला आमचा मित्र चळचळ कापू लागला. तो म्हणाला "मी त्याला ओळखलं आहे. पृथ्वीसिंह तो तिथं उभा आहे". जज्जसाहेबांनी विचारलं "पहिल्यांदाच तू का नाही ओळखलंस"? अमरसिंह टोलवाटोलवी करत म्हणाला "तो जरा काळा झालेला आहे!" या त्याच्या उत्तरानं एक धीट वकील म्हणाला "ए अॅप्रूव्हर, रंग काळा झाला आहे तो तुझा की त्याचा?"

सरकारच्यावतीनं जे वकील आमच्यासाठी नियुक्त करण्यात आले होते ते सरकारी वकिलांना आणि सरकारपक्षाच्या साक्षीदारांना नाही म्हटलं तरी जरा वचकून वागत होते. त्यांची ती उलाढाल बघून आम्हाला मौज वाटत होती. आम्ही आपसात बोलण्यात किंवा चणे तोंडात टाकण्यात गढून जात होतो. हा सर्व तमाशा तब्बल पाच महिने चालू होता. पहिल्या "लाहोर कट खटल्याचा" वृत्तांत सरकारच्यावतीनं प्रसिद्ध झालेला आहे.

न्यायाधिकरणामध्ये—ट्रिब्युनल—दोन सदस्य इंग्रज होते आणि एक भारतीय होता. भारतीय जज्जाचं नाव होतं पंडित शिवनारायण. ते होते तर इंग्रज सरकारचेच नोकर परंतु केव्हा केव्हा त्यांच्या तोंडून काही शब्द असे बाहेर पडायचे की त्यामुळे ते भारतीय आहेत हे लक्षात येई. एके दिवशी एका अॅप्रूव्हरनं असं सांगितलं की "गदर की गूंज" हे पुस्तक वाचल्यानंतर त्याच्या मनात संतापाचा आग-डोंब उसळला. तो आपलं निवेदन पंजाबी भाषेतून करत होता. म्हणून हिन्दी जज्जमहाशयांनी त्याला पंजाबी भाषेतच प्रश्न केला "हुण बुझ गयी है कि नहीं?" हा प्रश्न ऐकून आम्ही जोरजोरात हसू लागलो. इंग्रज जज्जांची तोंडं मात्र आणखीनच लालभडक दिसू लागली.

खटला उन्हाळ्यात चालू होता. जज्जसाहेबांच्या डोक्यावर पंखा हलत होता. आम्ही घामानं चिंब होत असू. आम्ही कायम चणे तोंडात टाकत कामकाज बघत होतो. तहान लागली तर प्यायला थंड पाणी सुद्धा मिळत नव्हतं. खटल्याचा निकाल लिहिण्यासाठी सर्व जज्ज दोन महिने थंड हवेच्या पहाडी मुलुखात जाऊन राहिले. तिथं थंड डोक्यानं काहीजणांना फाशीची तर काहींना कैदेची शिक्षा

त्यांनी ठोठावली. "थंड हवेत थंड डोक्यानं" इंग्रज न्यायाधिशांचा "फाशी किंवा जन्मठेप" हा निकाल लाहोरच्या भयंकर उष्णतेत, जेलमधील कोठड्यात पडलेल्या आम्हा सर्वांना अगोदरच माहीत होता.

## फाशीची मधुर प्रतीक्षा

१४ सप्टेंबर १९१५ ला आम्हाला जेलमधल्या कोठड्यातून बाहेर काढून आमच्या वेगवेगळ्या तुकड्या बनवण्यात आल्या व आम्हाला कोर्टापुढे उभं करण्यात आलं. जजसाहेबांनी आमच्यापैकी प्रत्येकाचं नाव पुकारून आम्हाला निकाल सांगितला. ज्या तुकडी समवेत मला उभं केलं होतं, त्या तुकडीत मी एकटाच मृत्युदंडाची शिक्षा झालेला होतो. इतरांना जन्मठेपेची शिक्षा झाली होती. पोलिसांनी मला बाजूला काढून फाशीची शिक्षा झालेल्या कैद्यांच्या खोलीत घेऊन गेले. मी मूक होतो. माझ्या सहकाऱ्यांचे चेहरे सांगत होते–"आम्हालाही मृत्युदंडाची शिक्षा झाली असती तर किती चांगलं झालं असतं". पोलिसांनी आम्हाला आपसात बोलण्याची मनाई केली. फार लौकर आमची एकमेकांपासून ताटातूट करण्यात आली. फासावर जावयाच्या कैद्यांच्या खोलीत गेल्यानंतर हे समजणं कठीण होतं की तिथं कुणाकुणाला बंद करून ठेवलेलं आहे. पहारेकऱ्यांना विचारलं तर ते काहीच सांगायला तयार नव्हते. एवढ्या मोठ्या संख्येनं, सर्वांना एकाच वेळी फासावर लटकावणं हे काम पोलिसांनाही अवघड वाटत होतं. एकूण प्रकार त्यांनाही भयंकर स्वरूपाचाच वाटला. त्यांच्याही चेहऱ्यावर औदासीन्य दिसू लागलं. ते आमच्याशी काहीच बोलेनात. आम्ही एक युक्ती शोधून काढली. पहिल्यांदा आम्ही जोरजोरात आरडाओरडा केला आणि त्यानंतर आपापल्या खोलीतून आपल्या नावाचा पुकारा करून कोण कुठं आहे हे एकमेकांना कळवण्याचा प्रयत्न केला. आमचे कोण कोण साथीदार शेवटपर्यंत आहेत, हेही त्यामुळं आम्हाला कळलं.

तुरुंगात कैद्यांना धार्मिक पुस्तकं जवळ बाळगता येतात–अशी परवानगी देण्यात येते दिवसभराची कामे आटोपल्यावर वेळ मिळाल्यानंतर अशी पुस्तकं वाचता येतात. ही परवानगी सूर्यप्रकाश आहे तोपर्यंतच वाचन करावं, रात्रीच्या वेळी नाही, अशी होती. इथं मी पहिल्यांदा ॲनी बेझंटनी केलेला भगवद्गीतेचा इंग्रजी अनुवाद वाचला. गीतेचं तत्वज्ञान खरोखरच मोठं गूढ आहे. त्यावेळी मला तो गूढ अर्थ फारसा समजला नाही. परंतु ते तत्वज्ञान वाचून वारंवार एक प्रश्न माझ्या मनापुढे उभा राहिला की ज्या देशातील वातावरणात अनेक शतके ऋषीमुनींनी "आत्मा अमर आहे तो अविनाशी आहे"–त्याला कुणी जाळू शकत नाही–तो नष्ट होत नाही असं शिकवलं ही शिकवण मिळालेल्या धर्मियांनी मृत्यूला घाबरून गुलामगिरीला का बरं कवटाळलं ? माझ्या मनात हा प्रश्न वारंवार उभा राही–पण उत्तर मिळत नव्हतं.

मृत्युदंडाची शिक्षा ऐकल्यापासून आम्ही सर्व चोवीस जण, मोठ्या उत्सुकतेनं वाट बघत होतो की आम्हाला केव्हा खोलीबाहेर काढतात व केव्हा आमच्या मानेभोवती फास आवळतात. जेव्हा सबंध दिवस असाच गेला तेव्हा आम्हाला वाटलं की हे काम बहुधा रात्रीच्या वेळी पार पाडलं जाईल. रात्रही आमची वाट बघण्यातच गेली. सकाळ उजाडल्याबरोबर आमच्या खोल्यांपुढं पाण्याची बादली आणून एकेक डबा आमच्या हाती देण्यात आला. स्नान करण्यासाठी आम्हाला आज्ञा देण्यात आली. स्नान आटोपल्यावर ते आम्हाला फाशीच्या तख्तावर घेऊन जाणार होते फाशीच्या तख्तावर एकावेळी तिघेजण उभे राहू शकत होते. आमच्या साथीदारांनी लगेचच तीन–तीन जणांच्या तुकड्या बनवल्या. एकमेकांशी हास्य-विनोद करत ते म्हणू लागले की कुणीही घाबरून रडायचं नाही. तुमच्या रडण्यानं आपली तुकडी बदनाम होईल. आपल्या तुकडीची बेअब्रू होऊ देऊ नका. आपल्याला खोलीपासून फाशीच्या तख्तापर्यंत सिंहगर्जना करत जायचं आहे आणि फासाच्या दोराचं चुंबन घ्यायचं आहे.

पहारेकऱ्यांच्या सूचनेनुसार स्नान आटोपून आम्ही वाट बघत बसलो. स्वतंत्र भारताच्या. स्वतंत्र वातावरणातील तरुण बंधूनो ! फाशी द्यायच्या अगोदर स्नान करायला का सांगतात? अर्थ स्पष्ट आहे. हिन्दुधर्मियात मृतदेहावर अग्निसंस्कार करण्यापूर्वी स्नान घालतात. जेलमधल्या गोऱ्या साहेबानं असा विचार केला असावा की २४ शवांना शिवलेनंतर स्नान घालणं फारच कष्टाचं होईल–तेव्हा अगोदरच त्यांना स्नान करायला सांगावं. थोड्याच वेळात ज्यांचा मृत्यु व्हायचा आहे त्यानं आधीच स्नान आटोपणं उचित आहे.

मृत्यूसाठी तयार होऊन बसणं आणि स्नान वगैरे आटोपून मृत्यूची प्रतीक्षा करणं, ही काही साधारण गोष्ट नाही. अशा प्रकारची कल्पना करणंसुद्धा कठीण आहे. या गोष्टीचा आनंद त्यांनाच चाखता येतो ज्यांना मृत्यूची प्रतीक्षा करण्याची अशी संधी चालून आली असेल, असं भाग्य ज्यांच्या वाट्याला आलं असेल. स्नान आटोपल्यानंतरचा एक तास मोठ्या अस्वस्थतेत गेला. सूर्य आता वर आला. दुसऱ्या कैद्यांच्या खोल्यांची दारंही उघडली. आता आम्हाला खूपच उदास वाटू लागलं. आम्हाला असं वाटलं की आमचा आजचा दिवसही असाच कैदेत जाणार. दिवस संपला–रात्रही संपली. दुसरे दिवशी परत पाण्याची बादली खोलीसमोर ठेवण्यात आली. आम्ही स्नान करून परत मार्गप्रतीक्षा करत बसलो. आम्हाला मुक्ती मिळाली नाही. आम्ही अजूनही कैदेत होतो. तिसऱ्या दिवशीही हाच प्रकार झाला. आता आमच्या मनात नाना प्रकारच्या शंकाकुशंका येऊ लागल्या. काही लोकांच्या मनात या जेलमध्ये आपल्याला फासावर लटकावणार नाहीत, असा विचार आला. सर्वसामान्य लोकांच्या मनात दहशत निर्माण करण्यासाठी, सैनिकी बन्दोबस्तात, आम्हाला लाहोरमधील चौकाचौकातून जाहीरपणे फासावर लटकावतील—असं वाटू लागलं.

त्या सुमारास एका विशिष्ट जातीच्या पुढाऱ्यानं एका सार्वजनिक सभेच्या ठिकाणी जाहीरपणे ही गोष्ट सांगितली की इंग्रज न्यायालयानं २४ भारतीयांना फाशी देण्याचा हुकूम दिला आहे. कदाचित उद्याची सकाळ होण्यापूर्वी हे सर्वजण फासावर लटकावले जातील. आमची तर सरकारला अशी विनंती आहे की या देशद्रोह्यांना रात्रभर देखील जिवंत ठेवण्याचं कारण नाही. इंग्रजी राजवट उलथून टाकण्याचा प्रयत्न करणाऱ्यांना संध्याकाळ होण्यापूर्वी फासावर लटकावण्यात यावं! हे भाषण करणारे नेते त्या सुमारास खूपच प्रसिद्ध होते. आज देखील त्याच महान नेत्यांचे वंशज स्वतंत्र भारताच्या सरकारात मोठमोठ्या पदांवर बसलेले आहेत!

जेलमध्ये फासावर लटकावण्याचं काम पार पाडण्यासाठी एका खास माणसाची वेतन देऊन नियुक्ती करण्यात येते. 'जल्लाद' (मांग) म्हणून तो ओळखला जातो. मासिक पगाराव्यतिरिक्त फासावर चढणाऱ्या प्रत्येक कैद्यामागे त्याला १० रुपये अधिक देण्यात येतात. हा 'जल्लाद' जो लाहोर येथील मध्यवर्ती तुरुंगातील कैद्यांना फासावर लटकावण्याचं काम करत होता, त्याला जेव्हा एकदम २४ लोकांना फाशी द्यायचं आहे हे समजलं तेव्हा त्याला खूप आनंद झाला. त्यानं आपल्या गल्लीतील मित्रांना सांगितलं की ज्या दिवशी तो २४ जणांना फासावर लटकावील, त्या दिवशी सर्वांना २५ रुपयांची मिठाई वाटली जाईल. आज कदाचित या गोष्टीवर कुणाचा विश्वास बसणार नाही. परंतु समाजातील एक मान्यवर पुढारी ज्यांचे वंशज आज देखील मोठ्या पदांवर आहेत, ते जर आम्हाला एक रात्रही जिवंत ठेवू नये असं म्हणतात तर मग फासावर लटकावण्याचं काम करणाऱ्या सामान्य माणसाचा असा विचार करण्यात काय दोष होता?

एकूण देशाचं वातावरण अशा प्रकारचं होतं आणि अशा प्रतिकूल परिस्थितीशी टक्कर घेत आम्ही स्वातंत्र्य-संग्रामात उतरलो होतो. देशाला स्वतंत्र करण्यासाठी मृत्यूला हाक देत होतो. सतत १४ दिवस सकाळी स्नान करून फासावर जायची आम्ही वाट बघत राहिलो. आमच्या सर्वांच्याच मनात धार्मिक भावना तीव्र होत्या. सगळ्यांचाच या गोष्टीवर दृढ विश्वास होता की ज्यांचा आत्मा शुद्ध असतो त्यांनाच मृत्यूनंतर त्यांच्या इच्छेनुसार पुनर्जन्म मिळतो. ह्यामुळेच फाशीचा दोर आम्हाला मृत्यूचं भय निर्माण करत नव्हता तर त्यात आम्हाला जीवनाच्या आणखी एका नव्या पर्वाचं चित्र दिसत होतं. त्यामुळे आमचा आजचा तुरुंगवास संपून, एका नव्या जीवनाची आम्हाला सुरुवात करता येत होती. काही वेळा अंधविश्वासही माणसाला आनंदी बनवतो. प्रत्येक दिवशी सकाळी स्नान आटोपल्यानंतर, मृत्यु झाल्यावर आपल्याला नवा जन्म लाभणार, या कल्पनेनं आम्हाला वेडं करून टाकलं होतं. या वेडाच्या भरातच आम्ही गात होतो, नाचत होतो. १४ दिवसांनंतर मात्र आमचा हा आनंदही हिरावून घेण्यात आला.

भाई परमानन्द हे समाजातील एक प्रख्यात नेते होते. ते मोठे तेजस्वी विद्वान होते आणि एक योगी पुरुष म्हणूनही त्यांच्याविषयी सर्वांना आदर होता. त्यांच्या सदाचार-पूर्ण जीवनामुळं लोकांच्या मनात त्यांच्याविषयी पूज्य भाव होता. भारताचा इतिहास त्यांनी लिहिला होता—तो खूप नावाजला गेला होता. देशावर त्यांचं अतोनात प्रेम होतं. यामुळं त्यांना काही काळ देशाबाहेर पाठवण्यात आलं होतं. सरकारी वकिलाला त्यांच्या-वर कुठलाही आरोप ठेवता आला नव्हता.—सरकार पक्षाला भाई परमानन्दांना अपराधी ठरवू शकेल असा एकही साक्षीदार सापडू शकला नाही. इंग्रजी न्यायालयानं त्यांनाही इतरांसमवेत फाशीची शिक्षा सुनावली, तेव्हा या घटनेनं देशभर खळबळ निर्माण झाली. भाई परमानन्दजींचे इष्टमित्र, आर्य समाजाचे सर्व पुढारी, पंडित मदन मोहन मालवीय इतकाच नव्हे तर ॲनी बेझंट देखील ह्या बातमीनं सुन्न झाल्या. सर्वांच्या पुढं एकच प्रश्न होता की अशा या देवमाणसाला फाशीच्या दोरातून कसं सोडवता येईल? या घटनेमुळं एक आंदोलनच उभं राहिलं. हे आंदोलन हळूहळू उग्र बनलं. आमच्या २४ जणांपैकी काही लोक असेही होते जे अमेरिकेतून भारतात परतले आणि बन्दरावर उतरताच त्यांना पकडण्यात आलं. ते कोणत्याही कट-कारस्थानात सामील नव्हते. त्यांनाही मृत्यु-दंडाची शिक्षा ठोठवण्यात आली. ह्या सर्व गोष्टींमुळे इंग्रज सरकारला आपल्या निर्णयाचा फेरविचार करणं आवश्यक वाटू लागलं. व्हॉइसरॉयच्या सल्लागार समितीनं दोन महिने-पर्यंत या गोष्टीचा खल केला. आमचे मात्र मानसिक हाल चालले होते.

फाशीच्या दोराचा एकच झटका आणि त्यानंतर मृत्यु, किंवा आयुष्यभर तुरुंगात हाल अपेष्टा भोगत सडत पडणं—या दोन परस्पर विरुद्ध चित्रांचं आम्हाला दर्शन घडत होतं आयुष्यभर तुरुंगात खितपत पडण्याचा विचार आम्हाला फारच त्रासदायक वाटत होता. एव्हाना आम्ही मृत्यूची मानसिक तयारी केली होती. जेल जीवनाच्या हाल-अपेष्टा सहन करत जगावं कसं हेही आम्ही शिकलो होतो. वकिलांनी आम्हाला सल्ला दिला की तुरुंगातून सुटकेसाठी आणि फाशीची शिक्षा माफ होण्यासाठी तुम्ही उच्च न्यायालयात अपील दाखल करा. ह्या बरोबरच बाहेरून अशा बातम्यादेखील आमच्यापर्यंत पोचत की जर्मन फौजांची सरशी होऊन त्या पुढे-पुढे घुसत चालल्या आहेत. काही तरी उपायांनी फाशीची शिक्षा लांबविण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. जर्मन फौजा इथपर्यंत येऊन पोचल्या तर आपल्याला मुक्त करतील. आमच्यापैकी अनेकांच्याकडून वकिलांनी अपिलं लिहून घेतली. माझ्याकडेही अनेक वकिलांनी येऊन अपील करण्याबद्दल मला गळ घातली जेलमधल्या अधिकाऱ्यांनीही मला समजावलं आणि मी शेवटी अपील करण्यासाठी राजी झालो. मात्र माझी एक अट होती की अपील मी सांगेन त्याप्रमाणं तयार केलं पाहिजे. मी माझ्या अपिलात हे नमूद केलं की जे काही मी केलेलं आहे, ते मी माझ्या मर्जीनुसार केलेलं आहे. ब्रिटिश राजवट याला अपराध मानून तिनं मला जी मृत्युदंडाची शिक्षा केलेली आहे, ती मला संपूर्णपणे मान्य आहे. जेलमधल्या अधिकाऱ्यांना जेव्हा माझं हे

निवेदन वाचून दाखवण्यात आलं तेव्हा ते आश्चर्यानं उद्‌गारले की हे काय अपील आहे ? मी उत्तर दिलं की यापेक्षा वेगळं असं माझं काही अपीलच नाही. मला हे कधीच समजलं नाही की माझं हे अपील वरपर्यंत कुणी पाठवलं किंवा नाही ?

अपिलाचा निकाल लागेपर्यंतचा काळ फारच कंटाळवाणा वाटत होता. वाचायला-लिहायला आमच्यापाशी काही नव्हतं. दिवस-रात्र आम्ही आमच्या खोल्यांत बन्दिस्त होतो. आम्हाला एकमेकांचे चेहरे देखील बघायला मिळत नव्हते. स्नानदेखील खोलीतच करावे लागे. पाण्याची बादली दाराबाहेर ठेवण्यात यावयाची. दोन्ही वेळचं जेवण बाहेरूनच देण्यात येई. पिंजऱ्यात बन्द केलेल्या जनावरांना खायला देण्यात येतं तसं. सकाळ-संध्याकाळी भंग्याला सफाईकाम करण्यासाठी फक्त दोन मिनिटं दार उघडण्यात येई. १५ नोव्हेंबर १९१६ या दिवशी आमच्या खोल्यांची कुलुपे उघडण्यात आली आणि एकेक करून आम्हा सर्वांना जेलच्या दुसऱ्या भागात एकत्र करण्यात आलं. कुणाला बाहेर आणलं आणि आत कोण कोण राहिले, हे कळायला मार्ग नव्हता. संध्याकाळी जेव्हा जेवण आणलं तेव्हा कितीजण बाहेर आणलेले आहेत, याचा अंदाज करता आला. इथंही आम्ही एक एकटे स्वतंत्र खोल्यांत बन्दिस्त होतो. आम्ही जोरजोरात एकेका नावाचा पुकारा करू लागलो. यानंतर आम्हाला समजून आलं की आमच्यापैकी सात जण अद्याप फाशीच्या कैद्यांच्या खोल्यांत ठेवलेले होते. करतारसिंह सराबा, विष्णु गणेश पिंगळे आदि साथीदारांच्या आठवणी येऊ लागल्या. राहून राहून विचार येत होता की उद्या त्यांच्या जीवनाचा अन्त होणार आहे. सबंध जेलभर ही बातमी वाऱ्यासारखी पसरली. रात्री कुणालाच झोपबसं वाटलं नाही. आमच्यावर पहारा करणाऱ्या जमादारांनीही त्या दिवशी जेवण घेतलं नाही. करतारसिंह सराबावर सर्वांचंच भारी प्रेम होतं.

"है जगाया हिन्द को करतार तेरी मौतने।
कसम हर हिन्दी तुम्हारे खून की खाता है आज"॥

दुसरे दिवशी जेलमधील लोहार कैदी हातोडे आणि अन्य सामान घेऊन आमच्या खोल्यांपाशी आले. आम्ही बन्दिवान होतो, कैदी होतो, परंतु कैद्याचा पोषाख सोडला तर आमच्या शरीरावर इतर काही चिन्हं नव्हती. आता मात्र आमच्या पायात ५ शेर वजनाच्या बेड्या ठोकण्यात आल्या आणि गळ्यात लोखंडी कडा—गुलामीचं चिन्ह—घालण्यात आली. या व्यतिरिक्त एका लाकडी पाटीवर कैद करण्यात आल्याची व सुटकेची तारीख नोंदवण्यात आली होती. माझ्या गळ्यात जी लाकडी पाटी बांधण्यात आली तिच्यावर माझ्या सुटकेचं वर्ष १९५१ असं नोंदवलेलं होतं. जे जीवन आमच्या वाट्याला आलं होतं, ते जगणं भाग होतं.

तिकडे इंग्रजांवर जर्मन घणाघाती घाव घालत होते. परंतु आम्ही मात्र इंग्रजांच्या तावडीत सापडलो होतो. भारतीय पुढारी इंग्रजांना विजय मिळावा यासाठी हर-प्रकारे त्यांना साहाय्य करत होते. भारतीय तरुण भाकरीसाठी जर्मन फौजांशी लढत होते आणि भाजी-पाल्याप्रमाणं कापले जात होते. हिन्दुस्थानच्या भूमिवर असा कुणीही नव्हता—जो या तरुणांना आवाहन करून म्हणेल—"तरुणांनो पुढं या—स्वातंत्र्याच्या या युद्धात सामील व्हा—मातृभूमिसाठी बलिदानाला सज्ज व्हा"—देशाचं एकूण वातावरणच मोठं विचित्र होतं. आपल्या देशात राहण्याचा आमचा हक्कच हिरावण्यात आला होता. आमच्या मनात मात्र सतत हेच शब्द निनादत होते—'तख्त की तख्ता' (सिंहासन की फाशीचा तख्ता). आमच्या पदरात मात्र दोन्हींपैकी काहीच पडलं नाही. वाट्याला आल्या लोह-शृंखला! आमची मनं अशी काही घडली होती की आम्ही परत बेफिकिरीचं जीवन जगू लागलो.

एका संध्याकाळी तिथले अधिकारी सैनिकी पहाऱ्यात आम्हाला घोडागाडीत बसवून लाहोर जवळच्या मोगलपुरा स्टेशनावर घेऊन गेले. तिथं आमच्यासाठी गाडीचे डबे तयार ठेवण्यात आले होते. त्यात आम्हाला बसवण्यात आलं. मेलगाडी तिथं थांबवण्यात आली. आमचे डबे तिला जोडण्यात आले. आमचं टोळकं जोर-जोराने गायला लागलं. शेकडो माणसं डब्यापाशी जमा झाली. रेल्वे प्लॅटफॉर्मवरचे लोक "हे कोण आहेत?" असं एकमेकाला विचारू लागले. जिथं जिथं गाडी थांबत होती तिथं तिथं आम्ही गात होतो आणि आमच्या डब्याभोवती उतारू जमा होऊन तोच प्रश्न विचारत होते "हे आहेत तरी कोण?"

१९१५ साली देशाची राजकीय परिस्थिती एकंदरीत कशी होती याचं अनुमान वरील घटनेवरून करता येईल. पाच महिने जेलमध्येच खटला चालत राहिला. २४ भारतीयांना देशप्रेमाच्या अपराधाबद्दल फाशीची शिक्षा होते—त्यातल्या ७ जणांना फासावर लटकावण्यात येतं. व्हाइसरॉयच्या काउन्सिल पुढे पुन्हा खटला दाखल करण्यात येतो. देशावर प्रेम करणाऱ्या लोकांना इंग्रज काळ्यापाण्यावर घेऊन निघाले आहेत आणि आमचे लोक आमची देशभक्तीपर गाणी ऐकून विचारतात—"हे कोण आहेत?"

लाहोर-कलकत्ता या सबंध प्रवासात एकही जण आम्हाला असा भेटला नाही जो आमची काही विचारपूस करील—आमच्याविषयी सहानुभूती दाखवील. दोन-दोन माणसांना एकेका हातकडीत बन्दिस्त करण्यात आलं होतं. एखाद्याला जरी लघवी किंवा शौचविधीला जायचं असलं तर दुसऱ्यालाही त्याच्यासोबत जावं लागे. अशी होती देशभक्तांना वागणूक—स्वतःला सभ्य म्हणविणाऱ्या इंग्रजांची! स्वातंत्र्य-प्राप्तीनंतर देखील आम्ही अजून त्यांच्याशी संबंध ठेवले आहेत. ह्यापरतं दुसरं दुर्दैव

होणतं?—रेल्वेच्या डब्यात अशा अवघड अवस्थेत आम्ही ४० तास काढले. हा एक विचित्रच मानसिक आणि शारीरिक त्रास आमच्या वाट्याला आला. हावडा स्टेशनवर आम्ही येऊन पोंचलो तेव्हा रात्र झाली होती. बंगालमधल्या क्रांतिकारकांनाही आमची काही बातमी नव्हती. त्यांनाही आमच्या कानावर तोच प्रश्न पडला—" हे कोण आहेत?"

पोलीस-पहाऱ्यातच घोडागाडीत बसवून अलीपूर जेलमध्ये आम्हाला पोंचवण्यात आलं. एखाद्या क्रांतिकारकाची आम्हाला मदत मिळाली असती तर रात्रीच्या काळोखात पोलिसांच्या हातावर तुरी देऊन आम्ही सहजतेने निसटू शकलो असतो.

अलीपूर मध्यवर्ती तुरुंगाच्या खोल्यात आम्हाला बंद करण्यात आलं. तुरुंगातील अधिकारी इतर कैद्यांशी वागतात तीच वागणूक आम्हालाही मिळाली. परंतु या वेळेस आम्ही जरा अडवाअडवीचं धोरण स्वीकारलं, त्याचं फळही लगेच आम्हाला मिळालं. जहाजाच्या प्रतीक्षेत आम्हाला ५ दिवस तिथं रहावं लागलं. 'महाराजा' नावाच्या जहाजावर आम्हाला चढवण्यात आलं. जहाजात जाऊन बसल्यानंतर थोडासा बदल घडून आला. आमच्या हातातल्या बेड्या काढण्यात आल्या. मातृभूमिची सीमा ओलांडून आम्ही पुढं निघालो तेव्हा मनाला खूप उदासीन वाटलं. जिवंतपणी आपण तिथं परत येऊ किंवा नाही—याचा विचार करणं देखील व्यर्थ होतं.

अंदमान बेटांजवळील समुद्राचा रंग नुसता निळा नसून गडद निळा आहे. लांबून बघताना त्या पाण्याचा रंग काळाच दिसतो. याच कारणामुळे तिथं जे कैदी पाठवण्यात येतात त्यांनी या बेटाचं नाव 'काळं पाणी' असं ठेवलं होतं.

तिसऱ्या दिवशी आम्ही अंदमानच्या किनाऱ्यावर येऊन पोंचलो. तिथं पोंचताच आम्हाला हुकूम सुटला की आपापला बाड-बिस्तरा घेऊन आम्ही जहाजाच्या छतावर चढून जावं. वरच्या मजल्यावर येताच आम्ही जेव्हा भोवताल दृष्टी टाकली तेव्हा तिथलं दृश्य फारच सुंदर होतं. तिथले डोंगर आणि वनश्री बघून आम्ही आनंदित झालो. आम्ही जेव्हा आणखी पुढं गेलो—तर तिथं एक प्रशस्त घर दृष्टीस पडलं. मी मनाशी विचार केला, त्या प्रचंड घरात आपल्याला १९५१ साल उजाडेपर्यंत जिवंत राह्यचं आहे. दूर अंतरावरून ते घर एखाद्या भव्य महालाप्रमाणे दिसत होतं.

● ● ●

जहाजावरून खाली उतरून आम्ही जेलच्या दारापर्यंत येऊन पोंचलो. या जेलला "सेल्युलर जेल" (Cellular Jail) 'कोठड्यांचा तुरुंग" म्हणत. इथं सर्व कैद्यांना स्वतंत्र खोल्यांत बन्द करून ठेवतात. इथं एकूण ७४० खोल्या होत्या. आम्ही दारातून आत दाखल झालो. आमच्याबरोबर इतरही शेकडो कैदी होते. त्यांना सर्वांना आत घेऊन गेले—आम्हाला मात्र थांबावं लागलं. तिथल्या जेलरचं नाव "बारी बाबा" (Berry) असं होतं.

काळ्यापाण्याचे कैदी मिस्टर बेरी यांना प्रति-परमेश्वर म्हणून ओळखत होते. इंग्रजी राजवटीनं जुलूम आणि अत्याचार करण्यासाठी हा माणूस शोधून काढला होता. छळ करणाऱ्या बेरीला ही गोष्ट कळाली होती की भारतातील इंग्रजी राजवट उलथून टाकण्याचा प्रयत्न करणारे गदर-पार्टीचे लोक कैदी म्हणून तिथं येत आहेत. आमच्या स्वागताची त्यानं जय्यत तयारी करून ठेवली होती. जेलच्या अधिकाऱ्यानं जेव्हा त्याला हे सांगितलं की जहाजावरून कैदी आलेले आहेत व त्यांना तिथं आवारात बसवून ठेवलं आहे. हे ऐकताच सर्व जामानिमा करून तो मोठ्या रुबाबात आपल्या बंगल्यातून खाली उतरला. आपल्या हातातील वेताची छडी टेकवीत टेकवीत तो हळूहळू आमच्या दिशेनं येऊ लागला. त्याची उंची थोडी बुटकीच होती परंतु शरीर मात्र धिप्पाड होतं. त्याच्याकडे बघून असं वाटत होतं की तीन काठ्यांच्या आधारावर एक लाकडी पिंपच आपल्याकडे आपोआप येत आहे. जवळ आल्याबरोबर त्या चालत्या पिंपातून आवाज उमटला तेव्हा आम्हाला कळून चुकलं की ते पिंप नसून मानवी पोषाख परिधान केलेला एक राक्षस आहे, साक्षात सैतानाचीच मूर्ती आहे. तो म्हणाला—"बॉम्बवाला—स्वराज मांगता—स्वराज नाही कोल्हू देगा." (बॉम्बवाल्यांनो—स्वराज्याची मागणी करता काय? स्वराज्य तर नाही—घाणा मात्र अवश्य मिळेल.) बंगालच्या ज्या क्रांतिकारकांनी इंग्रजांवर बॉम्बफेक केली होती—ते सर्व बॉम्बवाले म्हणवले जात. राजकीय गुन्ह्यासाठी त्यांना जर इथं पाठवण्यात आलं तर त्यांचा उल्लेख 'बॉम्बवाले' म्हणूनच होई. मिस्टर बेरी जेव्हा आमच्या अगदी जवळ येऊन पोंचला, तेव्हा त्याचा चेहरा, त्याचा प्रचंड देह आणि वागणूक बघून आम्हाला जोरात हसू फुटलं. आम्हा कैद्यांची ही वागणूक बघून रागानं तो लाल झाला. तो दारू पिऊनच तिथं आला होता. त्याच्यावर सत्तेची नशाही चढली होती. आमच्यापैकी एकानंही जेव्हा त्याच्या

प्रश्नाचं उत्तर दिलं नाही तेव्हा त्याच्या रागाचा पारा आणखीन वर चढला. त्यानं हाताखालच्या अधिकाऱ्यांना हुकूम सोडला की आम्हाला तावडतोब खोल्यात नेऊन टाका. यांना कुणाशीही बोलू देऊ नका.

आम्हाला कोण कोणत्या खोल्यात बंद करायचं याचा निर्णय आधीच घेण्यात आला होता. आम्हाला आपापल्या खोलीत नेऊन बंद करण्यात आलं. आतापावेतो आम्हाला जी वागणूक मिळाली नव्हती ती काळ्यापाण्यावर आल्या आल्याच अनुभवाला आली. पंजाबमधील तुरुंगात आम्ही स्वतःचे जोडे पायात ठेवू शकत होतो परंतु काळ्या-पाण्यावर येताच आमची पादत्राणं काढून घेण्यात आली. काळ्यापाण्यावरील कैद्यांनी तेथल्या अधिकाऱ्यांना जोड्यांनी बडवलं होतं—यामुळे शासनाला कैद्यांचे जोडे काढून घेणं आवश्यक होऊन बसलं होतं.

अंदमानचं आमचं जीवन सुरू झालं. नोव्हेंबर १९१५ ते जुलै १९२१ चा काळ तसा बराच मोठा होता. या कालावधीत अनेक घटना घडल्या. पहिल्या महायुद्धाचा शेवट झाला होता. भारतात पंजाबात जालियनवाला बागेतील हत्याकांड झालं होतं. गांधीजींनी भारतीय स्वातंत्र्यासाठी महान आंदोलन उभं केलं. रशियामध्ये "लाल-क्रांती" यशस्वी झाली होती. महायुद्ध संपल्यानंतर इंग्रजी राजवटीनं विजयोत्सव साजरे केले. या सगळ्या घटना घडल्या तेव्हा आम्ही मात्र अंदमानच्या खोल्यात बन्दिस्त होतो.

त्या सुमारास अनेक बुद्धिमान क्रांतिकारक अंदमानमध्ये १९०८-०९ पासून कैदी म्हणून ठेवलेले होते. या कैद्यात—वीर विनायक दामोदर सावरकर, गणेश दामोदर सावरकर (थोरले बंधु), बंगालचे प्रख्यात क्रांतिकारक—हेमचन्द्रदास, यांनीच भारतीय युवकांना बॉम्ब बनविण्याची कला शिकवली होती. बीरेन्द्रकुमार घोष (बाबू अरविन्द घोष यांचे धाकटे बंधु)—ज्यांनी बंगालमध्ये क्रांतीचं आंदोलन उभं केलं होतं आणि पुलिन बिहारीदास, ज्यांनी सबंध बंगालमध्ये क्रांतिकार्याची केंद्रं स्थापन केली होती—अशा देशभक्तांचा समावेश होता. काळ्यापाण्यावरील अधिकाऱ्यांनी या मंडळींचा खूप छळ केला होता. वीर सावरकरांचंच उदाहरण सांगता येईल. वीर सावरकरांनी आधुनिक भारतातील तरुणांना क्रांतीचा मंत्र दिला होता. जे तरुण क्रांतिकारक वृत्तीचे होते— सावरकर त्यांचे नेते होते. तेजस्वी व्यक्तिमत्त्वाच्या, सामर्थ्यवान माणसाला इंग्रज अधिकाऱ्यांनी बैलासारखं काम करायला भाग पाडलं. तेलाच्या घाण्याला जुंपून दररोज तीस पौंड तेल गाळण्याची त्यांना शिक्षा करण्यात आली होती.

आपापल्या कोठडीत जाऊन आम्ही ती रात्र कंठली. आम्ही मनोमन हे समजून चुकलो की तुरुंगाच्या या कोठड्या आमच्यासाठी मृत्यूच्याच कोठड्या आहेत. या खड्ड्यातून आम्ही काही जिवंत बाहेर पडणार नाहीत. तुरुंगातल्या अधिकाऱ्यांनी आम्हाला चाबकाचा मार देऊन वठणीवर आणण्याचा ठाम निर्धार केला होता.

सकाळी साडेपाच वाजता आमच्या कोठड्यांची दारं उघडण्यात आली. दोघा-दोघांच्या जोड्या करून आम्हाला खाली बसवून आमची मोजदाद करण्यात आली. नंतर बाहेरच्या मोकळ्या आवारात नेऊन आम्हाला बसवलं. प्रातर्विधीसाठी दहा मिनिटांचा वेळ देण्यात आला. नंतर परत आम्हाला रांगेत बसवण्यात आलं. आमच्या हातात दोन लोखंडी भांडी होती—त्यातलं एक पाणी पिण्यासाठी होतं आणि दुसरं जेवणासाठी. कामाची सुरुवात करण्यापूर्वी आम्हाला उकडलेल्या तांदुळाची पेज देण्यात आली. त्यानंतर सर्व कैदी त्यांना सांगितलेली कामं करण्यासाठी रवाना झाले. आम्हालाही भाताची ती पेज (तिला कांजी म्हणत) पिण्यासाठी देण्यात आली. आमच्या खोलीत लाकडाची एक पाटी आणि जाड दांडकं त्यांनी आणून ठेवलं—नारळाचा काथाही त्या सोबत होता.

काळ्यापाण्यावर नारळाचा फार मोठा उद्योग आहे. नारळाच्या पानांपासून चटया बनतात. फळांतल्या गरापासून—खोबऱ्यापासून तेल काढण्यात येतं, तर त्याचा काथा कुटून लांब लांब "तार" बनवून त्यापासून दोर बनवले जातात. दोरांपासून चटया विणण्यात येतात आणि राहिलेला भुस्सा खत बनवण्यासाठी उपयोगात आणतात.

नारळाची साल हिरवी असेल तर ती कुटून त्याचे तार बनवणं कठीण नाही पण ती सुकलेली असेल तर ती कुटता कुटता कैदी थकून जातो. तार लौकर बनवता येत नाही. सकाळी आठ वाजता आम्हाला हे काम देण्यात आलं. चार वाजेपर्यंत अर्धा शेर वजनाचे तार जेल अधिकाऱ्यांना दाखवायचे होते. ज्याला एवढं काम होत नसे, त्याला सायंकाळी छड्यांचा मार बसे. उघड्या अंगावर वेत सपासप मारले जात. सहा महिने पायांत बेड्या, सात दिवस सतत आठ-आठ तास हात वर बांधून उभं करण्यात येई. गोणपाटाचे कपडे वापरण्यासाठी देत. अशा प्रकारच्या शिक्षा केल्या जात.

अम्बाला जवळच्या शहाबादचा रहमतअलीखान नावाचा एक डाकू तिथं होता. त्याला समजलं की लालडूचा कोणी चौधरी नावाचा कैदी आलेला आहे. लालडू हे अम्बाला जिल्ह्यातलं प्रसिद्ध गाव आहे. रहमतअलीखान जेलमधल्या अधिकाऱ्यांशी भांडण-तंटे करून प्रख्यात बनला होता. जेलच्या अधिकाऱ्यांशी भांडणं त्याला फार आवडे. त्यानं एका दुसऱ्या कैद्याबरोबर मला निरोप पाठवला की नारळाच्या काथ्याचे तार बनवण्याची तुला गरज नाही. बरोबर चार वाजता अर्धा शेर वजनाचं ताराचं बंडल तुझ्या खोलीत येऊन पडेल.

मी माझ्या पद्धतीनं माझं काम चालू ठेवलं. परंतु नारळाच्या काथ्या कुटून तार काढणं मोठं कठीण काम होतं. सायंकाळी चार वाजता केलेलं काम जेलच्या अधिकाऱ्यांना दाखवण्याचा हुकूम सुटला. माझ्या हातात जेलच्या अधिकाऱ्यानं चांगल्या तऱ्हेने बांधलेली तारांची गाठ पाहिली. ती बघून तो मोठ्यानं हसला—म्हणाला—एवढं काम तुम्ही कसं काय केलंत? माझ्यापाशी काहीच उत्तर नव्हतं. मीही हसत हसत म्हणालो—

"मी काम केलं !" माझं ऐकल्यानंतर त्याला भांडत बसण्याची जरूर नव्हती. माझं उत्तर ऐकून घेऊन तो निघून गेला. माझ्या एकाही साथीदाराला अपेक्षित काम पूर्ण करता आलं नव्हतं. सगळ्यांना बजावण्यात आलं की आज त्यांना क्षमा करण्यात आली आहे—उद्या मात्र त्यांनी आपलं काम पुरं केलंच पाहिजे. हे ऐकून कुणी काहीच बोललं नाही. हीच सूचना जेव्हा भाईजींच्या परमानन्दांना करण्यात आली, तेव्हा त्यांनी मात्र हसत हसत जेलच्या अधिकाऱ्याची चेष्टा केली. जेलच्या अधिकाऱ्यानं त्यांना पकडून बारी बाबाच्या समोर उभं केलं. परमानन्दांना बघताच बारीनं शिवी हासडली. परमानन्दांनी विचार केला की त्याच्या इंग्रजी शिव्यांना इंग्रजीतून उत्तर देणं योग्य नाही. इंग्रजीतच आपणही त्याला शिव्या दिल्या तर त्या हिन्दी कैद्यांना कळणार नाहीत. म्हणून त्यांनी जोरात हिन्दुस्तानी आणि पंजाबी भाषेत त्याला शिव्यांची लाखोली वाहिली. काळ्या पाण्याच्या त्या 'परमेश्वराला' एवढ्या गरम गरम आणि मसालेदार शिव्या या अगोदर कधी चाखायला मिळाल्या नसतील. संतापानं तो पंडित परमानन्द यांना मारहाण करण्यासाठी पुढे धावून आला. पंडितजींपर्यंत त्याचे हात पोचण्याच्या आत त्याचं ढेरपोट पंडितजी जवळ आलं. पंडितजी चुकणारे नव्हते, त्यांनी अगदी जोरदार लाथ त्याच्या पोटावर लगावली. त्या लाथेनं जेलचा "परमेश्वर" खुर्चीत जाऊन आदळला. मग काय, सर्वच अधिकारी दंडुके घेऊन पंडितजींच्या अंगावर तुटून पडले. त्यांना खूप चोप देऊन त्यांच्या खोलीत बंद करण्यात आलं. दुसऱ्या दिवशी त्यांना मेजर मरीच्या पुढे उभं करण्यात आलं. मरी जेलचा प्रमुख अधिकारी होता त्यानं पंडितजींना उघड्या अंगावर वीस वेत मारण्याची शिक्षा फर्मावली. पंडित परमानन्द यांना लाकडी तिपाईला बांधण्यात आलं आणि वेत मारण्यासाठी जल्लादाला बोलावण्यात आलं.

वेतानं मारण्याचा विधी देखील साधारण स्वरूपाचा नसतो. वेताच्या छडींना चांगला वेतावा म्हणून पाण्यात भिजत ठेवतात. जेलमधल्या एखाद्या धिप्पाड शरीरयष्टीच्या खूनी किंवा डाकूला वेत लगावण्याची कामगिरी दिली जाते. जोरात वेत मारता यावेत व वेत मारताना त्याला थकल्यासारखं होऊ नये—म्हणून जेलमधल्या त्याच्या नियमित आहाराव्यतिरिक्त त्याला दूध आणि मांस देण्यात येई. कैद्यांचं अंग उघडं करून त्याचे हात-पाय करकचून बांधून टाकण्यात येत, त्याच्या ढुंगणांवर भिजवलेला पातळ कपडा टाकण्यात येई. यानंतर तो मारेकरी (जल्लाद) दोन्ही बाजूस वेत फिरवून कैद्याच्या मांड्यांवर सपकन प्रहार करी. वेत लागल्या बरोबर त्या जागचं चामडं छडीला चिकटून येई. कातडी निघाल्यामुळे जखमेतून रक्ताची चिळकांडी उडे. एक फटका मारल्यानंतर मारेकऱ्यानं एका मिनिटाची विश्रांती घेऊन मग दुसरा फटका मारायचा—अशी पद्धत होती. पंडित परमानन्द यांना वीस वेत लगावण्यात आले. नंतर त्यांना उचलून त्यांच्या खोलीत नेऊन टाकण्यात आलं.

आमच्या सर्व साथीदारांना ही बातमी समजली तेव्हा आमच्या सर्वांच्या मनात संताप उफाळून आला. सत्याग्रह करण्याशिवाय आमच्या समोर दुसरा कुठलाच पर्याय नव्हता. सर्व परिस्थितीचा गंभीरपणानं आम्ही विचार करू लागलो. स्वातंत्र्य-संग्रामात आम्ही जे उतरलो होतो ते काही केवळ इंग्रजांच्या तुरुंगरूपी कारखान्यात भरती होण्यासाठी नव्हे किंवा निमूटपणे त्यांनी सांगितलेली कामं करण्यासाठीही नव्हे. तेव्हा आम्ही असा निर्णय घेतला की जेलमध्ये राहून आम्ही आमच्या मर्जीला येईल, तेच काम करू. जेवढं काम आम्हाला झेपेल-तेवढच काम आम्ही करणार. इतर कुठल्याही कामाला आपण हात लावायचा नाही. आम्ही स्पष्ट नकार दिला. आमचं हे वर्तन बघून मेजर मरेचा जळफळाट झाला व त्यानं आमच्या प्रत्येकाच्या खोलीपाशी येऊन आमच्या पायात बेड्या ठोठावण्याच्या व हात वर बांधून उभे राहण्याच्या शिक्षा फर्माविल्या.

इंग्रजी सत्तेशी आमची लढाई जुंपलीच होती आणि त्याच फळही आम्हाला मिळालं होतं. आता जेलच्या अधिकाऱ्यांशी आमचा झगडा सुरू झाला आणि त्याचं फळही आम्हाला भोगायला मिळालं. सहा वर्षं सतत कुठल्या न कुठल्या दिवशी जेलच्या या न त्या अधिकाऱ्या-बरोबर आम्हाला झगडा करावा लागला. कधी आम्ही त्यांना पिटून काढत होतो तर कधी आम्हाला मार खावा लागला होता.

माझे सर्वच साथीदार शक्तिमान आणि उंचेपुरे होते. भाई केसरसिंह, भाई शेरसिंह बिशनसिंह पैलवान यांच्याकडे बघत राहावं अशा शरीरयष्टीचे ते होते. यांना केवळ बघण्यासाठी अनेक इंग्रज लाहोरच्या मध्यवर्ती कारागृहात लांबून लांबून यायचे. हे एवढे बलवान होते की दोघे-चौघे मोडल्यास सर्वसाधारण हातकड्या यांच्या हातांना बसायच्याच नाहीत.

एके दिवशी बिशनसिंह पैलवानाची जेलच्या अधिकाऱ्याशी टक्कर झाली. जेलच्या मुख्याधिकाऱ्यांनी हुकूम सोडला की जा व त्याची चांगली पिटाई करा. कैदी जमादार सोटे घेऊन पुढे निघाले. बिशनसिंहानं बघितलं की हे लोक आपणास दंडुक्यानी ठोकणार त्याच्या पायात बेड्या पडलेल्याच होत्या. त्यानं बेड्यांचे दोर नीट कमरेला बांधले आणि मोठ्यानं ओरडून पंजाबी भाषेत तो म्हणाला— 'आओ, अगे, जिन्हें मौत लेणी है। दोनों टंगड़े फड़के चीर डालांगा'—(मरायचं असेल तर इकडे या. दोन्ही तंगड्या फाडून तुम्हाला उभा चिरीन.) प्रचंड देहाचा बिशनसिंह रौद्र रूप धारण करून तिथं उभा होता. त्याची उंची सहा फूट तीन इंच होती आणि वजन २५० पौंड. तो पंजाबचा एक प्रख्यात मल्ल होता. त्याचं रूप बघून कैदी जमादारांना याची खात्रीच पटली की जो कुणी त्याच्या तावडीत सापडेल—तो जिवंत सुटायचा नाही. बारी बाबा लांब अंतरावर उभा राहून ओरडत होता—मारो! पकडो! परंतु जाणून बुजून मृत्यूच्या दाढेत कोण शिरणार? बेरीला सर्व परिस्थिती समजली. तो मग तिथून गुपचूप निघून गेला.

माझ्या शीख साथीदारांना केस धुण्यासाठी साबण मिळायचा नाही. दाढीसाठीही त्यांना सोडा देण्यात येई पण तो अगदीच हलक्या प्रतीचा असे. मग शीख बांधव काही तरी करून बाहेरून साबण मागवायचे आणि आपली डोकी धुवायचे. बाहेरून साबण मागविताना कुणी पकडला गेला की सहा महिने पायात बेड्या आणि सात दिवस वर हात बांधून उभे राहण्याची शिक्षा दिली जाई. वाचण्यासाठी आम्हाला वर्तमानपत्र किंवा पुस्तक देत नव्हते. जे कैदी जेलच्या बाहेर काम करायला जात, त्यांना आम्ही हर प्रयत्नानं वर्तमानपत्र लपवून आणण्यासाठी सांगत असू. त्या काळात महायुद्ध चालू होतं आणि युद्धाचे परिणाम जाणून घेण्याची आम्हाला खूप उत्सुकता होती.

काही कालावधीनंतर सावरकर बंधूंना आणि बंगालच्या क्रांतिकारकांना काही सवलती मिळाल्या. ती सर्वच मोठी विद्वान मंडळी होती. त्यांच्याजवळ खूप ग्रंथ होते. त्यांनी आपली पुस्तकं आणून, एक छोटं ग्रंथालयच बनवलं होतं. तीन वर्षांनंतर आमची जेलच्या अधिकाऱ्यांशी कमी प्रमाणात भांडणं होऊ लागली. पुस्तकं आणि वर्तमानपत्रं वाचण्याची आम्हालाही थोडीफार सवलत मिळाली.

जास्त धोकादायक कैद्यांना "सेल्युलर जेल" (तळघरात) डांबून ठेवण्यात येई. ते सगळे डाकू लवकरच आमचे चांगले मित्र बनले. प्रत्येक डाकूची आमची कुठल्या न कुठल्या प्रकारे सेवा करण्याची इच्छा असे. त्यांच्या पैकी बरेचसे डाकू चांगले सज्जन होते. ते जुगार खेळायचे आणि व्यापारही करायचे. असे कैदी आमची हर प्रकारे मदत करू लागले. आमचं जीवन जरा शांततेनं चाललं होतं. बॅरी साहेबांना हे कुठून पसंत पडणार ? त्यानं पुन्हा विचार केला की कुणाशी तरी सामना झाला पाहिजे. त्यामुळेच तर त्याची कीर्ती वाढणार होती! तो भरपूर दारू पिऊन आमच्या खोल्यांकडे यायचा आणि आम्हाला शिवीगाळ करायचा. आमचे पुष्कळसे साथीदार असे होते ज्यांना शिव्या देण्याची आवड होती. ते त्याला पंजाबी भाषेतून मनसोक्त शिव्या देत. दुसऱ्या दिवशी बारी बाबा त्यांच्याकडे येऊन म्हणे—"मी दारू प्यालो म्हणजे अगदी बेभान होऊन जातो. तुम्हाला खूप शिवीगाळ करतो—तुम्हाला जर मला शिव्या द्यायच्या असतील तर त्या इंग्रजीतून द्या—म्हणजे इतर कैद्यांना त्या कळणार नाहीत—तुम्ही पंजाबी मधून शिव्या देता—त्यामुळं माझा अपमान होतो."

दिवसरात्र बॅरी याचाच विचार करायचा की कैद्यांचा छळ कोण-कोणत्या रीतीने करावा. त्याला वाचायची-लिहायची बिलकुल आवड नव्हती. कुणाही सज्जन माणसाची त्याची संगत आवडणारी नव्हती. त्याच्या जीवनात केवळ दोनच गोष्टींना स्थान होता एक म्हणजे कैदी आणि दुसरी गोष्ट तुरुंग. तो दिसायला जसा बेढब होता तसंच त्याचं मन सुद्धा विकृत होतं. एके दिवशी भरपूर दारू पिऊन तो तुरुंगात फेरी मारायला आला. वेळ सायंकाळची होती. आमचे एक बुजुर्ग साथीदार श्री. भानसिंह यांच्या

खोलीपाशी तो थांबला. भानसिंह बब्बर असल्यामुळे आम्ही त्यांना "बाबा" म्हणून संबोधित होतो. बेरी त्यांच्यापाशी गप्पा मारू लागला. बोलता बोलता शब्द वाढत गेले. बेरीने आपलं शिव्यांचं अस्त्र बाहेर काढलं. बाबा भानसिंह यांनीही त्याला चांगल्या झोंबणाऱ्या शिव्या दिल्या. त्यावेळी जेल बंद झालेली होती. सगळीकडे शांतता पसरली होती. सर्व कैदी आपापल्या खोल्यांत बसून मोठ्या आरामात शिव्या ऐकत होते. बेरीच्या ही गोष्ट लक्षात आली की भानसिंहाच्या जोरदार आवाजातील शिव्या सर्वांना ऐकायला येत आहेत. त्यामुळं कैद्यांच्या मध्ये त्याला काहीच मान उरणार नाही. हा विचार येताच भानसिंहाची चांगली जिरवली पाहिजे, असा त्याने विचार केला. त्यानं त्यांच्या खोलीचं दार उघडायला सांगितलं. कैदी जमादारांना त्यानं आज्ञा केली की त्यांची अशी पिटाई करा की तोंडातून शब्द न उमटला पाहिजे. बाबा भानसिंह यांना बेशुद्ध होईपर्यंत मारहाण करण्यात आली. त्यानंतर त्यांच्या खोलीचं दार बन्द करून बेरी निघून गेला. मारझोडीचे आणि रडण्या-ओरडण्याचे आवाज आमच्या खोलीत ऐकायला आले होते. आम्ही सर्वच जण बेचैन झालो. आम्ही विचार करू लागलो की बाबा भानसिंह बब्बर आहेत. त्यांना जी मारहाण करण्यात आली, त्यामुळं त्यांचे काय हाल झाले असतील? सकाळी कुलुपे उघडताच सर्व कैदी एक नंबरच्या बॅरेकमधून दोन नंबरच्या बॅरेककडे जात असत. त्यांच्या करवी संबंध जेलमध्ये बाबा भानसिंह यांना जी खूप मारहाण करण्यात आली, त्याची बातमी पोचवण्यात आली. बाबा भानसिंहांनी माझ्याकडे निरोप धाडला की या प्रचंड मारझोडीमुळं ते दोन-चार दिवसांपेक्षा अधिक काळ जिवंत राहू शकणार नाहीत.

असमर्थता आणि लाचारीच्या अवस्थेत अशा घटनेचा माणसावर जो परिणाम होतो-तोच परिणाम माझ्या मनावर झाला. बाबा भानसिंहांच्या बद्दल माझ्या मनात नितांत आदर होता. मी त्यांच्या खूप जवळ पोचलो होतो. अमेरिकेतून मी जेव्हा भारतात परतायचं ठरवलं त्यावेळी मी सर्व स्नेह्यांच्या भेटी घेतल्या होत्या. जेव्हा मी बाबा भानसिंहांना भेटलो, तेव्हा त्यांना मी माझ्या मनातील गोष्ट सांगितली. यानंतर आपली कदाचित भेटही होणार नाही, असेही मी त्यांना म्हणालो होतो. माझं बोलणं त्यांनी लक्षपूर्वक ऐकून घेतलं. ते मला म्हणाले—"भोजनाची वेळ झाली आहे. मी स्वयंपाक करतो—जेवून जा." त्यांनी जेवण तयार करून मला वाढलं. मी जेवायला बसलो आणि ते तडक आत गेले व आपला बाड-बिस्तरा गुंडाळून बाहेर आले. मी त्यांचा निरोप घेऊ लागलो तेव्हा ते म्हणाले—"निरोप कुणाचा घेतोस? मीही तुम्च्यासह येतो." मला या संदर्भात त्यांच्याशी चर्चा करायची होती. तुम्ही कधी भारतात परत जाण्या-संबंधी माझ्याशी बोलला नव्हता? तुम्ही तर आणखी काही वर्षे अमेरिकेतच राहायचं ठरवलं होतं? त्यांनी उत्तर दिलं की ते अमेरिकेत आणखी काही वर्षे अवश्य राहू इच्छित होते, परंतु मला बघून त्यांच्या मनात असा प्रश्न उभा राहिला की ज्या तरुणांनी जगात

अजून काही पाहिलंसुद्धा नाही, जीवनातल्या आनंदाचा उपभोग घेतला नाही, ते तरुण जर देशाच्या स्वातंत्र्यासाठी आपल्या प्राणांची बाजी लावू शकतात तर त्यांच्या सारखा वयस्कर माणूस कोणते भोग भोगण्यासाठी पाठीमागे राहणार? मी त्यांना काहीच उत्तर देऊ शकलो नाही. आम्ही शहरात आलो. त्यांनी आपली सर्व कमाई बँकेतून काढून घेतली व ती माझ्या हवाली केली. देशप्रेमाच्या ज्या भावनेनं भारावून बाबा भानसिंह आमच्या बरोबर निघाले होते. ही खरोखरच अद्भुत गोष्ट होती. त्या घटनेला आता अर्धशतकाचा काळ होऊन गेला आहे. परंतु त्या दिवशीची गोष्ट माझ्या मनात अजूनही ताजी आहे. अशा एक बुजुर्ग साथीदारानं आपण आता दोन-चार दिवसांचे सोबती आहोत असा निर्वाणीचा निरोप पाठवावा– या प्रकारानं माझ्या मनाची जी घालमेल झाली, जी कळ मी अनुभवली ती त्यांनाच समजू शकेल–ज्यांनी एकमेकांसाठी जगण्याचं आणि मरण्याचं व्रत घेतलेलं आहे.

आम्ही सर्वच राजकीय कैदी वेगवेगळ्या ७ तुकड्यांत विभागले गेलो होतो आम्ही एकमेकांना भेटू शकत नव्हतो. भेटणं अशक्यच होतं. जे लोक एका क्रमांकात होते त्यांनाही रात्रंदिवस खोल्यांत बंदिस्त ठेवलं जाई. त्यामुळं त्यांची देखील भेट होऊ शकत नव्हती. जे इतर कैदी काही कामानिमित्त भेटत व ज्यांना निरनिराळ्या ठिकाणी जाता येत असे, त्यांच्या मार्फत चिठ्ठ्या-चपाट्या पाठवून आम्ही एकमेकांशी विचार-विनिमय करत असू. अशा तऱ्हेनंच आम्ही संपर्क स्थापून, असं ठरवलं की आम्हाला अशा तऱ्हेनंच मृत्यूचा सामना करावा लागणार असेल, बाबा भानसिंह यांच्याप्रमाणंच मरण वाट्याला येणार असेल तर हेच बेहतर होईल की आम्ही सर्वांनी मरायला तयार व्हावं, जुलमी राजवटीतील अधिकाऱ्यांशी टक्कर घ्यावी. जाळ्यात अडकलेल्या पक्षानं आपल्या पंखांची कितीही फडफड केली तरी तो उडून जाऊ शकत नाही. तशीच स्थिती तुरुंगाच्या जाळ्यात सापडलेल्या कैद्यांची होती. आत्महत्या करून ते मुक्त शकत नाहीत. जुलमी अधिकाऱ्यांशी ते दोन हातही करू शकत नाहीत, सूडही उगवू शकत नाहीत. आमच्या मनात नुसते कढ फुटायचे—परंतु आवंढा गिळून आम्हाला गप्प बसावं लागत होतं. आम्ही सर्वांनी एवढा मात्र पक्का निश्चय केला की जेलच्या अधिकाऱ्यांनी बाबा भानसिंह यांच्या बाबतीत जी लज्जास्पद गोष्ट केली होती— तसा प्रकार परत होऊ नये यासाठी जेलच्या अधिकाऱ्यांशी आपण संघर्ष करायचाच.

तुरुंगात भारतातील विविध प्रांतातून आलेल्या कैद्यांची संख्या ९० होती. त्यातले ४५ जण पंजाबातील होते. बंगाल आणि महाराष्ट्रातून आलेले कैदी आमच्या अगोदरपासून तिथं होते. जुने कैदी असल्यामुळं त्यांना सोयी-सवलती अधिक होत्या त्यांचं जेलमधलं जीवन आणि त्यांना करावं लागणारं काम आमच्यापेक्षा निराळं.

होतं. पंजाबमधल्या कैद्यांनी असं ठरवलं की, सर्वांसाठी हरताळ पाळणं आवश्यक आहे. जेलच्या अधिकाऱ्यांना काही सवलती मागायच्या नाहीत आणि कुठलंच काम करायचं नाही. सर्व साथीदारांनी याला मान्यता दिली. हरताळ सुरू झाला.

हरताळ पुकारणाऱ्या कैद्यांना सहा महिन्यांसाठी पायांत लोखंडी दांडा व बेड्या अशी शिक्षा फर्मावण्यात आली. यामुळे कैद्यांना चालायचा अतिशय त्रास होईल. सात दिवस सतत आठ आठ तास हात वर बांधून उभं केलं जाई. दिवस रात्र खोलीतच बंद करून ठेवण्याचे हुकूम होते. जेवण कमी प्रमाणात दिलं गेलं. सकाळी नाष्टा देण्यात येऊ नये फक्त दोन वेळा जेवण व ते इतकं कमी की, सतत भुकेचा त्रास झाला पाहिजे.

या शिक्षेविरुद्ध आम्ही तक्रारी करू लागलो तेव्हा शिस्तीच्या विरुद्ध वागणाऱ्या कैद्यांना जसं वागवतात, तसंच तुम्हाला वागवण्यात येत आहे, असं त्यांच्याकडून उत्तर मिळालं.

गदर पार्टीतील एक प्रमुख व्यक्ती बाबा सोहनसिंह भकना यांच्या मनात असा विचार आला की, कामासंबंधी नुसता हरताळ पाळून चालणार नाही. एवढ्या कृतीनं आपलं उद्दिष्ट साध्य होणार नाही. अन्न सत्याग्रह, उपोषण करावंच लागेल. तुरुंगात उपोषण करणं, ही सोपी गोष्ट नसते. कुणीही स्वाभिमानी माणूस जेव्हा पूर्णपणे हताश बनतो तेव्हा अपमानजनक जीवन जगण्यापेक्षा आत्महत्या करण्याऐवजी उपोषणाच्या मार्गानं मृत्यू स्वीकारणं पसंत करतो. यामुळं सर्व देशबांधवांना हे समजेल, सर्वांना बघायला मिळेल आणि आपणांस उपोषण का करावं लागलं हे कळेल. सोहनसिंह भकना यांनी आम्हा सर्वांना ही गोष्ट समजावली आणि उपोषणासाठी आमची संमती मागितली. इतर कुणी उपोषण करायचं नाही हे ही स्पष्ट केलं. त्यांचा निर्णय सर्वांनी मान्य केला आणि त्यांनी उपोषण सुरू केलं. मी हे सर्व बघत होतो. मी वयानं सर्वांहून लहान होतो. बाबा भानसिंह यांच्याविषयी माझ्या मनात जसं प्रेम होतं तसंच प्रेम आणि आदर बाबा सोहनसिंह यांच्याविषयीही होता. आमच्या पक्षाचे ते एक महान नेते आहेत, असंच मी मानत होतो.

बाबा सोहनसिंह यांचं उपोषण सुरू झाल्यानंतर मीही त्यांना साथ देणार असं जाहीर केलं. राजकीय क्षेत्रात उपोषणाचा उपयोग एखाद्या शस्त्राप्रमाणं होतो. अनेक आंदोलनं अधिक तीव्र बनवण्यासाठी, अन्न सत्याग्रहाचा मार्ग अनुसरण्यात आला आहे. अन्न सत्याग्रहाची भूमिकाच अशी आहे की, त्यामुळं सर्वांचं लक्ष अशा व्यक्तींभोवती केंद्रित होतं. अन्न-सत्याग्रहामुळं येणारा मृत्यू हाही मोठा क्लेशकारक असतो. म्हणूनच जो कुणी हा मार्ग अवलंबितो त्याला सर्वांचीच सहानुभूती मिळते.

● ● ●

मी माझं उपोषण सुरू केलं. त्या अगोदर मी कधी कुठलं व्रत, एकादशी, प्रदोष इ. केलेलं नव्हतं. उपाशी राहणं किती त्रासाचं असतं, याची मला कुठलीच कल्पना नव्हती. माझ्यासमोर एकच गोष्ट होती, माझे एक वडीलधारे साथीदार अशा उपायांनी जर मरणार असतील तर भुकेच्या आगीत आपणही त्यांच्याप्रमाणेच मरावं. बाबा सोहनसिंह भकना एक आदर्श व तपस्वी व्यक्तिमत्त्व होते. जीवनावर अंकुश ठेवून कसं जगावं हे त्यांना माहित होतं. त्यांच्यापासून प्रेरणा घेऊन उपोषण म्हणजे मृत्यू, एवढाच मी विचार केला होता.

कुणी उपोषण प्रारंभ केले तर सामान्यत: तो पाणी पितो. परंतु उत्साहाच्या भरात मी पाण्याचाही त्याग केला. बाबा सोहनसिंह यांना जेव्हा मी पाणी देखील पीत नाही हे कळलं, तेव्हा त्यांना अतिशय दु:ख झालं. चिठ्ठ्या-चपाट्या पाठवून अनेकजणांनी मला समजावण्याचा प्रयत्न केला. परंतु मी माझा हट्ट सोडला नाही. कुणाच्याच समजावण्याचा माझ्यावर काहीच परिणाम झाला नाही. माझ्या मनात आता एकच विचार होता—जेलच्या अधिकाऱ्यांना दाखवून द्यावं की, मारहाण करून तुमच्या हातून मरण्यापेक्षा आम्हाला हाच मार्ग योग्य वाटतो. आम्ही भुकेच्या आगीत जळून मरायला तयार आहोत. माझ्या साथीदारांनाही मला सांगायचं होतं की, आत्मसन्मान राखण्यासाठी मी सर्वप्रथम मरायला तयार आहे.

जेलचे जमादार कोठीसमोर उभे राहत होते. एका भांड्यात वरण, भात, भाजी, भाकरी व दुसऱ्यात पाणी भरून ठेवत होते. दोन्हीपैकी मी कशाचं सेवन करतो, हे थांबून बघायचे. व्रत, उपवास करणारे लोक २४ तास अन्न किंवा पाणी सेवन करत नाहीत. आमचे मुसलमान बांधव वर्षातून एक संबंध महिना २४ तासांत एकवेळ अन्न व पाणी सेवन करून "रोजे" पाळतात. २४ तास पाणी देखील प्यायचं नाही, यानं काय त्रास होतो, हे त्यांना चांगलं माहीत आहे. पहिले २४ तास मी पाण्याविनाच काढले. मला विशेष असा त्रास वाटला नाही. परंतु त्यानंतर मात्र भुकेची आग शांत करण्यासाठी पाणीही पोटात जाईना तेव्हा आग चांगलीच भडकली. त्यामुळे मी व्याकूळ बनलो. थंड मनानं विचार करणं किंवा झोपून राहणं अशक्य होऊ लागलं. पूर्ण सात दिवस मी अशा अवस्थेत सामना करत राहिलो. आपल्या निश्चयावर अडून राहिलो.

सातव्या दिवशी रात्रीच्या वेळी मला वाटू लागलं की, आपण जर पाणी प्यालो नाहीत तर जिवंत राहू शकणार नाहीत. ज्या एका लाकडी फळीवर मी पडलेला होतो, तिथून उठून मी पाण्याच्या भांड्यापर्यंत पोचलो. भांडं उचलून तोंडाला लावावं अशीच इच्छा झाली. परंतु माझ्या अंतरात्म्यानं मला थोपवलं. माझ्या कानात माझेच शब्द निनादले. "पृथ्वी! तू सगळ्या साथीदारांना सांगितलंस की, पहिल्यांदा माझा मृत्यू होईल. अन्न व पाणी यांचं सेवन करणार नाही. मग हा दुबळेपणा कुठचा?" पाण्याचं भांडं पूर्ववत ठेवून मी परत फिरलो व पडून राहिलो. आता तहानेनं मी व्याकूळ होऊ लागलो. दुसऱ्यांदा परत पाणी पिण्यासाठी जागेहून उठलो परंतु पुन्हा तसाच परत आलो. तिसऱ्यांदा मी परत जेव्हा पाण्याच्या भांड्यापाशी गेलो तेव्हा अंतरात्म्यानं पुन्हा मला रोखलं. माझ्या अंतरात्म्याच्या आवाजानं मी पुरता पागल बनलो. पाण्याचं ते भांडं मी हातात घेतलं आणि जोरात ओरडून ते बाहेरच्या पहारेकऱ्याकडं भिरकावलं. फळकुटावर येऊन पडून राहिलो आता संबंध शरीरात आग-आग होऊ लागली आणि कपाळ थंड घामानं थबथबलं मला असं वाटलं की आपला शेवट जवळ आला आहे परंतु तसं काही झालं नाही.

दुसऱ्या दिवशी माझ्या भोवती थोंगड्या लपेटण्यात आल्या. चार कैद्यांनी मला उचललं आणि आदेशानुसार ते मला हॉस्पिटलमध्ये घेऊन गेले. हॉस्पिटलच्या डॉक्टरांनी प्रकृती तपासली आणि अन्न पाणी सेवन करायला त्यांनी सांगितलं. मी त्यांचा सल्ला मानला नाही. तेव्हा मला खोलीत आणून ठेवण्यात आलं.

मला जेव्हा थोंगड्यात लपेटून हॉस्पिटलकडे नेत होते तेव्हा कैद्यांनी हे बघून अशी बातमी फैलावली की, उपोषण करणारा कैदी मरण पावला आहे. बातमी ऐकून माझ्या साथीदारांना खूप वाईट वाटलं. पण ते काय करू शकत होते? याचप्रमाणं लागोपाठ सहा दिवस ते मला हॉस्पिटलमध्ये नेत होते आणि परत आणून माझ्या खोलीत मला टाकून देत होते. आता पाणी न पिण्याचा माझा निश्चय पक्का झाला होता. तहानेचाही आता मला त्रास वाटेनासा झाला. मी आता जीवनाचे तास मोजत बसलो. तेरा दिवसांनंतर मला हॉस्पिटलमधल्याच खोलीत बंद ठेवण्यात आलं. काही वेळानं आठ जमादार कैद्यांसमवेत डॉक्टर तिथं आले. जमादार कैद्यांनी माझे हात, पाय, डोके दाबून धरले. एक रबराची नळी नाकावाटे शरीरात घालण्यात आली आणि नळीद्वारे अर्धा शेर दूध माझ्या पोटात सोडण्यात आलं. कैद्यांनी मला मोकळं करताच मी घशात बोटं घालून उलटी काढण्याचा प्रयत्न केला. तेरा दिवस शरीराची आग-आग होत होती. अर्धा शेर दूध आत पोचताच शरीरानं ते शोषून घेतलं. उलटी वाटे काहीही पडलं नाही.

आता नव्यानं जीवनाची सुरुवात झाली. सकाळ-संध्याकाळ अशाच पद्धतीनं मला दूध पाजवण्याचा परिपाठ सुरू झाला आणि प्रत्येकवेळी उलटी करण्याचा मी प्रयत्न केला. तीन दिवसांनंतर उलटीद्वारे थोडंसं दूध बाहेर पडलं. बाकीचं दूध शरीरानं स्वीकारलं होतं. अशाच रीतीनं दोन महिने लोटले. आमच्या हरताळाची आणि उपोषणाची बातमी वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाली, याचा आम्हाला पत्ता लागला बाबा सोहनसिंह भकना यांनी आपली कर्तव्यपूर्ती झाली आहे असा विचार केला. देशबांधवांना आपल्या अन्न–सत्याग्रहाची कारणं समजली होती. त्यांना असा विश्वास वाटू लागला की, जेल्चा अधिकारीवर्ग यापुढं आपल्याला वाईट रीतीनं वागवणार नाही. त्यांनी स्वतः उपोषण सोडलं व मलाही सोडायला सांगितलं. मी माझ्या हट्टीपणानं त्यांचा सल्ला मानला नाही व उपोषण चालूच ठेवलं. अशाच अवस्थेत आणखी तीन महिने लोटले. दूध शरीरात जात होतं आणि ते पचत होतं. या कालावधीत मला कुठला आजार झाला नाही. मृत्यूचं कुठलं लक्षणही आढळलं नाही.

एके दिवशी एका कैदी जमादारानं मला येऊन सांगितलं की, बाबा रूडसिंह 'चूडचक' हे आजारी पडले आहेत. डॉक्टर त्यांच्यावर काहीच उपचार करत नाहीत. बाबा काही खातपीत नाहीत. दिवसा पडून राहण्यासाठी घोंगडे देखील मिळत नाही. ही बातमी ऐकून मला विचार पडला की आपला हा साथीदार कसा काय जगणार? एकीकडे मी स्वतः हॉस्पिटलमध्ये स्वच्छ बिछान्यावर पडलो आहे. बिछान्यावर स्वच्छ, पांढरी चादर घातलेली आहे, थंडीचा त्रास होऊ नये म्हणून गरम पांघरूण आहे. दोन वेळ पोटात दूध पोचवलं जातं. लोकांच्या दृष्टीनं मी मरायचा प्रयत्न करत आहे. परंतु वस्तुस्थिती निराळीच आहे. माझे साथीदार मरणाच्या दारात आहेत. ते अन्नसेवन करू शकत नाहीत. त्यांना औषधपाणी मिळत नाही. आजारी असतानाही त्यांना अंथरूण-पांघरूण मिळत नाही.

मी विचार केला होता की सर्व साथीदारांच्या आधी सर्वांत प्रथम मी मरेन परंतु माझे साथी बाबा रूडसिंह माझ्याही अगोदर मरणार. मी निश्चय केला की आपण आधी मेलं पाहिजे परंतु मरायचं कसं?

दरवाजा बंद होता. पहारेकरी बाहेर उभा होता. मी हॉस्पिटलमधील अंथरूण गुंडाळून बाहेर फेकलं. अंगावरील कपडेही काढून टाकले. पहारेकऱ्याला सांगितले की आजपासून मी पूर्ण मौन पाळणार, कुणाशीही बोलणार नाही. कपडे आणि अंथरूण बाहेर फेकून मी साथीदारांना हे सुचविण्याचा प्रयत्न केला की मी कोणत्याही अशा मृत्यूला आलिंगन देणार आहे. पाणी पिणं तर मी केव्हाच बंद केलेलं होतं. माझी अशी समजूत होती की, थंडीच्या प्रचंड थंडीत आपण जर या अंगानं गारठलो

फरशीवर झोपून राहिलो तर मृत्यू लौकर येईल. माझ्या या वेडगळपणानं सर्व तुरुंगभर सनसनाटी निर्माण झाली. माझ्या साथीदारांना व जेलच्या अधिकाऱ्यांना आणि खुद्द डॉक्टरांनाही असंच वाटू लागलं की पृथ्वीसिंहाचं डोकं फिरलं आहे, त्याला वेड लागलं आहे.

वीर विनायक दामोदर सावरकरांना माझ्याविषयी खूप प्रेम वाटत होतं. माझ्या सारख्या तरुणाचं डोकं फिरलं आहे, या गोष्टीवर त्यांचा विश्वास बसत नव्हता. वस्तुस्थिती काय आहे, हे जाणून घेण्याचा त्यांनी प्रयत्न केला. त्यांनी मला एक लांबलचक पत्र लिहिलं आणि एका कैदी जमादारासोबत ते माझ्याकडे पाठवून दिलं. जेव्हा डॉक्टरांना असं वाटू लागलं की, वेडाच्या भरात, मी आत्महत्या करीन तेव्हा त्यांनी चार माणसं पहाऱ्यासाठी तैनात केली. माझ्या प्रत्येक गोष्टीवर बारीक लक्ष ठेवण्यात येऊ लागलं. माझ्या उपोषणाचा कैदी जमादारांवर फार परिणाम झाला होता. जेलमधल्या कैद्यांना मी म्हणजे कुणी तरी साधू तपस्वी आहे, असं वाटू लागलं. तिथला प्रत्येक कैदी माझ्यासाठी काय हवं ते करायला तयार होता. मी वीर सावरकरांचं पत्र वाचलं. ते फारच महान लेखक होते. त्यांच्या युक्तीवादापुढे मी टिकणं कठीण होतं. आपल्या मित्रांना ते आपले विचार फारच लौकर पटवून देऊ शकत असत. मी त्यांच्या प्रत्येक उदाहरणाला उत्तर म्हणून दुसरी उदाहरणं दिली. मी त्यांना लिहिलं की जे काही मी करत आहे तेच योग्य आहे. याबद्दल कुणाला भिती बाळगण्याचं कारण नाही. या बातमीनं पृथ्वीसिंहाला वेड लागलं नाही, हे सर्वांना समजलं, त्यांचा जीव भांड्यात पडला.

पायात बेड्या, शरीर उघडं, पोचरायला वारा, थंडीचे दिवस! नुसत्या गार फरशीवर पडून राहणं, पोटात अन्न नसल्यामुळे होणारी तगमग, अशा अवस्थेत माणसाला किती शारीरिक आणि मानसिक यातना होत असतील! पाय लांब करून झोपावं तर थंडी अधिकच भासते. हा त्रास कमी करण्यासाठी खोलीतल्या एका कोपऱ्यात बेड्यांच्या आधारानं तासन तास बसून राहणं, याशिवाय अन्य पर्याय नव्हता. त्या काळात परमेश्वरावर माझी अपार श्रद्धा होती. स्वामी रामतीर्थ आणि स्वामी विवेकानंदांचे ग्रंथ मी अभ्यासले होते. राजयोग, हठयोग, ज्ञानयोग आणि कर्मयोग यांचाही मी अभ्यास केला होता. त्या सुमारास मी इहवादी बनलो नव्हतो. माझी पूर्ण श्रद्धा होती की ईश्वरच आपलं रक्षण करत आहे. आपल्या हातून त्याला कुठलं तरी महान कार्य करून घ्यायचं आहे; म्हणून त्यानं आपल्याला अजून जिवंत ठेवलेलं आहे.

त्या काळात मला ध्यानावस्थेचा सराव होता. दिवस-रात्र याच अवस्थेत जात होते. बराकीच्या वरांड्यात मी थोडावेळ जागी जायचो. हातानं शरीरावर पाणी ओतून शरीर स्वच्छ ठेवण्याचा मी प्रयत्न करत असे. नंतर शरीरावर

भिंतीचा चुना घालून पाणी सुकवीत असे. सर्व शरीर भस्म केल्याप्रमाणे पांढरं होई. यांचे मला दोन फायदे होते. चुन्यामुळं माझं तापलेलं शरीर पाणी शोषून घेई आणि चुन्याचा थर अंगावर चिकटून राही. या भस्मलेपणामुळं थंडीचा त्रास कमी होई.

याच सुमारास बर्मा-रंगून खटल्यातील गदर पार्टीचे आमचे काही साथीदार काळ्या-पाण्याची शिक्षा होऊन तिथं येऊन पोचले. आल्या आल्या ते आमच्या संपात सामील झाले. त्यांच्या पैकी मौलवी जफर हुसेन आणि रामरक्खा बाली या दोघांनी तर उपोषणालाही प्रारंभ केला.

लौकरच त्यांनाही रबर नळीच्या साहाय्याने दूध देण्यास प्रारंभ करण्यात आला. रामरक्खा बाली ५० दिवसांहून अधिक काळ जगू शकले नाहीत. उपोषणातच त्यांचा मृत्यू झाला. त्यांच्या मृत्यूची बातमी ऐकून आम्ही सर्वच जण दुःखी, कष्टी झालो. राजकीय बंदी आमच्या संपात सामील झालेले नव्हते, त्यांची एकूण परिस्थिती मोठी दयनीय होती. अन्य कैदी त्यांच्याकडे घृणेच्या नजरेने बघू लागले. माझ्या साथीदारांनीच मी उपोषण मागे घ्यावं म्हणून मला जंग जंग पछाडलं—माझ्यावर दडपण आणण्याचेही प्रयत्न केले. परंतु माझी ऊर्मी अजून शांत झाली नव्हती. पंडित जगतराम हे माझे निकटचे स्नेही होते.—त्यांनी आपल्या रक्तानं मला एक पत्र लिहिलं.—त्या पत्रातूनही त्यांनी मी आता उपोषण सोडलं पाहिजे, असं कळवलं. माझ्या निष्ठुर मनावर याचाही काहीच परिणाम झाला नाही. बाबा शेरसिंह 'वईपुई' हेही माझ्यावर खूप प्रेम करणारे गृहस्थ होते. मी जर उपोषण सोडलं नाही तर फार काळ जगू शकणार नाही. हे त्यांनाही कळलं. त्यांनीही काही विचार केला. ते काही कुणी लेखक वगैरे नव्हते. त्यांना असं वाटलं की आपण स्वतः जाऊनच समजूत घालावी.—परंतु ते मला भेटणार कसे? मी तर हॉस्पिटलमध्ये होतो आणि ते जेलच्या दुसऱ्या टोकाच्या खोलीत बन्दिवान होते. त्यांना एक चमत्कारिक कल्पना सुचली. त्यांनी काचेचा तुकडा बारीक करून पाण्या बरोबर ती काच पिऊन टाकली. काचेचे तुकडे पोटात गेल्यामुळं आतड्यांना जखमा झाल्या. त्यांना उलटीवाटे व शौचातून रक्त पडू लागलं. डॉक्टरांना हा काय प्रकार आहे हे समजेना. आमच्या उपोषणामुळं अगोदरच जेलची एकूण परिस्थिती नाजूक बनली होती. उलटी आणि शौचातून रक्त पडू लागल्यामुळे डॉक्टर घाबरले आणि त्यांनाही उचलून हॉस्पिटलमध्ये दाखल करण्यात आले. ज्या कैदी जमादारांना त्यांच्या-वर पहाऱ्यासाठी ठेवलेलं होतं त्यांच्यापासून बाबा शेरसिंह यांनी ही गोष्ट लपवून ठेवली नव्हती की त्यांनी मुद्दामच काच बारीक करून प्राशन केलेली आहे—यामुळंच ते हॉस्पिटलमध्ये पोचू शकणार होते आणि मला उपोषण मागे घेण्याविषयी ते समक्ष बोलू इच्छित होते. यासाठी त्यांनी हा सगळा बनाव घडवून आणलेला होता. कैदी जमादारांनी आवश्यक ती दक्षता बाळगून त्यांना माझी भेट घेऊ दिली. बाबा शेरसिंहांनी

मला भेटून सर्व प्रकार सांगितला व मोठ्या कळकळीनं आणि प्रेमानं माझी समजूत घालण्याचा प्रयत्न केला. मला भेटता यावं एवढ्यासाठी त्यांनी काच कुटून पिण्याचा जो अघोरी प्रकार अवलंबिला तो ऐकून माझे डोळे अश्रूंनी डबडबले. मला रडू आलं परंतु तरीही माझा निर्धार कायमच होता. परिस्थितीत काहीच फरक पडला नाही. बाबा शेरसिंह मोठ्या निराश मनानं तिथून परतले. त्यांचं पोट औषधानं साफ करण्यात आलं व ते बचावले.

आम्हाला सर्वांना सहा महिन्यांची शिक्षा केली होती. आता सहा महिन्यांचा काळ संपायला आला होता. या कालावधीत आमच्यापैकी अनेक जण खूप आजारी पडले, परंतु मृत्यू मात्र कुणाचाच झाला नाही. चार महिन्यांच्या कालावधीत मला साधं सर्दी-पडसंही झालं नाही. काळ्या पाण्याच्या त्या बेटावर हा सर्वांच्या चर्चेचा विषय बनला. ते म्हणत की पृथ्वीसिंहानं योग-साधना केलेली आहे. तो एक योगीपुरुष आहे. दैवी शक्तीमुळेच त्याला कुठल्याही प्रकारचा त्रास होत नाही.

माझ्यासाठी आता हे उपोषण उपोषण राहिलंच नव्हतं. माझं जीवन याच पद्धतीनं चाललं होतं. सकाळी दहाच्या सुमाराला सहा माणसं येऊन जबरदस्तीनं खाली पाडून मला दूध द्यायचे. सायंकाळीही याच प्रकाराची आवृत्ती व्हायची. ह्या सर्व प्रकाराची मला आता मनस्वी चीड वाटू लागली. अशा या उपोषणामुळं मृत्यू माझ्यापासून खूपच दुरावला होता. एके दिवशी ते लोक मला दूध देण्यासाठी माझ्यापाशी आले. मी त्यांच्यावरच हल्ला चढवला. हल्ला करण्याचा माझा हेतू हा की त्यामुळं चिडून ते लोक मला खूप मारहाण करतील व या मारहाणीमुळं मला मृत्यु येईल.—किंवा ते माझ्यावर खूप चिडतील आणि मला दूध देणं बन्द करतील. माझं दूध बन्द झालं म्हणजे प्रकृती खालावून माझा मृत्यु होईल. परंतु दोन्हीपैकी एकही गोष्ट घडली नाही. त्यांनी मला मारहाणही केली नाही आणि जबरदस्तीनं दूध पाजवणं बन्दही केलं नाही. काळ्यापाण्याच्या सर्व अधिकाऱ्यांना ही बातमी सांगण्यात आली. ते सर्वजण माझी प्रकृती बघण्यासाठी तिथं आले. त्या दिवशीच्या माझ्या वागण्यानं त्यांची अशी खात्री झाली की माझा स्वतःवर ताबा राहिलेला नाही. लोहाराला बोलावून माझ्या पायातील बेड्या कापून टाकण्यात आल्या.—खोलीचं कुलुपही काढून टाकलं. सबंध खोलीभर गाद्या अंथरण्यात आल्या. खोलीच्या चार कोपऱ्यात चार पहारेकरी बसवण्यात आले. त्यांना सक्त ताकीद देण्यात आली की मला आत्महत्या करू देऊ नये.

जेलच्या कार्यालयात कामं करणाऱ्या भारतीयांना आणि काही अधिकाऱ्यांनाही माझ्याविषयी खूप सहानुभूती निर्माण झाली होती. माझ्या खोलीवर पहारा देण्यासाठी एका चांगल्या जमादाराची नियुक्ती करण्यात आली. खोलीभर गाद्या घालण्यात आल्या होत्याच—मात्र उघड्या अंगानेच मी त्यावर पडून राहिलो. ह्याच प्रकारे चार दिवस मी पडून राहिलो.

वीर विनायक दामोदर सावरकर व त्यांचे थोरले बंधू गणेश दामोदर सावरकर यांनी मला पत्रं लिहिली. त्यांनी मला त्याचं सगळं सामर्थ्य पणाला लावून उपोषण मागं घेण्याची सूचना केली. त्यांनी लिहिलं–"पृथ्वीसिंह, आम्हाला अशी शंका येते की शारीरिक दुर्बलतेमुळं तुमच्यावर एखादा आघात होऊन, तुम्ही विकलांग बनाल की काय. तुमच्यासंबंधी ज्या हकीकती आमच्या कानांवर येतात–त्यावरून तुम्ही आता फार दिवस तग धरू शकाल, असं वाटत नाही. आता तुमचं उपोषण हे उपोषण राहिलं नाही ते आत्महत्येचं साधन बनू पाहत आहे."

त्यांच्या सूचांना माझ्यापाशी काहीच उत्तरं नव्हती. माझी वाणी बन्द होती. बैठी जमादारांनी मला पेन्सिलीचा एक तुकडा आणून दिला होता. तो पेन्सिलीचा तुकडा लपवण्यासाठी खोलीत जागा नव्हती. मी तो ओठात लपवून ठेवत होतो. दिवसभरात मला अनेक चिठ्ठ्या येत होत्या. त्यांना उत्तरं देणं भाग होतं. मी सावरकर बंधूंच्या पत्रासंबंधी विचार करू लागलो, तितक्यात एक डास मला सतावू लागला. तो मला अनेक वेळा चावला. तो एकदाचा माझ्या हातात सापडला. बोटांच्या चिमटीत पकडून मी त्याला जोरात दाबलं आणि तो मेला असे समजून त्याला दूर फेकण्याचा प्रयत्न केला. मूठ उघडताच डास तिथून उडाला. डास जिवंत परिस्थितीत उडाला परंतु त्यानंच मला सावरकरांच्या पत्राचं उत्तर सुचवलं. त्यांच्या पत्रांच्या मागच्या बाजूसच मी डासाची हकीकत लिहिली, माझ्या हाताच्या मुठीत डास जसा जिवंत राहिला त्याचप्रमाणं नियती मला आपल्या कुशीत सुरक्षित ठेवील. माझ्या हातून एखादं महान कार्य पार पाडायचं असेल तर कुठल्याही परिस्थितीत मी जिवंत राहीन. आपण कुणी माझी चिंता करू नका.

माझं सगळं जीवनच एका अपार श्रद्धेशी निगडित होतं. डासाच्या त्या एका साध्या घटनेनंतर ती श्रद्धा आणखीनच खोलवर रुजली. एकशेवीस दिवसांपासून मी एकटाच त्या खोलीत बसून आपल्या विचारात मग्न होतो. आता मी चार पहारेकऱ्यांच्या समवेत बसलो होतो. एखाद्या भावाप्रमाणं ते मधून मधून मला समजावण्याचाही प्रयत्न करत होते. चहूकडून माझ्या स्नेह्या-सोबत्यांनी पाठवलेल्या चिठ्ठ्या ते मला आणून देत होते. या अवस्थेत माझं मन अस्वस्थ बनलं. आजार किंवा मृत्यु माझ्या जवळ देखील फिरकत नव्हते. उपोषण चालू ठेवण्यासाठी माझ्यापाशी आता कुठलं सबळ कारणही दिसेना. एकशे पंचवीस दिवस झाल्यानंतर माझ्या सर्व सायदारांनी मला एक पत्र पाठवून त्यात सर्व परिस्थितीचं चित्र रेखाटलं. परिस्थिती खूपच गंभीर होती. भारतातील वृत्त-पत्रांतून उपोषणासंबंधी आणि आम्ही पुकारलेल्या संपासंबंधी बरीच चर्चा झाली होती. सर्वांनाच असं वाटत होतं की जेलचे अधिकारी यापुढं कुणावर अत्याचार करायचं धाडस करणार नाहीत. भानसिंहांवरील अत्याचार हाच शेवटचा ठरेल.

त्यावेळी माझं वय तरुण होतं. प्रकृती सुदृढ होती. डॉक्टर दररोज येऊन विचारपूस करत होते. त्यांच्या देखरेखीखाली मला दोन वेळा दूध देण्यात येत होतं. माझं वजन एव्हाना १० पौंड झालं होतं—परंतु मला कुठलाच आजार जडला नव्हता. मला तर असं वाटलं की हेच आपलं नैसर्गिक जीवन आहे. ह्या प्रकाराला उपोषण म्हणणं म्हणजे ती एक चेष्टाच ठरेल. मी विचार केला की आपण जर उपोषण असंच चालू ठेवलं तर आपले साथीदार हरताळ चालू ठेवतील. या प्रकारात कुणी आजारी पडला किंवा मरण पावला तर त्याच्या मृत्यूला आपण कारणीभूत ठरू. आपल्या माथ्यावर तो कलंक लागेल. शेवटी मी माझ्या साथीदारांना उपोषण बन्द करत आहे, हे कळवलं. माझा निर्णय सर्वांना जेव्हा समजला तेव्हा सर्वांनी समाधान प्रकट केलं.

तुरुंगाचे अधिकारीही खूश झाले. मी उपोषण बंद केल्यानंतर एक आठवडा मला दूध, लोणी, अंडी आणि पाव असं अन्न देण्यात आलं. एका आठवड्यानंतर मात्र मग सर्वसामान्य कैद्यांचं जेवण मलाही मिळू लागलं. या सर्व गोष्टींचा माझ्या प्रकृतीवर खूपच वाईट परिणाम झाला. त्यानंतर मला कधीही उपोषणापूर्वी होतं ते आरोग्य लाभलं नाही.

● ● ●

अनेक कैदी काळ्यापाण्याच्या बेटावर वास्तव्य करून होते. त्यांना अनेक प्रकारच्या सवलती देण्यात आल्या होत्या. ते लोक हरप्रकारांनी मला साहाय्य करत होते. जेलच्या नियमांचं बंधन पाळणं, त्या प्रमाणं वागणं, मला बंधनकारक नव्हतं. यामुळेच सार्थीदारांकडून खाण्या-पिण्याबाबत जे साहाय्य मिळे, त्याचा मी पुरेपूर उपयोग करून घेतला. उपोषणाच्या काळात माझं जेवढं वजन घटलं होतं ते मी भरून काढलं. मात्र पूर्वीचं आरोग्य व शक्ती मिळविता आली नाही.

बारी बाबाची नोकरीची मुदत संपली होती. त्याच्या गर्जना ऐकायला येईना-गेल्यामुळे संबंध जेल मध्ये शांत वाटू लागलं. मारहाणीचे आवाज ऐकू येईनासे झाले. रडणं–ओरडणंही बन्द झालं.

हरताळानंतरचे आमचे जेलमधील दिवस शांततेत जाऊ लागले. भारतामधून चौकशीसाठी एक कमिशन तिथं आलं. आम्ही आमच्या मागण्या कमिशनसमोर मांडल्या आणि शासनाला लेखी निवेदनही सादर केलं. निवेदनात आम्ही लिहिलं होतं की राजकीय कैद्यांना काळ्यापाण्यावर पाठवण्यात येऊ नये. त्यांना काही कारणांमुळं पाठवण्यातच आलं तर त्यांना अमूक अमूक प्रकारच्या सोयी-सवलती असल्या पाहिजेत. कमिशनच्या सदस्यांनी आमचं म्हणणं सहानुभूतीनं ऐकून घेतलं. कमिशन परत गेल्यानंतर आम्हाला पुस्तकं व वर्तमानपत्रं वाचायला मिळू लागली. जेलच्या अधिकाऱ्यांविरुद्ध आम्ही पाच वर्षेपर्यंत जो लढा दिला होता त्यात आमच्या-पैकी आठ जण दगावले होते. त्यांपैकी एक जण उपोषणामुळं, एक जण मारहाणीमुळं आणि बाकीचे डॉक्टरांच्या निष्काळजीपणामुळे मरण पावले होते.

मरी यांच्या जागी श्री. बारकर जेलचे सुपरिन्टेण्डेण्ट आणि वैद्यकीय अधिकारी म्हणून रुजू झाले. ते आल्याबरोबर त्यांनी हुकूम सोडला की कैद्यांच्या दररोजच्या जेवणात जे ½ औंस तेल देण्यात येतं ते ४ ड्राम कमी करण्यात यावं. त्यांच्या डोक्यात हा पाशवी विचार कुठून आला, माहीत नाही. बारकर मेडिकल ऑफिसर होते. पौष्टिक आहारासंबंधी मेडिकल ऑफिसरला पूर्ण ज्ञान असतं. मेडिकल ऑफिसरनं असा विचार का केला असावा, हे मला आजपर्यंत समजू शकलं नाही. माझ्या मनानं एक निर्णय मात्र ठामपणे घेतला होता की प्रत्येक इंग्रज माणूस हा मानवी पोषाखात वावरणारा एक सैतान आहे.

हा १९२०-२१ चा काळ होता. भारतात गांधीजींची असहकाराची चळवळ जोरात पसरली होती. मी माझ्या समजुतीप्रमाणं असहकाराचा असा अर्थ लावला होता की इंग्रजांशी कुठल्याच बाबतीत सहकार्य करायचं नाही आणि त्यांचं साहाय्य घ्यायचं नाही. तेव्हा मीही स्वतःशी निर्णय घेऊन टाकला की कुणाही इंग्रजासमोर उभं राहायचं नाही. मी त्यांना काही मागणार नाही किंवा त्यांच्याशी बोलणार देखील नाही या नव्या मेडिकल ऑफिसरशी मानवी-संबंध ठेवणं म्हणजे सुद्धा एक प्रकारचं पाप आहे, असं मला वाटू लागलं. बाबा गुरुमुखसिंह आणि बाबा हरनामसिंह 'टुंडीलाट'. यांनी देखील तेल कमी केल्यामुळं आपल्या प्रकृतीवर वाईट परिणाम होईल, असंच सांगितलं. ज्या अनेक कैदी बांधवांनी आम्हाला हरप्रकारे मदत केली होती त्यांच्यासाठी आम्ही काही तरी करणं आवश्यकच होतं. परत हरताळ पुकारण्याचं ठरलं आणि या हरताळात दोन्ही बाबांनीही सामील व्हायचं ठरवलं. त्यांच्या मनात 'असहकाराची' अशी काही भावना नव्हती.

नवा मेडिकल ऑफिसर हा एक महाकाय राक्षस होता. तो सव्वा सहा फूट उंच होता. तो जेलची पाहणी करण्यासाठी निघाला आणि नेमका माझ्या खोलीच्या बाहेर येऊन थांबला. मी त्याच्या देखत खोलीत तसाच बसून राहिलो, याचा त्याला संताप आला. त्यानं इंग्रजीतून मला उभे राहण्याची आज्ञा केली. मी हसून त्याच्याकडे बघितलं आणि तसाच बसून राहिलो. मग माझ्या खोलीचं कुलूप उघडून तो आत आला. माझी दाढी पकडून त्यानं मला उभं केलं. त्याची पाठ फिरल्याबरोबर मी परत खाली बसलो. श्री. बेरी यांचा जावई श्री. डगन आता जेलर होता. तो आयर्लंडच्या स्वातंत्र्य-युद्धाचा समर्थक होता. इंग्रजांच्या विषयी त्याच्या मनात कमालीची चीड होती. भारतीय राजकीय कैद्यांविषयी त्याला खूप सहानुभूती होती. सायंकाळी तो मला भेटायला आला. मी त्याला सांगून टाकलं की इंग्रजानं मला वाईट रीतीनं वागवलं. यानंतर परत असाच प्रकार घडला तर मी स्वतःला आवर घालू शकणार नाही, हे तुम्ही तुमच्या अधिकाऱ्यांच्या कानावर घाला. माझा हा निरोप अधिकाऱ्याच्या कानावर घालण्याची त्याची काही हिंमत झाली नाही.

दुसऱ्या दिवशी तो जेलचा अधिकारी परत माझ्याकडे आला. मी आधीच्या दिवसाप्रमाणेच आजही बसूनच होतो. मला बसलेला बघून त्याचा अगदी तीळपापड झाला. कुलूप उघडून तो खोलीत आला. अदल्या दिवसाच्या अपमानाचा सूड उगवण्यासाठी मी टपूनच बसलो होतो. त्यानं माझी दाढी पकडण्यासाठी हात पुढे केला तसा मी त्याच्याकडे झेपावलो व त्याच्या तोंडावर एक जोरदार ठोसा लगावला. त्याच्या सोबतच्या अधिकाऱ्यांनी मला दंडुके लगावायला सुरुवात केली आणि त्यांच्या मारहाणीनं मी बेशुद्ध होऊन पडलो. तो निघून गेल्यानंतर

कुणीही डॉक्टर विचारपूस करायला तिथं फिरकला नाही. माझं कुठलं हाड मोडलं नव्हतं. दुसऱ्या दिवशी माझ्या खोलीत एक पिंजरा आणून ठेवण्यात आला व मला पिंजऱ्यात बंद करण्याची त्यानं आज्ञा केली. ज्या इंग्रज माणसानं माझ्याशी अशी वागणूक केली होती, त्याच्यासंबंधी पुढील काळात माझ्या सर्व साथीदारांचं, तो एक भला माणूस आहे असं मत बनलं. त्या दिवसानंतर मात्र तो पुन्हा कधी माझ्या खोलीकडे फिरकला नाही.

अशा तऱ्हेनं दिवस चालले होते. जेलमध्ये अफवा पसरल्या की राजकीय कैद्यांना इथून काढून भारतातील तुरुंगांत नेणार आहेत. तुरुंगातील डॉक्टरांनीही अशी काही चर्चा चाललेली आहे, या बातमीला पुष्टी दिली. परंतु भारतातील कुठल्याही प्रांताचा गव्हर्नर पंजाब मधल्या कैद्यांना आपल्या प्रांतातील तुरुंगात सुरक्षित ठेवू शकू अथवा नाही, याबद्दल साशंक होता. सर्व प्रांतांतील जेलच्या अधिकाऱ्यांनी आमच्या नावांची देखील धास्ती घेतली होती. अन्दमानच्या काळ्यापाण्यावर देखील आमच्या बंदोबस्तासाठी इंग्रज सैनिक पाठवावे लागले होते. हजारीबाग येथून गदर-पार्टीचे १८ कैदी तिथल्या अधिकाऱ्यांना बदडून, शिडी वगैरे काही नसताना तुरुंगाच्या भिंतीवरून उड्या मारून फरार झाले होते. अशा कैद्यांना आपल्या तुरुंगात ठेवायला कुणीही अधिकारी तयार नव्हता. इंग्रज सरकारचे गृहखात्याचे सचिव श्री. मॅक्फर्सन तर आमचा उल्लेख "लांडग्यांची टोळी" असाच करत. त्यांनी असं म्हटलं होतं की पंजाबचे राजबन्दी ही माणसं नसून हिंस्त्र प्राणी आहेत. हिंसाचारातच त्यांना आनंद मिळतो.

ज्या इंग्रजी राजवटीतील अधिकाऱ्यांनी जालियनवाला बागेत निःशस्त्र व निरपराध भारतीयांवर गोळ्यांचा वर्षाव केला आणि ज्या इंग्रजांनी जगाच्या काना-कोपऱ्यात जाऊन दुर्बल लोकांच्यावर अनन्वनीत अत्याचार केले, ते आम्हाला हिंस्त्र प्राणी म्हणून संबोधित होते! निर्लज्जपणाची कमाल नाही तर काय?

भारतातील तेव्हाच्या राजवटीनं असा निर्णय घेतला की काळ्यापाण्याच्या ठिकाणीच शहर वसवायचं. तिथल्या कैद्यांनाच तिथं वसवायचं आणि राजकीय कैद्यांना तिथून काढायचं. तिथं वसती करून राहणाऱ्या कैद्यांना सोयी-सवलती उपलब्ध करून द्यायच्या. राजकीय कैद्यांना कोणत्या प्रांतात ठेवायचं, ह्याचा निर्णय व्हायचा राहिला. शेवटी असा निर्णय घेण्यात आला की मद्रास प्रांतातील निरनिराळ्या तुरुंगात आम्हाला ठेवण्यात यावं. मद्रास प्रांतातील तुरुंगांत आम्हाला ठेवण्याचं मुख्य कारण म्हणजे तिथल्या लोकांशी आम्ही भाषा, रंग-रूप, पोषाख आदि बाबतीत भिन्न असल्यामुळे तेथील कैद्यांना आमच्या विषयी कुठलीच सहानुभूती वाटणार नाही आणि तुरुंगातून आम्ही पळालो तर आम्हाला ताबडतोब पकडता येईल.

काळयापाण्यावरून आम्हांला आता रवानगी होणार, हे आता निश्चित होतं. आमच्या काही साथीदारांना १९१६ च्या युद्धसमाप्तीनंतर सोडून देण्यात आलं होतं. शासन त्यांना अत्यंत धोकादायक समजत होतं– त्यांनाच डांबून ठेवण्यात आलं होतं. आताही काही लोकांचं असं मत होतं की त्यांची सर्वांची सुटका होईल मात्र सरकार पृथ्वीसिंहाला सोडणार नाही, त्याला कैदेतच ठेवतील. माझ्या साथीदारांनी मी माझं वागणं बदलावं असं सुचवलं. त्यांनी या गोष्टीवर विशेष भर दिला की मी असहकाराचं धोरण सोडून द्यावं. यावर मी खूप विचार केला आणि आपल्या निर्धारावर कायम राहिलो. शेवटी एके दिवशी आमच्या खोल्यांची दारं उघडली गेली आणि आम्हा सर्वांना वैद्यकीय तपासणीसाठी नेण्यात आलं. मी अधिकाऱ्यांच्या समोर चालणं-फिरणं किंवा जागेवरून उठणं बन्द केलं होतं म्हणून मला त्यांनी उचलून अधिकाऱ्यांसमोर आणलं व वजनाच्या काटयावरही मला उचलूनच ठेवून माझं वजन केलं. तो अधिकारी एकेका कैद्याला बघून व त्याचं जेलचं रेकार्ड वाचून त्याच्या जेलच्या तिकिटावर आपला अभिप्राय लिहीत होता– एखाद्याविषयी त्यानं लिहिलं– "चांगला माणूस वाटतो"– तर दुसऱ्या एखाद्याच्या तिकिटावर– "दिवस ठीक तऱ्हेनं कंठले". एकाला तर त्यानं– "आदर्श कैदी" म्हणून गौरविलं. "ह्याची सुटका करण्यात यावी"– अशीही शिफारस केली. माझ्या तिकिटावर मात्र त्यानं लिहिलं– "फारच भयंकर माणूस! याला सुधारणं अशक्य आहे. एखाद्या हुतात्म्याचा आव आणतो– याला अतिशय काळजीनं सांभाळण्याची जरूरी आहे."

दोन वर्षे भारतातील तुरुंगांत आणि सहा वर्षे काळयापाण्यावर राहिल्यानंतर मला हे प्रशस्तिपत्र मिळालं होतं. जेव्हा केव्हा परदेशी राजवट त्या देशातील नागरिकाला तुरुंगात डांबण्याची शिक्षा देते, तेव्हा त्यांचं धोरण हेच असतं की त्या माणसाच्या हृदयातील देशप्रेम पार संपुष्टात यावं, जेलच्या यातना भोगताना त्याची देशभक्ती नष्ट व्हावी, सरकार विरोधी विचार करणं आणि कार्य करणं त्यानं सोडून द्यावं. स्वतःला तुच्छ लेखून शासनाच्या दाराशी लाचार बनून त्यानं आलं पाहिजे.

अनेक वर्षे हाल अपेष्टा सहन करत मनात देशप्रेमाची भावना जिवंत ठेवणं ही सोपी गोष्ट नाही. परमेश्वराची दया आणि साथीदारांचं उत्तेजन ह्या मुळेच केवळ हे मनोबल टिकून राहतं.

इंग्रज सरकारच्या अधिकाऱ्याच्या लेखणीतून हेच शब्द उमटले की ह्याचं मन देश-प्रेमाच्या नशेनं धुंद झालेलं आहे आणि त्याची ही नशा उतरवणं शक्य नाही. मादक पदार्थांच्या सेवनानं उतरणारी ही नशा नव्हे!

१९१५ च्या अखेरीस आम्ही "महाराजा" जहाजावर चढून भारताचा किनारा सोडून निघालो होतो तेव्हा आमच्या सर्वांच्या मनात हाच विचार होता की जिवंतपणी आपल्याला पुन्हा मातृभूमीचं दर्शन होणार नाही. काळ्यापाण्यावर कुठल्या प्रकारच्या हाल-अपेष्टांनी आपला मृत्यू होईल– त्याची तर कल्पनाही आम्ही करू शकत नव्हतो. आता जेव्हा परत आम्हाला त्याच जहाजामध्ये बसवून भारताकडे घेऊन निघाले, तेव्हा आमच्या मनात अनेक आशा पल्लवित झाल्या. मातृभूमीचं परत दर्शन होणार आणि जिवंत राहिलो तर परत स्वातंत्र्याचे दिवस अनुभवायला मिळणार– या विचारांनी आमची मनं सैरभैर झाली.



काळ्यापाण्याचा इतिहास हा एक निराळ्या प्रकारचाच इतिहास आहे. ब्रह्मदेशाच्या राजाचे शेवटचे दिवस ह्याच बेटावर गेलेले होते. इ. स. १८५७ च्या स्वातंत्र्य-युद्धातील अनेक वीरांना इथंच आपलं उर्वरित जीवन व्यतीत करावं लागलं होतं. भारतातील सर्वच क्रांतिकारकांना या बेटावरील तुरुंगात अनेक हाल-अपेष्टांना तोंड द्यावं लागलं होतं. बॅरिस्टर विनायक दामोदर सावरकर यांनी खूप परिश्रम करून "काळ्या पाण्याचा इतिहास" हा ग्रंथ लिहिला आहे. वीर सावरकरांनी आपलं आत्मचरित्र – ("माझी जन्मठेप") लिहितेवेळी काळ्यापाण्याचा इतिहास पूर्णपणे उभा केला आहे. त्यांच्या लेखनाची शैली अप्रतिम असून तिची जेवढी स्तुती करावी तेवढी थोडी आहे. आपल्या राष्ट्राविषयी प्रेम आणि इंग्रजांविषयी तिरस्कार बाळगणाऱ्या वीरांना कोणकोणत्या कष्टांचा सामना करावा लागतो आणि काळ्यापाण्यावरील काळ्या खोल्यातून कशा प्रकारचं जीवन त्यांच्या वाट्याला येतं, त्या नरकात कसं जगावं लागतं, ह्या सर्व गोष्टींचं ज्ञान प्राप्त करून घ्यायचं असेल तर त्यांनी सावरकरांचा "काळ्या पाण्याचा इतिहास"— हा ग्रंथ अवश्य वाचून बघावा.

माझा हा जीवन-वृत्तान्त निराळ्याच प्रकारचा आहे. हा वृत्तान्त लिहीत असताना "काळं पाणी" किंवा "गदर-पार्टी" चा समग्र इतिहास लिहिण्याचा माझा मुळीच हेतू नाही. परंतु "गदर-पार्टी" संबंधी जसं संक्षेपानं मी सांगितलं आहे तसंच "काळ्या पाण्याविषयी" मी थोडक्यात सांगणार आहे.

काळ्यापाण्याच्या बेटावर इंग्रजांना वास्तव्य करायचं होतं. यासाठी दरसाल विशिष्ट संख्येतील कैद्यांना काळ्यापाण्यावर वास्तव्य करण्यासाठी इंग्रज सरकारचे इंग्रज जज्ज, "काळ्या पाण्याची जन्मठेप" अशी शिक्षा देत होते. जन्मठेप म्हणजे साधारणपणे वीस वर्षांची कैद. वीस वर्षांच्या तुरुंगवासाच्या काळात जेलच्या अधिकाऱ्यांना प्रत्येक महिन्याला एका कैद्याची कमीत कमी तीन दिवस आणि जास्तीत जास्त सहा दिवस, शिक्षेतून सूट द्यायचा अधिकार होता. जर एखादा कैदी जेलच्या अधिकाऱ्यांच्या आज्ञा निमूटपणे पाळून व जेलचे नियम सांभाळून शांतपणे तिथं राहिला तर अशा कैद्याची चौदा वर्षांनंतर सुटका होत असे. जेव्हा कैदी काळ्यापाण्याच्या तळ-घराच्या तुरुंगात पोचत तेव्हा त्यांचा सर्व इतिहास बघण्यात येई. एखादा साधारण खूनी किंवा मामुली चोरी केलेला असेल, अशा कैद्यांना एका आठवड्यात

काळ्या पाण्याच्या एखाद्या बेटावरील जंगलात काम करण्यासाठी पाठविण्यात येई. तिथं ते बराकीत राहत असत आणि कैदी-जमादारांच्या देखरेखीखाली दिवसभर जंगलात कामं करत. पाच वर्षं शिक्षा भोगल्यानंतर त्यांना जरा बऱ्यापैकी कपडे आणि दरमहा बारा आणे वेतन मिळे. दहा वर्षं झाल्यावर त्यांना बाहेरून आर्थिक साहाय्य मागवण्याची परवानगी दिली जाई आणि त्यांचे नातेवाईक व मित्र त्यांना तिथं येऊन भेटू शकत असत. जर त्यांच्यापैकी कुणी तिथं स्थायिक होऊ इच्छित असतील तर सरकारतर्फे त्यांना जमीन आणि आर्थिक मदतही मिळत असे.

कैद्यांना जंगलात जे काम करावं लागे ते एवढं कष्टाचं होतं की त्या भीतीनंच दररोज कुणा न कुणी गळफास लावून आत्महत्या करी किंवा सरळ समुद्रात उडी घेऊन बुडून मरे. एखादा कैदी जंगलातच पळून जाऊन लपून राहण्याच्या प्रयत्नात कुठल्या न कुठल्या जंगली श्वापदाचं भक्ष्य बनून जायचा. काही धाडसी तरुणांनी काळ्या पाण्याचा समुद्र पोहून भारत किंवा ब्रह्मदेशाचा किनारा गाठण्याचाही प्रयत्न केला होता. काहींची प्रेतंच किनाऱ्याला लागली!

ज्या कैद्यांनी लूट उगवण्याच्या हेतूने खून केलेले असतील ते किंचित धोकादायक समजले जात परंतु ज्यांनी दरवडे घालून खूनही केलेले असतील ते अत्यंत भयंकर स्वरूपाचे मानले जात. अशा कैद्यांना प्रथम एक ते तीन वर्षं पर्यंत तुरुंगात डांबून नंतर त्यांची रवानगी जंगलातील कामासाठी होई. जंगलातली कामं अतिशय कष्टप्रद होती कारण अंदमान बेटावर वर्षातून नऊ महिने पाऊस पडत असे. यामुळं मलेरियाचा फैलाव करणारे डास तिथं मोठ्या प्रमाणात होते. जंगलात ओल्या कपड्यांनी काम करणं आणि डासांचा मारा सहन करणं, जळवांच्याकडून रक्त शोषण आणि कामात थोडीही हयगय झाली की मारहाण सहन करणं, हे सगळं किती कष्टप्रद होतं याची कल्पना करता येईल. जंगलात कटाई व्यतिरिक्त त्यांना अन्य कामंही करावी लागत. उदा. रस्ते तयार करणे, झाडांची कटाई करून बराकी बनवणे, नारळाची लागवड करणे, नारळाच्या झाडावर चढून नारळ काढणे, कुऱ्हाडी आणि करवतीनं झाडं तोडणं-चिरणं, लाकडांच्या फळ्या बनवणे, तोडलेली झाडं दोरांच्या साहाय्यानं तिथून ओढत नेऊन अन्यत्र त्या लाकडांचे ढीग रचणे वगैरे.

सेल्युलर जेलमध्ये ज्या कैद्यांना शिक्षेचे दिवस कंठावे लागत ते स्वतःला थोडेसे भाग्यवान समजत. राहण्यासाठी त्यांना स्वच्छ खोली देण्यात येई आणि तीन वेळ मोजून-मापून अन्नही मिळे. उन्हा-पावसातलं काम त्यांच्या वाट्याला येत नव्हतं. डास, जळवा यांच्या हल्ल्यापासूनही ते सुरक्षित होते. पळून जाऊन आत्महत्या करण्याचीही त्यांना संधी नव्हती. धोकादायक आणि सशक्त कैद्यांना विशेष प्रकारच्या संकटांचा सामना करावा लागे. घाण्याच्या बैलाप्रमाण त्यांना तेलाचा घाणा फिरवून तेल गाळा

करावं लागे आणि याहूनही कठोर शिक्षा म्हणजे आपल्या खोलीत बंदिस्त राहून घाण्याची चाके जागेवरच फिरवावी लागत– ही शिक्षा द्यायचं कारण म्हणजे कैद्याला तेल पिण्याची किंवा खोबरं अथवा तीळ खाण्याची संधी मिळू नये, म्हणून. हे काम फारच कठीण होतं अशा प्रकारचं काम वाट्याला येऊ नये म्हणून अनेक कैदी स्वतःवर अघोरी अत्याचार करत. आपल्या हातांना ते जखमा करायचे किंवा असे काही पदार्थ खायचे की ज्यामुळे रक्ताचे संडास व्हायचे. घाणा चालवायला ते नकार द्यायचे आणि वेतांचा मार निमूटपणे सहन करायचे. काही कैदी कुठूनतरी दोर मिळवून गळफास लावून आत्महत्याही करायचे.

काळ्यापाण्याच्या बेटावर नारळाचा प्रचंड उद्योग होता. हजारो मण नारळ तोडून त्यातलं खोबरं काढलं जाई–काथ्यापासून बारीक तंतू काढले जात आणि खोबऱ्याचे तुकडे करून ते जेलच्या छतावर सुकवण्यासाठी ठेवत. खोबरं सुकल्यानंतर ते पोत्यात भरून भारतात पाठवलं जाई. तिथं त्यापासून तेल काढत.

नारळ फोडून आतलं खोबरं काढण्याचं काम मिळणारा कैदी स्वतःला भाग्यवान समजे. ते नारळातील पाणी पिऊ शकत होते, खोबरंही त्यांना खायला मिळे. हे काम करणारे कैदी आम्हालाही नारळातील पाणी आणि खोबरं पाठवून द्यायचे. आमच्यापैकी जे सशक्त होते आणि ज्यांची पचन-शक्ती चांगली होती, त्यांना इच्छेनुसार पाणी आणि खोबरं मिळू शके. जे कैदी अशक्त किंवा आजारी असत त्यांना खोबरं सुकवण्याचं किंवा काथ्यापासून तंतू बनवण्याचं काम दिलं जाई. या तंतूपासून दोर विणण्याचं कामही त्यांनाच सांगण्यात येई. या दोरांपासून जहाजांना उपयुक्त ठरणारे जाडे दोर वळण्यात येत. जेलच्या चार भिंतींच्या आवारात लोहार आणि अन्य कारागिरांनाही कामे असत. काळ्यापाण्यावरील कार्यालयात जे निरनिराळ्या प्रकारचे फॉर्म्स वगैरे लागत त्यांची छपाई जेलच्या छापखान्यातच करण्यात येई. सुमारे चार वर्षांनंतर आमच्या काही साथीदारांना छापखान्यातील कामं देण्यात आली. काही जणांना तर दरमहा बारा आणे एवढं वेतनही मिळू लागले.

तळघरातील तुरुंगात जे कैदी नमाधारकपणे वागत आणि आपल्या वाट्याला आलेली कामं शांत चित्ताने करत मग त्यांना बाहेरच्या कामाला पाठवण्यात येई. बाहेर नेलेल्यांपैकी जे धोकादायक वाटत त्यांना मात्र परत खोल्यात डांबण्यात येई.

बर्मी कैद्यांशी माझा चांगला परिचय होता कारण मला बर्मी भाषा चांगल्या तऱ्हेनं अवगत होती. माझ्या वयाच्याच एका बर्मी डाकूनं जेलमधून पळून जाण्याचा बेत आखला. त्याचा माझ्यावर खूप विश्वास होता. त्यानं मलाही पळून जाण्याची सूचना केली. खोल्यातील प्रकाशासाठी ठेवलेल्या झरोक्यांचे लोखंडी गज कापून

काढता येत होते. त्या डाकूनं जेलच्या बाहेर संपर्क प्रस्थापित केले होते. त्याच्या मित्रांनी गज कापून काढण्यासाठी मदत करण्याचे कबूल केले होते. मी त्याच्या ह्या योजनेत सामील होऊ शकत नव्हतो कारण माझी खोली वारंवार बदलण्यात येत होती. काळ्यापाण्यावरील कैदी अंदमान बेटावरून पळून जाण्याची जी योजना बनवीत तिचं स्वरूप असं होतं. हे कैदी रात्रीच्या वेळी बांबूच्या होडीतून समुद्रावर येऊन पोचत. मोठ-मोठे बांबू दोरांच्या साहाय्यानं एकत्र बांधून–त्यांची तरफ बनवण्यात येई. बांबू आतून पोकळ असल्यामुळे–एकमेकांना जोडून ही तरफ बनवली जाई. काही मोठ्या आणि जाडजूड बांबूंना छिद्रे पाडून त्यात पिण्याचे पाणी भरून येत. खाद्यपदार्थंही सोबत घेण्यात येत. हा बर्मी डाकू अशा योजनेनंच तेथून पळाला. आम्ही मात्र सहा वर्षं पर्यंत जेलच्या कोठडयांत बंदिवान होऊन पडलो होतो. आम्हाला कधी बाहेरच्या मोकळ्या हवेचा आनंद मिळू शकला नाही. यामुळं अंदमान बेटाविषयी आम्हाला अधिक जाणकारी मिळाली नाही. मात्र, कैद्यांसंबंधी आम्हाला भरपूर माहिती होती.

अंदमान हा बेटांचा एक समूह आहे. या बेटांमध्ये–पोर्टब्लेअर, अंदमान आणि निकोबार ही प्रमुख आहेत. या तीन मोठ्या बेटांच्या भोवती अनेक छोटी-छोटी बेटं आहेत. सर्वच बेटांत जंगलं आणि पर्वत आहेत. जमीन चांगली सुपीक आहे- जीवनोपयोगी सर्व वस्तु तिथं निर्माण केल्या जाऊ शकतात. तिथं ऊसाची मोठी शेती आहे. नारळासाठी तर ही बेटं प्रसिद्धचं आहेत. वर्षातून नऊ महिने इथं पाऊस पडतो–त्यामुळं इथं तांदुळही खूप पिकतो. मच्छीमारीचाही इथं मोठा उद्योग चालू शकतो. अंदमान बेटांवरील आदिवासी जंगली अवस्थेत राहतात. ते आपल्या टोळ्या बनवितात. त्यांचा रंग काळा असून उंचीनं ते बरेच बुटके असतात. इंग्रजांनी अनेक आदिवासी ठार केले. यानंतर जे थोडे फार जिवंत राहिले त्या सर्वांना सुसंस्कृत बनवण्याचे त्यांनी प्रयत्न केले.

काळ्यापाण्यासंबंधी आतापर्यंत जे काही लिहलं गेलं आहे, त्या सर्वांत वीर विनायक दामोदर सावरकर यांचं आत्मचरित्र सर्वोत्कृष्ट आहे. अरविन्द घोष यांचे धाकटे बंधु वीरेन्द्रकुमार यांनी ही "काळ्यापाण्याची कथा"–या शीर्षकाचे आपले आत्मचरित्र लिहिलं आहे. भाई परमानन्द यांच्या "आप बीती" मध्येही काळ्या पाण्याची हकीकत आलेली आहे. शचीन्द्रनाथ सान्याल यांनी सर्वांत प्रथम "बन्दी जीवन" हे पुस्तक लिहून काळ्यापाण्यावरील बन्दी जीवनावर चांगला प्रकाश टाकला होता.

● ● ●

१९२१ मधील जून किंवा जुलै महिना होता. गदर पार्टीच्या सर्व कैद्यांना 'महाराजा' जहाजामध्ये बसविण्यात आलं. जहाजावर चढल्यानंतर समजलं की जहाजाची दिशा मद्रासकडे आहे. जहाजाचा प्रवास तीन दिवस चालला. आमच्या सर्वांच्याच मनात हुरहूर निर्माण झाली होती. कैदी जीवनाची सहा वर्षे संपली होती. जेलमध्ये ज्यांचा काळ शांतपणानं गेला होता अशा लोकांना तीन-चार वर्षांनंतर सुटकेची आशा होती. ज्यांना चांगली प्रमाणपत्रं मिळाली होती ते तर आणखी लौकर सुटण्याची आशा बाळगून होते. जेलच्या अधिकाऱ्यानं मला जे सर्टिफिकेट दिलं होतं त्यावरून मला माझं भविष्य स्पष्ट दिसत होतं. मी जिवंतपणी जेलमधून सुटणं अशक्यप्राय होतं. मी विचार केला होता की बंदिवासात जर मी मेलो नाही तर १९५१ पूर्वी माझी सुटका होणं अशक्य आहे. हे होतं माझं भविष्य.

तिसऱ्या दिवशी आमचं जहाज मद्रास बन्दराला लागलं. उतरल्यानंतर आम्हा सर्वांना 'सुधारगृहात' (Penitentiary Jail) मध्ये पोचविण्यात आलं. सगळ्यांना एका बराकीत बन्द करण्यात आलं. दुसऱ्या दिवशी आम्हा सर्वांना तपासणी-साठी रांगेत उभं करण्यात आलं. नियमाप्रमाणे आम्ही सगळे चांगले जागे होऊन जेलच्या अधिकाऱ्यांच्या पुढे उभे राहिलो. मी असहकार पुकारलेला असल्यामुळं मी जागेवरच बसून राहिलो. माझं असं बसून राहणं इंग्रज अधिकाऱ्याला खूपच अपमानजनक वाटलं. त्याला ते असह्य झालं आणि तो सरळ मजकडे निघाला. माझ्या पुढ्यात जेलच्या नोंदीचं रजिस्टर पडलेलं होतं. त्यानं ते रजिस्टर उघडलं. पहिल्या पानावरच माझं प्रमाणपत्र चिकटवलेलं होतं. ते वाचताच त्याच्या चेहऱ्याचा रंग बदलला. माझ्या-कडे बघून तो हसला आणि मुकाट्यानं निघून गेला. त्याच्या तोंडातून एक शब्दसुद्धा उमटला नाही. त्याच दिवशी सायंकाळी सुमारे सहा वाजता आम्हाला तीन-तीनच्या किंवा चार-चारच्या तुकड्या बनवून जेलच्या बाहेर नेण्यात आलं. आमच्या पायांत साखळ्यांच्या बेड्या घातलेल्याच होत्या, आता हातातही बेड्या घालण्यात आल्या. माझ्या समवेत आणखी दोन साथीदार होते. शिपाई आम्हाला स्टेशनवर घेऊन गेले. मला कलकत्त्याला जाणाऱ्या गाडीत बसविण्यात आलं. आणखी दोघं माझ्याबरोबर होते. एकाचं नाव केहरसिंह आणि दुसऱ्याचं मृणालसिंह असं होतं. केहरसिंह २३ क्रमांकाच्या छावणीत पकडला गेला होता. आम्ही तिघेजण होतो आणि आमच्यासह पहारेकरीही

तीनच होते. हातापायांत बेड्या होत्या. इतर उतारूंच्या समवेतच आम्हाला बसवण्यात आलं होतं. शिपायांच्या हातांत बंदुकी होत्या. गाडी वेगानं धावू लागली. डब्यातल्या अन्य प्रवाशांची भाषा आम्हाला समजत नव्हती. आम्ही एकमेकांशी काही-बाही बोलत होतो. रात्री १० वाजता जेव्हा प्रवासी पेंगू लागले, कसाबसा आराम घेऊ लागले, मी माझ्या जोडीदारांना पंजाबीत म्हणालो– "साडे नाल तीन कुक्कड हैंगे–आओ इन्हां नूं मरोड सुट्टीए." (आपल्या बरोबरच्या या तीन कोंबड्यांच्या माना मुरगाळून यांना फार करू).

आम्ही तिघंही चांगलेच बलशाली होतो. त्या तीन पोलिसांना ताब्यात घेणं मुळीच अवघड नव्हतं कारण आमच्या एकेका हातातच बेडी होती, दुसरा हात मोकळा होता, एकेक ठोसा लगावून आम्ही त्यांच्या बंदुकी हिरावून घेऊ शकत होतो आणि गार्डची साखळी ओढून गाडी थांबवणं शक्य होतं. माझं बोलणं ऐकून माझ्या जोडीदारांनी आपल्या नजरा खाली वळवल्या. मी समजून चुकलो की त्यांना लौकरच सुटका होण्याची आशा होती तेव्हा ते माझ्या योजनेत कशाला सामील होतील? मला हे बघून अतिशय वाईट वाटलं की काल जे साथीदार मृत्यूशी सामना करायला तयार होते–सहा वर्षांच्या कैदेनं ते पार खचून गेले होते. माझी सुटकादेखील लौकर होण्याची शक्यता असती तर असा वेडेपणाचा विचार माझ्यातरी डोक्यात कशाला आला असता? निराश मनानं मीही खाली पडलो आणि थोड्याच वेळात झोपी गेलो. दोन तासांनी मी लघवीला जायला उठलो. पोलिसांनी माझ्या हातातील बेडी काढली. लघवी आटोपून मी परत बाहेर आलो तेव्हा पहारेकरी झोपी गेलेला आहे, हे मी पाहिलं. गाडी खूप वेगानं धावत होती. बाहेर जोरात पाऊस पडत होता. अंधारात बाहेरचं काहीच दिसत नव्हतं. शिपाई झोपलेले आहेत असं बघून माझ्या मनात पुन्हा ऊर्मी उसळून आली आणि एका क्षणात माझ्या मनात विचार चमकून गेला की आपण खिडकीतून उडी मारून पळून निसटावं. खिडकीखालीच माझा जोडीदार झोपला होता. उडी मारण्या-साठी त्याला ओलांडून जावं लागणार होतं. खिडकीतून मी बाहेर उडी घेताना माझ्या पायातील बेड्या त्याच्या शरीराला घासून गेल्या. त्यानं घाबरून हातानं पकडण्याचा प्रयत्न केला परंतु त्या अवधीत मी बाहेर पडलो होतो. त्याच्या हाताचा मला थोडा मारही लागला. गाडीचा वेग त्यावेळी जवळजवळ ३० मैलांचा असावा. माझा जोडीदार घाबरून जागा झाल्यामुळें सर्वच जण जागे झाले. साखळी ओढण्यात आली. गाडी २०० गज पुढें जाऊन थांबली.

मी सावधपणानं उडी मारली होती. मी पायांवर पडू इच्छित होतो—पण पडलो ते गुडघ्यावर, गुडघ्यांना खूप मार लागला. जागेवरून उठणंच कठीण वाटू लागलं. मनाच्या निश्चयानं सर्व शरीर गरम झालं. मी उठून चालायला लागलो. पळण्याशिवाय

गत्यंतर नव्हतं. गाडी थांबलेलीच होती. तिन्ही शिपाई माझ्या जोडीदारांसह खाली उतरले. मी जिथं उडी टाकली होती त्या जागेवर त्यांनी गोळ्या झाडल्या. धावताना मी तिथंच पडून राहीन असा त्यांचा अंदाज होता. अंधारात मी पुढे सरकलो आणि एका काटेरी कुंपणापाशी पोचलो. माझ्या पुढ्यात काटेरी झुडपांचं कुंपण होतं. पाठीमागे परतण्यात अर्थच नव्हता. पुढे जाणं भागच होतं. अशावेळी अधिक विचार करण्यातही अर्थ नसतो. जे ठरवलेलं आहे ते पार पाडल्यावाचून गत्यंतर नसतं. डोळे बंद करून मी दोन्ही हात डोळ्यांवर ठेवले आणि कुंपणावरून पुढे उडी घेतली. डोळे बचावले परंतु सगळ्या अंगात काटे घुसले. मी कुंपणापलीकडे येऊन पोचलो. आता माझ्या समोर पाण्यानं भरलेलं भाताचं खाचर होतं. ते ओलांडून पलीकडे गेलो तर तिथं पुन्हा काटयांचं कुंपण आढळलं. काटयांची भीती नाहीशी झाली होती. ते बाड देखील मी उडी मारून ओलांडलं. मी कुठे चाललो आहे आणि पुढयात काय आहे, हे प्रश्न माझ्यालेखी निरर्थक होते. काही वेळानंतर मी एका भिंतीवर येऊन आदळलो. हात लांबवून अंदाज घेतला तेव्हा हाताला भिंतीचा मढेरीचा वरचा भाग लागला. कुणाच्या तरी घराची ती भिंत होती, हे उघड होतं. भिंतीवर चढून खाली उडी टाकावी व घरात जावं, हा विचार मनात आला. भिंतीवर हात टेकवून खाली पाय सोडले परंतु ते जमिनीला लागेचनात. हाताची पकड घट्टशी वाटली नाही. शरीराच्या रेट्यानं परत भिंतीवर चढलो आणि पलीकडील बाजूस उडी टाकून उतरलो. शेतात पाणी साचलेलंच होतं. चालत निघालो तेव्हा कुठं नाला, कुठं शेत लागत होतं. काही भागातून चालत जात होतो तर कुठं पोहत पलीकडे पोचत होतो. सुमारे एक तास अंधारात असाच चालत राहिलो. एवढयात एका ठिकाणी दिव्याची ज्योत दिसली. मी त्या दिशेनं पुढं निघालो. भातानजीकच्या एका छोटया झोपडीजवळ हा दिवा होता त्या उजेडात तिथं दोन खाटांवर एक पुरुष आणि एक स्त्री झोपलेले दिसले. एका कोपऱ्यात एक वासरू बांधलेलं होतं. उजेडात मी स्वतःकडे बघितलं तेव्हा अंग ठिकठिकाणी खरचटलं होतं. अनेक ठिकाणची कातडी सोलून निघाली होती. अंगभर काटे घुसलेले होते. सर्वांगातून रक्त येत होतं. सगळे कपडे रक्तानं थबथबले होते. मी माझ्याशीच म्हणालो की ही माणसं जागी होऊन माझ्याकडे बघतील तर त्यांना काय वाटेल? त्यांना तर वाटेल की समोर भूतच उभं राहिलं आहे! यांना झोपेतून उठवावं की उठवू नये, असाच प्रश्न मला पडला. त्यांना उठवून काय सांगावं? कसं सांगायचं? त्यांची समजूत कशी पटवायची? मी विलक्षण थकलो होतो. खाली बसून विश्रांती घ्यायची माझी इच्छा होती. पायातल्या बेडया सांभाळत मी खाली बसलो. बेडीच्या साखळ्यांचा आवाज झालाच आणि त्या आवाजानं तिथली स्त्री जागी झाली. त्या बाईनं डोळे उघडून माझ्याकडे बघितलं तेव्हा ती अतिशय घाबरली. तिच्या चेहऱ्यावरून आणि हालचालींवरून तिला किंकाळी मारायची आहे हे दिसत होतं. मी आपल्या ओठांवर

बोट ठेवून तिला गप्प राहायला खुणावलं. भयभीत झाल्यानं ती ओरडली नाही परंतु पलीकडे झोपलेल्या पुरुषाला तिनं हलवून जागं केलं. त्या पुरुषानं डोळे उघडून माझ्याकडे बघितलं तेव्हा तो अवाक् झाला. त्याला मी एखाद्या कोड्याप्रमाणं वाटू लागलो. मी त्यांना अखेर हे सांगण्याचा प्रयत्न केला की मी कुणी भूत-प्रेत नसून, माणूसच आहे. मी माझ्या बेड्या त्यांना दाखवल्या आणि दोन संस्कृत शब्दांचा उच्चार केला—'देशभक्त—स्वराज्य' त्या काळात महात्मा गांधींचं असहकाराचं आंदोलन जोरात होतं. देशावर प्रेम करणारे अनेक आन्ध्रवासी तुरुंगात पडलेले होते. माझ्या तोंडातून जेव्हा 'देशभक्त-स्वराज्य' हे शब्द बाहेर पडले तेव्हा त्यांच्या चेहऱ्यावरील भीती नाहीशी झाली आणि आता त्यांना माझ्याविषयी सहानुभूती वाटू लागली. त्यांच्या हाताच्या खुणा बघून, आम्ही काय करावं, असं ते विचारत आहेत, हे माझ्या लक्षात आलं. मी त्यांना खुणा करूनच सांगितलं की आधी माझ्या या पायातील बेड्या तोडायच्या आहेत. त्या दोघांनीही जवळ येऊन बेड्या बघितल्या. आम्हाला त्या तोडता येतील असं वाटत नाही, असा भाव त्यांच्या चेहऱ्यावर दिसला. मी झोपडीत चहूकडे नजर टाकली. तिथं एक लोखंडी गोळा पडलेला दिसला. तो आणण्याबद्दल मी त्यांना खुणावलं. त्यांनी त्या गोळ्यानं बेडीवर प्रहार करून बघितले परंतु बेड्या तुटल्या नाहीत. मी पार थकून गेलो होतो. हातातील कातडीही सोलून निघाली होती परंतु तरीही उरल्या सुरल्या बळाचा वापर करून त्या गोळ्यानं मी स्वतःच बेडी तोडण्याचा प्रयत्न केला. लोहाराला ज्या बेड्या तोडण्यासाठी हातोड्याचा आणि पकडीचा वापर करावा लागतो ती बेडी मी कसंबसं त्या लोखंडी गोळ्याच्या मदतीनं तोडली. ती बेडी त्यांच्या हवाली करून ती शेतात कुठं तरी खड्डा करून गाडून टाका, असं मी खुणेनं सांगितलं. माझ्या अंगावर कैद्याचे जे कपडे होते त्यांवर रक्ताचे डाग होते. मी ते अंगावरून काढले. फक्त लंगोट राहू दिला. मी खूण करून त्यांना कपडे मागितले. खुणेनेच त्यांनी सांगितलं की त्यांच्या अंगावरील कपड्यांशिवाय त्यांच्यापाशी दुसरे कपडे नाहीत. मला खूप भूक लागली होती. मी खायला मागितलं तेव्हा त्यांनी कोपऱ्यातील मातीची रिकामी भांडी दाखवून आपली असमर्थता प्रकट केली. अशा परिस्थितीत तिथं आणखी काही वेळ थांबणं व्यर्थ होतं. मी झोपडीबाहेर पडलो. पाऊस थांबला होता. समोरच एक मोठं घर दिसलं. दरवाजा उघडून अन्न-वस्त्र मागण्याची माझी इच्छा होती परंतु त्या शेतकरी तरुणानं मला मागे खेचलं आणि मी आत जाऊ नये असं समजावलं. ते घर एखाद्या इंग्रजाच्या हस्तकाचं असावं, असा मी अंदाज केला. तो तरुण गावाच्या सीमेपर्यंत माझ्यासोबत आला नमस्कार करून मी त्याचा निरोप घेतला. चहूकडे पाणीच पाणी दिसत होतं. कोणत्या बाजूनं जावं, हा मोठा माझ्यासमोर प्रश्न होता. कुठं कसलीही खूण दिसेना तेव्हा देवाचं नाव घेऊन मी एका बाजूनं निघालो.

मागे वळून बघितलं तेव्हा तो किसान युवक परत जात होता. आन्ध्रमधील गरीब किसान युवक अंगावर एक सदरा आणि लुंगी. घरात केवळ रात्रीपुरतं अन्न होतं. दुपारची भाकरी त्याला मोल-मजुरी केल्यानंतरच मिळणार होती. हा अर्धनग्न किसान एका अर्थानं खरा देशभक्त होता. तुरुंगातून पळालेल्या कैद्याला पोलिसांच्या हवाली करण्याचा विचार सुद्धा त्याच्या मनात आला नाही. इंग्रजांच्या शत्रूचं रक्षण करण्यासाठी तो जागरूक होता आणि तत्पर होता. राष्ट्रीय स्वातंत्र्याचा अंकुर इथंच दडलेला होता. घराकडे परतलेल्या त्या किसान युवकाला बघून माझ्या मनात हे विचार आले.

मी समोर बघितलं. सूर्योदय होण्यास अजून थोडा अवधी होता. रात्रीचा अंधार निवळत होता. पाण्यातून चालत चालत शेवटी मी रेल्वे रुळांवर पोचलो. हा तोच रेल्वेमार्ग होता. ज्यावरून गाडी मला तुरुंगात डांबण्यासाठी घेऊन जात होती. थकावटीनं आणि भुकेनं मी व्याकूळ बनलो होतो. रस्त्याने हाताला लागतील ती जंगली फळं मी तोडून खाल्ली. थोडा वेळ मी रेल्वेच्या रुळांवर पडून राहिलो. माझ्या शरीराची एकूण परिस्थिती मोठी दयनीय बनलेली होती. अंग सोलून निघालं होतं. काही जखमांतून रक्त तोंडाशी वाळलं होतं. काही वेळानं मी उठून पुढं निघालो. मी एका स्टेशनवर पोचलो. स्टेशनवर पोलिसांची एक तुकडी पडलेली होती. एका डाकूच्या मागावर ते तिथं आले होते. स्टेशनमास्तरानं त्या तुकडीला रात्री चालत्या गाडीतून एक कैदी पळून गेल्याची बातमीही सांगितली होती. मला बघितल्याबरोबर हाच तो फरारी कैदी आहे, हे त्यांनी तावडतोब ओळखलं. त्यांनी मला पकडून बसवलं आणि ते प्रश्न विचारू लागले. त्यांच्या प्रश्नाचं कुठलंही समाधानकारक उत्तर मी देऊ शकलो नाही. त्यामुळं मीच तो पळालेला कैदी आहे, याबद्दल त्यांची खात्री झाली. त्यांनी मला ताब्यात घेतलं आणि गाडीत बसून ज्या स्टेशनावरून मी पळालो होतो त्याच स्टेशनवर आणून पोचवलं. मार बसल्यामुळं आणि ठिकठिकाणी जखमा झाल्यामुळं चौदा दिवस मला नीट उभं राहणं कठीण झालं. मी कमालीचा अशक्त झालो होतो.

एक राजकीय बन्दी गाडीतून उडी मारून पळाल्याची बातमी वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झाली होती. ज्या स्टेशनाजवळ मी उडी मारली होती त्याचं नाव होतं ओंगोल (Ongole). आन्ध्र प्रदेशातलं हे एक सुंदर नगर होतं. या गावचे बैल देखणे व सशक्त होते व सर्व देशभर प्रसिद्ध होते. तिथल्या नागरिकांना जेव्हा ही बातमी समजली की पायात बेड्या असताना चालत्या गाडीतून उडी मारून पळालेला राजबन्दी तिथल्या पोलीस ठाण्यात धरून आणलेला आहे, तेव्हा अशा धाडशी व्यक्तीला बघण्यासाठी त्या पोलीस ठाण्याच्या बाहेर हजारो तरुण जमा झाले. पोलीस ठाण्यात कैद्याचे विशिष्ट कपडे उपलब्ध नव्हते आणि दुसरे कपडे मला देण्याचा त्यांना अधिकार नव्हता. मद्रास काउन्सिलचा एक खिस्ती सदस्य माझ्या भेटीसाठी आला. माझी सर्व हकीकत ऐकून

तो फारच प्रभावित झाला. मला घालण्यासाठी त्यानं सर्व कपडे खरेदी करून पाठवले. ते कपडे परदेशी असल्यामुळे मी ते घातले नाहीत. माझ्या अंगावर अजूनही केवळ लंगोटच होता. तिथल्या काँग्रेस-कार्यकर्त्यांना ही बातमी समजली तेव्हा ते माझ्यासाठी खादीचे कपडे घेऊन आले. पोलिसांनी ते खादीचे कपडे अंगात घालण्याची मला अनुमती दिली नाही. कपडे मला स्वीकारू दिले नाहीत.

माझ्यावर उपचार करण्यासाठी डॉक्टरांना बोलावण्यात आलं. तसा मला कुठलाच आजार नव्हता. अंगात घुसलेले काटे बघून तो म्हणाला काटे सर्व शरीरभर रुतलेले आहेत. एक-दोन असते तर काढून टाकता आले असते. त्याचं असं बोलणं ऐकून मी मनातल्या मनात विचार करू लागलो की हा खरोखरच डॉक्टर आहे का एखादा पशु! अंगात रुतलेले काटे आतल्या आत फुगून मोठे झाले व ते फुटले परंतु बाहेर काढता आले नाहीत. त्यावेळच्या जखमा आणि काटे रुतल्याच्या खुणा आजही माझ्या पायांवर दिसतात. पोलिसांनी मी पळून जाण्याचा गुन्हा केला, हा आरोप ठेऊन मला कोर्टा-पुढं उभं केलं. प्रथम श्रेणी मॅजिस्ट्रेटसमोर माझं प्रकरण ठेवण्यात आलं. माझ्यावर चालविल्या जाणाऱ्या खटल्याची हकीकत साऱ्या गावभर झाल्यामुळं मला बघण्यासाठी हजारो तरुण कोर्टात जमू लागले. माझ्या शरीरावर लंगोटीशिवाय अन्य कपडा नव्हता. माझ्या दोन्ही हातात बेड्या ठोकण्यात आल्या होत्या. शिवाय मला बांधूनही ठेवण्यात आलं होतं.

मी कोर्टाच्या व्हरांड्यात आऊन बसलो. मला जेव्हा आत बोलावलं तेव्हा तिथं जाऊन मी परत जमिनीवर बसून राहिलो. मॅजिस्ट्रेटनं माझ्याशी बोलायला सुरुवात केली. मी नुसताच बसून राहिलो. त्यानं अधिकाऱ्याच्या तोऱ्यात मला उभं राहून उत्तरं द्यायला सांगितलं. "हे काही घर नाही" असंही त्यानं सुनावलं. मीही एखाद्या क्रांतिकाराला शोभेल असंच उत्तर दिलं. "हे कोर्ट इंग्रज सरकारच्या अधिपत्याखाली आहे. तुमच्या डोक्यावर इंग्रज बादशहाचा फोटो लावलेला आहे. त्याला मी माझा शत्रू मानतो. म्हणून या कोर्टाविषयी मला मुळीच आदर वाटत नाही. आपल्या विषयीही मला आदर वाटत नाही. तुमच्या शासनाचा मानच मी करत नसल्यामुळे मी उभा राहून बोलणार नाही". मॅजिस्ट्रेट एक चतुर ब्राह्मण होता. माझं बोलणं ऐकून तो किंचित हसला. त्यानं आपल्या शिपायाला आज्ञा दिली की टेबल-खुर्ची बाहेर न्या. आडाखाली कोर्ट लावा. मला बाहेर बोलावून त्यांनी मलाही खुर्चीवर बसायला सांगितलं. बाहेर मोकळ्या जागेत त्याच्या समवेत खुर्चीवर बसायला माझा काहीच विरोध नव्हता. मी त्याच्या पुढ्यात खुर्चीवर बसलो. आमचं बोलणं सुरू झालं. मॅजिस्ट्रेटनं मला आपला बचाव करण्यासाठी वकील देऊ शकतोस, असं सांगितलं. अनेक तरुण वकील तिथं आलेले होते. कुठलीही फी न मागता ते माझं वकीलपत्र घ्यायला तयार होते. त्यांच्याविषयी

मी कृतज्ञता प्रकट केली व त्यांना सांगितलं की मला काही बचाव द्यायचा नाही. इंग्रजांच्या कैदेतून सुटका करून घ्यायचा मी प्रयत्न केला. यापुढेही संधी मिळाली तर परत प्रयत्न करीन. मी याला अपराध मानत नाही. असं करणं हेच माझं कर्तव्य आहे. सरकारला हा गुन्हा वाटत असेल आणि त्याबद्दल ते मला शिक्षा करणार असतील तर त्यांना अडथळा करण्याचीही माझी इच्छा नाही.

तीन-चार दिवस खटल्याचं कामकाज चाललं. साक्षीदार उभे करण्यात आले. शेवटी मॅजिस्ट्रेट मला म्हणाले की तुम्ही जो अपराध केलेला आहे त्याबद्दल मला शिक्षा द्यावी लागत आहे, याचं मला वाईट वाटतं. तुम्ही बचाव दिला असता तर कदाचित मी तुम्हाला शिक्षा सुनावली नसती. तुम्ही जो अपराध केलेला आहे त्याबद्दल तुमच्या शिक्षेत आणखी एका वर्षाची वाढ करण्यात येत आहे. याबरोबरच ते असंही म्हणाले की माझ्याविषयी त्यांना सहानुभूती वाटते. परंतु अपराधाबद्दल शिक्षा करणे, हे त्यांचं कर्तव्य आहे. मीही हसत त्यांना म्हणालो की मलाही त्यांच्याविषयी खूप सहानुभूती वाटते. आपणाला खूपच कष्ट घ्यावे लागले. खटल्याचं कामकाज लिहावं लागलं. माझी शिक्षा १९५१ साली संपली काय किंवा ५२ साली संपली काय, त्यामुळं काहीच फरक पडत नाही. ५१ सालापर्यंत मी जिवंत राहिलो तर कदाचित १९५२ सालीही मी जिवंत राहीन. पोलीस मला अॅंगोलच्या उप-कारागृहात घेऊन गेले. तरुणांचा एक मोठा जमाव माझ्या मागून येत होता. एका तरुणानं पुढं येऊन एक खादी टोपी माझ्या डोक्यावर ठेवली. तुरुंगाच्या दारापर्यंत टोपी माझ्या डोक्यावर होती. तिथं पोचल्यावर मात्र ती काढावी लागली. त्या दिवशी मी माझ्या मनाशी निश्चय केला की एका देशप्रेमी युवकानं माझ्या डोक्यावर गांधी-टोपी घातली. हा माझ्या जीवनातला मोठा सन्मानच होता. गांधी-टोपी विषयी मला कायमचा आदर राहील. १९२१ साला-पासून आजतागायत मी गांधी-टोपी त्याच श्रद्धेनं वापरत आलो आहे.

सब-जेलचा अधिकारी माझ्या कोठडीसमोर आला व मला म्हणाला की तुमचं देशप्रेम बघून मी अगदी नतमस्तक झालो आहे. तुमच्यातील देशप्रेमाची भावना मला स्पर्शून गेली. मला हुकूम मिळाला आहे की तुम्हाला राजमहेन्द्री येथील तुरुंगात नेऊन पोचवावं. मी तीन शिपाई तुमच्यासोबत पाठवीत आहे. तुमच्या हातात किंवा पायात बेड्या ठोकण्याची माझी मुळीच इच्छा नाही. माझा आपल्यावर पूर्ण विश्वास आहे. मात्र माझी आपणास विनंती आहे की आपण यापूर्वी ज्याप्रमाणं चालत्या गाडीतून उडी टाकण्याचा धोका पत्करला, तसा प्रयत्न कृपा करून करू नका. पुन्हा उडी मारू नका. कारण यात मृत्यू येण्याचा संभव आहे. भगतच्या वेळेसच तुम्ही कसे वाचलात याची कल्पना देखील करता येत नाही. देशाची राजकीय परिस्थिती झपाट्याने बदलत चालली आहे. आपण जिवंत राहिलात तर आपल्या हातून देशाची सेवा घडेल.

मी त्या अधिकाऱ्याच्या बोलण्यानं चांगलाच प्रभावित झालो. त्याची आठवण आजही माझ्या मनात ताजी आहे. ज्या गाडीतून मी उडी मारून पळालो होतो आता परत त्याच गाडीत बसून मला राजमहेंद्रीला पोचायचं होतं. मी येथून निघणार, ही बातमी गावात पोचताच शेकडो तरुण स्टेशनवर मला निरोप देण्यासाठी जमा झाले. त्यांनी पुष्पहार आणि मिठाई आणली होती. माझ्यासारख्या एका लंगोटीधारकाला त्यांनी फुलांच्या हारांनी सजवलं आणि भरपूर मिठाई खायला घातली. तीन शिपाई माझ्या-समोर हात जोडून उभे होते. आपण फार गरीब आहोत व आपल्यावर दया करण्याची त्यांनी मला विनवणी केली. आपल्या हाता-पायात बेड्या नाहीत. आपण बलवान आहात. तुम्ही पळून जायचं ठरवलं आणि या तरुणांनी तुम्हाला मदत करण्याचं ठरवलं तर आम्ही काहीच करू शकणार नाहीत. आपण पळालात, तर आपल्या जागी आमची तुरुंगात रवानगी होईल आणि आमची बायका-मुलं उपाशी मरतील. मी त्यांना आश्वासन दिलं की मी पळून जाणार नाही. राजमहेंद्री येथील तुरुंगाच्या दारापर्यंत तुम्हाला घेऊन जाईन. थोडा वेळ तुम्हीच माझे कैदी आहात असं समजा !

राजमहेंद्री तुरुंगात येऊन पोचल्याची बातमी सर्वांना समजली. आन्ध्र प्रदेशातील वर्तमानपत्रांनी माझ्या बातमीला खूप प्रसिद्धी दिली होती. तिथं पोचल्याबरोबर हजारो काँग्रेस कार्यकर्त्यांनी माझं स्वागत केलं. मला त्यांनी उतरून घेतलं आणि ते पोलिसांना म्हणाले की आम्ही यांना गोदावरीचं स्नान केल्याशिवाय तुरुंगात जाऊ देणार नाहीत. पोलिसांना निरुपायच होता. ते मुकाट्यानं गोदावरीच्या दिशेने चालू लागले. तिथं पोचून मी नदीत डुबकी लगावली. स्नानानंतर आम्ही सर्वजण एकत्र बसलो. एक-मेकांशी खूप बोललो. पोटभर मिठाई खाल्ली. शेवटी बैलगाडीत बसवून त्यांनी माझी जेलकडे रवानगी केली. जेलच्या दरवाजापाशी येऊन त्यांनी माझा निरोप घेतला.

माझी तिथं येण्याची बातमी गुप्तचर यंत्रणेमार्फत अगोदरच पोचली होती. वृत्त-पत्रांनीही ठळक प्रसिद्धी दिली होती. जेलचे अधिकारी माझ्यासारख्या कैद्याच्या स्वागताची तयारी करून प्रतीक्षा करत बसले होते. तिथला जेलर अर्धा-इंग्रज होता. मी दरवाजा-तून आत येऊन एके ठिकाणी बसून राहिलो तेव्हा तो अधिकारी आपल्या कार्यालयातून बाहेर येऊन माझ्याकडे निघाला. सर्व शिपायांनी मला उभे राहून त्या साहेबांना अभिवादन करण्याची सूचना केली. त्यांचं न ऐकता मी तसाच बसून राहिलो. मला बसलेला बघून अधिकाऱ्याचा चेहरा रागानं लाल झाला. परंतु तो काहीच बोलला नाही. कैदी जीवनाची जी कागदपत्रं माझ्यापाशी होती त्यातलं प्रमाणपत्र त्यानं बघितलं. ते बघताच त्याच्या चेहऱ्यावरील भाव क्षणातच बदलले. तो हसत हसत माझ्याकडे आला आणि इंग्रजीतून तो मला मागे जे काही घडलं ते विसरून जा, असं म्हणाला. आता

तुम्ही हिन्दुस्थानात आहात, मला आपला मित्र माना, असंही तो म्हणाला. तुम्हालाही मी माझा मित्रच मानीन, असंही त्यानं कबूल केलं. मी ही तत्परतेनं उत्तर दिलं की आपल्या भावनेसंबंधी मी आभारी आहे. मात्र माझा निश्चयही मी स्पष्टपणे आपल्या कानावर घालू इच्छितो. कुठल्याही सोयी-सवलतीसाठी मी आपल्याकडे भिक्षा मागणार नाही. इंग्रज अधिकाऱ्यांनी माझ्याकडून आदराची अपेक्षा बाळगू नये. इंग्रज अधिकाऱ्यांशी मी कुठलाही सहयोग करायला तयार नाही. माझं म्हणणं ऐकल्यावर जेलच्या त्या अधिकाऱ्यानं माझ्याशी कोणत्या प्रकारे वागायचं हे आपल्या मनातल्या मनात निश्चित केलं.

शिपायांनी मला फाशीच्या कैद्यांच्या खोलीत नेऊन बंद केलं आणि जेलच्या अधिकाऱ्याचा एक अत्यंत विश्वासू जमादार माझ्यावर पहारा देण्यासाठी नेमण्यात आला. माझा मोकळा वेळ मी ईश्वराची आराधना करण्यात घालवू लागलो. ध्यानमग्न होण्याचा मला चांगलाच सराव होता. अनेक तास पद्मासन घालून मी ध्यान धारणा करू लागलो. मी तीन-चार वाजल्यापासून ते दहा वाजेपर्यंत एकाच अवस्थेत डोळे बंद करून ध्यानावस्थेत बसून राही. जेलच्या खोलीत कोणतंही काम करायचं नाही, हे मी पक्कं ठरवलं होतं. माझं हे वागणं जेलरला अधिक काळ सहन होणं अशक्य होतं. जेलरला एकच मंत्र पाठ असतो की कैद्याला भयानक मारहाण करून वठणीवर आणणं. याच मंत्राचा माझ्यावर प्रयोग करावा असा त्यानं विचार केला. माझ्या या वागण्याचा इतर कैद्यांवर विपरीत परिणाम होऊन तेही जेलच्या नियमांचं पालन करणार नाहीत, अशी त्याला शंका आली.

एके दिवशी सकाळी जेल उघडण्याच्या वेळी काही जमादार माझ्या खोलीबाहेर येऊन उभे राहिले. जेलर तिथं आला आणि त्यानं माझ्या खोलीचं कुलूप काढायला सांगितलं. खोलीचा दरवाजा उघडल्याबरोबर माझ्या मनात विचार आला की, माझ्याशी आता काळ्या पाण्याच्या तुरुंगात बाबा भानसिहांशी जो व्यवहार झाला होता, तसाच प्रकारचा व्यवहार अंमलात येणार आहे. मला भयानक मारहाण होणार आहे. जे कैदी जमादार खोलीबाहेर उभे होते त्यांच्या हातात जाडजूड सोटे होते. जेलर बाहेर उभा राहिला आणि त्यानं जमादारांना आत घुसून मला वठणीवर आणण्याचा हुकूम सोडला. आता आपली काय गत होणार आहे, हे माझ्या ध्यानात आलं. मी जागेवरून उसळी मारून जेलरवर झेप घेतली आणि त्याची मान पकडली. मग काय, माझ्यावर सोट्यांचा वर्षाव होऊ लागला. मला खाली जमिनीवर पाडण्यात आलं. खूप मारहाण त्यांनी केली. नशीब म्हणजे माझं कुठलंही हाड मोडलं नाही. ह्या सर्व घटनेचा परिणाम म्हणजे जो जेलर दररोज माझ्या खोलीसमोरून केव्हा फेरी मारत होता, त्यानं माझ्या खोलीकडे येणं बंद केलं. माझा पहारा मात्र आणखी कडक करण्यात आला. राजमहेन्द्री जेलमध्ये माझे आणखी काही साथी बंदिवान करून ठेवले होते.

पंडित जगतरामहो निर्भय होते. संत रणवीरसिंह यांनाही निर्भय ठेवलं होतं. मला मारहाण केल्याचं या सर्वांना समजलं तेव्हा त्यांना फार वाईट वाटलं पण ते काय करू शकणार होते. त्यांना सर्वांना नाईलाज होता. प्रत्येक जणच आपल्या पद्धतीनं तुरुंगवासाची शिक्षा भोगत होता. माझ्या धाडसी आणि आक्रमक वृत्तीचा इतर कैदी जमादारांवर मोठाच प्रभाव पडला. मी तासन् तास ध्यानावस्थेत बसून ईश्वराची आराधना करतो. यामुळे त्यांच्या मनात माझ्याविषयी श्रद्धेचा भाव निर्माण झाला.

जेलरच्या अत्यंत विश्वासातला असलेला कैदी जमादार कालिजचा एक तरुण मुलगा होता. त्यानं एका स्त्रीवर बलात्कार केला होता आणि त्याच अपराधाबद्दल तो शिक्षा भोगत होता. ज्या दिवशी मी उसळी मारून जेलरची मान पकडली होती, माझ्या या धाडसी कृत्यानं त्या तरुणाच्या मनातही माझ्याविषयी आदराची भावना निर्माण झाली. तोही माझ्यावर प्रेम करू लागला. माझ्याकडे श्रद्धेनं बघू लागला. माझा पक्का भक्त बनला. कालिजचा हा तरुण एका जमीनदार कुटुंबातील होता. पैशाच्या बळावर तुरुंगातलं जीवनही तो ऐष-आरामानं जगत होता. तो मला दररोज बाहेरून वर्तमानपत्र मागवून देऊ लागला, खाण्याचे पदार्थही पाठवू लागला. राजमहेन्द्री शहरात काँग्रेसचे जे पुढारी होते. त्यांच्याशी माझा गुप्त पत्रव्यवहारही सुरू झाला.

त्या तरुण कैदी जमादाराचं नाव लक्ष्मणराव असं होतं. त्याचा थोरला भाऊ त्याची सर्व प्रकारची मदत करत होता. माझ्या संबंधीची त्याला सर्व माहिती मिळाली होती. मला हा विचार पडला की जो माणूस मी कधी बघितलेला नाही, ज्याची माझी अजिबात ओळख-देख नाही, असा हा माणूस माझ्यासाठी हे सर्व कशासाठी करतो? हा माणूस कसा असेल? एके दिवशी तो माझ्या 'स्वप्नातच' आला. त्याचं रंग-रूप, उंची, शरीरयष्टी, पोषाख या सर्वाचं चित्र माझ्या मनात उभं राहिलं. दुसरे दिवशी सकाळी कैदी जमादार लक्ष्मणराव माझ्या खोलीसमोर आला तेव्हा त्याला मी त्याच्या भावाचं स्वप्नात बघितलेलं रूप सविस्तर वर्णन करून सांगितलं, ते वर्णन ऐकून आश्चर्यानं तो माझ्या तोंडाकडे बघत राहिला. यानंतर तर तो माझा परमभक्त बनला. एके दिवशी माझ्याकडे येऊन तो म्हणाला की माझी सगळी जमीन मी तुमच्या नावे करू इच्छितो. मी त्याला होकार दिला असता तर त्यानं आपला शब्द पाळला असता अथवा नाही, हे सांगता यायचं नाही. मी त्याला म्हणालो तुझी जमीन माझ्या नावे करून मी काय करणार? तीन वर्षं तर मला तुरुंगातच काढावी लागणार आहेत. तुम्ही देशावर प्रेम करायला शिका, आपलं जीवन देशसेवेत घालवा यानंच मला अधिक आनंद होईल.

लक्ष्मणरावांच्या वागण्यामुळे पुष्कळसे कैदी जमादार आणि ऑफिसात काम करणारे कैदी माझे भक्त व चाहते बनले. ऑफिसातला हेडक्लर्क पदवीधर होता. रात्रीच्या वेळी त्याला सबंध तुरुंगात एक फेरी मारावी लागे. तो माझ्या खोलीबाहेर थांबून दोन-दोन तास माझ्याशी बोलायचा, बाहेरच्या जगातील सर्व बातम्या मला सांगायचा. त्याचं नाव होतं कंदरच्या रामकृष्ण मूर्ती. रामकृष्ण मूर्ती अद्यापही हयात असून त्यांना मी अनेकदा भेटलो आहे. आजकाल ते एका कॉलेजात प्राध्यापक आहेत.

जेलच्या प्रमुख अधिकाऱ्यांना, जेलमधले कैदी जमादार माझ्याशी असं आदरानं वागतात, ही बातमी कुठल्याशा कुठल्या पद्धतीनं समजलीच. त्या अधिकाऱ्यांनी माझ्यापासून स्वतःची सोडवणूक करून घेण्यासाठी एक योजना आखली. वरच्या अधिकाऱ्यांना इथल्या अधिकाऱ्यांनी असं कळवलं की पृथ्वीसिंह हा कैदी पागल आहे, वेडा आहे. त्याला एखाद्या 'वेड्यांच्या इस्पितळात' ठेवणे ठीक होईल.

माझं वेडेपण सिद्ध करणारी एकही घटना प्रत्यक्षात घडलेली नव्हती. रामकृष्ण मूर्तीने मला येऊन ही बातमी सांगितली की जेलचे अधिकारी शासनाशी माझ्या वेडाच्या संदर्भात पत्रव्यवहार करत आहेत. जेलमधल्या हिन्दी डॉक्टरांनीही मला सांगितलं की हे लोक मला वेडा ठरवून वेड्यांच्या इस्पितळात ठेवण्यासंबंधी युक्त्या प्रयुक्त्या अवलंबीत आहेत. माझ्या इतर साथीदारांप्रमाणे मीही व्यवहार करणं ठीक होईल. नाही तर उगाचच वेड्यांच्या इस्पितळात जायचा प्रसंग ओढवेल. पागलपणा म्हणजे एक विचित्र रोग आहे. वेड्यांच्या सहवासात चांगले लोकही वेडे होण्याची शक्यता असते. मी सर्वांचं म्हणणं ऐकून घेतलं. मी मनातल्या मनात असंच ठरवलं की जेलच्या अधिकाऱ्यांनी मला वेड्यांच्या इस्पितळात पाठवलंच तर तिथल्या सर्व वेड्यांना इंग्रजांचे शत्रू बनवून टाकल्याशिवाय राहणार नाही. मला त्यांनी पाठवूनच बघावं!

तुरुंगाचे अधिकारी या संदर्भात विचार विनिमय करत होते तेव्हा पंजाबमध्ये अकाली आंदोलनानं जोर पकडला होता. पंजाबमधील सर्व देशभक्त शीख अकाली आंदोलनात सामील झाले होते. पंजाबच्या अकालींनी आमच्या सगळ्या मागण्या उचलून धरल्या आणि मद्रास प्रांतातील सर्व पंजाबी राजकीय कैद्यांना पंजाब प्रांतातील तुरुंगात ठेवण्याची जोरदार मागणी केली. काही प्रमुख कैद्यांचे नामोल्लेख करून पंजाबच्या राजकीय कैद्यांना भेटण्याची आम्हाला परवानगी देण्यात यावी, अशीही मागणी अकालींनी केली. ज्यांच्या नावाचे उल्लेख करण्यात आले त्यांपैकी एक प्रमुख नाव सरदार तेजसिंह चूडकाना, यांचं होतं. हे सरदारजी माझ्या

श
मवेत 'काळंपाणी' भोगून आले होते. या सर्वांचा परिणाम म्हणून तीन लोकांच्या शिष्टमंडळाला आम्हाला जाऊन भेटण्याची परवानगी मिळाली. या तीन सदस्यांनी माझ्या अन्य सहकाऱ्यांची भेट घेतली. हे सर्व साथी काही काँग्रेस पुढाऱ्यांसह माझ्या कोठीपाशीही आले. कोठ्यांची दारं उघडून त्यांच्याशी बोलण्याची सर्वांना परवानगीही मिळाली. काही बाबींवर चर्चा झाली. शेवटी शिष्टमंडळानं मला असं सांगितलं की पंजाब काँग्रेस कमेटीचा आदेश आहे, सर्व राजकीय कैद्यांनी जेलच्या अधिकाऱ्यांशी सहकार्याच्या भावनेनं वागावं, सरकारतर्फे राजकीय कैद्यांना सर्व तऱ्हेच्या सोयी-सवलती मिळतील. राजकीय कैद्यांनी सरकारशी संघर्ष करण्याचा पवित्रा घेऊ नये. राजकीय कैद्यांच्या सुटकेसाठी सरकारशी आम्ही वाटाघाटी करत आहोत. मला समजावण्यात आलं की मी माझा मार्ग सोडून बाबा व अन्य साथीदारांसमवेत गुण्या-गोविंदानं जेलमधील आयुष्य कंठावं.

मी त्यांचं म्हणणं मान्य केलं. तिथं जो अधिकारीवर्ग उपस्थित होता व काँग्रेसचे जे पुढारी आलेले होते त्या सर्वांशी मी हस्तांदोलन केलं. मी त्यांना आश्वासन दिलं की यापुढं माझ्या वागण्यानं मी त्यांच्या सहानुभूतीला पात्र ठरेन.

जेलच्या अधिकाऱ्यांनी माझी ती खोली बदलून ताबडतोब मला माझ्या अन्य साथीदारांच्या सोबत राहण्याची व्यवस्था केली. त्यांनी मला माझ्या आवडीचं काम विचारलं. मी त्यांना उत्तर दिलं की काँग्रेसचे जे अनेक कार्यकर्ते आजारी पडल्यामुळं हॉस्पिटलमध्ये ठेवण्यात आले आहेत, मी त्यांची सेवा-शुश्रूषा करू इच्छितो तसंच आन्ध्र प्रदेशातील जे कैदीबांधव हिन्दी भाषा शिकू इच्छितात त्यांना मी हिन्दीचं शिक्षण देऊ इच्छितो. ही मागणी करताना माझ्या मनात एकच विचार होता की काँग्रेसच्या तरुणांना भेटून देशाच्या स्वातंत्र्यासाठी त्यांनी काय काम करण्याची गरज आहे हे त्यांना समजून सांगावं.

सात वर्षेपर्यंत मी एकटाच खोलीत बन्द असे. इकडे-तिकडे फिरणे आणि अन्य साथीदारांशी प्रत्यक्ष विचार विनिमय करण्याची माझी ही पहिलीच वेळ होती. माझ्यासाठी हे नवीन प्रकारचं जीवन होतं. आता मला तुरुंग हा तुरुंगासारखा वाटेना. मी आता माझ्या देशबांधवांची सेवा करत होतो. हिन्दीचे वर्ग सुरू झाले. काँग्रेसचे जे सत्याग्रही त्या तुरुंगात ठेवण्यात आले होते त्यांच्यात सरकारचे काही गुप्तचरही येऊन राहिले होते. काँग्रेसच्या सत्याग्रहींशी मी जे जे बोलत होतो, त्याचा वृत्तान्त ते सरकारकडे लिहून पाठवत होते. हिन्दीचे वर्ग जेमतेम महिनाभरही चालू शकले नाहीत. अचानकच ते बन्द करण्यात आले. हॉस्पिटलचं काम मात्र चालू ठेवण्यात आलं. इतरांची सेवा केल्यानं मनाला समाधान मिळत होतं. वर्तमानपत्रं आणि पुस्तकं वाचायला मिळत होती. काँग्रेसच्या अनेक पुढाऱ्यांशी चर्चा करता येऊ लागली.

कोकोनाडाचे प्रख्यात वकील बुलसू शांबमूर्ती, आन्ध्रप्रदेशचे महान नेते कोंडा व्यंकटप्पय्या, श्री. कालेश्वरराव, थिरुमलराव–अशा थोर व्यक्ती तिथं येत. आन्ध्र-प्रदेशातील या थोर व्यक्तींशी माझा परिचय झाला आणि तो पुढे वाढतच गेला. माझे दिवस मोठ्या आरामात चालले होते. एके दिवशी जेलच्या हॉस्पिटलमध्ये टॅयफाईडचे नऊ रोगी एकाचवेळी दाखल करण्यात आले. या आजारात काळजी-पूर्वक शुश्रूषा हीच गोष्ट महत्त्वाची असते. मी त्यांच्या सेवा-शुश्रूषेसाठी माझी सर्व शक्ती पणाला लावली. तिथला इंग्रज मेडिकल ऑफिसर मोठा सज्जन गृहस्थ होता. माझ्या त्या शुश्रूषेनं तो फारच खूश झाला–त्यानं माझी जेलमधून सुटका करण्याचीही शिफारस केली. त्यानं लिहिलं की पृथ्वीसिंहासारख्या सेवाभावी माणसाला गुन्हेगार म्हणून तुरुंगात ठेवणं योग्य नाही. काळ्यापाण्यावर मला जे प्रमाणपत्र मिळालं होतं त्याच्याच जोडीला हे प्रमाणपत्र चिकटवण्यात आलं. मी जेव्हा हे प्रमाणपत्र वाचलं त्यानंतर मात्र मी हॉस्पिटलमध्ये जाणं बन्द केलं. जेलचे मेडिकल ऑफिसर माझ्या खोलीपाशी आले. त्यांना वाटलं मी आजारी पडलो असेन. मी काही आजारी पडलो नव्हतो. त्यांनी मला हॉस्पिटलमध्ये का नाही आला, म्हणून विचारलं. मी त्यांना गंभीरपणानं उत्तर दिलं की मी माझ्या देशबांधवांच्या सेवेच्या मोबदल्यात माझ्या सुटकेची अपेक्षा करत नाही. आपण माझ्या सुटकेची शिफारस करावी, अशी माझी मुळीच अपेक्षा नाही. त्या सज्जन माणसाला माझं मनोगत समजून आलं. माझा हात धरून ते मला हॉस्पिटलमध्ये घेऊन गेले. तिथं पोचल्या-वर ते म्हणाले, मला कल्पना नव्हती की माझ्या शिफारसपत्राचा तुमच्यावर असा परिणाम होईल. मला क्षमा करा. आजारी माणसांच्या सेवा-शुश्रूषेचं कामही यानंतर बन्द करण्यात आलं.

आठ वर्षेपर्यंत मला बाहेरच्या व्यक्तींशी पत्रव्यवहार करण्याची अनुमती नव्हती. जेव्हा मला अशी परवानगी मिळाली, तेव्हा मी सर्वात अगोदर आपल्या वडिलांना पत्र लिहिलं. उत्तरादाखल वडिलांनी लिहिलं की तुझ्या सुटकेची काही शक्यता आहे का नाही? मी त्यांना स्पष्ट शब्दात उत्तर पाठवलं की इंग्रज सरकारकडून माझी सुटका कदापीही होणार नाही. त्याचं कारण हे की इंग्रज राजवट मला एक भयंकर स्वरूपाचा कैदी मानत होती.

तुरुंगातील अधिकाऱ्यांशी आता माझे दोस्तीचे संबंध निर्माण झाल्यामुळे ते मला स्पष्टपणे लिहायची परवानगी देत होते. या पाठीमागचं कारण काहीही असो, मी लांबलचक पत्रं लिहीत होतो व ते मला अडवत नव्हते. जेलचा प्रमुख अधिकारी एक ख्रिस्ती गृहस्थ होता. तो अतिशय प्रामाणिक पण होता. माझी पत्रं वाचून तो खूश व्हायचा. माझ्याकडे येऊन तो अनेक बाबींची चर्चाही करायचा. याच संदर्भात एक चमत्कारिक घटना घडली.

काँग्रेसच्यावतीनं आंध्र प्रदेशात जेव्हा सत्याग्रह आंदोलन सुरू झालं तेव्हा आन्ध्र मधल्या एका राजपूत तरुणानं सरकारच्या विरुद्ध बंड पुकारलं. डोंगराळ प्रदेशात व जंगलात राहणाऱ्या आदिवासींचा तो नायक बनला. पोलिसठाणी आणि सरकारी खजिने लुटण्यास त्यानं प्रारंभ केला. एक दिवस त्याला समजलं की पंजाबमधील एक राजपूत राजमहेन्द्रीच्या तुरुंगात बन्दिवान आहे. त्यानं सरकारला पत्र लिहून जाहीर केलं की तुरुंगावर हल्ला करून तो पृथ्वीसिंहाची सुटका करणार आहे. योग्य बन्दोबस्त ठेवणं सरकारचं कर्तव्य होतं. त्यानं हल्ल्याची तारीख आणि वेळ देखील सरकारला कळवली. आसपासचे सर्व पोलिस सरकारनं तुरुंगाच्या रक्षणासाठी बोलावून घेतले. सरकारला जाहीर आव्हान देणाऱ्या त्या शूर राजपूत वीराचं नाव सीताराम राजू असं होतं. सीताराम राजूनं हा एक धूर्त डाव टाकला होता. यामुळं त्याला पोलिसठाणी आणि खजिने आयतेच लुटायला मिळाले. जेलच्या अधिकाऱ्यांच्या मनात एक प्रकारची भीती निर्माण होऊन बसली. त्यांना असं वाटू लागलं की हा राजू जेलवरही हल्ला करायला मागं-पुढं बघणार नाही. म्हणून त्यांनी सरकारला विनंती केली की पृथ्वीसिंहाला कुठे तरी अन्य सुरक्षित ठिकाणी हलवण्यात यावे. माझ्या समवेत पंडित जगतराम, संत रणधीरसिंह आणि श्री. करतारसिंह यांनाही पाठविण्याची व्यवस्था करण्यात आली.

* * *

# ११ दुसरी उडी आणि सुटका

सन १९२२ च्या नोव्हेंबरातील शेवटच्या आठवड्याचे दिवस होते. असहकाराचं आंदोलन जोरात चालू होतं. जेलच्या अधिकाऱ्यांनी मला कार्यालयात बोलावून सांगितलं की सरकार तुम्हाला दुसऱ्या तुरुंगात पाठवू इच्छिते. कैद्याला हातापायांत बेड्या घालूनच नेण्यात येतं. तुमचे अन्य तीन साथी-सज्जन व शांत वृत्तीचे असल्यामुळे त्यांना बेड्या घालण्याची आवश्यकता नाही. तुमच्या बाबतीत काय करावं? तुम्हाला बेड्या घालाव्यात की घालू नयेत? मी हसून उत्तर दिलं की गेल्या सोळा महिन्यांपासून तुम्ही माझी वर्तणूक बघत आहात—एवढ्या उपरही तुम्हाला योग्य वाटेल ते करा. माझं बेड्यांवर मोठं प्रेम आहे किंवा त्यांचा अगदी तिटकारा आहे—अशातला प्रकार नाही. ते प्रसन्न वृत्तीनं म्हणाले की तुमच्या हातापायांत बेड्या घालून घेऊन नेण्याची आमची इच्छा नाही. याचं खरं कारण हे होतं की राजकीय कैद्यांना बेड्या घालून वागवण्याच्या धोरणावर वृत्तपत्रांनी सरकारवर कडाडून टीका केली होती. माझे तिन्हीही साथीदार एवढे सज्जन होते की त्यांना एकट्यांना पाठवून, नागपूर तुरुंगात जाऊन पोचा, असं सांगितलं असतं तर ते सरळ नागपूर तुरुंगाकडे गेले असते. परंतु मी त्यांच्यासोबत होतो. त्यामुळे सरकारनं एक इंग्रज पोलिस इन्स्पेक्टर व आठ शिपायांच्या लवाजम्यासहित आमची रवानगी केली.

राजमहेन्द्री शहरात, पृथ्वीसिंहाला अन्य कुठल्या तरी तुरुंगात पाठविणार असल्याची बातमी, सर्वांपर्यंत पोचली. हजारो काँग्रेस कार्यकर्ते आणि कॉलेजचे विद्यार्थी स्टेशनवर आम्हाला निरोप देण्यासाठी जमा झाले. त्या सर्वांनी आमचं स्वागत केलं. इंग्रज पोलिस इन्स्पेक्टर लोकांची ही प्रचंड गर्दी बघून घाबरून गेला. मी त्याला जवळ बोलावून, घाबरण्याचं कारण नाही, असं सांगितलं. आपण प्रतीक्षालयात शांत मनानं बसून राहा. माझ्यासाठी तिथं आलेल्या मित्रांनाही मी पोलीस इन्स्पेक्टरसाहेबांचं योग्य आदरातिथ्य करायला सांगितलं. त्याच्या मनात काय काय विचार येत असतील, कुणास ठाऊक? स्टेशनवर एवढी प्रचंड गर्दी जमा झाली होती की त्या गर्दीत मिसळून मला तिथून निसटणं अगदी सोपं होतं. स्टेशनच्या बाहेर अनेक मोटारी उभ्या होत्या. काही जण घोड्यांवर स्वार होऊनही आले होते. पळून जाण्यासाठी अनेक मार्ग उपलब्ध होते. काही धाडसी तरुणांनी मला पळून जाण्याचा सल्लाही दिला. मी त्यांना हसून उत्तर दिलं की आता गांधीबाबांचं राज्य आहे. सगळा देश सत्य आणि अहिंसेच्या

मागेच पडला आहे. सशस्त्र क्रांतीचं लोकांना आता आकर्षण राहिलेलं नाही. माझ्यासारख्या क्रांतिकारकालाही आजच्या राजकीय वातावरणात काही काम राहिलेलं नाही.

देश अतिशय वेगानं स्वातंत्र्याचा मार्ग क्रमीत आहे असं मला ठामपणे वाटत होतं. या मार्गात अडथळे निर्माण करणं उचित नव्हतं. रेल्वे प्लॅटफॉर्मवर दोन तास मित्रांशी आमच्या मनमोकळ्या गप्पा झाल्या. भेटी-गाठी होत राहिल्या. आम्ही सर्वांनी मिळून जेवण केलं. देशातल्या विविध प्रश्नांची आम्ही उघड स्वरूपात चर्चा करत होतो. गाडी स्टेशनात आली आणि आम्ही सर्वांचा निरोप घेतला. माझे दोन स्नेही श्री. चन्द्रशेखर शर्मा आणि कंदरपा रामकृष्ण मूर्ती विजयवाडा (बिजवाडा) स्टेशनवर मला भेटायला आले आणि पुढे अनेक स्टेशनांपर्यंत ते आमच्यासोबत होते. गाडी सिकंदराबाद स्टेशनवर पोचली. तिथं आम्हाला गाडी बदलायची होती. आमची गाडी सुटायला काही तासांचा अवधी होता. पंडित जगतराम यांनी मुद्दाम मला शहरातून काही तरी खाण्यासाठी घेऊन ये, असं सांगितलं. त्या इंग्रज पोलिस इन्स्पेक्टरला आमच्यासंबंधी आता थोडा विश्वास निर्माण झाला होता. मला कुठल्या न कुठल्याप्रकारे पळून जाण्याची संधी मिळावी असंच पंडित जगतरामांना वाटत होतं. परंतु खाद्यपदार्थ घेऊन मी जेव्हा स्टेशनवर परत आलो तेव्हा जगतरामजींनी मिश्किलपणे मला विचारलं— "तुला काय झालं? अशी संधी वाया घालवलीस?" त्यांचा भाव माझ्या लक्षात आला. मी त्यांना काहीच उत्तर दिलं नाही. आमची गाडी आल्यानंतर निमूटपणे आम्ही चढून आत बसलो. सायंकाळ झाली होती. दुसऱ्या दिवशी सकाळी नागपूरला पोचून तिथल्या तुरुंगात बंद व्हायचं होतं.

सूर्य मावळत होता आणि त्याकडे बघून मलाही माझ्या जीवनाचा सूर्य मावळत चालला आहे, असं वाटू लागलं. सन १९५१ साल उजाडेपर्यंत आपलं सबंध जीवन अंधकारमय आहे—हे मला जाणवलं. ही सुंदर संध्याकाळ आणि तुरुंगातील ती काळकोठडी ही विसंगती मला तीव्रपणे जाणवताच—माझ्या मनात प्रचंड खळबळ निर्माण झाली. माझ्या अंगावर चांगले स्वच्छ कपडे होते. डोक्यावर मी फेटा बांधला होता. माझ्या मनातले भाव डोळ्यावाटे प्रकट होत होते. मला बघणारा कुणीही हे म्हणू शकला असता की मी त्यावेळी मृत्यूशीच खेळ मांडलेला आहे. माझ्या मनात मृत्यूचे विचार येत होते आणि मी मावळत्या सूर्यप्रकाशात मातृभूमीचं दृश्य डोळ्यात साठवत होतो. त्या इंग्रज इन्स्पेक्टरचं लक्ष माझ्याकडे गेलं—मला असा गंभीर बघून त्याचं माथं ठणकलं. त्याच्या डोक्यात विचार आला की हा कैदी खिडकीजवळ बसला आहे—त्याच्या हातापायात बेड्या तर नाहीतच—यानं जर खिडकीतून उडी मारून पळ काढला तर कसं? पंडित जगतरामांचही माझ्याकडे लक्ष गेलं. त्यांनी चेष्टेनं विचारलं—समोरच्या शेतातल्या त्या कादेरी

वाढाच कुंपण ओलांडण्याची तुझी अजून हिंमत आहे ? त्यांचे शब्द ऐकून मी झोपेतून एकदम जागं व्हावं—तसा जागा झालो. पळून जाण्याचे विचार मी केव्हाच मनातून काढून टाकले होते. मी जगतरामजींकड रोखून बघू लागलो. त्यांच्या प्रश्नाचं काहीच उत्तर दिलं नाही. इंग्रज इन्स्पेक्टरनं पंडितजींचा प्रश्न ऐकला होता आणि नेमकी त्याच वेळी त्याचीही दृष्टी माझ्यावर पडली. त्याच्या मनात संशय निर्माण झाला. त्याला एक प्रकारची भीती वाटू लागली. तो सावध झाला आणि त्यानं आपला हात पिस्तुलावर ठेवला तो जरा सरकून जगतरामच्या नजीक पोचला आणि त्यांच्या कानात पुटपुटला—"पृथ्वीसिंहांना सांगा खिडकीजवळून उठून इथं माझ्या शेजारी बसायला"—पंडितजींनी इन्स्पेक्टरच्या शब्दांचा पुनरुच्चार केला. माझ्या मनात हे शब्द तीक्ष्ण बाणांप्रमाणे घुसले. या इंग्रज माणसाला एवढा संशय वाटावा ! हे मला फारच अपमानकारक वाटलं. माझ्या मनात विचार आला की खरोखरच आपण नुसते गळाचे गणपती आहोत. राजमहेन्द्री स्टेशनवर मित्रांनी पळून जाण्याचा सल्ला दिला होता, तो आपण मानला नाही. सिकंद्राबादला बाजारात आपण एकटेच गेलो होतो—तेव्हाही पळून जाण्याची संधी होती, तीही आपण वाया घालवली. तो इंग्रज जगतरामजींच्या कानाशी लागल्यामुळे माझ्या मनातलं भूत अचानकच जागं झालं. पळून जाण्याचा जो विचार मी सोडून दिला होता—आता परत तोच विचार मनात सारखा येऊ लागला. परंतु मी माझी खिडकीजवळची जागा सोडली नाही. माझ्या डोळ्यातून संतापाची आग बाहेर पडत होती. त्यानं मग दोन शिपायांना माझ्या अगदी जवळ बसवलं. आता मी स्वतंत्र नव्हतो, त्यांचा बंदी होतो.

मी मनातच म्हणालो—"मारू उडी ? —होय ! उडी मारलीच पाहिजे." त्यानंतर गोळी लागली तरी हरकत नाही. हे असं अपमानास्पद जीवन आपल्याला सहन नाही होणार. मनात उसळून उठलेली ही लाट मी दाबण्याचा प्रयत्न केला. माझ्या मनात अन्तर्द्वंद्व चालू झालं. काही मिनिटं यातच गेली. शेवटी मी मनाला कसंबसं शांत केलं. सूर्यास्त झाला होता. बाहेरची दृश्य आता अस्पष्ट होऊ लागली. मी स्वतःच उठून इन्स्पेक्टरच्या बाजूला जाऊन बसलो आणि थोड्या वेळानं मी चक्क झोपी गेलो. माझ्या शरीराची आणि मनाची परिस्थिती अशी काही होऊन गेली होती जणू काही पैलवानांशी माझी कुस्तीच जुंपली होती आणि मी पराभूत झालो होतो. डोळे मिटून पडलो तेव्हा पळून जाण्याचीच दृश्ये डोळ्यांपुढे उभी राहू लागली.

पळून जाण्याच्या विचाराचं भूत आता मनावर पूर्णपणे स्वार झालं होतं. माझ्या हृदयातील भावनांचा त्यानं पूर्ण कब्जा घेतला होता. मी गाढ झोपेत होतो. त्या भूतानं मला जागं केलं— कुठून तरी अंतराळातून आवाज येत होता—कुणीतरी मला म्हणत होतं—बहादूर गड्या, ऊठ, झोपून काय राहिला आहेस ? ही योग्य संधी आहे. मी झोपेतून जागा झालो. चहुकडे दृष्टी फिरवली. रेल्वेच्या त्या डब्यात आम्ही चौघे कैदी

आणि नक्र पोलीस, यांच्या शिवाय इतर कुणीच नव्हतं. इन्स्पेक्टर आणि चार शिपाई झोपलेले होते. दुसरे चार शिपाई पत्ते खेळत होते. माझ्यातला कण न कण आता सावध बनला. मी पूर्णपणे जागा झालो. आता कुठली झोप? मी संडासला जायच्या निमित्तानं जागेवरून उठलो. त्या क्षणापर्यंत पळून जाण्याचा पक्का विचार माझ्या मनात नव्हता. मी संडासात शिरलो. मनातला विचार आता जोरात म्हणू लागला "अरे! वेड्या! काय बघत बसला आहेस? पळून जायचं असेल, तर हीच वेळ आहे". गाढ झोपेतून उठलेला माणूस जसा इकडे तिकडे बघतो तसंच मीही चहूकडे बघू लागलो. संडासमध्ये माझ्या इतक्याच उंचीवर मला एक खिडकी दिसली. मी खिडकीवरली काच बाजूस सारली. मी उडून उभा राहिलो. माझं डोकं खिडकीतून बाहेर आलं.—मग माझ्या शरीरात व मनात विजेची चपळाई शिरली. मला डब्याच्या खिडकीचं हँडल दिसलं—त्या हँडलवर मी हात ठेवला. त्याचा आधार मिळताच मी माझं सबंध शरीर संडासच्या खिडकीतून बाहेर काढलं. बाहेर चांदण्यामुळं सगळं स्पष्ट दिसत होतं. गाडी ताशी ४० मैलांच्या वेगानं धावत होती. माझ्या शरीरानं आणि मनानं एकाच वेळी उसळी घेतली. 'पॅरॅलल बार' वरा खेळाडूप्रमाणं मी उडी घेतली. माझे पाय जमिनीला लागले होते. मी बिलकुल अडखळलो नाही. मी गुडघे देखील जमिनीवर टेकवले नाहीत. मला तिथं सोडून गाडी त्याच वेगानं पुढे निघून गेली. तो पृथ्वीसिंह जो थोड्या वेळापूर्वी स्वतःला एक क्षुद्र कैदी समजत होता—आता तो भारताच्या भूमीवर स्वतंत्र माणूस म्हणून उभा होता. चन्द्रप्रकाशात रस्ता स्वच्छ दिसत होता. एखादा वाघ शिकाऱ्याच्या तावडीतून सुटल्यानंतर जसा पळतो तसा मी पळू लागलो. पळता पळता मी विचार करत होतो की थोड्या वेळातच गाडीची साखळी ओढली जाईल---गाडी थांबवण्यात येईल---शिपाई खाली उतरतील, मला घेरण्याचा प्रयत्न करतील---गोळ्यांचा वर्षाव होईल. ह्या विचारांमुळं माझ्या पायात विजेचा संचार झाला. मी आणखी वेगानं पळू लागलो. मी आणि रेल्वगाडी परस्पर विरुद्ध दिशांना धावत होतो. गाडी धूळ उडवीत पुढे चालली होती. पत्ते खेळत बसलेले शिपाई पत्तेच कुटत बसले. ते डाव हरलेले आहेत, याचा मात्र त्यांना पत्ता नव्हता!

इ. स. १९४० साली पंडित जगतरामजींशी भेटण्याचा योग आला तेव्हा त्यांच्या तोंडून माझ्या पलायनानंतरच्या घटना समजल्या. ते म्हणाले की संडासमधून तू उडी मारल्यानंतर थोड्या वेळाने पोलिसांनी चौकशीला सुरुवात केली. बराच वेळ झाला तरी मी संडासातून बाहेर पडत नाही हे बघून शिपायांनी संडासचं दार वाजवायला सुरुवात केली. दरवाजा आतून बन्दच होता. मग त्यांनी दरवाजावर बंदुकीच्या नळ्यांनी प्रहार करायला सुरुवात केली. त्यांनी दरवाजा फोडला. आत बघितलं तर पिंजरा रिकामा होता. त्यांनी तावडतोब गाडीची साखळी ओढली. गाडी थांबली. पोलिसांनी

माझे काही कपडे आणि हातकड्या बाहेर टाकून कैदी आताच पळाला आहे—पृथ्वीसिंह उडी मारून निसटला आहे, हे सर्वांना जाहीर केलं. यामुळेच गाडी थांबवावी लागली, असा त्यांनी खुलासा केला. गाडी थोडा वेळ थांबली. जवळपास शोधाशोध केली. त्यांना कळून चुकलं होतं की कैदी बराच अगोदर निसटला असावा. सर्वच्या सर्वजण गाडीत चढून बसले आणि गाडी पुढे निघाली.

ती २९ नोव्हेंबर १९२२ ची रात्र होती. स्वच्छ चांदण्यात मी शेतांमधून पळत सुटलो होतो. मला खूप तहान लागली होती. जवळपास कुठं पाणी दिसेना. मागच्या वेळेस उडी मारली तेव्हा जिकडे-तिकडे पाणीच पाणी होतं आणि पाण्यानं मला हैराण केलं होतं. आज कुठं पाण्याचा टिपूस दृष्टीस पडत नव्हता. पाण्या-वाचून मरण ओढवतं की काय, असं वाटू लागलं. मी थोडा वेळ थांबलो. माझं आराध्यदैवत प्रभू रामचन्द्राची मी प्रार्थना केली. हे पतितपावन प्रभू, पाणी कुठं मिळेल? मला एखादी जागा दाखवा, मार्ग दाखवा. माझ्या मनात बाण सुटल्याचं चित्र उभं राहिलं—मी अशी समजूत करून घेतली की प्रभू रामचंद्रानं बाण सोडून त्या दिशेनं जाण्याची सूचना केली आहे! तिथं तुला पाणी मिळेल. मी सश्रद्ध मनानं त्या दिशेने निघालो. एक विहीर माझ्या दृष्टीस पडली. त्या विहिरीजवळ जाऊन पोचलो. विहिरीत पाणी दूर होतं—परंतु पाणी काढण्यासाठी पोहरा किंवा दोर तिथं दिसेना गेले. विहिरीच्या आसपास वापर केलेलं पाणी इकडे तिकडे साचलेलं होतं. मी खाली बसून नीट पाहिलं. तिथं सगळा चिखल होता आणि पाण्याचा किंचितसा थर वरती दिसत होता. ते पाणी ओंजळीत घेण्याइतपतही खोल नव्हतं. मी जमिनीवर हात टेकून आपलं तोंड त्या पाण्यापाशी नेलं आणि जिभेनं आणि ओठांनी ते पाणी शोषून घ्यायला प्रारंभ केला. पाण्याची तहान अशा उपायांनी भागवली. थोडा वेळ तो त्या निर्जन भूमीवर पडून राहिलो. पडल्या पडल्या आपल्या नशिबाच्या फेऱ्याचा विचार करू लागलो. तिथं किती वेळ पडून राहणार? तिथून उठून मी एका बाजूने निघालो. चालता चालता मी मुख्य सडकेवर येऊन पोचलो. तसाच चालत राहिलो तेव्हा एक मैलाचा दगड लागला. त्या दगडावर अमरावती—२ मैल, अशी अक्षरं होती. अमरावती ही अक्षरं वाचल्या बरोबर मनात अनेक चित्र निर्माण झाली. एक चित्र मनात स्थिर झालं. अमरावती मध्यप्रांतातलं प्रधान शहर होतं—याच शहरात ज्येष्ठ राष्ट्रीय वृत्तीचे नेते, श्री. लोकमान्य टिळकांचे सहकारी, दानशूर दादासाहेब खापर्डे राहत होते. मी विचार केला की आपल्याला त्यांच्याकडे निश्चितच आश्रय मिळेल. विचारमग्न अवस्थेत मी चालतच राहिलो. अमरावतीबाहेर पोचलो. पुन्हा मैलाच्या दगडावरील मजकूर वाचला—अमरावती २ मैल! माझ्या हे लक्षात आलं की आपण अमरावती ओलांडून आलो आहोत. मी तिथून मागे फिरलो. शहराजवळच्या एका घरासमोर

एक लाकडी नामफलक दिसला. जवळ जाऊन तो वाचला. ते एक वसतिगृह होतं. सकाळचे चार वाजून गेले होते. एक विद्यार्थी आपल्या खोलीत दिवा लावून बसलेला आढळला. मी त्याचं दार ठोठावलं. त्यानं दार उघडून माझं स्वागत केलं. "काय हवं?" म्हणून विचारलं. मी त्याला म्हणालो की मला तुमच्या शहरातल्या एखाद्या प्रसिद्ध देशभक्ताकडे पोचवा. त्या तरुणाच्या मनात अशी शंका देखील आली नाही की हा चांगला धडधाकट दिसणारा, बहिरा-मुका-आंधळा, नसलेला हा माणूस-गावात असाच पुढे जाऊन कुणाला विचारत का नाही? माझं म्हणणं ऐकून घेऊन त्यानं नम्रतेनं मला बसायला सांगितलं. कपडे वगैरे करून तो माझ्या समवेत तिथून बाहेर पडला. तो गपचूप चालत राहिला. अनेक रस्ते आणि गल्ल्या ओलांडून तो मला एका भव्य दरवाजा असलेल्या हवेलीपाशी घेऊन आला. त्यानं दार ठोठावलं. नोकरानं दार उघडलं. चौकशी केल्यानंतर असं समजलं की श्री खापर्डे हे स्टेट कौन्सिलच्या बैठकीसाठी गेलेले आहेत. तो तरुण माझ्या तोंडाकडे बघू लागला. मी त्याला शहरात आणखी कोण अशा प्रकारची व्यक्ती आहे हे विचारलं. त्यानं वीर वामनराव जोशी यांचं नाव घेतलं. आम्ही मग त्यांच्या घराकडे निघालो. त्यांच्या घरी पोचल्यावर तेही घरी नसल्याचं समजलं. मी जरा खट्टूच झालो आणखी कुणी बघा—असं मी त्याला सांगितलं. आम्ही तेथून पुढे निघालो होतो. तो मला म्हणाला की डॉ. वऱ्हाडपांडे एक काँग्रेसचे कार्यकर्ते आहेत—आपण त्यांच्याकडे जाऊ या. सकाळचे पाच वाजून गेले होते. त्याचं दार ठोठावलं. दरवाजा उघडताच एका सज्जन माणसानं मला आत नेऊन "आपण कोण आहात?" असं विचारलं "माफ करा, मी आपणास ओळखलं नाही—"असं ही ते म्हणाले. मी हसऱ्या चेहऱ्यानं त्यांना म्हणालो—"फार वर्षांपूर्वी आपली भेट झालेली आहे—आपण ती विसरूनही गेला असाल—आपण स्मरणशक्तीला थोडा ताण दिलात तर आठवेल." हे गृहस्थ त्यांना हव्या असलेल्या ठिकाणी पोचले आहेत, हे बघून तो तरुण आम्हाला नमस्कार करून तिथून बाहेर निघून गेला. मी मोठ्या प्रेमळ दृष्टीने त्याच्याकडे बघितलं—माझे डोळे जणू म्हणत होते की तो तरुण माझ्यासाठी देवदूत बनूनच आलेला आहे!

रस्ता दाखवण्यासाठी आलेला तो अठरा वर्षांचा तरुण १९२२ च्या देशभक्तीच्या भारावलेल्या वातावरणात वाढलेला होता. त्यानं मनातल्या मनात हे ओळखलं असलं पाहिजे, मी कुणीतरी राजकीय कार्यकर्ता आहे आणि मला कुणाचं तरी साहाय्य हवं आहे. जवळ जवळ एक तास तो माझ्या बरोबर फिरत होता परंतु त्यानं मला एकही प्रश्न विचारला नाही.

डॉ. वऱ्हाडपांडयांनी दार बन्द केलं आणि बैठकीत जाऊन बसल्यानंतर हसत हसत त्यांनी विचारलं—आपली भेट कुठं बरं झाली आहे? त्यांना काहीच आठवत नव्हतं.

मग मी मोठा गंभीर भाव चेहऱ्यावर आणून त्यांना सांगितलं की मी त्यांना अजिबात ओळखत नाही. तुरुंगातून पळून आलेला मी एक कैदी आहे. नंतर हळूहळू संक्षेपानं मी त्यांना माझी सर्व हकीकत सांगितली. माझं बोलणं ते शांतचित्ताने ऐकत होते–सर्वच प्रकार त्यांना एखाद्या स्वप्नासारखा वाटत होता. त्यांनी मला शेवटी विचारलं की मला त्यांच्याकडून कुठल्या प्रकारच्या साहाय्याची अपेक्षा आहे? त्यांचा हा प्रश्न ऐकून आपल्याला निश्चित त्यांची मदत मिळणार, याची मला खात्री पटली. मी त्यांना म्हणालो की आधी मला एक कात्री आणि वस्तरा आणून द्या. ही लांबलचक वाढलेली दाढी आधी काढून टाकतो. त्यांनी तशी व्यवस्था केली. तुरुंगात वाढवलेली दाढी आज उपयोगी पडली. दाढी काढल्याबरोबर माझा जुना पुराणा सोबतीही मला ओळखू शकला नसता. माझ्या अंगावर जे कपडे होते त्यावर तुरुंगाच्या काही खुणा नव्हत्या, परंतु ते बदलावेत–असाच विचार माझ्या मनात आला. मी डॉक्टरसाहेबांना कपडे देण्याची विनंती केली. त्यांनी ताबडतोब टोपी, सदरा आणि खादीचं धोतर हे कपडे हातात ठेवले. चपलांचा एक जोडही ते घेऊन आले. मी ते कपडे अंगावर चढवले. त्या कपड्यांमुळं मी आता शंभर टक्के कॉंग्रेसचा कार्यकर्ता दिसू लागलो. मी त्यांना मुंबईला जाण्यासाठी भाड्याची व्यवस्था करण्याची विनंती केली. तिथे पोचण्यासाठी किमान १५ रुपयांची गरज होती. खिन्न मनानं ते म्हणाले की डॉक्टरचा व्यवसाय सोडून ते कॉंग्रेसचं कार्य करत आहेत–भाकरीपुरती सोय आहे–पण जवळ पैसे मात्र नाहीत. पैशासाठी त्यांना आपल्या मित्रांची मदत घ्यावी लागेल. त्यांनी माझ्यावर जो विश्वास दाखवला–आजच्या काळात असा प्रकार असंभवनीय वाटेल. अशा विश्वासाची कल्पना देखील करता येत नाही.

आजपासून चाळीस वर्षांपूर्वी महात्मा गांधींनी आपल्या तपःपूत आचरणानं देशाचं राजकीय वातावरण किती निर्मळ बनवलेलं होतं! एक देशभक्त दुसऱ्या देशभक्तासंबंधी अविश्वास दाखवूच शकत नव्हता. याच कारणामुळं डॉ. वऱ्हाडपांडे यांनी माझ्या शब्दांवर संपूर्ण विश्वास ठेवला होता. देशप्रेमाच्या रंगात ते न्हाऊन निघाले होते. माझ्या डोळ्यातच त्यांना देशभक्तीची धुंदी दिसून आली.

घरात स्वयंपाक झाला. भोजन आटोपल्यानंतर डॉक्टरसाहेब मित्रांकडून पैसे घेऊन येतो–असं सांगून बाहेर पडले. ते श्री. शिवाजीराव पटवर्धन यांच्याकडे गेले. त्यांचा मित्र मंडळी नित्य होतीच. त्या सर्वांनाच त्यांनी माझी सर्व हकीकत सांगितली. ती हकीकत ऐकून ती मंडळी श्री. वऱ्हाडपांडे यांची चेष्टा करावी या हेतूनं म्हणाली की तुम्ही एक भोळे–भाबडे गृहस्थ आहात. कुणीतरी गुप्तचर तुमच्याकडे आलेला

आहे–तुम्ही त्याच्या जाळ्यात अडकला आहात. तो तुम्हाला फाक बनवत आहे! हे ऐकून श्री. वऱ्हाडपांडे फारच निराश झाले. उदास मनःस्थितीत ते त्यांना म्हणाले-"माझ्याकडे आलेल्या माणसाच्या डोळ्यावरून सुद्धा हेच लक्षात येतं की देशप्रेमानं तो वेडा बनलेला आहे." त्यांचं उत्तर ऐकून सर्वांचं मन बदललं आणि निर्णय असा झाला की ते सज्जन मला भेटतील–बघतील. त्यांनी डॉक्टरांना सांगितलं की पाहुण्यासमवेत तुम्ही फिरायला बाहेर पडा. सूर्य मावळायच्या आत तुम्ही रस्त्याने चालत राहा. आम्ही समोरून येऊ. तुम्हाला भेटू व त्या पाहुण्यालाही नीट न्याहाळू. त्याची हकीकत सत्य आहे किंवा नाही, हे आम्ही आमच्या पद्धतीनं समजून घेऊ. समोरून कोण आलं, कुणी मला बघितलं, यातलं मला काहीच कळलं नाही. डॉक्टरसाहेबांनी मला त्यांच्या घरी पोचवलं आणि ते परत बाहेर गेले. परत घरी आल्यानंतर त्यांनी १५ रुपये माझ्या हातावर ठेवले. ही गंमतीची कहाणी डॉ शिवाजीराव पटवर्धन यांनीच मला पुढें माथ्वाड (मुंबई) च्या व्यायामाच्या शिबि-राच्या वेळी १९४० साली ते जेव्हा माझे सहकारी म्हणून तिथं आले, तेव्हा मला सांगितली

डॉ. वऱ्हाडपांडे यांनी जेव्हा पंधरा रुपये माझ्या हवाली केले तेव्हा मी मोठ्या अभिमानानं कॉंग्रेसचा एक कार्यकर्ता मानू लागलो. माझ्या खिशात १५ रु. होते. आपण आता कैदी राहिलेलो नाहीत, याची खात्री झाली. सरकारच्या विरुद्ध संघर्ष करणारा मी एक बंडखोर होतो.

श्री. वऱ्हाडपांडे माझ्यासह अमरावती स्टेशनावर आले. मुंबईचं तिकिट काढून त्यांनी माझ्या खिशात टाकलं. मी गाडीत बसलो. मी ज्या मार्गानं आलो होतो त्याच दिशेनं आता मुंबईकडे निघालो. माझ्या डब्यात पोलीसचा एक शिपाई येऊन बसला. एका स्टेशनावर चार जणांची एक तुकडी आमच्या डब्यात चढली. तुकडीतल्या लोकांनी पोलीस शिपायाला विचारलं––"हवालदारसाहेब––कुठपर्यंत चाललात"? हवालदारसाहेब उत्तरले––"रात्री एक कैदी पळून गेला आहे––त्याला शोधत निघालो आहे." ती तुकडी साध्या वेषातील पोलिसांचीच होती. हवालदाराची चेष्टा करण्याच्या हेतूनं ते म्हणाले "कैदी पळाला रात्रीच्या वेळी––तुम्ही त्याला शोधायला निघालात दिवसाच्या वेळी"! असं म्हणून ते हसायला लागले. त्यांच्या हसण्यात मीही सामील झालो. पुढल्या स्टेशनवर ते सर्व उतरले. रात्री ९ च्या सुमारास मी मुंबईला पोचलो. वीर विनायक दामोदर सावरकरांचे धाकटे बंधू नारायण दामोदर सावरकर दातांचे डॉक्टर होते व ते मुंबईत होते. मी त्यांना माझा सहकारी करू इच्छित होतो. मी त्यांच्या पत्त्यावर पोचलो. रात्रीचे साडे दहा वाजून गेले होते. त्यांच्या दवाखान्याच्या कंपाउंडरनं मला त्यांच्या घरी नेऊन पोचवलं. डॉक्टर कपडे वगैरे बदलून झोपायच्या तयारीत

होते. मला बघून त्यांना आश्चर्य वाटलं—रात्रीच्या वेळी मी त्यांच्याकडे कशासाठी आलो आहे, हे त्यांना समजेना. उत्तरादाखल मी त्यांना आधी दार बन्द करायला सांगितलं आणि जवळ बसवून घेऊन मी त्यांना माझी सर्व हकीकत सांगितली.

रात्रीची वेळ होती. आम्ही दोघेही समवयस्क होतो. डॉक्टरांच्या चेहऱ्यावर भीतीचा लवलेश नव्हता. मला त्यांनी जवळ बसवून "हं सांगा सगळं विस्तारानं"—असं म्हणाले.

डॉ. नारायण दामोदर सावरकर आपल्या थोरल्या बंधूंना भेटण्यासाठी अंदमानला आले होते. मी त्यांना आठवण करून दिली. ते म्हणाले की मुंबईला परत येतेवेळी वर्तमानपत्रांतून तुम्ही पळून गेल्याची बातमी वाचली होती. मी त्यांना म्हणालो की आजच्या सकाळच्या वर्तमानपत्रांत देखील एक कैदी गाडीतून उडी मारून पळाल्याची बातमी तुम्ही वाचली असेल—तो पळालेला कैदी म्हणजे मीच! हे माझंच नाव आहे. हे ऐकल्याबरोबर डॉक्टर मनापासून म्हणाले—मी तुमचं स्वागत करतो. तुम्ही इथं संपूर्णपणे सुरक्षित आहात. एवढं बोलून ते खोलीबाहेर गेले. थोड्याच वेळाने त्यांचा मघाचा कंपाउण्डर माझ्यासाठी काही खाद्यपदार्थ घेऊन आला. मी खायला प्रारंभ तर केला पण माझं मन अनेक उलटसुलट शंकांनी भरून गेलं. या सज्जन माणसाचा माझ्या बोलण्यावर विश्वास बसला असेल काय? ते मध्येच अचानक कुठं बरं गेले असतील? यांना एखादा दगाफटका तर लागला नसेल? माझ्या लक्षात काहीच येईना. भारतीयांच्या मनातील देशप्रेमाचा मला अनेकदा प्रत्यय आला होता. १९२२ च्या देशाच्या राजकीय वातावरणात एका देशभक्ताला दुसऱ्या देशभक्ताविषयी कसलीही शंका येत नव्हती. एका भारतीयाच्या मनात दुसऱ्या भारतीयाविषयी संशयाला अजिबात स्थान नव्हतं. एक गरीब शेतकरी माझी मदत करतो, वसतिगृहातील तरुण विद्यार्थी देवदूतासारखा माझ्या साहाय्याला धावून येतो—अमरावतीला काँग्रेसचा एक कार्यकर्ता माझं रक्षण करतो—मला सर्वतोपरी साहाय्य करतो. डॉ. नारायण दामोदर सावरकर मला योग्य ते साहाय्य करायला तयार म्हणजे काहीच अडचण नव्हती. एक तास मी त्यांची वाट बघत बसून राहिलो. ते आपल्या समवेत १८ वर्षांच्या तरुणाला घेऊन एकदमातच घरी आले. तो तरुण सशक्त आणि उत्साही वाटत होता. डॉक्टर म्हणाले तुम्ही या तरुणासमवेत जा. तुम्ही अगदी सुरक्षित आहात, बिलकूल चिंता करू नका. एका तासाच्या आत डॉक्टरांनी सर्व योजना आखली. मुंबईच्या प्रसिद्ध प्रिन्सेस स्ट्रीटवरील पोलिस कचेरीच्या वरच्या मजल्यावरील एका खोलीत माझ्या थांबण्याची व्यवस्था करण्यात आली. तो तरुण मित्र मला त्या ठिकाणी घेऊन गेला. त्यानंतरच्या दिवसांत मला कुठं कुठं नेलं—कुणाकुणाची माझी भेट घडवून आणली, आम्ही कोणकोणत्या बाबींची चर्चा केली—ही सर्व हकीकत बरीच लांबलचक आहे.

## काकासाहेब गाडगीळांच्या घरी

माझी रवानगी पुण्याला करण्यात आली. माझी राहण्याची व्यवस्था एका सज्जन व्यक्तीच्या बिऱ्हाडी करण्यात आली. माझ्या आश्रयदात्याचं नाव देखील मला माहीत नव्हतं. त्या सज्जन गृहस्थाचं नाव सुदैवानं त्यांच्याचकडून एके दिवशी कळलं.

१९५६ सालची गोष्ट. सरदार प्रतापसिंग कैरों पंजाबचे तेव्हा मुख्यमंत्री होते. त्या सुमारास श्री. नरहर विष्णु ऊर्फ काकासाहेब गाडगीळ पंजाबचे राज्यपाल होते. सरदार प्रतापसिंह कैरों एकेदिवशी राज्यपालांची ओळख करून देण्यासाठी मला त्यांच्याकडे घेऊन गेले. श्री. काकासाहेब गाडगीळांना श्री. कैरों म्हणाले—"गव्हर्नरसाहेब, मी आज आपणास एका सद्‌गृहस्थाची ओळख करून देण्यासाठी त्यांना सोबत आणलं आहे—त्यांचं नाव आहे—सरदार पृथ्वीसिंह! पंजाबचे हे एक जुने प्रसिद्ध क्रांतिकारी आहेत. हे ऐकून श्री. गाडगीळ हसून म्हणाले—"यांना तुम्ही काय ओळखणार? चाळीस वर्षांपूर्वी चालत्या गाडीतून उडी मारून हे पळाले व नंतर पुण्याला माझ्या घरी काही काळ राहिले—" राज्यपालांचे शब्द ऐकून श्री. प्रतापसिंहजी आश्चर्यचकित झाले.

## भावनगरातील भूमिगत जीवन . . . . . . . . . . १२

पुण्याला काकासाहेब गाडगीळ यांच्या घरी राहून नंतर मी बेळगावला गेलो. तेथून गोव्यात पोचलो. कोणत्याही ठिकाणी अधिक काळ राहायला माझं मन तयार होईना. मी मुंबईला परत आलो. मला ज्या ज्या मंडळींनी साहाय्य केलं होतं त्या सर्वांशी माझी ओळख झालेली नव्हती. एके दिवशी रात्रीच्या वेळी डॉ. सावरकरांनी त्यांच्या एका मित्राशी माझी ओळख करून दिली. ते मला म्हणाले की हे गृहस्थ तुम्हाला सौराष्ट्रात भावनगर येथे आपल्या बरोबर घेऊन जातील. त्या मित्रांचं नाव होतं श्री. गणेश रघुनाथ—तात्यासाहेब वैशंपायन. वैशंपायन हे एक जुने क्रांतिकारी होते. ते वीर विनायक दामोदर सावरकरांचे सहकारी होते व सध्या भावनगरला तार खात्यात काम करत होते. ते एक अत्यंत बुद्धिमान समाजसेवक होते. त्यांना बघताच माझा त्यांच्यावर विश्वास बसला. मी मनात म्हणालो—"हाही माझ्यासारखाच कुणीतरी धाडसी जीवन जगणारा दिसतो."

श्री. वैशंपायन सामाजिक कार्यकर्ते होते आणि तरुणवर्गात फारच लोकप्रिय होते. लहानपणी नाशिक येथे दाण्डेकरांच्या व्यायामशाळेत त्यांनी व्यायामाचं शिक्षण घेतलं होतं. ते एक प्रख्यात मल्ल होते. शिवाय पोहण्यातही ते पटाईत होते. त्यांचे वडील एक आदर्श शिक्षक आणि देशभक्त होते. त्यांचे खूप मित्र होते. श्री. वैशंपायन यांच्याशी माझी अशी ओळख करून देण्यात आली–"हे एक बालब्रम्हचारी आहेत. घरदाराचा मोह सोडून ते बाहेर पडलेले आहेत—संसारबंधनात ते अडकून पडू इच्छित नाहीत. कुठेतरी नोकरी आणि समाजसेवा करत ते जीवन जगू इच्छितात."

माझ्यासाठी नोकरीचा शोध घेण्यात आला. मित्रांनी मला कोणत्या प्रकारची नोकरी चालेल असं विचारलं. वैशंपायन म्हणाले एखाद्या शिपायाचीही चालेल किंवा मंत्रीपद मिळालं तरी चालेल. सर्व मित्रांनी हसून विचारलं की शिपायापासून ते मंत्रीपदापर्यंत कोणतंही नाटक करू शकणारा असा हा आहे तरी कोण? त्यांचे जे मित्र माझ्याशी चर्चा करण्यासाठी येत, त्यांना माझं मोठं नवल वाटे. ते मनात म्हणत या माणसाच्या बुद्धीचा आणि शक्तीचा अंदाज लागणं कठीण आहे. भावनगरला पोचल्यानंतर श्री. वैशंपायन यांनी त्यांच्या चार-दोन मित्रांना माझी सर्व हकीकत सांगितली. त्यांनी कुणाकुणाला विश्वासात घेतलं होतं, हे काही मला माहीत नव्हतं.

एका मोठ्या उद्यानाच्या गेटकीपरची नोकरी मला मिळाली. ही नोकरी करायला मी तयारी दर्शवली. जेव्हा वैशंपायन यांच्या काही मित्रांना हे समजलं तेव्हा त्यांना ही नोकरी काही पसंत पडली नाही. माझ्यासारख्या क्रांतिकारकाला रात्रभर बागेवर पहारेकरी म्हणून उभं करणं त्यांना प्रशस्त वाटलं नाही. हा विचार अखेर सोडून द्यावा लागला. भावनगर येथे थिऑसॉफिकल सोसायटीच्या वतीनं एक सनातन धर्म हायस्कूल चालवण्यात येत असे. त्या शाळेत व्यायाम शिक्षकाची जागा रिकामी होती. नोकरी शोधण्यात एक महिना गेला होता. या महिन्यात खायला-प्यायला भरपूर मिळाल्या-मुळे, पौष्टिक आहारामुळे माझी प्रकृती फारच उत्तम झाली. माझ्यावर नवी झळाळी आली. माझ्या ठिकाणी तारुण्य मुसमुसत होतं. वैशंपायन माझ्याकडे बघून म्हणाले—"तुम्ही एक चांगले व्यायाम शिक्षक ठराल. शाळेच्या व्यवस्थापकांना भेटा आणि व्यायाम शिक्षक म्हणून नोकरीवर रुजू व्हा." उत्तर प्रदेशातील ज्या लोकांना महा-राष्ट्रात आणि गुजराथमध्ये भय्या म्हणून ओळखलं जातं, त्या भय्याचा पोषाख माझ्या अंगावर होता. मी मुख्याध्यापकांच्या खोलीत गेलो आणि त्यांना सॅल्युट ठोकला. त्यांनी अभिवादन तर स्वीकारलं मात्र बसायला सांगितलं नाही. स्काउट मास्टरला त्यांनी बोलावून सांगितलं—हे आपले नवीन व्यायाम शिक्षक आहेत. यांना घेऊन जा आणि काय काय कामं करावी लागतील ते सर्व समजावून सांगा. स्काउट-मास्तर हे शाळेत विज्ञा-नाचे शिक्षक म्हणूनही प्रसिद्ध होते. मला ते व्यायाम शाळेच्या जागेवर घेऊन गेले आणि ते माझ्याशी हिंदीत बोलू लागले. मी त्यांच्याशी इंग्रजीतून बोलू लागलो. ते आश्चर्यचकित होऊन माझ्याकडे बघू लागले. एक भैय्या इंग्रजी बोलतो म्हणजे काय? त्यांनी हसून माझा हात पकडला. आम्ही मग व्यायामांच्या तपशीलाबाबत थोडी चर्चा केली. ते मला परत हेडमास्तरांच्या खोलीत घेऊन गेले. ते त्यांना म्हणाले—"अहो! हे तर इंग्रजी विषयाचे पदवीधर दिसतात!" हेडमास्तरांनी हसून माझं स्वागत केलं आणि खुर्चीवर बसायला सांगितलं. ते म्हणू लागले—"क्षमा करा! मला वाटलं तुम्ही म्हणजे कुणी पैलवानच आहात—तुम्ही चांगले शिकले-सवरलेले आहात, हे मला माहीत नव्हतं. तुम्ही इथं उद्या कोणत्याही वेळी या—आपण चर्चा करू." बाहेर पडल्यावर माझ्या मनात शंका आली की माझ्या इंग्रजी बोलण्यामुळं काही घोटाळा तर होणार नाही? एवढ्यामुळं व्यायाम शिक्षकाची नोकरी गेली नाही, म्हणजे मिळवली!

दुसऱ्या दिवशी वेळेवर मी शाळेत गेलो. सर्व शिक्षकांना माझी ओळख करून देण्या-साठी हेडमास्तरांनी आपल्या खोलीत बोलावलं होतं. त्यांनी मला मोठ्या अगत्यानं खाली बसवलं व ते म्हणाले—"आमची संस्था आर्थिक दृष्टीनं गरीब आहे. आम्ही तुम्हाला योग्य वेतन देऊ शकणार नाहीत. आपण दररोज सायंकाळी एक तास शाळेचं काम करू शकलात तर आम्हाला आनंद वाटेल. या एका तासाच्या कामासाठी आम्ही आपणास दरमहा ३० रुपये मानधन म्हणून देऊ."

त्या काळीं ३० रुपये माझ्या उदरनिर्वाहासाठीं आणि अन्य गरजा भागविण्यासाठीं पुरेसे होते. मी त्यांच्या म्हणण्याला संमती दर्शविली. आता मी एक उत्कृष्ट व्यायाम शिक्षक बनू इच्छित होतो. शारीरिक बळ आणि चांगली उंची मला वारसाहक्कानेच मिळाली होती. काही लढण्या-भिडण्याचेही डावपेच मला अवगत होते. शरीरशास्त्र आणि आहारशास्त्राशीही मी परिचित होतो.

भावनगरमधलं माझं जीवन १९२३ साली सुरु झालं आणि जून १९३० पर्यंत मी तिथं राहिलो. या आठ वर्षांच्या काळात अनेक साहसपूर्ण घटना माझ्या जीवनात अनुभवायला मिळाल्या. भारताच्या इतिहासात हा काळ खूपच धडामोडींचा होता. त्या काळात आपल्या देशातील जागृत जनतेला अनेक बिकट समस्या स्वतःच सोडवाव्या लागल्या.

सौराष्ट्रामधील लोकांच्या मनात व्यायामासंबंधी आवड निर्माण होत होती. व्यायामा-संबंधी त्यांना विशेष असं ज्ञान मात्र नव्हतं. माझे हितचिंतक आणि मला मदत करणारे श्री. वैशंपायन हे व्यायामशास्त्राचे चांगले तज्ज्ञ होते. कुस्ती आणि देशी खेळ यांची त्यांना विशेष आवड होती. एका सार्वजनिक उद्यानात ते स्वतः एक व्यायामशाळा चालवीत होते. एके दिवशी मीही त्यांच्या व्यायामशाळेत जाऊन बसलो. काही तरुण आणि छोटी मुलं त्यांच्या भोवती बसून बजरंगबलीचं स्तोत्र म्हणत होती. अशा प्रार्थनेच्या वेळी अनेकदा मी त्यांच्यासमवेत बसे. एके दिवशी प्रार्थनेला बसलो असताना, त्या प्रार्थनेच्या संदर्भात माझ्या मनात काही विचार घोळू लागले. मला विचार पडला की, भारतातील कोटयावधी स्त्री-पुरुष दररोज देवतांचं भजन-पूजन करतात, देवतांची आराधना करतात–परंतु या देव-देवता प्रसन्न का बरे होत नाहीत ? सर्वांची प्रार्थना का बरं स्वीकारली जात नाही ? अशाप्रकारे विचार करत असताना मी एका निष्कर्षावर येऊन पोंचलो की देशातील सर्व स्त्री-पुरुषांनी ज्या देवतेची, ज्या पद्धतीनं, ज्या स्थानावर आणि ज्या भाषेत– ज्या भावनेनं आणि ज्या विधीनं पूजा-अर्चा करायला हवी तशी पूजा केली जात नाही. म्हणूनच देव-देवता लोकांना प्रसन्न होत नाहीत.

माझ्या या विचारमंथनातून मी असाही निष्कर्ष काढला की देशातली खरी देवता त्या देशातील मुलंच असतात आणि शिक्षक म्हणजे त्यांचा पुजारी. ज्या ठिकाणी त्यांची पूजा व्हायला हवी, ते स्थळ म्हणजे शाळा व क्रिडांगण. मी मनोमन असं ठरवलं की आपणाला पुजारी बनायचं आहे. एक पुजारी या नात्यानं आपल्याला एक अशी कला साध्य करावी लागेल जिच्या बळावर आपल्या आराध्य देवतेची चांगल्या तऱ्हेनं पूजा-अर्चा करता येईल. माझा हा निश्चय कृतीत आणण्यासाठी मी प्रयत्नाला लागलो. मी अनेक व्यायाम विशारदांना आपले गुरू मानून मी स्वतः शिकत राहिलो. बडोद्याचे राजरत्न प्रोफेसर माणिकराव यांचा मी विश्वास संपादन केला आणि

व्यायामशास्त्राचं सप्रयोग शिक्षण घेतलं. भावनगरच्या प्रमतेमधून जे जे शिकता आलं ते मी शिकलो. नाशिकचे व्यायाम तपस्वी, ज्वलंत निष्ठेचे, निस्वार्थी समाजसेवक—वीर सावरकरांचे अनुयायी, आदर्श शिक्षक श्री. कृष्णाजी बळवंत महाबळ गुरुजी यांचंही व्यायामाच्या क्षेत्रात मला मार्गदर्शन लाभलं.

माझ्या चेहऱ्यावर नेहमी हास्याची छटा उमटलेली असे. डोळ्यावर तारुण्याची धुंदी होती. माझा सशक्त पिंड, चपळपणा आणि देशबांधवाविषयी वाटणारं प्रेम या सर्व गोष्टी माझ्या वागण्यातून आपोआपच प्रकट होत. भावनगरमधले साहसप्रिय तरुण माझ्याकडे आकर्षित होऊ लागले. मी सर्वांचाच आवडता बनलो. चोवीस तास मी निरागस, निष्पाप मुलांच्या सहवासात घालवू लागलो. त्यांच्यामुळं गुजराथी भाषा सहजतेनं मी शिकलो.

व्यायामशाळेत आता तरुणांची संख्या झपाट्याने वाढू लागली. एखादं प्रशस्त मैदान आणि व्यायामांच्या उपकरणांचा अभाव, या गोष्टी मला खटकू लागल्या. मी कुणाला काही सांगू शकत नव्हतो. माझं म्हणणं कोण मान्य करणार, अशी शंका यायची. माझी पर्वतोपरी मदत करणारे वैशंपायन यांना अन्य ठिकाणी जावं लागलं. मी मग वैराग्याचं साधन अवलंबिलं. एके दिवशी जवळपास २०० मुलं माझ्या समवेत होती. त्यांच्यासमोर मी प्रतिज्ञा जाहीर केली की जोपर्यंत भावनगर येथे योग्य ठिकाणी सर्व साधन-सामग्रीसह एखादी उत्कृष्ट व्यायामशाळा आपण चालू करू शकणार नाही— तोपर्यंत मी दूध आणि मिष्टान्न सेवन करणार नाही.

दूध आणि गोड पदार्थ मला अतिशय आवडत. सर्वत्र भावनगरात माझी प्रतिज्ञा मुलांनी घरोघरी जाऊन सांगितली. त्यावर गावात चर्चा सुरू झाली. परंतु माझ्याकडे कुणीच लक्ष दिले नाही. भावनगर संस्थानचा कारभार सर प्रभाशंकर पट्टणी नावाच्या गृहस्थांच्या सल्ल्याने चाले. तिथले युवराज श्री. श्रीकृष्णकुमारसिंहजी त्यावेळी अज्ञान बालक होते. त्यांना राज्याभिषेक करण्याची वेळ येऊन ठेपली. हा सर्व विधी लौकरच पार पाडणार होता. या आनंदाच्या प्रसंगी एक मोठा उत्सव साजरा करण्याचे ठरले. राजघराण्याच्या या आनंदसोहळ्यात सहभागी होण्यासाठी दूरदूर अंतरावरून लोक भावनगरमध्ये जमा झाले. माझ्या मनात असा विचार आला की, आपणही आपल्या व्यायाम शाळेचा एखादा कार्यक्रम या उत्सवात सादर करू. व्यायामाची प्रात्यक्षिकं लोकांपुढं करून दाखवू. चहुकडे लोकांची गर्दीच गर्दी होती. व्यायाम प्रदर्शनासाठी कुठं मोकळी जागाच दिसेना. मी पोलीस अधिकाऱ्यांना विनंती केली. त्यांनी असमर्थता प्रकट केली. हसत हसत ते म्हणाले— "तुम्ही स्वतःच जागा शोधून काढा आणि मुलांचे खेळ अवश्य दाखवा— त्याला आमची हरकत नाही." मी माझं सर्व कौशल्य पणाला लावून— व्यायामांच्या प्रात्यक्षिकांसाठी जागा निश्चित केली आणि तिथं

कसरतींचे प्रकार सादर केले. त्या गुजरात राजदरबारचे प्रमुख कारभारी श्री. प्रभाशंकर पट्टणी यांचे एक साहाय्यक होते, त्याचं नाव होतं कर्नल जोरावरसिंह गोहिल. मी त्यांना अगोदरच विश्वासात घेतलं होतं. माझ्या दृष्टीनं कर्नल जोरावरसिंह सौराष्ट्रातील एक नररत्न होते. जेव्हा श्री. प्रभाशंकर पट्टणी यांनी तरुणांच्या कसरती बघितल्या तेव्हा त्यांनी जोरावरसिंहांना विचारलं की तरुणांना हे सगळे व्यायाम प्रकार शिकवणारा शिक्षक कोण आहे? त्याचं नाव काय आहे? तो कुठला राहणारा आहे? श्री. जोरावरसिंहांनी आपल्या विशिष्ट पद्धतीनं सर्व हकीकत सांगितली आणि हेही सांगितलं की ते शिक्षक प्रतिज्ञा करून बसले आहेत. जेव्हा व्यायामशाळेसाठी त्यांना प्रशस्त जागा मिळेल तेव्हाच त्यांची प्रतिज्ञा पूर्ण होईल!

सर प्रभाशंकर हे एक प्रभावशाली बुजुर्ग व्यक्तिमत्व होतं. मला त्यांनी जवळ बोलावून माझी पाठ थोपटली आणि ते जोरावरसिंहजींना म्हणाले–"यांना मोटारीत घेऊन भावनगर मधल्या सगळ्या सरकारी जागा दाखवा– त्यांना जी जागा पसंत पडेल त्यासंबंधीचं फर्मान मी काढतो. त्यांना लागेल ती सर्व मदत द्या." मी त्यांच्यासमवेत मोटारीत बसलो आणि मी त्यांना राजमहालाच्या दिशेनं वळण्यास सांगितलं. हा जुना राजवाडा होता–त्याचं नाव होतं मोतीबाग. चहूबाजूंनी उंच भिंती होत्या. आत एक मोठी बाग होती. या इमारतीत काही शासकीय कार्यालयं होती. मी तिथल्या बगिच्यातील १५० गज लांबी-रुंदीचा एक भूखंड मागितला. सरकारी हुकूम जारी करण्यात आला की बगिच्यामध्ये क्रीडांगण बनवण्यात यावं. भावनगरच्या जीवनात पुढे मला जे महत्त्वाचं कार्य करता आलं, त्याचा हा प्रारंभ होता. माझा हा पहिला विजय होता. माझे राष्ट्रीय विचार लोकांवर परिणाम करू लागले. भावनगरच्या राष्ट्रीय शिक्षणसंस्थेत मला एक सन्माननीय पद मिळालं. या संस्थेत व्यायामाचं शिक्षण देत असतानाच मी इतिहास आणि भूगोल विषयांच्या प्रशिक्षणाचं कामही आपल्या हाती घेतलं. संस्थेचे मुख्य संस्थापक श्री. नानाभाई भट्ट, श्री. हरभाई त्रिवेदी आणि श्री. गिजूभाई बधेका, हे होते. या तिन्ही सद्गृहस्थांचा मी लौकरच विश्वास संपादन केला. 'दक्षिण मूर्ती शिक्षणसंस्था' ही मुंबई इलाख्यातील महत्त्वाची संस्था होती. यामुळं गुजरात-सौराष्ट्रातील सर्व कार्यकर्त्यांची दृष्टी माझ्याकडे वळली. तरुणांच्या एका तुकडीसमवेत मी गुजरात आणि सौराष्ट्रात सहल काढली. या सफरीचा उद्देश होता व्यायामासंबंधी प्रचार करणं. जेव्हा मी 'दक्षिण मूर्ती' संस्थेत काम करत होतो तेव्हा सरकारी अधिकाऱ्यांचं माझ्याकडे लक्ष गेलं आणि नंतर त्यांनी मला सरकारी नोकरीमध्ये घेतलं.

एके दिवशी एक तरुण रडतच माझ्याकडे आला. तो सांगू लागला की हेडमास्तरांनी त्याला शाळेतून काढून टाकलं आहे. त्याचा अपराध म्हणजे टोपी न घालता तो वर्गात जाऊन बसला. मी त्याला विचारलं की काही खोडी करण्याच्या उद्देशानं तू टोपी न घालता वर्गात गेलास की अन्य काही कारणांमुळं? तेव्हा त्यानं उत्तर दिलं की तो आधी

व्यायाम शाळेत गेला होता–तेव्हा त्याने टोपी घातलेली नव्हती. मी त्याला म्हणालो की तू आज देखील असाच टोपी न घालता जा व वर्गात जाऊन बस. त्यानं त्याप्रमाणं केलं. त्याला धण्ड मारून वर्गाबाहेर हाकलून देण्यात आलं. त्यानं येऊन मला हे सांगितलं त्यावेळी मी भावनगरच्या राजपूत वसतीगृहाचा प्रमुख म्हणून काम करत होतो. त्या वसतीगृहातले जवळ जवळ शंभर विद्यार्थी त्या शाळेत शिकत होते. शहरातले २०० विद्यार्थी व्यायामशाळेत शिकायला येत होते. मी सर्व विद्यार्थ्यांना व्यायामशाळेत येताना हाफ पँट, हाफ शर्ट घालून उघड्या डोक्याने यायला सांगितले. मी सर्व विद्यार्थ्यांना असाही आदेश दिला की ते ज्या पोशाखात व्यायामशाळेत येतात, त्याच पोशाखात त्यांनी शाळेत जावं. हे दृश्य बघून हेडमास्तर थोडेसे चपापले. भावनगरमध्ये मी 'स्वामी-राव' या नावानं ओळखला जात होतो. हेडमास्तरांनी विचारपूस केल्यानंतर त्यांना या सर्व प्रकारामध्ये 'स्वामीराव' चा हात आहे–हे समजलं. भावनगरमध्ये 'स्वामी-रावां' चा चांगला वट्ट निर्माण झाला होता. मी कुशलतेनं आपले व्याप सांभाळत होतो. हेडमास्तरांनी शिक्षणाधिकाऱ्यांना हे सगळं लिहून कळवलं. शिक्षणाधिकाऱ्यांनी या सर्व गोष्टींकडे दुर्लक्ष केलं– कारण त्यांच्या मनात माझ्याविषयी आदरभाव होता. हेडमास्तर एवढ्या उपरही गप्प बसले नाहीत. ते सर प्रभाशंकर पट्टणींना जाऊन भेटले व मी मुलांना बेशिस्त वागायला उत्तेजन देतो आहे, अशी त्यांनी माझी त्यांच्याकडे तक्रार केली. सर्व विद्यार्थी टोपी न घालता, हाफ पँण्ट, हाफ शर्ट घालून शाळेत येत आहेत. सर प्रभाशंकर पट्टणी मोठे दूरदृष्टीचे गृहस्थ होते. जोराने हसून ते हेडमास्तरांना म्हणाले की स्वामीरावांना माझे आभार कळवा. बरं म्हणजे पूर्वीच्या गुरुकुलातल्याप्रमाणे सर्व विद्यार्थी नुसते लंगोट बांधूनच शाळेत आले असते तर ठीक झालं असतं. सर-साहेबांचं बोलणं ऐकून हेडमास्तरांचा चेहरा पार पडला. १९२५ नंतर शाळा-कॉले-जातील विद्यार्थी उघड्या डोक्याने वर्गांना येण्याची एक नवीन टूमच निघाली.

सर्व भारतभर गुजराथी माणसं चतुर आणि कुशल व्यापारीवृत्तीचे मानले जातात. ते गरीब व भीरु वृत्तीचे असतात. मी मात्र माझ्या जीवनातील एकंदर अनुभवांवरून असं मानतो की जगातील कोणताही धर्म अथवा जात जन्मतःच भित्री किंवा शूर अशी काही नसते. माणसाला जसं शिक्षण मिळतं त्याप्रमाणं त्याच्या व्यक्तीमत्त्वाला आकार प्राप्त होतो. भावनगर मध्ये कुठे आग लागली की पाण्याच्या दुर्भिक्ष्यामुळे ती लौकर आटोक्यात येत नसे. मी तिथल्या तरुणांना आग विझवण्याचं शिक्षण दिलं होतं. दोन-तीन प्रसंगी तर एकूण परिस्थिती फारच धोक्याची होती. आग एवढी भडकली होती की ज्वालांचा ताप सहन न होऊन अग्निशामकदलाचे जवान देखील तिथून पळाले होते. व्यायामशाळेतील ज्या तरुणांनी आग विझविण्याचं शिक्षण घेतलेलं असे, ते माझ्याबरोबर तिथे थांबत. वेळ पडली तर आग लागलेल्या घराच्या छतावरही ते चढून जात– शहरात सर्वत्र त्यांची कीर्ती पसरली होती. प्रत्येकाच्या मनात असा

विश्वास त्यानीं निर्माण केला होता कीं ते आगीच्या अधिक फैलाव होऊ देत नाहीत व लौकरच आग आटोक्यात आणण्यात यशस्वी होतात. या तरुणांना राष्ट्रीय सैनिक बनण्याचंही शिक्षण देण्यात आलं होतं.

चार-चार छटाक गूळ आणि फुटाणे या आहारावर, शेतात तुकड्या बनवून मी या तरुणांना ४५ मैलांचा प्रवास करायला लावलं होतं. शिवाजी महाराजांच्या जयंतीच्या निमित्तानं, सायंकाळी जंगलात घेऊन जाऊन त्यांच्या दोन तुकड्या बनवल्या व त्यांना 'मोगल-मराठे'—अशी नावं देऊन त्यांना लढाईचं शिक्षण दिलं. नानाविध प्रकारांनी मी सौराष्ट्रातील तरुणांना शौर्याची आणि धाडसाचं शिकवण दिली होती. त्यांना मर्दुमकीचं शिक्षण दिलं होतं. ह्याचा परिणाम असा झाला की पुरोगामी विचारांचे आई-वडील आपल्या मुलांना माझ्या हवाली करत आणि माझं अंगीकृत कार्य चांगलं चालावं, यासाठी मला त्यांचं साहाय्यही मिळे.

## श्री. बहाउद्दीन उस्मान शेख

श्री. बहाउद्दीन उस्मान शेख, 'व्यायाम-विशारद', यांच्याशी माझा संबंध बडोद्याच्या राजरत्न प्रो. माणिकराव, यांच्यामुळं आला. या मुस्लिम युवकाचं मला मोठं अजोड सहकार्य मिळालं. हा एक अतिशय आदर्श व सदाचार संपन्न युवक होता. मुसलमान धर्माचा व सतत कुराण पठण करणारा हा तरुण इतका प्रेमळ वृत्तीचा व शुद्ध आचरणाचा होता की त्याच्यासमवेत भोजन करायला एखाद्या ब्राम्हण व्यक्तीला सुद्धा अजिबात संकोच वाटला नसता. ही त्या काळातली गोष्ट आहे, जेव्हा ब्राह्मण अन्य कुणाच्या हातचं पाणी देखील पीत नसत.

बहाउद्दीन उस्मान शेख यांनी आपलं जीवन सर्वांगपूर्ण बनविण्यासाठी किती जबरदस्त प्रयत्न केले होते, त्याचं थोडक्यात वर्णन करतो. धार्मिक श्रद्धेच्या दृष्टीनं विचार केल्यास श्री. शेख हे एक अत्यंत प्रामाणिक व सुशिक्षित मुसलमान होते. आपले गुरु प्रो. माणिकराव यांना देवतातुल्य मानून ते त्यांची पूजा करायचे. त्यांनी २५ वर्षे भावनगर संस्थानाची चाकरी केली होती. सर प्र. पी. डी. पट्टणी हे नेहमी त्यांची प्रशंसा करीत. तसेच भावनगरच्या नागरिकांनाही त्यांच्याविषयी आदर होता. तुरुंगातून पळून आलेल्या अत्यंत धोकादायक अशा कैद्यावर (स्वामीराव) त्यांचं प्रेम होतं. विश्वासानं ते त्याचे सहकारी बनले होते. तीच विश्वास आणि सहकार्याची भावना सरदार पृथ्वीसिंह आणि पुढे स्वामीराव पृथ्वीसिंह यांनाही त्यांच्याकडून मिळाली होती. सदासर्वकाळ त्यांचं सहकार्य मला लाभलं. त्यांनी कधी कुणा धनिकापाशी हात पसरला नाही आणि गरीब याचकाला मदत करतात।

आपल्या दानशील वृत्तीचं प्रदर्शन केलं नाही. त्यांच्या ठिकाणी दंभाचा लवलेशही नव्हता. भावनगरचे तरुण त्यांना आपले माहात्म्यकर्ते आणि मार्गदर्शक मानत होते. भारतात सर्वत्र व्यायामक्षेत्रात त्यांनी ख्याती प्राप्त केली होती– जेव्हा जेव्हा त्यांचं चित्र माझ्या मनापुढे उभं राहतं–तेव्हा तेव्हा आपणासही त्यांच्याप्रमाणं आदर्श समाज-सेवक बनता आलं तर किती बरं चांगलं होईल– असंच मला त्यांच्या-विषयी वाटत राहिलं. त्यांच्या बोलण्यात कधी कडवटपणा नव्हता, कपाळावर कधी आठी उमटली नव्हती, अन्तःकरणात द्वेष-मत्सर नव्हता, कशाचेही प्रदर्शन नव्हते, ढोंगीपणा नव्हता, कुठली महत्त्वाकांक्षा नव्हती–चेहऱ्यावर कधी उदासीनता दिसली नाही–आणि त्यांनी कधी फळाची आशा बाळगली नव्हती. त्यांचं अवघं जीवन अशा सुयोगांनी भरलेलं होतं. कोणत्या कारणामुळं इतकं सुंदर जीवन त्यांच्या वाट्याला आलं असावं!

एक वेळ हिंदु-मुसलमानांचा दंगा झाला. भावनगरच्या सामाजिक जीवनात मला थोडं फार महत्त्व मिळालेलं होतं. शहरातील युवक माझ्या तंत्राने वागत होते. शहरातील नागरिकांनी हिंदु-मुसलमानांचे दंगे होण्याची शक्यता आहे–असं मला सांगितलं. तुम्हाला हे दंगे थोपवता येतील का? असा त्यांनी मला प्रश्न केला. मी त्यांना दंगे थोपवण्यात येतील, अशी खात्री दिली, तसा शब्द दिला.

मंदिर आणि मस्जिद दोन्ही धार्मिक स्थळांवर हल्ला होण्याचा संभव होता. नागरिकांना मी या धार्मिक स्थळांची तुम्ही चिंता करू नका, असं सांगितलं. ज्या तरुणांना मी सामाजिक कार्याचं शिक्षण दिलं होतं त्या सर्वांना बोलावून घेतलं. मुलं एकत्र जमल्यावर मी त्यांची दोन तुकड्यात विभागणी केली. सर्वांना याची कल्पना होती की माझा सहकारी एक मुसलमान गृहस्थ आहे आणि आमचं एकमेकांवर प्रेम आहे. आम्ही एका ताटात भोजन करत होतो आणि सगळं भावनगर 'मियाँ-महादेवाची' जोडी म्हणून आम्हाला ओळखत होतं. सगळ्या शहरात आम्ही ही बातमी प्रसृत केली की, 'मियाँ' मंदिराचं आणि 'महादेव' मस्जिदीचं रक्षण करणार आहेत. आम्ही एकत्रितपणे घोषणा दिली होती की अगोदर 'महादेवाला ठार करा आणि मगच मस्जिदीत पाऊल ठेवा. हे आवाहन गावातील हिंदूंना होतं तसंच मुसलमानांना 'मियाँ'ला ठार केल्याशिवाय मंदिरात घुसता येणार नव्हतं. शहरात जिकडे तिकडे हीच चर्चा सुरू झाली की 'मियाँ-महादेव' आपल्या प्राणाची बाजी लावून शहरात दंगल होऊ देणार नाहीत. आम्ही आपल्या तरुणांचे टोळके बरोबर घेऊन सन्ध्या शहरात गस्त घालत राहिलो. वातावरण आपोआपच निवळलं. आम्हाला काहीच करावं लागलं नाही.

## एका रात्रीत माझा १०८ मैलांचा प्रवास

पंडित जवाहरलाल नेहरू त्या सुमारास सौराष्ट्रातील एका मोठ्या शहरात राजकोटला यायचे होते. तिथं तरुणांचं एक मोठं संमेलन भरणार होतं. भावनगरचे शेकडो तरुण या संमेलनासाठी जाणार होते. मीही स्टेशनवर तरुणांना निरोप देण्यासाठी गेलो. सर्वजण मलाही सोबत चलण्याचा आग्रह करत होते. राजकोट स्टेशनवर गुप्त पोलिसांचा खूप सुळसुळाट झालेला होता. मला त्या सर्वांची नजर चुकवणं भाग होतं. संमेलनाला जाण्यासाठी माझंही मन उत्सुक होतं. जवाहरलाल यांच्या स्वागतासाठी भावनगरहून एक गाडी भरून चालली होती. हा १९२७ चा सुमार होता. 'यूथ लीग' हे तरुणांचं आंदोलन जोरात सुरू होतं. मी माझ्या तरुण सहकाऱ्यांना आश्वासन दिलं की उद्या सकाळी राजकोटला जवाहरलालजींच्या स्वागताला मी येईन पोचेन-काळजी करू नका. माझ्या साहसप्रिय मनानं आपण सायकलवरून राजकोटला जायचं, असं ठरवून टाकलं. उघड्या डोक्यानं, हाफ पँट व हाफ शर्ट घालून मी सायकलवर स्वार झालो-खिशात थोडे फार पैसे होते. स्वसंरक्षणासाठी जवळ एक सोटा ही ठेवला.

वेळ सूर्यास्ताची होती. दिवस उन्हाळ्याचे होते. येथून वीस मैलाच्या अंतरावर माझे एक स्नेही राहात होते. त्यांच्याकडे जाऊन रात्रीचं भोजन केलं. मी त्यांना सांगितलं की रात्रीतून मला राजकोट गाठायचं आहे. त्या सुमारास रात्रीचे ८ वाजले होते. तिथून राजकोट ८८ मैल दूर होतं. माझं बोलणं ऐकून त्यांनी माझी थट्टा सुरू केली. त्यांना मी काही तरी खोटंच सांगत आहे, असंच वाटलं. राजकोटपर्यंतचा रस्ता कच्चा होता. मालट्रक त्या रस्त्यानं कसेबसे जाऊ शकत परंतु बस आणि मोटारी रात्रीच्या वेळी त्या रस्त्यानं नेणं धोक्याचं मानलं जाई. दिवस अंधाऱ्या रात्रीचे होते. आणि माझ्यापाशी प्रकाशाचं काही साधन नव्हतं. मी खूप वेगानं सायकल चालवत होतो-रस्ता एवढा खराब होता की मी अनेक वेळा खाली पडलो परंतु सायकल मोडली नाही आणि मलाही विशेष दुखापत झाली नाही.

उन्हाळ्याचे दिवस असल्यामुळे आकाश स्वच्छ होतं. दृष्टी चांगली असणारा माणूस अशा अंधारातही पाहू शकतो. सायकल मी वेगानं पिटाळत होतो-रस्त्यातील खड्ड्यांमुळं किंवा रेतीत फसल्यामुळं मी अनेक ठिकाणी पडलो. रात्रीचे दहा वाजले असावेत. रस्त्यात एके ठिकाणी एक रानडुक्कर दिसलं. त्याला रस्ता ओलांडून पलीकडच्या बाजूला जायचं होतं-माझी सायकल नेमकी त्याच्या पुढ्यात पोचली. तो मग तोंड वळवून मी ज्या दिशेनं चाललो होतो-त्याच दिशेनं निघाला. तो रानडुक्कर आपल्याला ठार मारणार-असं मला वाटू लागलं. मला माझं मरण दिसू लागलं. त्याला वाटलं मी त्याला मारण्यासाठी त्याचा पाठलाग करतो आहे!

आम्ही दोघंही स्वतःला वाचवण्यासाठी अधिकात अधिक वेगानं धावू लागलो. वेगाच्या बाबतीत मी त्या डुकराची बरोबरी करू शकलो नाही. खूप वेगानं सायकल पिटाळल्यामुळं माझ्या छातीत श्वास कोंडला गेला. माझी दमछाक झाली; परंतु डुक्कर मात्र वेगानं पुढं निघून गेलं. काही मिनिटं मला नीट उभं राहणं ही कठीण होऊन बसलं. मी जमिनीवर अंग टाकून थोडा वेळ पडून राहिलो. मला खूप तहान लागली. जवळपास एखादं गाव दिसेना. आता सायकलीचा वेगही मंदावला. शेवटी एकदाचा एका गावात पोचलो. घरांची दारं बन्द होती. अनेक ठिकाणी दार उघडून पाणी द्या—असं म्हणूनही कुणीच दार उघडलं नाही. सौराष्ट्रात लोकांना डाकूंचं फारच भय असतं—या भीतीमुळं कुणीच दार उघडलं नाही. तहानेनं व्याकूळ झाल्यामुळं आता सायकलवर बसण्याचंही माझ्यात त्राण राहिलं नव्हतं. रस्त्यात एका साधूची झोपडी दिसली. मी त्या साधूला झोपेतून उठवलं आणि समग्र हकीकत त्याला सांगितली. साधूनं मला गुळाचा खडा हातावर ठेवला आणि लोटाभर गार पाणी समोर ठेवलं. पाणी प्यायल्यामुळं मला आता शांत वाटू लागलं. अर्धा तास मी तिथं पडून राहिलो. आराम केला. नंतर उठून पुन्हा वेगानं सायकल पळवायला सुरुवात केली. सकाळी रेल्वेच्या बरोबरच मी तिथं पोचेन, असं मी आश्वासन दिलं होतं. त्यामुळं रस्त्यात कुठं थांबून विश्रांती घ्यायला अवसरच नव्हता. एका रात्रीतून, ठार अंधारात, १०८ मैलांचा प्रवास करणं ही सोपी गोष्ट नव्हती. आपल्या शारीरिक सामर्थ्याची परीक्षाच घ्यायची हे मी मनाशी ठरवून टाकलं होतं. या प्रवासात दोन तास उलट्या दिशेने येणाऱ्या वाऱ्याचा मला सामना करावा लागला. विशेष असं काही काम नसताना, आपण उगीचच हे संकट विकत घेतलं—असाही विचार मनात येऊन गेला. एक रिकामा ट्रक त्याच बाजूला चालला होता—ड्रायव्हरनं मला आत बसण्याची सूचनाही केली—परंतु मी सायकल वरून येण्याचं कबूल केलं होतं—तेव्हा ट्रकमध्ये कसं काय बसायचं? रेल्वेनं अंतर अधिक होतं म्हणून मी सकाळी रेल्वेच्या वेळेवरच स्टेशनवर पोचलो. जेव्हा मित्रांनी मला तिथं बघितलं तेव्हा सर्वजण आश्चर्यचकित झाले. माझ्या या प्रवासाचीच ते आपसात चर्चा करू लागले. हा प्रवास तसा लांब पल्ल्याचा होता. वेळ रात्रीची होती. रस्ता कच्चा होता—वाटेत अनेक अडथळे होते. सगळ्या तरुणांना माझ्या शक्तीचा पहिल्यांदाच असा प्रत्यय आला. आधीच त्या सर्वांचं माझ्यावर प्रेम होतं—या प्रकारामुळं ते आणखीन वाढलं. पंडित जवाहरलाल नेहरू त्या काळात तरुणांचे अत्यंत आवडते नेते होते. काँग्रेस मधील बुजुर्ग मंडळी तरुणवर्गापासून खूपच दूर असायची. पंडित नेहरूंचं भाषण झालं. त्यावर चर्चाही झाली. माझ्या मनात अनेकवार त्यांच्याशी बोलण्याची इच्छा उत्पन्न झाली—परंतु त्या मेळाव्यात असा कुणीच विश्वासपात्र स्नेही-सोबती नव्हता, ज्याच्या मध्यस्थीनं पंडितजींना माझं सर्व गुपित सांगता येईल.

मी माझ्या मनातले बेत तसेच दाबून टाकले. त्यांना वर येऊ दिलं नाही. राजकोटच्या या सभेत भारतातील अनेक तरुण नेत्यांची भाषण झाली. त्या सर्व भाषणात खूप जोष होता.

दोन दिवसांनंतर मी आलेल्या मार्गानेच परत निघालो. आता समोर कुठला अडथळा नव्हता आणि वेळेचं बन्धनही नव्हतं. सायंकाळ होत होती. सूर्य मावळायच्या बेतात होता, एवढ्यातच माझ्या सायकलचं चाक पंक्चर झालं. सायकल हातात घेऊन तीन मैल चालत एका गावात पोचलो. सडकेलगतच एक पोलीस ठाणं होतं. वर्तमानपत्रातून अनेक वेळा माझ्या नावाचा उल्लेख येई, त्यामुळं मला अनेक जण ओळखत होते. पोलिसांनी माझी जेवणाची सोय केली—पंक्चरही दुरुस्त करून दिलं. सूर्योदय होण्याच्या आत मी तेथून निघालो. खूप वेगानं मी दहा वाजेपर्यंत सायकल चालवत होतो. थकावटीमुळं आणि भूक लागल्यामुळं मला थोडावेळ थांबावं लागलं. सडकेलगतच्याच एका गावात मी एका बनियाच्या दुकानावर गेलो आणि त्याला म्हणालो, "भय्याजी! माझ्यासाठी दोन शेर दूध गरम करा. अरे! तुम्ही पेढेही बनवता वाटतं? उत्तमपैकी पेढेही दोन शेर मोजा!" दूध गरम झाल्यावर त्यानं चार-पाच कपबशा वगैरे आणून ठेवल्या. त्याला वाटलं माझ्या-बरोबर आणखी माणसं असतील. त्यानं सर्वांच्या बसण्याची व्यवस्था केली. मी आश्चर्यानं विचारलं-"तुम्ही एवढी व्यवस्था कुणासाठी करत आहात?" त्यानं उत्तर दिलं-"तुमच्या अन्य जोडीदारांसाठी" मी मग म्हणालो "माझा कुणी जोडीदार नाही, मी एकटाच आहे!" तो दुकानदार टकमक माझ्याकडे बघत म्हणाला "मग काय तुम्ही एकटेच दोन शेर पेढे खाणार आणि वर एवढं सारं दूध पिणार?" मी हसून म्हणालो "आता बघाच तुम्ही शेठजी! पैसे ही मीच देणार आहे, काळजी करू नका!"

ते एक छोटंसं गाव होतं. सायकलीवरून प्रवास करणारा माझ्यासारखा नवखा माणूस बघून तिथं पोरं जमा झाली होती. बनिया त्या मुलांना उद्देशून म्हणाला "बघा! हा पाहुणा एकटा दोन शेर पेढे खाणार आहे आणि शिवाय दोन शेर दूध देखील पिणार आहे." ही बातमी गावभर पसरली. गावातली तरुण पोरं हा प्रकार बघण्यासाठी दुकानाबाहेर गोळा झाली. सर्वांच्या देखत एकट्यानंच खायचं याचा संकोच वाटत होता, परंतु खाणं भाग होतं. नंतर मी पैसे द्यायला बनियापाशी गेलो. तो व्यापारी पैसेच घेईना. मी त्याला पैसे घ्यायला भाग पाडलं. मग मी त्याला सांगितले की तीन दिवसांपूर्वी रातोरात सायकलवरून मी राजकोटपर्यंत गेलो होतो—तेव्हा ते तरुण म्हणाले "आपल्यासाठी हा आहार अधिक नाही." नंतर जेव्हा शांत चित्तानं मी या गोष्टीवर विचार करू लागलो तेव्हा माझ्या ही गोष्ट लक्षात आली की, कच्च्या रस्त्यानं रात्रीच्यावेळी १०८ मैलांचा प्रवास करणे हे अत्यंत धोक्याचं आहे. त्याच दिवशी मी परत असला फाजीलपणा यापुढं करणार नाही, अशी जोखीम स्वीकारायची नाही असा निर्णय घेऊन टाकला.

### साधूच्या वेषात काही दिवस

सन १९२३ च्या उन्हाळ्याच्या सुट्टीत मी एकवेळ लाहोरला जाऊन भाई परमानन्दांना भेटलो. वयितल्याबरोबर ते मला ओळखू शकले नव्हते. मी सर्व सांगितल्यावर त्यांना ओळख पटली. मोठ्या प्रेमानं मग त्यांनी माझं स्वागत केलं. राजकीय कार्यासंबंधी तसंच कार्यक्षेत्रासंबंधी आमचं बोलणं झालं. त्यांनी मला सल्ला दिला की मी नेपाळमध्ये जाऊन केंद्र स्थापन करावं आणि तिथून राजकीय कार्य चालू ठेवावं. ते म्हणाले तिथं जाऊन तुम्ही विशिष्ट प्रकारचं वातावरण निर्माण करा व योग्यवेळी आम्हाला सर्वतोपरी साहाय्य करा. त्यांचा हा विचार मला पटला. शाळेतून काही दिवसांची रजा घेऊन मी भावनगरहून हरिद्वारला पोचलो. हरिद्वारला मोठ्या संख्येनं साधू राहतात. हरिद्वारमध्ये फेरी मारल्यानंतर मी असा विचार केला, आपण ही साधूचा वेष धारण करावा, म्हणजे कुणी आपल्याला ओळखू शकणार नाही. निरनिराळ्या गावांतील आश्रमांतही आपल्याला सहजासहजी प्रवेश मिळू शकेल. आर्थिक तंगीचाही त्रास होणार नाही.

मी गंगेच्या काठा-काठानं पुढे निघालो व एका निर्जनस्थळी येऊन पोचलो. वाळूमध्ये एक मोठा खड्डा करून व आत एक मेणकापड घालून खड्डा पाण्यानं भरला. मी त्या पाण्यात गेरूची भुकटी मिसळून भगवा रंग तयार केला. त्यात मी माझे कपडे भिजवले. ब्लेडच्या पात्यानं दाढी-केसांचं मुंडण करून टाकलं. गंगेच्या पाण्यात डुबकी मारून मग मी काठावर भजन करत बसलो. कपडे वाळल्यानंतर ते अंगात चढवले आणि कांगडीच्या गुरुकुल आश्रमात येऊन पोचलो. अंगावर गेरूनं रंगवलेली भगवी वस्त्रं, एका हातात वेताची छडी, दुसऱ्यात कमंडलू आणि बगलेत मृगाजिन, अशा थाटात मी जेव्हा आश्रमात पोचलो तेव्हा तिथल्या ब्रम्हचाऱ्यांनी माझं चांगलं स्वागत केलं. आश्रमाच्या व्यवस्थापकांशी थोडीबहुत चर्चा झाली. माझं बोलणं-सवरणं त्यांना पसंत पडलं आणि माझा स्वभावही त्यांना आवडला. त्यांनी आश्रमातील बागेतील एका छोट्या झोपडीत माझी राहण्याची व्यवस्था केली. मला त्यांनी सांगितलं तुम्ही इथं हवे तितके दिवस राहू शकता. जवळ जवळ एक आठवडा मी तिथं थांबलो. भोजनाची व्यवस्था त्यांच्या वसतिगृहात करण्यात आली होती. तेथील ब्रह्मचारी देशप्रेमानं भारलेले होते. स्वाभाविकच त्यांना माझे विचार बरेच पटणारे वाटत. अशा तरुणांना सोडून जायला मन होत नव्हतं—तेही मला राहण्याचा आग्रह करत होते. परंतु मला नेपाळला जायचं होतं. मी अखेर त्यांचा निरोप घेऊन निघालो. गंगेच्या काठाकाठानं चालत राहिलो. दुपारी खाण्याची इच्छा झाली. मी एका गावाच्या दिशेनं निघालो. गावातल्या स्त्रिया विहिरीवर पाणी भरत होत्या. मी त्यांना पिण्यासाठी पाणी मागितलं.

त्यांनी मोठ्या आदरानं आणि भाविकतेनं मला पाणी दिलं आणि विचारलं "स्वामीजी आपण कुठे चालला आहात?" मीही एखाद्या साधूबाबाप्रमाणनं त्यांना उत्तर दिलं—"आपण तर रमते राम आहोत—न कुठून आलो, न कुठं जायचं आहे." एवढ्यातच दोन गावकरी बंधूही तिथं येऊन पोचले. ज्या घरातल्या स्त्रिया पाणी भरण्यासाठी आल्या होत्या त्याच घरातली ही पुरुष मंडळी होती. त्यांनी माझं कमंडलू आणि मृगाजिन आपल्याकडे घेतलं आणि ते मला त्यांच्या घरी घेऊन निघाले. ते म्हणाले दुपारची भोजनाची वेळ झालेली आहे, आपण आमच्या समवेत भोजन करा आणि नंतर जिकडे आपणास जायचं आहे, तिकडे जा. मीही आढेवेढे न घेता त्यांच्या समवेत चालू लागलो. गावातले अनेक स्त्री-पुरुष माझ्यासारख्या तेजःपुंज साधूचं दर्शन घेण्यासाठी, माझा आशीर्वाद घेण्यासाठी, त्या घरी येऊन पोचले. चार दिवस त्या मंडळींनी मला तिथून हलूच दिलं नाही. शेवटी मी तेथून पुढे निघालो. गंगेच्या काठा-काठानं व क्वचित दुसऱ्या एखाद्या मार्गानं पायी प्रवास करत करत मी पाटण्याजवळील सोनपूरला येऊन पोचलो. तिथं एक मोठी यात्रा भरली होती. यात्रेत लक्षावधी माणसं जमा झाली होती. नेपाळहूनही हजारो लोक तिथं आलेले होते. त्यांच्यापैकी अनेक जण साधू होते. त्यांच्याकडून मी नेपाळची माहिती हस्तगत केली. त्यांच्याकडून मला जी माहिती समजली त्यावरून तिथं पोचून एखादं कार्य उभं करणं अशक्य आहे, असंच मला जाणवलं. ह्यामुळे मी नेपाळला जाण्याचा बेत रद्द केला आणि पुन्हा भावनगरलाच परत आलो.

● ● ●

भावनगर मधले दिवस आनंदात चालले होते. १९२४ च्या अखेरीस माझ्या मनात परत विचारचक्र सुरू झालं. अशा प्रकारचं निरर्थक जीवन आपण किती काळ व्यतीत करणार? मध्येच अर्धवट अवस्थेत सुटलेलं आपलं कार्य परत हिंदुस्थानच्या बाहेर जाऊन सुरू ठेवलं पाहिजे. वडिलांना आणि भावाला भेटण्याचाही विचार मनात येऊ लागला. विचार करता करता मी असं ठरवलं की, बर्मा मार्गे आपण बँकॉक येथे जावं आणि गदर पार्टीच्या कार्यकर्त्यांशी संपर्क प्रस्थापित करून ते काम परत सुरू करावं. भावनगरमध्ये डॉ. पुरुषोत्तम विनायक काणे हे माझे एक विश्वासू स्नेही होते. त्यांनी माझ्या हातावर शस्त्रक्रिया करून हातावर गोंदलेलं माझं नाव काढून टाकलं होतं. मी माझा मनोदय त्यांना सांगितला तेव्हा खर्चासाठी म्हणून त्यांनी मला रु. २०० ची रक्कम दिली. माझा प्रवास आरामाचा व्हावा, असा त्यांनी विचार केला. मी कुठं जाणार आहे, ही गोष्ट मी सर्वांपासूनच लपवून ठेवली. भावनगरहून कलकत्त्याकडे मी रवाना झालो. चितगाव येथे पोचलो. तिथे जहाज पकडलं आणि रंगूनकडे निघालो. जहाज रंगूनला पोचलं. सर्व प्रवासी खाली उतरले. त्यांच्यापैकी २० उतारूंना पोलि-सांनी थांबवून ठेवलं. या प्रवाशांपाशी काही सामान-सुमान नव्हतं आणि रंगूनमध्ये त्यांच्या परिचयाचंही कुणीच नव्हतं. प्रवाशांना कुणाचा पत्ता सांगता आला अथवा कुणाचा परिचय असला तरच तिथं उतरण्याची परवानगी होती. जेव्हा पोलीस आम्हा सर्वांना माहिती वगैरे विचारण्यासाठी ऑफिसात घेऊन गेले तेव्हा संधी सापडताच मी तेथून निसटलो. उतरलेल्या प्रवाशांच्या गर्दीत सामील झालो. रंगूनमध्ये पोचताच मी बर्मी कपडे खरेदी केले व अंगावर घातले. बर्मी भाषा मला येत होतीच. आता तिथून पुढे रेल्वेनं प्रवास करणं मला सोपं झालं. एक सबंध दिवस आणि सबंध रात्र गाडीनं प्रवास केला. तिसऱ्या दिवशी मी मोनेवा शहराजवळ येऊन पोचलो. मोनेवाला पोचण्या अगोदर मी एका छोटयाशा स्टेशनवर खाली उतरलो. तिथून जंगलातील पायवाटेने मी वडिलांकडे निघालो. अंधार पडला होता. वडिलांच्या घरापाशी येऊन पोचलो. माझ्यापाशी जे थोडंफार सामान होतं ते मी तिथं प्रत्यक्ष पोचण्यापूर्वी झुडपाआड लपवून ठेवलं. गावात कुणी पाहुणा आला आहे, असं लोकांना वाटू नये म्हणून ही युक्ती योजिली. वडील घरात नव्हते. धाकटा भाऊ मात्र घरीच होता. १९१० नंतर आता माझी व त्याची भेट होत होती. आमच्या भेटीला चौदा वर्षं होऊन गेली होती. मी त्याला कसं बसं ओळखलं परंतु त्याला मात्र मला ओळखता

आलं नाही. मी 'राम-राम' असं अभिवादन करून तिथल्या खाटेवर बसलो. एखाद्या सुखवस्तु घराप्रमाणं माझं आदरातिथ्य त्यानं केलं. त्याच्या काही प्रश्नांची उत्तरं द्यायचं मी टाळत होतो. त्यानं माझ्यापाशी फार वेळ उभं राहणं मला नकोसं होतं. मला भीती वाटत होती, बोलण्याच्या ओघात ओळख पटली तर तो मला आनंद होऊन आलिंगन देईल. हे कुणाच्या दृष्टोत्पत्तीस पडलं असतं तर चार लोकांनी येऊन विचारपूस केली असती आणि शेवटी बातमी सर्वत्र पसरली असती ही मला भीती होती. रात्रीचे दहा वाजले होते. वडील एवढ्यात घरी परतले. खाटेवर मी पडलेला होतो—हे बघून त्यांनी भावाला विचारलं "पाहुणे कोण आहेत? कुठून आले आहेत?" भावानं उत्तर दिलं—मी काही विचारलं नाही पण तो भावासारखा दिसतो—"वडिलांनीही मग जरा काळजीपूर्वक वागायला सुरुवात केली. त्यांच्या हे लक्षात आलं की कुणी नवखा पाहुणा अशा तऱ्हेनं येऊन गुपचूप झोपून राहणार नाही. त्यांनी जेवण आटोपलं व नंतर मला येऊन विचारलं—"जेवणखाण झालं ना?" मी जरा संकोचानंच उत्तर दिलं—माझा आवाज ऐकताच त्यांना ओळख पटली. मला ते म्हणाले— "जेवण आटोपल्यानंतर थोडं बाहेर नाही का फिरायला जायचं?" मी लगेच उठलो व त्यांच्यासमवेत बाहेर पडलो. चांदणी रात्र होती. आम्ही जंगलात येऊन एके ठिकाणी बसलो. आमच्या खूप गप्पा झाल्या. परत येतेवेळी झाडीत दडवलेलं सामानही सोबत घेतलं. वडिलांनी धाकट्या भावाला सविस्तरपणे सर्व गोष्टी समजावून सांगितल्या आणि मी तिथं आल्याची बातमी कुणाला समजू देऊ नकोस असं त्याला बजावलं.

रात्रीच्या प्रशांत समयी, आकाशाच्या छताखाली बसून, सांसारिक व्यापात गुरफटलेले वडील आणि देशासाठी स्वतःला समर्पण करायला सिद्ध झालेला मुलगा यांच्यात कुठल्या-प्रकारचं संभाषण व्हावं? वडिलांच्या प्रत्येक शब्दातून एकच ध्वनी प्रकट होत होता—"बेटा! तू कुठल्यातरी सुरक्षित ठिकाणी जाऊन आता पोटा-पाण्याच्या उद्यो-गाला लाग. घर-संसार उभा कर!".

माझं ऐकणार असशील तर तुला मी काही स्थळांची, काही व्यक्तींची नावं सुचवू शकेन. तिथं तू अगदी सुरक्षित राहू शकशील, उद्योग धंदाही उभा करता येईल. मी इथं परिश्रम करून पुष्कळ पैसा कमावला आहे. त्या पैशाचा चांगला विनियोग कसा करायचा,—हीच मला रात्रंदिवस विवंचना आहे. तू स्वतःच आपल्या पायानं इथपर्यंत पोचलास तेव्हा त्या पैशाचा योग्य उपयोग होऊ शकेल, असं मला वाटायला लागलं आहे. त्या बिचाऱ्यांना काय माहीत की मी ज्या व्यापारात पडलो तिथं पैशाचा व्यवहार नव्हता. जीवनाचाच सौदा होता!

माझ्या मनातल्या भावना त्यांना समजावून सांगण्याचा मी प्रयत्न केला परंतु त्यांना त्यातलं काही समजलं नाही. ज्या सूत्रात आम्ही बांधले गेलो होतो ते होतं पिता-पुत्राचं नातं-प्रेम. शेवटी वडिलांनी या शब्दांत आपली हार्दिक सदिच्छा प्रकट केली—"पोरा

तुझ्या इच्छेप्रमाणं तू राहा. तुला जे काही करायचं असेल ते कर. माझी एवढीच इच्छा आहे की तू सुरक्षित ठिकाणी राहा. या कामी माझ्या संपत्तीचा तुला काही उपयोग असेल तर मी तुझी मदत करू शकतो–" आमच्या दोघांच्या चर्चेमधून काही फलनिष्पत्ती होऊ शकली नाही. त्यांची अशी समजूत घालणं की सांसारिक जीवनाच्या पलीकडे जाऊन विचार करा आणि क्रांतिकारकाचं जीवन समजून घ्या, हे सांगण्यासाठी माझे शब्द अपुरे पडत होते. शेवटी मी त्यांना म्हणालो की आजची सबंध रात्र मी तुमच्या सूचनेवर विचार करीन व उद्या रात्री याच ठिकाणी आपण परत बोलू. तिथून आम्ही घरी आलो. रात्र खूप झाली होती. भाऊ आमची वाट बघत जागाच होता. त्याला आता मी कोण आहे हे स्पष्टपणे समजलं होतं आणि वडील मला कुठं घेऊन गेले आहेत हेही त्याला माहीत होतं.

घरी परत आल्यानंतर वडील त्यांच्या खोलीत झोपायला निघून गेले. झोपतेवेळी भाऊ दूध घेऊन माझ्याकडे आला, माझ्याजवळ बसला. आम्ही दोघे सख्खे भाऊ होतो. एकाच मातापित्याच्या पोटी आम्ही जन्मलो होतो–एवढंच आमचं नातं होतं लहानपणी आमचं दोघांचं एकमेकांवर खूप प्रेम होतं परंतु आज आमच्यात काहीच मेळ राहिला नव्हता. धाकटा भाऊ या नात्यानं तो माझ्यासमवेत राहू इच्छित होता परंतु वैचारिकदृष्ट्या आम्ही एकत्र राहू शकू काय, याची त्याला कुठलीच कल्पना नव्हती. तो समर्थन करू शकत नव्हता. मी त्याला समजावण्याचा प्रयत्न केला–"हे बघ भय्या, वडिलांची सेवा आणि देशाची सेवा दोन्हीही समानच आहेत आणि तितक्याच पवित्र गोष्टी आहेत. विधात्यानं मला एका मार्गावर नेऊन सोडलं आणि तू सुदैवी आहेस कारण परमेश्वरानं तुला वडिलांची सेवा करण्याच्या मार्गावर सोडलं–तेव्हा आता तू याच मार्गावर दृढ राहून वडिलांची सेवा कर व पुत्रधर्माचं पालन कर. तुझ्यासाठी हाच मार्ग उत्तम आहे. कर्तव्याचं तू पालन कर. मी काय म्हणतो आहे, यातलं त्याला काहीच समजलं नाही". वारंवार तो मला मी तुझ्या समवेतच राहणार–असंच म्हणत राहिला. क्रांतिकारकांचं जीवन काय असतं, याची त्या बिचाऱ्याला कुठून कल्पना असणार? शब्दांनी हे सर्व त्याला समजावून सांगण्याचं सामर्थ्य माझ्या ठिकाणीही नव्हतं. आमचं बोलणं अर्धवटच राहिलं. तुला सकाळी उठल्याबरोबर अनेक कामं आहेत तेव्हा आता झोपी जा. आमच्या तिघांच्याही मनात एकच भीती होती की आसपासच्या एखाद्या माणसाला मी तिथं आलो आहे ही गोष्ट समजली व कर्णोपकर्णी होऊन एखाद्या इंग्रज अधिकाऱ्यापर्यंत ती जाऊन पोचली तर त्या दोघांचं सुखी जीवन क्षणात उद्ध्वस्त होऊन जाईल. वडिलांना व भावाला भेटण्याची इच्छा झाली म्हणूनच मी त्यांच्याकडे आलो. मात्र ही गोष्ट इतर कुणाला कळू नये, यासाठी रात्रभर मी तळमळत होतो. तसं वडिलांना व भावाला भेटल्यानंतर माझं मन बरंच शांत झालं होतं. आमच्या तिघां व्यतिरिक्त कुणाही चवथ्या माणसाला ही गुप्त गोष्ट आम्ही जाहीर होऊ दिली नव्हती.

सूर्योदय व्हायच्या पूर्वी अंधार असतानाच मी घरातून बाहेर पडलो व जंगलाकडे निघालो. तिथला सर्व परिसर माझ्या ओळखीचा होता. खाण्यासाठी काहीतरी शिदोरी सोबत घेतली. दिवसभर जंगलात इकडे तिकडे भटकण्यात वेळ घालवला. झाडांच्या छायेत विश्रांतीही घेतली. रात्री दहा वाजता आम्ही पिता-पुत्र परत ठरल्या ठिकाणी भेटलो. परत चर्चा सुरू झाली. वडिलांच्या हातात एक हजाराची थैली होती. तिथे नोटांचं चलन फारसं चालत नव्हतं. खेड्यातल्या लोकांचा नोटांवर विश्वास नव्हता. वडिलांनी बंदा रुपयांची थैली माझ्या स्वाधीन करत म्हटलं–"जिथं तुला जायचं असेल तिथं जा आणि स्थायिक हो. एखादी जागा पक्की कर–आणखी साहाय्य हवं असेल तर कळव–मी ते पूर्ण करीन". त्यांनी मला जो काही सल्ला दिला होता किंवा जिथं-जिथं म्हणून त्यांनी जायची सूचना केली होती, त्यासंबंधी मी काहीच बोललो नाही. त्यांचं मन मी दुखवू इच्छित नव्हतो. शेवटी मी त्यांना म्हणालो–"मी माझ्या पराक्रमाच्या बळावर इंग्रजांच्या तावडीतून निसटलो–तुम्हाला येऊन भेटण्याचं धाडसही मी पार पाडलं. तुमची व भावाची भेट झाली. तुम्ही तुमच्या प्रापंचिक जबाबदाऱ्या पार पाडा. सुखानं दिवस कंठा. मला तुमची सेवा करता येत नाही—याचंच मला वाईट वाटतं. मी देशाची सेवा करण्याचं व्रत घेतलं आहे. देशाची सेवा म्हणजेही तुमचीच सेवा आहे असं मी मानतो. जो पर्यंत इंग्रजी राजवट आपल्या देशात आहे तोपर्यंत मला तुमच्यापाशी राहून तुमची सेवा करणं शक्य होणार नाही."

### ब्रह्मदेशाच्या जंगलात

दुसरे दिवशी सकाळीच भाऊही माझ्या बरोबर उठला व तो माझ्या समवेत चालू लागला. दहा मैलांच्या अंतरावरील एका छोट्या स्टेशनावर पोचून मी गाडी पकडणार होतो. स्टेशनाच्या जवळ झाडीमध्ये आम्ही जाऊन बसलो. भावानं जाऊन तिकीट आणलं. आमची मनं भारावलेली होती. माझ्या राजकीय जीवनानुभवामुळं मी भावनेला त्वरित आवर घालायला शिकलो होतो. भाऊ मात्र फारच भावनाप्रधान होता. दुसरे दिवशी मी रंगूनला म्हणजेच सयाम देशात पोचण्याची योजना आखली. मी सयाम देशात जहाज पकडून पोचू शकत होतो. त्यासाठी पासपोर्ट लागत होता. तो मार्ग मला बन्द होता. मला जंगलातून आणि पहाडातून लपत छपत जाणंच शक्य होतं. रस्त्यात दोन मोठ्या नद्या पार करावयाच्या होत्या. हे कसं काय जमणार हा प्रश्नच होता. या शिवाय अन्य काही गत्यंतरही नव्हतं. मी जोरदार आवाज काढू शकणारं एक नकली पिस्तूल आणि एक गुप्ती या शस्त्रांची खरेदी केली. रंगून जवळच मौलमीन नावाचं एक शहर आहे. नदीवरील एका छोट्या जहाजाने मी तिथं पोचलो. मी गायी खरेदी करणाऱ्या व्यापाऱ्याचा वेष परिधान केला आणि तिथल्या गायींच्या व्यापाऱ्यांना चांगल्या गायी कुठे मिळू शकतील आणि त्यांच्या किमती काय

असतील, अशी विचारणा केली. या बरोबरच ठिकठिकाणच्या प्रसिद्ध व्यक्तींची नावं व पत्तेही मी लिहून घेतले. गायींचा एक व्यापारी म्हणून मी सयाम देशाच्या सीमेकडे निघालो. गायींची खरेदी-विक्री हा होता माझा धंदा ! मी गायींचं दूध स्वतः काढून बघायचा आणि त्या आधारावर गायींची किंमत ठरवायचा. या प्रकारामुळं दिवसातून दोन-तीन वेळ उत्तम व पोटभर दूध प्यायला मिळू लागलं. भोळे-भाबडे शेतकरी मला गायींचा व्यापारी समजून ते माझ्याकडून दुधाचे पैसेही घेत नसत. अशा तऱ्हेने ठिक-ठिकाणी भटकण्यात एक आठवडा गेला. रात्रीच्या वेळी बर्मी साधूंच्या झोपडीत आसरा घ्यायचा आणि दिवस उजाडला की चालायला लागायचं.

हा प्रदेश म्हणजे मलेरियाचं माहेर घर ! एके दिवशी मलेरियानं मला घेरलं. या आजाराला दाद न देता मी तसाच पुढे निघालो. एखाद्या गावापर्यंत पोचणं देखील अशक्य होऊन बसलं. रस्त्यात मला लाईनमनची झोपडी आढळली. नशीबानं माझी साथ केली. लाईनमन त्याच्या झोपडीत जेवण करत होता. तोही एक भारतीय हिंदू होता. मी मात्र मुसलमानाच्या वेषात होतो. मी त्या सुमारास अल्लारखान या नावानं वावरत होतो. लाईनमन माझ्याशी फारच सभ्यतेनं वागला. मला बसायला त्यानं सांगितलं. मी थोडक्यात त्याला माझी परिस्थिती सांगितली. मी म्हणालो "मी एक व्यापारी आहे—मला खूप ताप चढला आहे—चालायचंही माझ्यात त्राण उरलं नाही—तुमची परवानगी असेल तर आजची रात्र मी तुमच्या झोपडीत राहू इच्छितो." तो लगेचच म्हणाला—"मियासाहेब ! परवानगी कसली मागता. अशा परिस्थितीत मीच तुम्हाला पुढं जाऊ दिलं नसतं." चादर आणि सतरंजीशिवाय माझ्यापाशी दुसरं काही पांघरूण नव्हतं. सतरंजी अंथरली व चादर डोक्यावरून पांघरून मी तिथं पडून राहिलो.

## तापातील बडबड

ताप खूप चढल्यामुळे मी अगदी व्याकूळ बनलो. माझं सबंध शरीर थंडीनं थडथडत होतं. लाईनमननं त्याच्याकडील सर्व कपडे माझ्या अंगावर पांघरले. गरम गरम चहा देखील प्यायला दिला. मी तापानं अगदी फणफणलो होतो. ताप खूप चढल्यामुळे मी शेवटी वातात गेलो. तो लाईनमन—त्याचं नाव अजुध्या असावं, चांगला शिकला सवरलेला होता. त्याच्या झोपडीत पुस्तकं दिसली. आपली परिस्थिती बिकट आहे हे लक्षात घेऊन मी त्याला म्हणालो—"हे बघा. एक कागद-पेन्सिल घेऊन माझ्यापाशी बसा व मी सांगतो ते लिहून घ्या. माझी शेवटची वेळ आली आहे असं मला वाटायला लागलं आहे. मी आता काही तासांचाच सोबती आहे." मी असा विचार केला की आपल्या देशबांधवांच्यासाठी आपण आपला शेवटचा संदेश सांगावा. मी त्याला लिहून घेण्यासाठी जवळ बसवलं. किती वेळ मी त्याला सांगत राहिलो, मला समजलं नाही. माझं

बोलणं लिहून घेता घेता तो भारावून गेला. दुसऱ्या दिवशी माझी प्रकृती थोडी सुधारली. घाम आल्यामुळं ताप उतरला होता. मला चांगली झोप लागली. त्यानंतर प्रकृती अधिक सुधारली. मग मी त्याचा निरोप घेतला. पुढच्या गावाला कसं कसं जायचं, हे त्याला विचारलं. तो तरुण भावूक वृत्तीचा होता. तो माझ्या पुढ्यात हसत हसत उभा राहिला. त्याला जे मी लिहून घ्यायला सांगितलं होतं ते सर्व कागद त्यानं माझ्यासमोर ठेवले. तो म्हणाला "तुम्ही मला स्वतःचे नाव अल्लारखान असल्याचं सांगितलं. तुम्ही गायींचे व्यापारी आहात, होय ना? परंतु तुम्ही मला लिहून घ्यायला जे काही सांगितलं आहे—त्यावरून तर हेच स्पष्ट होतं की तुम्ही इंग्रज राजवटीला आपला शत्रू मानता आणि आपला देश स्वतंत्र करण्याची तुमची इच्छा आहे. तुम्ही तुमच्या मनातली गोष्ट जर मला सांगितली तर कदाचित मी तुमची मदतही करू शकेन. आता जरी मी इंग्रज सरकारचा नोकर असलो तरी भारतात स्वातंत्र्य-प्राप्तीसाठी जे आंदोलन चाललेलं आहे त्या आंदोलनाला माझाही पाठिंबा आहे. कुठल्या न कुठल्या रीतीनं आपण आपल्या देशाची सेवा करावी, असं मला मनापासून वाटतं. आपण माझी खात्री बाळगा. मी तुमचा विश्वासघात करणार नाही. तुम्ही येथून जंगला-जंगलातनं प्रवास करणं मला मान्य नाही. इकडची जंगलं खूप दाट आहेत आणि जंगलात क्रूर जनावरेही आहेत. प्रचंड नद्या आहेत. शिवाय, तुम्ही आजारी आहात. काल रात्री तुमची प्रकृती जशी अचानक बिघडली, असाच प्रकार जंगलात झाला तर जिवंत राहणं कठीण होऊन बसेल." तो तरुण हे सर्व एवढ्या भावुकपणे सांगत होता की त्यावर विश्वास ठेवणं भागच होतं. मग मीही त्याच्यावर विश्वास टाकायचं ठरवलं. सात दिवसपर्यंत त्यानं मला तिथे ठेवून घेतलं आणि माझी सेवाशुश्रूषाही केली. औषधोपचार मिळणं अशक्यच होतं. म्हणून ताप काही उतरला नाही. अशा अवस्थेत पुढे प्रवासाला निघणं म्हणजे मृत्यूला आमंत्रण देण्यासारखंच होतं. त्यामुळं नाईलाजानं मला माझी दिशा बदलावी लागली. मौलमीन शहरात मी परत आलो आणि डॉक्टरांच्याकडून इंजेक्शनं टोचून घेतली. पोटात घेण्यासाठी औषध घेतलं आणि हॉटेलात खोली बंद करून मी पडून राहिलो. मला भीती पडली की पुन्हा बातामध्ये काही बरळत राहिलो तर पंचाईत व्हायची. इंजेक्शनचा त्वरित परिणाम झाला. ताप तात्काळ उतरला. गायींचा व्यापारी म्हणून मी सात दिवस त्या हॉटेलात राहिलो.

चांगली विश्रांती घेऊन झाल्यानंतर आता काय करावं? हा विचार मनात उभा राहिला. सयामकडे जाण्याचा विचार सोडून द्यावा लागला होता. मार्ग फारच बिकट होता. कोणत्या स्वरूपाचा त्रास सहन करावा लागणार आहे, याची चुणूक अनुभवली होती. मग विचार करून परत रंगूनला येऊन गेलो.

## गुप्त–पोलिसांशी सामना

रंगूनहून सरळ कलकत्ता येथे जायचं मी ठरवलं. तिकीट काढण्यासाठी मी बन्दरावर गेलो. एक–मद्रासी गुप्त–पोलिसानं माझा पाठलाग सुरू केला. प्रश्न विचारून त्यानं मला चांगलंच बेजार केलं. तो एक सी.आय.डी. चा मनुष्य आहे, हे मला चटकन समजलं. त्याला माझा संशय आलेला आहे आणि सहजा सहजी तो आपला पिच्छा सोडणार नाही, हे मला कळून चुकलं. तो वारंवार मला पोलिस–ठाण्यावर चलण्याची सूचना करत होता आणि मी त्याला विरोध दर्शवीत होतो. शेवटी तो मला पन्नास रुपयांची लाच घेऊन सोडायला तयार झाला. त्याचा असा समज झाला की पोलिसठाण्यावर जायला मी घाबरतो आहे. मी त्याला पन्नास रुपये द्यायला कबूल झालो परंतु मी त्याला म्हटलं—"माझ्याजवळ सध्या तर पन्नास रुपये नाहीत—मात्र एका मित्राकडून उसने घेऊन तुम्हाला देईन. मी एक सभ्य मनुष्य आहे—पोलिसठाण्यावर जाण्यानं माझी बेअब्रू होईल–" तो मग माझ्या बरोबर मित्राकडे यायला तयार झाला. मी त्याला सोबत विरळ वस्ती असलेल्या भागात घेऊन गेलो. आसपास कुणी नाही असं बघून काठीमधून मी गुप्ती बाहेर काढली तो त्याच्यावर रोखून मी म्हणालो–"तू जर आरडा-ओरडा केलास तर तुला ठार करीन—मी येथून लांब जाईपर्यंत तू इथं बसून राहायचं–उठून इकडे तिकडे पळण्याचा प्रयत्न केलास तर माझ्याशी गाठ आहे. मी तुला जिवंत सोडणार नाही–"माझा एकूण अवतार बघून व माझ्या हातातील गुप्ती बघून, आपला जीव धोक्यात आहे, हे त्यानं ओळखलं. मग माझ्याशी एक अक्षर न बोलता मुकाट्यानं तो तिथं खाली बसला. मला तो अर्धमेला झाल्यासारखा वाटला. तिथून उठायची तो काही हिंमत करणार नाही, असा मी विचार केला. मी तेथून पळतच निघालो. दहा मिनिटेपर्यंत एका गल्लीतून मी पळत राहिलो.–गल्लीच्या तोंडाशी सुदैवानं मला एक घोडागाडी मिळाली. तिच्यात बसून मी शहराच्या मध्यवस्तीत आलो. तिथं एके ठिकाणी मी कपडे बदलले आणि फिरून मोनेवाचं तिकीट काढून गाडीत बसलो.

## मणीपूरच्या दिशेनं

घरची एकूण परिस्थिती मी बघितलीच होती. अंधार पडल्यानंतर वडिलांना भेटून सर्व हकीकत त्यांच्या कानांवर घातली. माझ्या मनातली योजनाही मी त्यांना सांगितली. जहाजात बसून कलकत्याला जायचा विचार मी सोडून दिला. यामुळं उत्तर बर्माकडून मणीपूर मार्गे भारतात पोचायचं मी ठरवलं. वडिलांनी जो हजार रुपयांची थैली मला देऊ केली होती त्यातले केवळ २०० रुपये मी घेतले होते. ह्या सर्व प्रवासात ते खर्च झाले होते. मी परत वडिलांकडून १०० रुपये

घेतले आणि उत्तर बर्माच्या दिशेनं वाटचाल सुरू केली. छिंडवीन नदीवर एक छोटी आगबोट वाहतूक करत होती–तिच्यात बसून मी पुढे निघालो. चार दिवस प्रवास केल्यानंतर मी बर्माच्या उत्तरी सीमेवर येऊन पोचलो. छिंडवीन नदी उत्तर बर्माच्या ज्या भागातून वाहते तो सगळा भाग हिरव्यागार पर्वतराजींनी आणि जंगलांनी व्यापलेला आहे. छिंडवीन नदीच्या दोन्ही काठावर घनदाट व भयानक स्वरूपाची जंगलं आहेत. या जंगलात हिंस्र प्राणी, जंगली म्हशी आणि हत्ती देखील आहेत. ज्यांना निसर्गसौंदर्याची आवड आहे, त्यांना दोन्ही काठावरील हे दृश्य मोहविणारं आहे. रस्त्यात स्टीमबोट काठावरील एखाद्या गावापाशी थांबली म्हणजे प्रवासी तेवढ्याच वेळात जवळपास फेरफटका मारून येत. गावागावातून मजेने खात-पीत मी मणीपूरच्या सीमेवर येऊन पोचलो. जहाज यापुढे जात नव्हतं. मणीपूरला जाणारे सर्वच प्रवासी बौद्ध साधूंच्या धर्मशाळांतून थांबत. मीही तिथंच थांबलो. सर्वांशी बोलताना असं समजलं की मणीपूरला जायचे दोन मार्ग आहेत. एक मार्ग सरकारी आहे व त्या मार्गानं जाण्यासाठी सरकारी परवाना घ्यावा लागतो. त्यासाठी आपलं नाव व पत्ता सांगावा लागतो. दुसरा मार्ग जंगलातून जाणारा आहे. रस्त्यानं अत्यंत वेगानं वाहणारे ओढे आहेत––ते ओलांडून जाणंही अवघड आहे. ओढ्यांवर पूल वगैरे काही नाहीत. रस्त्यात हिंस्र पशू पावला-पावलावर भेटतात. या रस्त्यानं जाण्यासाठी सरकारची परवानगी वगैरे काही घ्यावी लागत नाही. माझ्यासमोर प्रश्न पडला की हिंस्र पशूंच्या सहवासात जंगलातील मार्गानं जावं की ज्या माणसांनी पोटासाठी आपलं सर्वस्व विकून टाकलं आहे अशा माणसांच्या मार्गानं जावं? हिंस्र पशूंशी सामना करण्याची वेळ आलीच तर आपल्या शक्तीचीही परीक्षा होऊन जाईल. तेव्हा मी ठरवून टाकलं की, आपण हिंस्र पशूंच्या मार्गानंच जायचं. तेच अधिक सोपं आहे. पहाडावरील ओढे ओलांडता येतील–परंतु आपण ज्यांनी भाकरी-साठी स्वतःला विकून टाकलं आहे, त्या नर पशूंच्या, हातात सापडणं योग्य होणार नाही.

मी जंगलातील मार्गानेच जायचा निश्चय केला. बोलण्याच्या ओघात असं कळलं की चार व्यापाऱ्यांची एक तुकडीही मणीपूरला जाणार आहे. मी त्यांना भेटून मलाही सोबत येऊ द्या असं सांगितलं. ते म्हणाले की सरकारी रस्त्यानं निघालो तर पोचायला पाच दिवस लागतील. जंगलाच्या जवळच्या मार्गानं तीन दिवसांत पोचता येईल. मी त्यांना आणखी एक प्रस्ताव सांगितला की जर त्यांनी माझं सामान–सुमान त्यांच्या मालाबरोबर वाहून न्यायची व्यवस्था केली तर त्या सर्वांचा तीन दिवसांचा भोजनाचा खर्च आपण करू. माझ्या या सूचनेनं ते सर्व तरुण आनंदित झाले. तीन दिवसांची खाद्यसामग्री सोबत घेऊन आम्ही तिथून निघालो. ह्या रस्त्यानेही मलेरियाचं संकट होतंच. रस्त्याने सर्वत्र प्रचंड डास होते. पहिल्या रात्री आम्ही खूपच थकलो होतो. मला सगळ्या डास चावल्यामुळं मला परत ताप आला. आपल्याला परत केव्हाही

मलेरियाचा उपद्रव होऊ शकतो, हे लक्षात घेऊन मी यावेळी सर्व औषधं सोबत आणली होती. ताप आल्याबरोबर मी औषधं घेतली. सकाळी ताप उतरला होता. बरं वाटू लागताच आम्ही परत रस्त्याने चालू लागलो. रस्त्यानं चाललो असताना माझ्याबरोबरचे ते चार व्यापारी अचानकच थांबले. त्यांनी खूण करून सांगितलं की पायातून जोडे काढून घ्या—जवळच एक वाघोबाची स्वारी झोपलेली आहे. त्याच्या श्वासाचा वास वातावरणातून येतो आहे. आम्ही ज्या पायवाटेने चाललो होतो तिथं दोन्ही बाजूस दाट जंगल होतं. आम्ही आजूबाजूला बघितलं, काहीच दिसत नव्हतं. मी त्यांचं म्हणणं मान्य करून हलक्या पावलांनी चालू लागलो. मात्र मी माझी तीक्ष्ण गुप्ती हातात घेतली होती. वेळ पडलीच तर आपणही हल्ला करायचा हे मी ठरवलं होतं. वाघ बहुधा आपली शिकार फस्त करून झोपला असावा. आम्ही सुरक्षित अवस्थेत तेथून पुढे सरकलो.

ह्यानंतर दुसरंच संकट उभं राहिलं. खूप जोरानं पाऊस पडू लागला. झाडांच्या खाली आम्ही उभे राहिलो. पाऊस थांबल्यावर पुढे निघालो. रस्त्यात एक नाला होता. नाल्यातील पाणी प्रचंड वेगानं वाहत होतं. पाण्याच्या त्या वेगानं मोठमोठे दगड इकडून तिकडे घसरत होते. नाल्याच्या पलीकडील काठावर लोकवस्ती होती. अलीकडील काठावर घनदाट जंगल होतं. हिंस्र पशूंनी भरलेलं आणि मधोमध हा वेगानं वाहणारा नाला—मृत्यूचा साक्षात जबडाच ! आम्ही हा नाला कुठूनतरी ओलांडण्याच्या प्रयत्नात होतो. एवढ्यातच पलीकडे राहणारे लोक नाल्यात उतरून आमच्या दिशेनं निघाले. काही मिनिटातच ते एकाएकी अदृश्य झाले. त्यांचं काय झालं हे आम्हाला कळलं देखील नाही. नऊ माणसांचा एकत्र मृत्यु आम्ही साक्षात बघितला. आम्हाला काहीच करता येत नव्हतं. पाण्याचा तो अतिप्रचंड वेग आमच्या लक्षात आला. आम्ही उभे होतो त्या काठावर रात्री हिंस्र श्वापदांपासून बचावणं कठीण होतं. पाण्यात उतरून पलीकडच्या तीरावर पोचणं शक्यतेतलं होतं. मला माझ्या शक्तीवर पूर्ण विश्वास होता. माझ्या साथीदारांनीही मला उत्तेजन दिलं. ते म्हणाले की तुमचे सर्व कपडे काढून आमच्याकडे द्या. मी कपडे त्यांच्याकडे दिले आणि लंगोट लावून काठावर उभा राहिलो, नशिबावर हवाला ठेवून. माझे चारही साथीदार तरुण होते. पहाडी नाले कसे पार करावेत, याचा त्यांना चांगला अनुभव होता. ते सहजपणे नाला पार करून पलीकडे जाऊन पोचले. मला मात्र त्यांच्या पद्धतीनं नाला ओलांडता आला नाही. पाण्याबरोबर मला एक मैल दूर वाहात जावं लागलं. सुदैवानं मला कुठं मार लागला नाही. शेवटी पैलतीरावर जाऊन पोचलो आणि मी परत माझ्या साथीदारांना येऊन भेटलो.

त्या दिवशी रात्री आम्ही एका गावाजवळ जाऊन मुक्काम केला. तीन-चार चोरांनी आम्हाला लुटण्याचा प्रयत्न केला. परंतु माझे चौघेही साथीदार तरुण होते आणि चांगले शूर होते. आम्ही त्या चोरांचा चांगलाच समाचार घेतला. शेवटी ते पळाले.

आमचा ओरडा ऐकून गावातील लोकही आमच्या मदतीला धावून आले. दुसरे दिवशी प्रवास करत असताना मला परत ताप भरला. मी औषध घेतलं आणि पळत राहिलो. पळण्यामुळे मी घामाघूम झालो. घाम आल्यानंतर मी थोडा वेळ पडून राहिलो. जेव्हा सर्व सोबतीदार माझ्याजवळ पोचले तेव्हा सामान त्यांच्या हवाली करून मी आणखी पळत राहिलो, परत घाम आला. घामामुळं मला अगदी हल्कं वाटू लागलं. पळत राहणे आणि थोडा वेळ पडून राहणे हा क्रम सायंकाळपर्यंत चालत राहिला.

ह्यानंतर आम्ही एका गावात येऊन पोचलो. त्या गावातील लोक अर्धवट जंगली होते. माझे मणीपूरचे साथी त्यांच्या भाषेतून बोलू शकत होते. मग ते त्यांच्या समवेत त्यांच्या प्रमुखाकडे गेले व त्याला सांगितले की आमच्यासोबत एक भारतीय व्यापारी आहे व तो तापाने फणफणलेला आहे. त्याला विश्रांतीची अत्यंत आवश्यकता आहे. तो प्रमुख तिथं आला. तोही मोठा शूर आणि धाडसी दिसत होता. त्याच्या हातात भाला होता. त्यानं येऊन माझ्याकडे बघितलं. तो आम्हा सर्वांना घेऊन त्याच्या घरी आला आणि सर्वांच्या झोपण्याची व्यवस्था केली. त्याच्या घरातील भिंतीवर रानम्हशींची शिंगं बांधलेली दिसली. तसेच वाघनखंही अडकवलेली आढळली. त्यानं थोडे तांदूळ उकडून भात मला खाण्यासाठी दिला. मी थोडंसं खाल्लं आणि औषध घेऊन झोपून राहिलो. खूप ताप आल्यामुळं तीन दिवस तिथंच राहावं लागलं. माझे चौघे साथीदारही माझ्यासाठी तिथंच राहिले. त्या प्रमुखाच्या मध्यस्थीनं सामान-सुमानासाठी आणि स्वारीसाठी आम्हाला एक घोडा मिळाला. त्यावर बसून साथीदारांसह मी मणिपूरला येऊन पोचलो. तीन दिवसांच्या प्रवासाला आम्हाला सात दिवस लागले. मणिपूरहून भारतात जाण्यासाठी परवाना काढावा लागतो व त्यासाठी भारतातील पत्ता लिहून द्यावा लागतो. माझ्यासमोर प्रश्न होता की आपणास विनापरवाना भारतात जाता येईल की नाही? मी माझ्या साथीदारांच्या घरी १५ दिवस राहिलो. डॉक्टरी उपचार घेतले आणि चांगलं खायला-प्यायला मिळाल्यामुळे माझी खंगलेली प्रकृती पूर्ववत झाली.

## पुन्हा भारतात

मणिपूरला एक सर्कस आली होती. त्या सर्कसमधील एक काम करणारा माणूस घरी परतू इच्छित होता. सहज बोलण्याबोलण्यातून माझी त्याची ओळख झाली. त्यानं आपल्याबरोबरच माझंही नाव लिहून आवश्यक ती परवानगी मिळवली. माझ्याकडे पुरेसे पैसे होते. मित्रांसाठी मी मणिपूरला अनेक छोट्यामोठ्या वस्तू खरेदी केल्या. मोटारीत बसून आम्ही मणिपूर रोड स्टेशनपर्यंत आलो. तेथून रेल्वेने प्रवास करून व स्टीमरनं ब्रम्हपुत्रा नदी ओलांडून मी कलकत्याला येऊन पोचलो. राजमहेन्द्री येथील मित्रांना भेटण्याचा विचार मनात आला. ज्या मित्रांशी माझा परिचय झाला होता ते

देशभक्त होते. त्यांच्यावर विश्वास टाकायला काहीच हरकत नव्हती. काही काळ श्री. कालेश्वरराव यांच्या घरी राहिलो. श्री. राव १९२१-२२ मध्ये माझ्यासमवेत राजमहेन्द्री जेलमध्ये होते. स्वतंत्र आन्ध्रप्रदेश राज्य निर्माण झाल्यानंतर तेथील विधानसभेचे ते पहिले अध्यक्ष म्हणून निवडले गेले होते. सर्वच जुन्या मित्रांची भेट झाली. तिथून मी मुंबई गाठली व नंतर भावनगरला परत आलो. या सर्व प्रवासाला दोन महिन्यांचा कालावधी लागला. मी भावनगर संस्थानच्या नोकरीत होतो. मी रजेसाठी अर्ज वगैरे दिलेला नव्हता. शिक्षणाधिकाऱ्यांची माझ्यावर मर्जी होती. ते रोज माझी हजेरी लावत होते. मी जाऊन त्यांना भेटलो तेव्हा गंभीर होऊन ते म्हणाले "आम्ही जेवढं तुमच्यावर प्रेम करतो, तुमचंही तसंच प्रेम असतं तर किती बरे चांगलं झालं असतं! तुम्ही तर ब्रह्मचारी आहात—तुम्हाला कुठं लोकांची आणि संसाराची पर्वा आहे? ऑफिसात जाऊन आपला दोन महिन्यांचा पगार घ्या व परत काम सुरू करा." तिथले सर्वच मित्र आणि विद्यार्थी मला मोठ्या प्रेमानं भेटले. त्यांना अतिशय आनंद झाला.



१९२९ सालातील संध्याकाळची वेळ होती. रस्त्यानं मी चाललो होतो, एवढ्यात एका पोलीस इन्स्पेक्टरची भेट झाली. मी व्यायामशाळेत निघालो होतो. भावनगरचे नागरिक आणि अधिकारी माझ्यासंबंधी आदर बाळगून होते. तो पोलीस इन्स्पेक्टर हात जोडून माझ्यासमोर उभा राहिला. लोकांच्या मध्ये मी 'स्वामीराव' किंवा 'स्वामीजी' याच नावांनी ओळखला जात होतो. तो मला म्हणत होता की तो आपल्या मुलाला माझ्या व्यायामशाळेत दाखल करू इच्छितो. त्यांच्या मुलावर मी चांगले संस्कार करावेत. मुलगा घरी कुणाचंच ऐकत नाही. फारच उनाड बनला आहे. मी हसून म्हणालो की उद्या त्याला तुम्ही माझ्याकडे घेऊन या. एवढं बोलून मी पुढे निघालो. परंतु तो माझ्या बरोबरच निघाला. तो म्हणाला— "स्वामीजी, अतापर्यंत आम्हाला तुमचं पूर्ण नाव काय आहे—हे कधी समजलं नाही. तुम्ही राहणार कुठले, याचीही माहिती नाही." त्याचं बोलणं ऐकून मी जरा रागातेच म्हणालो "मी कुठला राहणारा आहे हे तुम्हाला जाणून काय करायचं आहे? माझं नाव काय आहे—याच्याशीही तुमचा काहीच संबंध नाही. मुलाला पाठवणार असाल तर पाठवा"—माझं हे उत्तर ऐकून तो गुपचूप निघून गेला.

त्या सुमारास सरदार भगतसिंह आणि त्यांचे साथीदार पकडले गेले होते. राजगुरू मात्र कुठे सापडत नव्हते. व्यायामशाळेत येणारे विद्यार्थी मला 'गुरुजी' म्हणून संबोधीत. कुण्यातरी मूर्खं पोलिसानं मीच 'राजगुरू' असावा—अशी बातमी सोडून दिली. मग काय, सबंध पोलिसखातं मलाच राजगुरू समजू लागलं. एक इन्स्पेक्टर हाच तर्क लढवीत मला भेटून गेला. माझं नाव काय आहे, याची तो विचारणा करू लागला. दुसऱ्या दिवशी सकाळी दहा वाजता मी अद्याप घरीच होतो, वरच्या मजल्यावरील संडासात मी होतो—एवढ्यात खाली दोन सशस्त्र पोलीस इन्स्पेक्टर माझ्या घरात शिरले. त्यांच्यापैकी एकजण काल सायंकाळी रस्त्यात ज्याची भेट झाली होती—तोच होता. आपलं स्वातंत्र्य संपुष्टात आलं, याची मला जाणीव झाली. घराच्या दुसऱ्या बाजूनं वरून उडी मारून पळून जाण्याचा विचार डोक्यात आला. शहरातील शेकडो तरुण मला हरप्रकारे मदत करायला तयार होते. पोलीस काही मला पकडू शकले नसते. पोलिसांना माझं सर्व गुपित समजणार नाही, ह्याची मला खात्री होती. तरीही पोलिसांच्या डोळ्यात धूळ फेकणं आवश्यकच होतं. घरातल्या बैठकीच्या खोलीत खुर्च्या होत्या. पोलीस

इन्स्पेक्टर्स तिथं माझी वाट बघत बसले. मी खोलीत येताच ते दोघेही नम्रपणे उठून उभे राहिले. मी त्यांना बघून मोठमोठ्यानं हसू लागलो. ते जरा बावरे बावरे होऊन माझ्याकडे बघू लागले. मला हसताना बघून ते म्हणाले—"स्वामीजी! आपण कशासाठी हसत आहात?" मी म्हणालो" "तुमच्या मूर्खपणावर हसू नको तर काय रडू?" पोलिस राजगुरूच्या शोधात आहेत—हे मला आधीच समजलेलं होतं. ते मला 'राजगुरू' समजून पकडायला आले आहेत हीच गोष्ट माझ्या डोक्यात होती. आश्चर्यचकित होऊन ते माझ्याकडे टकमक बघत राहिले, तेव्हा मीच म्हणालो—"मी एवढ्यासाठी हसतो आहे की तुम्ही मला राजगुरू समजून इथं आला आहात." पोलीस राजगुरूच्या शोधात असल्याची बातमी बडोद्याचे व्यायाम महर्षी प्रो. माणिकराव यांच्याकडून मला कळली होती. माझं बोलणं ऐकून पोलीस अधिकारी सर्दच झाले. ते म्हणाले—"तुम्ही राजगुरू नाहीत? तर मग कृपाकरून आपलं पूर्ण नाव आणि राहण्याचं ठिकाण या कागदावर लिहून द्या. तुम्ही गेली अनेक वर्षे इथं राहता, हे आम्हाला माहीत आहे. आम्हालाही आमच्या खात्याला तुम्ही राजगुरू नाही आहात हाच रिपोर्ट द्यायचा आहे. तुम्ही जो काही नाव व पत्ता लिहून द्याल तो आम्ही वर पाठवून देऊ. मी हसतच कागद घेतला व त्यावर लिहिलं स्वामीराव दयाराम—गाव कमालपूर, तालुका हमालपूर, जिल्हा नागपूर! कागद त्यांच्या हवाली केला व हसत हसतच त्यांना म्हणालो—"पोलिसांना या पत्यावर तपास करायला सांगा—मी तिथलाच रहिवाशी आहे आणि येथल्या बड्या बड्या अधिकाऱ्यांनाही विचारा की मी इथं किती वर्षांपासून राहतो" भावनगरच्या दोन प्रमुख अधिकाऱ्यांचा माझ्यावर विशेषच लोभ होता. त्यांना माझ्या जीवनातलं रहस्य माहीत होतं आणि म्हणूनच त्यांना माझ्याविषयी आदर वाटत होता. पोलिसांनी वर लिहून कळवलं की हा माणूस राजगुरू नाही आणि येथील मोठ-मोठ्या अधिकाऱ्यांच्या त्याच्या ओळखी आहेत. त्या अधिकाऱ्यांत त्याला मानाचं स्थान आहे. ही गोष्ट इथंच दडपण्यात आली आणि मी तिथंच टिकून राहिलो.

## सत्याग्रह आंदोलन

१९३० सालचं सत्याग्रह आंदोलन खूप जोरात सुरू झालं. माझे देशप्रेमासंबंधीचे विचार ऐकून अनेक तरुणांनी प्रेरणा घेऊन सत्याग्रह आंदोलनात उडी घेतली. यांनी मीठाचे सर्व कायदे भंग करून तुरुंगवास पत्करला. व्यायामशाळेत आता एकही तरुण दिसेना छोटी छोटी मुलं खेळण्यासाठी जमा व्हायची. मी कुठल्याही रस्त्याने निघालो की माझ्या बरोबर पाच-चार तरुण सहजच असायचे. आता मी रस्त्याने एकटाच फिरताना दिसू लागलो. रस्त्यानं भेटणारे नागरिक माझ्याकडं काहीशा संशयानं बघू लागले. त्यांची ती दृष्टी असं सांगून जायची

की शहरातील तरुणांच्या मनात देशभक्तीचं स्फुल्लिंग यानंच चेतवलं. त्यांना तुरुंगात जायला प्रवृत्त केलं. स्वतः मात्र दूध प्राशन करून मिशांवर ताव मारत गावातून फिरतो आहे. माझ्याशी कुणी स्पष्ट शब्दात हे बोललं नव्हतं. परंतु त्यांच्या नजरेतून हा भाव ओसंडायचा. मला अगदी लाजल्यासारखं व्हायचं. माझ्यासंबंधीचा त्यांचा आदर आणि प्रेम पूर्वीप्रमाणे राहिलेलं नव्हतं. या गोष्टीचा माझ्या मनावर केवढातरी आघात झाला. ही परिस्थिती मला असह्य होऊ लागली. सत्याग्रह करण्याचा अर्थ होता—जन्मठेप. लोक माझ्याकडे तिरस्काराने बघत आहेत, असं मला वाटू लागलं. काँग्रेस कार्यालयात जाऊन मी त्यांना विनंती केली की स्वामीराव सत्याग्रहात उडी घेणार आहे, हे सर्वत्र जाहीर करून टाका. त्याप्रमाणं जाहीर करण्यात आलं. रात्री भावनगर मधील स्त्री-पुरुषांची एक मोठी सभा झाली. प्रत्येक गल्लीतील लोक फुलांचे हार घेऊन सभेला आले. रात्री दहा ते बारा—दोन तास मी नागरिकांच्या पुढे भाषण केलं. हे माझं पहिलंच राजकीय भाषण होतं. भावनगरात या अगोदर मी कधीच अशा प्रकारचं भाषण दिलं नव्हतं. तरुणांच्या मेळाव्यात बसून मी त्यांच्याशी राजकारणावर अनेकदा गप्पा-गोष्टी केल्या होत्या. त्या रात्री हे आपल्या जीवनातलं शेवटचंच भाषण आहे, असाच माझा समज बनला होता. इंग्रजांच्या जुलमी राजवटीचं संपूर्ण दर्शन मी माझ्या भाषणातून लोकांना घडवलं होतं. गुलामीच्या ज्या शृंखलांनी आपणास बांधून टाकलं आहे, त्या तोडून टाकण्यासाठी कोणत्या मार्गाने जावं लागणार आहे, याची जाणीव मी लोकांना करून दिली. दुसऱ्या दिवशी सकाळी मिरवणूक निघाली. स्टेशनवर हजारो लोक मला निरोप देण्यासाठी आले. सत्याग्रहात सामील झालेल्या सत्याग्रहींना सहा-सहा महिन्यांच्या शिक्षा व्हायच्या. सहा महिन्यानंतर त्यांची सुटका होत असे. माझ्यासमोर महिन्यांचा आणि दिवसांचा हिशेब नव्हता. मी त्यांच्या हाती पडलो की माझी जन्मठेप ठरलेलीच होती. भावनगरच्या लोकांशी माझे प्रेमाचे संबंध निर्माण झाले होते. तिथल्या प्रेमळ वृत्तीच्या तरुणांना सोडून निघणं क्लेशकारक होतं. मी त्यांना सोडून निघालो होतो. प्रेमाचे जे धागेदोरे आमच्या दरम्यान निर्माण झाले होते, देशप्रेमानं जे स्फुल्लिंग मी त्यांच्या मनात फुलविलं होतं, त्याच देशप्रेमाखातर मला त्यांना सोडून निघणं भाग होतं. आता आमची कायमची ताटातूट होणार आहे, ही गोष्ट फक्त मलाच माहीत होती. त्यांची तर हीच समजूत होती की मीही इतरांप्रमाणेच काही महिन्यांनी परत येईन.

दुसऱ्या सत्याग्रहींसमवेत मीही रानपूरला पोचलो. सौराष्ट्रातील सत्याग्रहींची एक मोठी छावणी रानपूर येथे होती. अमृतलाल शेठ हे छावणीचे प्रमुख होते. सत्याग्रहींच्या प्रतिज्ञा-पत्रावर त्यांनी मला सही करायला सांगितलं. सत्याग्रहींच्या प्रतिज्ञा-पत्रात

एक वाक्य होतं—"मन, वचन आणि कर्मात मी सदैव सत्य आणि अहिंसेचं पालन करीन—' त्या प्रतिज्ञा-पत्रावर सही करण्याचं नाकारलं. मी म्हणालो मी केवळ सत्याग्रह करण्यासाठी आलो नाही—तरुणांशी मिळून-मिसळून राहण्यासाठी मी आलो आहे. ते मला एकट्याला सोडून इथं निघून आले आहेत. श्री. अमृतलाल माझ्या जीवनाशी आणि कार्याशी चांगले परिचित होते. त्यांनी सहीसाठी आग्रह धरला नाही. मुंबईचे अनेक गुप्त पोलीस रानपूर कँपावर आलेले होते. त्यांच्यासाठी मी अगदी नवखा होतो. त्यांना न माझं नाव ठाऊक होतं न त्यांनी कधी माझा फोटो वर्तमानपत्रात बघितला होता. त्यांना वाटलं मीही कुणीतरी हेर आहे किंवा एखादा क्रांतिकारीही असेल. कँपमधील अनेक तरुण त्याला मानतात, आदरभाव व्यक्त करतात. याच्यावर बारीक लक्ष ठेवलं पाहिजे. पोलिसांनी तरुणांना माझ्या-संबंधी बरीच माहिती विचारली परंतु माझ्याविषयी ते तरी काय सांगणार? कुणाला काही ठाऊकच नव्हतं. मला पकडून तुरुंगात टाकणंच योग्य होईल, असं पोलिसांना वाटलं. एके दिवशी मी रानपूरहून धंधुका येथे गेलो. धंधुका तेथून १५ मैलांच्या अंतरावर होतं. तिथंही अनेक सत्याग्रही जमा झालेले होते. मी रानपूरला कुठे दिसेना म्हणून माझा शोध काढत काढत पोलीस धंधुकाला येऊन पोचले.

शहाबुद्दीन नावाचा एक पोलिस इन्स्पेक्टर सत्याग्रहींचा खूप छळ करणारा म्हणून प्रसिद्ध होता. संध्याकाळची चारची वेळ होती. तो माझ्यापाशी आला. तो पंजाबी मुसलमान होता. त्याच्या खिशात पिस्तूल होतं. त्याच्या मिशा खूपच मोठ्या होत्या आणि चेहरा उग्र होता. त्यानं मला येऊन सांगितलं की सरकारनं मला पकडण्यासाठी वॉरंट काढलेलं आहे. तुम्हाला तुरुंगात जावं लागेल. छावणीमध्ये येताना अनेक तरुणांनी त्याला बघितलं होतं. त्याचं बोलणंही सर्वांनी ऐकलं होतं. छावणीत ढोल वाजविण्यात आला. सर्व तरुण भराभर एका जागी जमले. सत्याग्रहींच्यामध्ये असा एक रिवाजच पडला होता, कुणाला अटक झाली की त्याची वाद्य वाजवून तुरुंगापर्यंत मिरवणूक काढायची. सत्याग्रही ढोल वाजवत-वाजवत माझ्याभोवती एकवटले. मी त्यांच्यापैकी जे प्रमुख होते त्यांना मला हा प्रकार पसंत नाही, असं सांगितलं. तुरुंगाच्या दारापर्यंत माझ्यासोबत कुणीही येण्याची जरुरी नाही. शहाबुद्दीन बरोबर मी एकटाच जाईन.

मनात एक गमतीचा विचार अशाही स्थितीत येऊन गेला. इतिहासातही शहाबुद्दीन घोरी आणि पृथ्वीराज चौहान यांचा सामना झाला होता. मी अर्धा सदरा आणि हाफ पँट नेसून होतो. डोक्यावर काहीच नव्हतं आणि पायातही काहीच नव्हतं. अशाच अवतारात मी शहाबुद्दीन यांना म्हटलं "चला! तुरुंगात मला पोचवून मग परत या"—यापूर्वी असा प्रकारे कुणी सत्याग्रही त्यांच्याशी वागला नसावा. ते हसत-हसत माझ्या

बरोबर निघाले. रस्त्याने त्यांच्या सोबत जात असताना माझ्या मनात विचार आला आपण जर याच्याशी चार हात केले तर काय बरं होईल? माझ्या शक्तीसंबंधी आणि चपळपणाविषयी माझी चांगली खात्री होती. गावातल्या गल्लीबोळांतून आम्ही चाललो होतो. तेथून बाहेर पडल्यानंतर हमरस्त्यानं आम्हाला जेलपर्यंत जायचं होतं. हमरस्त्यावर पोचण्यापूर्वी गल्लीच्या टोकाशी आल्यानंतर आपण तिथून पळायचं, असं मी मनोमन ठरवलं होतं. भरलेलं पिस्तूल त्याच्या कंबरेला लटकत होतं. मी वेळेचा अंदाज केला--कंबरेला बांधलेलं पिस्तूल हातात घेऊन माझ्या दिशेनं गोळी झाडण्यासाठी कमीत कमी दहा सेकंद लागणार होते. दहा सेकंदात मी पन्नास गज दूर पळू शकतो. पन्नास गजाहून अधिक अंतरावर पिस्तूलाची गोळी पोचू शकणार नाही आपण त्याच्या तावडीतून सुरक्षितपणे निसटू शकतो, ह्याची मला पक्की खात्री होती. मी चेष्टेनं त्याला म्हणालो "इन्स्पेक्टर साहेब, सलाम!" एवढं बोलून अतिशय. वेगानं मी पळालो. एक. गल्लीच्या टोकाला पोचताच---मी तिथून पळ काढला होता. गल्लीबाहेर येऊन त्यानं गोळी झाडली अथवा नाही, काही समजलं नाही—पिस्तुलचा आवाज काही ऐकायला आला नाही. मी गल्लीबाहेर येताच, शेजारच्या शेतांत शिरलो. तेथल्या कुंपणावरून उड्या मारून मी पुढे पुढेच पळत राहिलो. योगायोगानं पंधरा मिनिटांनी जोराचा सोसाट्याचा वारा आणि पाठोपाठ पाऊस सुरू झाला. शेतात सगळीकडे पाणीच पाणी झालं. आता कुणीही शेतांतून माझा पाठलाग करू शकत नव्हत!

सूर्यास्ताची वेळ होती. शेतातून लपत छपत मी बऱ्याच अंतरावर येऊन पोचलो माझ्या ओळखीच्या गावातील एका शेतात मी लपून बसलो. चांगला अंधार पडल्यावर मग मी उठून गावात दाखल झालो. पाठीमागून कुणी तरुण घोडीवर स्वार होऊन येत होता. मला बघताच तो म्हणाला—"स्वामीजी! तुम्ही इकडे कुठं?" एवढे बोलून तो माझ्याकडे आला. आश्चर्यचकित होऊन तो माझ्याकडे बघतच राहिला. त्यानं विचारलं—"काय भानगड आहे?" मी थोडक्यात त्याला सर्व हकीकत सांगितली तो भावनगरच्या राजपूत वसतिगृहातला माझा विद्यार्थी होता. गुलाबसिंग असं त्याचं नाव होतं. मी त्याला सांगितलं की पोलीस माझा पाठलाग करत आहेत. पोलीस इथंही पोचण्याची शक्यता आहे. माझी कुठंतरी लपून बसण्याची व्यवस्था कर. त्यानं मला एका गवताच्या गंजीत नेऊन बसवलं. घरी जाऊन त्यानं माझ्यासाठी लोटाभर गरम दूध आणलं. दूध घेत-घेत मी त्याला माझी योजना समजावून सांगितली. त्या गावात अनेक राजपूत तरुण होते. वसतिगृहाचे ते विद्यार्थी होते. माझ्या इशाऱ्यावर प्राणाची बाजी लावायला ते तयार होते. गावातले अन्य वीस-पंचवीस तरुणही मला ओळखत होते. त्यांच्यापैकी चौघांजवळ बंदुकीही होत्या. मी त्यांना सांगितलं की

गरज पडली तर पोलिसांशी सामना द्यावा लागेल. दोन घोडीही तयार ठेवा. एका माणसाला माझी सोबत करत भावनगरपर्यंत यावं लागेल. दोन-तीन तास मी त्याच्या घरी विश्रांती घेतली. पायात रुतलेले काटे काढून टाकले. एवढ्यात दोन घोड्यांचीही व्यवस्था करण्यात आली. एका घोड्यावर तो तरुण बसला, दुसऱ्या घोड्यावर मी स्वार झालो. आम्ही तिथून निघालो. सकाळ होता होता आम्ही भावनगरच्या खाडीपाशी येऊन पोचलो. मी त्या तरुणाला सांगितलं की घोड्यांची व्यवस्था कुणाकडे तरी करून तू नंतर माझ्याबरोबर चल. तो त्या गावात घोडी घेऊन गेला व ओळखीच्या माणसाकडे त्यांना बांधून तो परत माझ्याकडे आला. आम्ही तेथून निघालो. खाडी पोहून आम्ही दोघेही भावनगरात पोचलो. डॉ. पुरुषोत्तम विनायक काणे आणि बहाउद्दीन उस्मान शेख या दोघांकडे माझी बातमी पोचवण्यात आली. ते तबडतोब मजकडे आले. मी मग मुसलमानी वेष धारण केला आणि रातोरात रेल्वेने प्रवास करून मुंबईला येऊन पोचलो.

• • •

आठ वर्षं मी सर्वत्र भारतभर फिरत होतो. शेकडो देशभक्तांच्या मनात माझ्यासंबंधी स्नेह आणि विश्वास निर्माण झाला होता. कुणा न कुणाकडून-कोणत्या न कोणत्या वेळी-कुठल्या न कुठल्या ठिकाणी गुप्तचर पोलिसांना हे कळालेलं होतं की मी जिवंत आहे, भारतातच आहे आणि मोठ्या उत्साहाने राष्ट्रोन्नतीच्या कार्याला मी वाहून घेतलं आहे मी नेमका कुठे आहे, ह्याचा मात्र त्यांना पत्ता लागू शकला नाही. कुणी त्यांना माझी नेमकी माहिती दिली नाही. म्हणून पोलीस त्यांच्या पद्धतीनं मोठ्या चातुर्यानं माझा शोध घेत होते. क्रांतिकारकांना भेटून ते माझ्याविषयी माहिती घेण्याचा प्रयत्न करत. काही गुप्त पोलिसांनी लाहोर जेलमध्ये मी बन्दिस्त होतो तेव्हा सरदार भगतसिंहाशी माझे धागेदोरे पोचतात काय, याचाही शोध घेण्याचा प्रयत्न केला. भगतसिंहांची व माझी ओळख आहे काय, याचाही शोध घेतला. गुप्त पोलिस आणि भगतसिंह वेगवेगळ्या प्रकारांनी व वेगवेगळ्या कारणांसाठी माझी माहिती मिळवण्याच्या प्रयत्नात होते. भगतसिंहांचा उद्देश हा होता की बोलण्याच्या ओघात कुठं पृथ्वीसिंहाचा पत्ता कळतो काय ? पोलिसांनाही माझा पत्ता कळावा, असं वाटत होतं. पोलिसांशी बोलताना भगतसिंहांना एवढं कळलं की मी गुजराथमध्ये कुठल्यातरी शहरात आहे. एवढी माहिती त्यांना पुरेशी होती. त्यांनी आपल्या अन्य क्रांतिकारक सहकाऱ्यांना हे सांगितलं होतं की गुजराथमध्ये त्यांची माझी भेट होऊ शकेल. त्यांना शोधून काढा. प्रसिद्ध क्रांतिकारक कै. धन्वंतरी यांनी मला शोधून काढण्याची प्रतिज्ञाच केली होती. ते भाई परमानन्दजींना जाऊन भेटले होते. भाई परमानन्द यांनी "आपबीती" या आपल्या आत्मचरित्रात माझा मोठ्या प्रेमानं उल्लेख केला आहे. धन्वंतरी यांनी जुन्या क्रांतिकारकांसंबंधीच्या गप्पा चालल्या असता, त्यांनी माझ्यासंबंधी त्यांना विचारलं—परंतु भाई परमानन्दांनी विशेष असा उत्साह दाखवला नाही. तीन दिवसानंतर परत एकदा धन्वंतरी यांनी परमानन्दांना विचारलं की पृथ्वीसिंहाचा ठाव-ठिकाणा तुमच्याशिवाय कुणीच सांगू शकणार नाही. आम्हाला पोलिसांकडूनच एवढं निश्चितपणे समजलं आहे की पृथ्वीसिंह कुठंतरी गुजराथ प्रांतात राहतात. पोलीस त्यांच्या पद्धतीनं आपलं शोधकार्य करत आहेत—ते पोलिसांच्या हाती पडावेत, असं आम्हाला बिलकूल वाटत नाही. आपण जर आम्हाला त्यांचा पत्ता सांगितलात तर आम्ही त्यांना अन्य एखाद्या सुरक्षित ठिकाणी पोचवण्याची व्यवस्था करू. धन्वंतरींचं सगळं ऐकून घेतल्यानंतर भाई परमानन्दांनीही असा विचार

केला की त्यांना माझा पत्ता सांगण्यास काहीच हरकत नाही. भाई परमानन्दांनी त्यांना सांगितलं की बडोद्याच्या प्रो. माणिकरावांकडून माझा ठावठिकाणा समजू शकेल. धन्वंतरींना या नंतर प्रो. माणिकरावपर्यंत कसं पोचायचं, असा प्रश्न पडला. पंडित आत्माराम हे गुजराथचे प्रसिद्ध आर्यसमाजी कार्यकर्ते होते. त्यांच्या मुलांशी धन्वंतरींचा चांगला परिचय होता. तेही बडोद्यालाच राहत होते. श्री. अनंतप्रिय आणि शांतिप्रिय यांच्या-मार्फत धन्वंतरींनी प्रो. माणिकरावांचा स्नेह संपादन केला. माणिकरावांनी धन्वंतरी यांना गणेश रघुनाथ वैशंपायन यांच्याकडे पृथ्वीसिंहाची माहिती मिळू शकेल असे सांगितले. धन्वंतरी यांनी ओळखपत्र दाखवून मुंबईला वैशंपायन यांची भेट घेतली. त्यावेळा मुंबई सोडून मी अलाहाबादकडे प्रस्थान ठेवले होते.

बडोद्यामध्येच प्रो. माणिकरावांकडून श्री. श्रीराम वाजपेयी यांच्याशी माझा परिचय झाला होता. त्यांच्या सेवाभावी कार्यानं मी खूपच प्रभावित झालो होतो. सेवेचं एखादं नवं क्षेत्र शोधण्यासाठी मला त्यांचं खूप साहाय्य मिळालं होतं. मी अलाहाबादला त्यांच्याकडे गेलो. तिथं माझे एक सहकारी व व्यायामाची आवड असलेले मित्र श्री. देवनाळकर हे काम करत होते. मी त्यांच्याकडे जाऊन थांबलो आणि श्रीराम वाजपेयी यांना मला सेवा करण्यासाठी एखादं क्षेत्र सांगा, असं म्हणालो. श्री. श्रीराम वाजपेयी माझ्या कामासाठी योजना आखू लागले. एवढ्यातच एक तरुण तिथं येऊन पोचला व माझ्या हातात एक पाकिट देऊन तिथं एका खुर्चीवर बसला. लिफाफा उघडून मी पत्राचा मजकूर झटकन वाचला. पत्र श्री. गणेश रघुनाथ वैशंपायन यांचं होतं. त्यांनी लिहिलं होतं की पत्र घेऊन येणारा तरुण हा अत्यंत विश्वासू असून तो समक्ष सर्व गोष्टी बोलेल. मी त्याच्यावर पूर्ण विश्वास टाकायला हरकत नाही. बोलत असताना हे समजलं की पत्र आणणारा तरुण हा प्रसिद्ध क्रांतिकारक धन्वंतरी आहे. तो हिन्दी रिपब्लिक सैन्याचा सदस्य असून सरदार भगतसिंहांकडून माझ्यासाठी निरोप घेऊन आला आहे. मग मी त्यांच्याशी पूर्ण विश्वासानं बोलत राहिलो. सविस्तर चर्चा केली. आमचं असं ठरलं की एका निश्चित जागी रात्री आठ वाजता मी श्री. चन्द्रशेखर आझाद यांची भेट घ्यावी. अलाहाबादच्या एका उद्यानात आमची ही भेट ठरली. श्री. चन्द्रशेखर आझाद यांच्यासह त्यांचा एक मित्रही आला होता. त्याचं नाव होतं सुखदेव. मी धन्वंतरींबरोबर ठरलेल्या जागेवर जाऊन पोचलो. श्री. चन्द्रशेखर आझाद यांच्या बरोबर चालू राजकीय घडामोडी-बद्दल एक तास माझं बोलणं झालं. थोड्याच वेळात माझ्या हे लक्षात आलं की त्यांचे विचार अत्यंत सुस्पष्ट आहेत. प्रत्येक विषयाचा विचार करण्याची त्यांची पद्धत निराळी आहे. त्यांच्या शब्दा-शब्दांतून ठाम निर्धार व्यक्त होत होता. त्यांच्या त्या थोड्याशा सहवासानंही मला असं वाटू लागलं की मृत्यूशी सामना करायचाच असेल तर त्यांच्या सारखाच माणूस सोबत असावा.

त्यांनी मला स्पष्ट शब्दात सांगितलं की आतापर्यंत त्यांचा दहशतवादी मार्गावर विश्वास होता. जुलमी राजवटीचा शेवट शस्त्रबळानेच करता येईल, यावर आमचा दृढ विश्वास होता. अत्याचारी इंग्रजांना ठार करूनच पीडित जनतेची सुटका होऊ शकेल, असंच आम्हाला वाटत होतं. परंतु आता क्रांतीसंबंधीच्या ग्रंथांचे वाचन केल्यानंतर, आमचंही असं मत बनलं आहे की बोल्शेव्हीक क्रांतीच्या पद्धतीवर, क्रांतीची नीट योजना बनविल्या-शिवाय गत्यंतर नाही. यामुळेच आम्ही असं ठरवलं आहे की रशियन साम्यवाद्यांनी ज्याप्रकारे लाल-क्रांती घडवून आणली, त्याचा नीट अभ्यास केला पाहिजे. सरदार भगतसिंहांनी तुम्हाला विशेष निरोप पाठवला आहे की तुम्ही हिन्दी रिपब्लिकन आर्मीचे सदस्य बनावं.– तुम्हाला रशियामध्ये पाठवण्यात यावं, तिथं जाऊन तुम्ही सर्व गोष्टींची माहिती घ्यावी. अभ्यास करून, भारतात परतावं आणि येथल्या क्रांतिकारकांचं नेतृत्व करावं. तुम्ही रशियाला जावं आणि हे कार्य पार पाडावं अशी आमची इच्छा आहे. रशियापर्यंत कसं पोचायचं आणि आपले मनोरथ सफल कसे होतील या सर्व गोष्टी तुम्हालाच ठरवाव्या लागतील. याबाबतीत आमच्या कुठल्याही साहाय्याची तुम्ही अपेक्षा करू नये. आजपासून आम्ही तुम्हाला आमचा एक सशस्त्र साथीदार समजू. याचं प्रतीक म्हणून मी तुम्हाला अकरा गोळ्यांचं हे ऑटोमॅटिक पिस्तूल आणि पन्नास काडतुसं भेट म्हणून देत आहे. त्या वेळी माझ्या मनात विचारांचे कल्लोळ उसळत होते. मनात काय काय बेत ठरत होते हे सर्व सांगायचं तर त्यांचाच एक ग्रंथ होईल.

श्री. श्रीराम वाजपेयी यांच्याकडून एक पत्र घेऊन मी राजस्थानात गेलो. तिथं जाऊन मी एका शाळेत शिक्षकाची नोकरी स्वीकारली. काही दिवसांनंतर विद्यार्थ्यांशी व सहकारी शिक्षकांशी मी मोकळेपणाने चर्चा करू लागलो. मनावरचा पडदा बाजूला सारून मी वर्तमान राजकीय घडामोडींबद्दल बोलू लागलो. तीस रुपये मासिक पगारावर मी एक शिक्षक म्हणून काम करू लागलो. त्या सर्वांच्या मनापुढं एक प्रश्न असा उभा राहिला की ज्याच्या डोक्यात एवढे राजकीय विचार भरलेले आहेत आणि जो माणूस देशाच्या स्वातंत्र्याचा विचार करतो, त्यानं एका शिक्षकाचा व्यवसाय कशासाठी स्वीकारला ? त्यांना माझे विचार ऐकून त्यांच्या ज्ञानात भर पडली होती. देशप्रेमा-संबंधी उत्साहही निर्माण झाला होता. परंतु माझे विचार आणि नोकरी यात त्यांना विसंगती जाणवत होती. त्यांना वाटलं की मी कुणीतरी हेरच आहे. अनेक लोकांच्या मनात असाच विचार आला की हिंदुस्थान सरकारनं कुणीतरी चतुर गुप्त पोलिस राजस्थान-मधील राजकीय वातावरणाची माहिती घेण्यासाठी पाठवला आहे. अशा बिकट अवस्थेत तिथं राहून काही कार्य करणं, हे धोक्याचं होतं. यामुळे राजस्थान सोडून मी परत माझे मित्र श्री. पुरुषोत्तमदास कडिया यांच्याकडे मुंबईला, कांदिवली येथे येऊन पोचलो. त्यांनी माझी गुप्तपणे राहण्याची व्यवस्था केली. ते ठिकाणही गुप्तच होतं. रात्रं-दिवस मी

त्या बंगल्यात एखाद्या कैद्याप्रमाणं राहू लागलो. याच सुमारास धन्वंतरी यांच्या मदतीनं श्रीमती दुर्गादेवी आणि श्री. चन्द्रशेखर आझाद यांचे सहकारी सुखदेव मुंबईला येऊन गणेश रघुनाथ वैशंपायन यांना भेटले. मीही गुप्त रातीनं राहण्याऐवजी प्रकट होऊन काही तरी कार्य करण्याची योजना तयार केली. ही हकीकत नंतरच्या पृष्ठांत येईलच.

१९२३ ते १९३० पर्यंत सौराष्ट्रात राहून युवकांसाठी मी जे काही कार्य केलं होत त्यामुळे तरुणांच्या मनात माझ्यासंबंधी खूपच आपुलकी होती. मी त्यांचा आवडता पुढारीही होतो परंतु सत्याग्रह-आंदोलनामुळे मी त्या जीवनातून बाहेर पडलो होतो आणि मी असा बाहेर फेकला गेलो की परत त्या क्षेत्रात जाऊ शकलो नाही.

भगतसिहांची अटक, लाहोर कट खटला, भगतसिहांच्या फाशीसंबंधीची जबानी या सर्व घटनांनी भारतातील तरुणवर्गात विलक्षण खळबळ निर्माण झाली. भारताच्या सर्व प्रांतातून संबंध वातावरणातून "भगतसिह जिंदाबाद", "इन्कलाब जिंदाबाद", या घोषणा दुमदुमत होत्या. भगतसिहांना फाशीची सजा सुनावण्यात आली तेव्हा या निर्णया-विरुद्ध ठिकठिकाणी निदर्शनं करण्यात आली. भगतसिहांचे साथीदार मलाही येऊन भेटले होते. त्यांना येऊन असा निर्णय जाहीर केला की आपण वेगळ्या प्रकारे निदर्शनं करायची. भगतसिहांनी ज्याप्रमाणे असेंब्लीत बॉम्बस्फोट केला होता, आपणही अनेक बॉम्बस्फोट करू, इंग्रजांना गोळ्या घालू, मात्र कुणालाही ठार मारायचं नाही. त्यांच्या मनात आपण भीती निर्माण करायची. तशी योजना आखण्यात आली.



## लॅमिंग्टन रोड गोळीबार खटला .. .. १६

मुंबई शहरात लॅमिंग्टन रोडवर एक पोलीस ठाणं आहे. या ठाण्यावर अँग्लो-इंडियन सार्जंटस् अधिक संख्येने होते. या पोलीस ठाण्यावर गोळीबार करायचा असं आम्ही ठरविलं. एका मित्राकडून मोटार मिळवली. मोटार चालवणारा आमचा एक साथीदारच होता, त्याचं नाव होतं जे. बापट. मोटारची नंबर प्लेट त्याला बदलण्यास सांगितले. आम्ही तिघं आणि चौथा मोटार चालविणारा असे एकूण चौघेजण जिवाची बाजी लावून हल्ला करायला निघालो.

आमच्या या कृत्याचा परिणाम काय होणार? ठाण्यातील पोलिसांशी आमचा सामना कसा काय होणार? त्यांच्या गोळीबाराला आपण प्रत्युत्तर कसं द्यायचं? या सर्व गोष्टींचा कुणीही विचार केलेला नव्हता. मुख्य म्हणजे विचार करण्याची कुणाची कुवतच नव्हती. आम्ही चौघेजण धाडसी होतो. हे धाडस करून आम्हाला दाखवून द्यायचं होतं की भगतसिंह हा एकटा नाही. आम्हाला हेही सिद्ध करायचं होतं की आम्ही जी कृती करत आहोत, तशीच कृती भारतातला कुणीही युवक करू शकेल.

रात्रीचे अकरा वाजले असावेत. सिनेमाकोन चित्रपट बघून घरी परत निघाले होते. चांदणं पडलेलं होतं. आम्ही कुणाची शिकार करणार, का आमचीच शिकार होणार हेच विचार मनात घोळत होते. लॅमिंग्टन पोलीस स्टेशन आणि समोरच्या रस्त्यावर भरपूर प्रकाश होता. पोलिस स्टेशनच्या समोर आम्ही गाडी उभी केली. पोलीस स्टेशनमधून चार गोरे सार्जंट बाहेर आले. ते बाहेर येताच गोळ्या झाडून आम्ही त्यांचं स्वागत केलं. ते सर्व तावडतोब जमिनीवर झोपले. आम्ही पोलिस स्टेशनवर गोळ्या झाडू लागलो. एवढ्यात एक मोटार तिथं येऊन थांबली. मोटारीत बसलेल्या लोकांना बाहेर कसले फटाके फुटत आहेत, त्याचा अंदाज आला. ते तावडतोब मोटारीतून खाली उतरले. एक इंग्रज आणि त्याची मेमसाहेब गोळ्यांच्या टप्प्यात आले. एक गोळी मेमसाहेबांच्या पायात घुसली आणि त्या खाली कोसळल्या. इंग्रजानं तिला उचलून घेतलं व तो तिथून निघाला. आम्ही गोळीबार थांबवला. समोर जी मोटार येऊन उभी राहिली होती तिच्यावरही आम्ही काही गोळ्या झाडल्या. त्या मोटारीचे टायर फोडावेत, हा आमचा हेतू होता. त्यामुळे त्या मोटारीनं आमचा पाठलाग करता आला

नसला. हा सर्व वेळ काही मिनिटांतच पार पडला. एका क्षणात गोळी लागल्याचे बघून आमचं चित्त खळमळीत झालं होतं. कुणाला अडवणी करण्याचा किंवा कुणावर नेम धरून गोळी झाडण्याचा आमचा विचार नव्हता. आम्ही गाडी सुरू केली आणि तिथून पळ काढला. सर्व रस्ता निर्मनुष्य होता. आमची मोटार चांगली होती ताशी ६० मैलांच्या वेगाने आम्ही पळत होतो. आमचा पाठलाग करायला कुणीच येत नव्हतं. आम्ही एवढ्या वेगानं मोटार चालवली की समोर येऊन आमची मोटार थांबवण्याची शक्यताच उरली नाही. कुणाला तसा अवसरच मिळाला नाही. आम्ही ज्या मित्रानं मोटार दिली होती त्याच्या घरी पोचलो. मोटार मालक आमचा समविचारीच होता. त्याला सर्व हकीकत सांगितली.

मुंबईच्या लॅमिंग्टन रोड पोलीस स्टेशनवर गोळीबार करून आम्ही निसटलो खरे परंतु पोलिसांच्या गराड्यातून निसटणं कठीण दिसू लागलं. पोलिसांशी केव्हा आणि कुठं सामना होईल, हे सांगता येत नव्हतं. आम्हाला सतत सावध राहणं भाग होतं. जिवात जीव असेपर्यंत आम्ही पोलिसांच्या तावडीत सापडण्याची कल्पना देखील असह्य होती. आमचा आमच्या नेमबाजीवर आणि मनगटाच्या जोरावर विश्वास होता. पोलिसांशी आमचा समोरासमोर सामना झाला तर मग जिवंत राहणंच कठीण होतं. पोलिसांच्या हातात मी जिवंत सापडणे नामुष्कीचं होतं. माझं प्रेतच ते ताब्यात घेऊ शकत होते. ते मृत शरीर माझंच आहे, याची ओळख पोलिसांना पटावी म्हणून मी माझ्या खिशात एक निवेदन लिहून ठेवलेलं होतं. मी एकवेळ मृत्यूशी झुंज देऊन आलेलो होतो. आपल्या देशाची शान टिकविण्यासाठी मी आत्मसमर्पणाला तयार होतो. माझ्या डोळ्यासमोर त्यावेळी काय काय उभं राहत होतं, याची कल्पना एखाद्या जिवंत मनाच्या माणसालाच करता येणे शक्य आहे. भावविवश होऊन त्यावेळी जे निवेदन लेखी स्वरूपात मी आपल्या खिशात ठेवलं होतं यातला शब्दन् शब्द काही आता आठवत नाही. त्याचा आशय काहीसा पुढील-प्रमाणे होता. 'भारतीय जनतेवर अन्याय आणि अत्याचार करणाऱ्या इंग्रजांनो! जरा कान देऊन ऐका—डोळ्यावरील झापड बाजूस काढून पाहा, कानाचे पडदे नीट करून ऐका, डोकं ठिकाणावर ठेवून विचार करा, वस्तुस्थिती ध्यानात घ्या आणि माणुसकीच्या मार्गानं चालायला शिका! १९११ साली मदनलाल धिंग्राने पिस्तूल चालवून तुमच्या राजवटीला सावध होण्याचा इशारा दिला. १९१२ साली काही मिरवणुकीच्या वेळी बॉम्बस्फोट करून दिल्ली येथे क्रांतिकारकांची गर्जना तुमच्या कानांचे पडदे भेदून गेली होती. १९१५ साली क्रांतिकारकांना, तुमच्या डोळ्यावर चढलेली उन्मादाची चरबी कमी होत नाही हे दिसून आल्यावर तुमची राजवट उध्वस्त करण्यावाचून अन्य उपाय नाही हा निष्कर्ष काढावा लागला. त्यात ते असफल ठरले. परंतु १९२९ साली भगतसिंह आणि त्यांचे साथीदार

बटुकेश्वर दत्त यांनी दिल्लीच्या असेंब्लीत बॉम्बस्फोट करून तुम्हाला युद्धावर येण्याचं आवाहन केलं. भगतसिंह आणि त्याच्या साथीदारांना फासावर लटकावून तुम्ही भारतीय तरुणांनाच आव्हान दिलं आहे. तुमचं हे आव्हान आम्ही स्वीकारीत आहोत. आज मुंबईच्या लॅमिंग्टन रोड पोलीस स्टेशनवर पिस्तुलांनी गोळ्या झाडून आम्ही हे सूचित करण्याचा प्रयत्न केला आहे की तुमचे जुलूम आणि अत्याचार चालूच राहिले तर तुमचं हे वागणं म्हणजे मृत्यूला आमंत्रण ठरेल! आम्ही आज या गोष्टीची ग्वाही देत आहोत की यापुढे भारतीय युवक आणि युवती तुमच्या बरोबर रक्ताची रंगपंचमी खेळण्यासाठी तयार झालेले आहेत. आम्ही शस्त्रांच्या मदतीनं तुमच्या सशस्त्र पोलिसांवर खुल्या रस्त्यावर हल्ला करून आव्हान दिलेलं आहे की हिम्मत असेल तर समोरासमोर येऊन लढा. देशावर प्रेम करणारे सर्व युवक आमच्या बाजूनं उभे राहतील. एक काळ होता जेव्हा भारतामधील भोळे भाबडे लोक सरकारविरुद्ध बंड करणाऱ्याला देशद्रोही समजत. आज इंग्रजी राजवटीतील नोकरशहा आणि यांच्या दलालांना, हे दिसत नाही का, की भारतीय जनतेनं ज्यांच्या ठिकाणी देशप्रेम नाही तेच देशद्रोही आहेत, हा विचार आता पक्केपणी स्वीकारला आहे."

"मी माझ्या देशावर प्रेम केलं होतं आणि तुमच्या जुलमी राजवटीनं मला फासावर चढवण्याचा प्रयत्न केला होता. देशातील जनतेनं मला मृत्यूच्या दाढेतून बाहेर काढलं आणि मी माझ्या शारीरिक बळाच्या जोरावर तुमची सर्व बंधनं झुगारून मुक्ती मिळवली. देशावर प्रेम करणाऱ्या लोकांनी माझा प्राणपणानं सांभाळ केला—सगळ्या परिस्थितीत माझं रक्षण केलं. यापुढेही तेच माझं रक्षण करतील. आजही तुमच्या जुलमी पोलीसांशी माझा सामना झालाच तर मी निश्चयपूर्वक सांगतो की मी जिवंत तुमच्या हाती सापडणार नाही. माझी मातीच तुमच्या हातात पडेल."

"ज्याप्रकारे आज आम्ही रस्त्यावर आलो आहोत त्याचप्रकारे देशातील तरुण आणि तरुणीही रस्त्या-रस्त्यावर आणि मैदानात तुमच्या विरोधात उभे राहतील. जोपर्यंत तुमची जुलमी राजवट इथून नेस्तनाबूद होणार नाही, तोपर्यंत प्रतिकार चालू राहील."

एखाद्या क्रांतिकाराचं असावं असं माझं हे निवेदन होतं. त्या इंग्रज महिलेला गोळी लागली होती त्याबद्दल मी दिलगिरीही व्यक्त केली होती. माझं निवेदन खूपच आवेशयुक्त होतं. खटल्याच्या वेळी माझं हे निवेदन कोर्टासमोर ठेवण्यात आलं होतं. त्या काळच्या वृत्तपत्रातून ते प्रसिद्धही झालं होतं.

गाडीतील चार लोकांपैकी एका व्यक्तीचे केस लांब होते. हे पोलिसांनी बघितलं होतं. लांब केसांची व्यक्ती म्हणजे स्त्री–ही गोष्ट पोलिसांच्या कशी ध्यानात येणार? यामुळं पोलिसांनी राष्ट्रीय आंदोलनात भाग घेणाऱ्या, लांब केस ठेवलेल्या काही धाडसी तरुणांना पकडून ते त्यांची पिटाई करत राहिले. त्या सर्वांना काही काळानंतर सोडून देण्यात आलं.

दुर्गादेवी ही शूर क्रांतिकारक भगवतीचरणची पत्नी होती. लाहोर नजीक एके ठिकाणी बॉम्बचे प्रयोग करून बघतांना भगवतीचरण हुतात्मा झाले होते. दुर्गादेवी सुंदर, धैर्यवान आणि मोठ्या ताकदीची स्त्री होती. अशी शूर महिला, मी माझ्या उभ्या जीवनात दुसरी बघितली नाही. गोळीबार करण्यासाठी आम्ही जेव्हा निघालो तेव्हा तिनं आपला चार वर्षे वयाचा मुलगा गणेश दामोदर सावरकरांच्याकडे सोपवला होता. सुखदेव आणि दुर्गादेवी सहजपणे मुंबईहून पळून गेले.

मी माझा एक तरुण मित्र पुरुषोत्तम मिस्त्री याला बरोबर घेऊन निघालो पोलिसांनी सगळीकडे जाळं पसरलेलं होतं. पोलिसांना हेही माहीत होतं की माझ्यापाशी पिस्तूल आहे आणि मीही एक जुना खेळाडू आहे. माझा नेम पक्का होता. बन्दर, विमानतळ, रेल्वेस्टेशन, बस स्टँड सर्वत्र त्यांनी नाकेबन्दी केली होती. परंतु मोटारीत बसून गोळ्या झाडणारा माणूस, जंगलातील पायवाटांनी पळून जाऊ शकेल, हे काही पोलिसांच्या लक्षात आलं नाही.

जंगल आणि डोंगर ओलांडून मी मुंबईहून २० मैल दूर येऊन पोचलो होतो. जवळच एक स्टेशन होतं–मी तिथं थोडा वेळ बसलो. माझ्या एका मित्रानं तिकीट काढून आणलं. गाडी आली व मी आत चढून बसलो. सूर्य मावळलेला होता. मला खूप तहान लागली होती. मी एका स्टेशनवर पाणी पिण्यासाठी खाली उतरलो. पोलिसचे लोक कारवाईनं इकडे तिकडे तपास करत होते. एका गुप्त पोलिसाचं माझ्याकडे लक्ष गेलं. आम्ही दोघांनीही एकमेकांना ओळखलं! स्टेशन छोटंसच होतं–तिथे केवळ तीन पोलिस होते. माझ्यावर हात टाकण्याची त्यांना काही हिंमत झाली नाही. पोलिस अधिकाऱ्यांच्या सूचना होत्या की शस्त्र असल्या खेरीज मला पकडण्याचा प्रयत्न करू नये–यात जीव गमावण्याची शक्यता आहे. पोलिसांना असा हुकूम होता ते त्याप्रमाणंच वागले. ज्या डब्यात मी बसलो होतो तिथल्या एकेका प्रवाशाला धाक-दपटशा करून त्यांनी बाहेर काढलं. माझ्या तरुण मित्रालाही त्यांनी खाली उतरण्यास सांगितलं. पुढल्या स्टेशनवर पोलिसांनी मदत पाठवण्याबद्दल निरोप केला होता–गाडी सुरू झाली. डब्यात आता आम्ही केवळ चौघेच राहिलो. मी आणि माझे तीन रक्षण कर्ते! क्रांतिकारक चन्द्रशेखर आझादांनी भेट दिलेलं

अकरा गोळ्यांचं पिस्तूल माझ्या खिशात होतं. पिस्तुलाचं 'सेफ्टी-कॅच' ही काढलेलं होतं. चापावर बोट ठेवण्याचाच अवकाश. त्या शिपायांच्या ठिकाणी मला माझा मृत्यू दिसू लागला आणि त्या शिपायांना त्यांचं मरण माझ्या ठिकाणी दिसू लागलं. माझा चेहरा एखाद्या जंगली हिंस्त्र श्वापदाप्रमाणे झाला होता—आपल्या पुढ्यातील सावजावर उसळून हल्ला करण्यासाठी आणि त्याच्या रक्ताचा घोट घ्यायला उत्सुक बनलेल्या क्रूर श्वापदासारखा ! माझ्या मनात अनेक विचार येत होते आणि ते तसेच दडपले जात होते. एवढ्यातच पुढलं स्टेशन आलं. जोरात शिटी वाजवून गाडी उभी राहिली. तिला सिग्नल मिळालेलं नव्हतं. माझ्यासाठी हीच एक सुसंधी होती. जीवन-दान लाभण्याची हीच शक्यता होती. मी कोट घातलेला होता आणि खिशातील पिस्तुलावर बोटही ठेवलेलं होतं. मी पिस्तूल बाहेर काढलं—पोलिसांनी ते बघितलं. पिस्तूल बघताच ते चाटी पडून राहिले. मग काय—खिडकी उघडली आणि मी खाली उडी मारली. त्या पोलिसांनी खिडकीबाहेर तोंड काढून मी कोणत्या दिशेने पळालो हे बघण्याची सुद्धा तसदी घेतली नाही.

बाहेर चांदणं पडलेलं होतं म्हणून प्रत्येक गोष्ट स्पष्टपणे दिसत होती. स्टेशन मैलभर दूर होतं. गाडी दहा मिनिटं तिथंच थांबून राहिली. हे सर्व नाटक-विधात्यानं माझ्यासाठीच रचलं आहे, असंच मला वाटलं. शेतां-शेतांतून मार्ग काढत मी बराच वेळ चालत राहिलो. शेतातच थोडावेळ झोपही काढली. सकाळी उठल्यानंतर आजूबाजूला बघितलं तेव्हा एक छोटंसं गाव जवळच असल्याचं आढळलं. यापूर्वीही अनेकदा मी या गावी आलो होतो. तेथले गल्ली-बोळ माझ्या परिचयाचे होते. त्या गावाचं नाव होतं नवसारी. मी एका दुकानावर गेलो आणि खेडुताला शोभणारे सदरा, धोतर व जोडे खरेदी केले. बाहेर शेतात जाऊन मी कपडे बदलले. आता मी त्याच वातावरणात राहणाऱ्या एखाद्या शेतकऱ्यासारखा दिसू लागलो. आर्यसमाजाच्यातर्फे सुपा नामक गावात एक गुरुकुल चालवण्यात येत होतं. नव-सारीच्या जवळच माझे एक मित्र राहत होते. त्यांची मदत मिळेल या अपेक्षेनं मी त्यांच्याकडे निघालो. मी तिथं स्वतःला सौराष्ट्रातील एक शेतकरी म्हणूनच सांगत राहिलो. मी त्यांना असं सांगितलं की मला माझ्या मुलाला 'गुरुकुलात दाखल करायचं आहे! माझं वेषांतर एवढं बेमालूम झालेलं होतं की माझे मित्रही मला ओळखू शकले नव्हते. मग मी त्यांना म्हणालो की दोन दिवस तिथं राहून एकूण परिस्थितीचा अंदाज घेऊ व नंतर काय ते ठरवू. त्यांनी मोठ्या आनंदानं मला तिथं ठेवून घेतलं. वर्तमानपत्रांत गोळीबाराच्या खटल्यासंबंधी सर्व काही प्रसिद्ध झालं होतं. भावनगरात माझं नाव स्वामीराव होतं—माझ्या एका फोटोतही हेच नाव आहे. मला पकडून देणाऱ्याला मोठं बक्षीस जाहीर झालं होतं.

या घटनेनंतर मी असं ठरवलं की यापुढे भारतात राहणं आपल्याला कठीण जाईल. 'लॅमिंग्टन रोड शूटिंग केस' पहिल्यांदा श्री. दस्तूर यांच्या कोर्टात चालली आणि नंतर हायकोर्टात चालली. आरोपींनी आपल्या बचावासाठी बॅरिस्टर दिले होते. श्री. गणेश रघुनाथ वैशंपायन हे आरोपी नं. १ म्हणून दाखवण्यात आले. कोर्टात खटल्याचं कामकाज ऐकण्यासाठी जी गर्दी होई, त्यांना पास देण्यात आले होते. त्या पासांच्या पाठीमागे "श्री. गणेश रघुनाथ वैशंपायन—आरोपी नं. १" असा मजकूर इंग्रजीत छापलेला होता. श्री. वैशंपायन यांच्या वतीनं बॅ. पंडित (रणजीत पंडित यांचे बंधू)—तसेच श्री. [illegible] आणि छापणकर यांच्या सहाय्यानं बॅ. रेगे व कीर्तीकर काम बघत होते. स्पेशल ज्युरीची नियुक्ती करण्यात आली होती. ज्युरीचे फोरमन एक यहुदी गृहस्थ होते. ४ मे १९३१ रोजी हायकोर्टानं ज्युरीशी सहमती दर्शवत आपला निकाल जाहीर केला. सर्व आरोपींना हायकोर्टानं निर्दोष मुक्तता केली. या खटल्याचा निकाल मी काबुल शहरात मुद्दाम जाऊन वाचला होता. बॅ. झाबवाला यांनी आरोपींचा मोठ्या बुद्धिमत्तेनं आणि चातुर्यानं बचाव केला होता. सरकारने या खटल्यासाठी जवळजवळ एक लाख रुपये खर्च केले. बॅ. सावरकरांच्या खटल्यानंतर सरकारने हा एक मोठा खटला म्हणून चालविला होता. या खटल्यात सरकारचा सपशेल पराभव झाला. स्वतंत्र भारतात या खटल्याचा पूर्ण इतिहास प्रसिद्ध होणे जरूरीचे आहे. हा इतिहास ग्रंथ खूपच रोमांचकारी ठरण्याची शक्यता आहे. [illegible] जर्मनीला जाण्यापूर्वी मी संक्षेपानं या खटल्याचा उल्लेख केला आहे. नंतरच्या काळात हा खटला "लॅमिंग्टन रोड शूटिंग केस" म्हणून न राहता 'बॉम्बे शूटिंग केस' म्हणूनच प्रसिद्धी पावला.



तुरुंगातून तर दोन वेळा मी पळालो होतो. आता मला माझा देश हाच एखाद्या तुरुंगाप्रमाणे वाटू लागला. एका बाजूने समुद्र—दुसऱ्या बाजूला हिमालय पर्वत. पर्वत मार्गावर ठिकठिकाणी पहारेकरी होते आणि बन्दरमार्गानं बाहेर जाण्याची तर कल्पनाही करता येत नव्हती. प्रत्येक ठिकाणी इंग्रजांचे पंजे पसरलेले होते. मी ठरवलं की आपण देशाच्या बाहेर जायचंच. देशात राहून एखाद्या बन्दिशालेप्रमाणं जगायचं नाही. मी शेतकऱ्याचा वेष चढवलाच होता. हातात एक काठी घेतली आणि कंबरेत थोडासा वाकून मी चालू लागलो. मी जवळच्या स्टेशनवर येऊन बसलो. एका तरुण प्रवाशाला "बेटा! मला एक बडोद्याचं तिकिट आणून दे"— असं म्हणालो. त्या तरुणालाही बडोद्यालाच जायचं होतं आणि तोही शेतकरी कुटुंबातलाच होता. मी त्याचा आधार घेत घेत डब्यापर्यंत गेलो व आत चढून बसलो. त्या तरुणानं बाकीच्या उतारूंना विनंती करून बाकावरच माझी झोपण्याचीही व्यवस्था केली. थंडीचे दिवस होते. मी चादर तोंडावरून पायापर्यंत ओढून राहिलो. तरुणाच्या माझ्याविषयी मनातच सहानुभूति निर्माण झाली होती. त्याच तरुणाच्या मदतीनं मी बडोद्याच्या गाडीत जाऊन बसलो. बडोद्याला पोचल्यानंतर मी त्याच तरुणाला मला प्रो. माणिकराव यांच्या हाताच्या दवाखान्यात घेऊन चल—अशी विनंती केली. आम्ही दवाखान्यात पोचलो. त्यानं आत जाऊन " बाहेर एक रोगी आलेला आहे" असं सांगितलं. "त्याची फासळी तुटली आहे." मी निपचित एका टेबलावर जाऊन पडून राहिलो. तो शेतकरी तरुण मला तिथं सोडून निघून गेला. माणिकरावांनी आजारी शेतकऱ्याला बघताच ओळखलं. वर्तमानपत्रांत 'गोळाबाराच्या खटल्या'चा वृत्तान्त प्रसिद्ध झाला होता. मला पकडण्यासाठी गुप्त पोलिस शोधाशोध करत होतेच. प्रो. माणिकरावांना मी माझे गुरु मानत होतो. माझ्या जीवनातल्या सर्वच गोष्टी त्यांना माहीत होत्या. मला बघताच ते थोडेसे हसले आणि म्हणाले—"डाव चांगला रचला आहे." मी तिथं येण्यापूर्वी एक तास अगोदरच पोलिस माझा शोध घेत आलेले होते. वेळ रात्रीची होती. मला एका खाटेवर असं झोपवून ठेवलं की जणू माझ्या कंबरेचं हाडच मोडलेलं होतं. कंबरेचं हाड मोडलेला एक शेतकरी मग चार दिवस तिथं तसाच पडून राहिला. मी जेव्हा गुरूंना मला एखाद्या सुरक्षित ठिकाणी पोचवा असं सांगितलं तेव्हा ते म्हणाले की इथल्या इतकं दुसरं कुठलंही ठिकाण सुरक्षित नाही. मी कुणाला कळवू शकत नाही आणि बरोबर गोष्टही सांगू शकत नाही. इथं एक तर कुणी यायचं नाही आणि

अडचाउलगही कुणी आलाच तर तुम्ही कसा काय वेळ घेतला—ते तर बघू. तुमच्या नावाची सूचना गुप्तपत्रांत प्रसिद्ध झाली आहे. फोटोही वर्तमानपत्रातून प्रसिद्ध झाले आहेत. पैशाच्या मोहानं कुणीही तुम्हाला विकायला कमी करणार नाही. तुमचं जीवन उद्ध्वस्त होईल आणि माझी किती बदनामी होईल ? पोलीस इथं येऊन पोचलेच तर नंतर जे काय भोगावं लागेल ते आपण दोघंही भोगू. दोन-चार दिवस पोलिसांची धावपळ संपू द्या. मग जिथं जायचं असेल तिथं जा. चार दिवसांनंतर कुणाला कुणाला पकडण्यात आलं आणि पोलीसांना मार बसल्यामुळे कुणी कुणी काय काय सांगितलं, हे सगळं वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालं.

प्रो. माणिकराव यांना बडोदा सरकारनं ' राजरत्न ' ही पदवी दिली होती. ते समर्थ रामदासांचे भक्त होते आणि मारुतीचे उपासक होते. ते मैदानी खेळांचे तसेच पुरुषी खेळांचे भोक्ते होते. भारतातील तरुणांना शूर-वीर बनवावे, यासाठीच अहोरात्र ते झटत होते. ते सेवेचा, शौर्याची, आरोग्य, पौरुष आणि शक्तीची साक्षात मूर्तीच होते. माझ्या मनात त्यांच्याविषयी आदरभाव वसत होता. मी त्यांचं म्हणणं मान्य केलं.

मी भावनगरला जाऊन स्थायिक झालो तेव्हा माझा कुणाशीच परिचय नव्हता. पोलिस कार्यालयात माझे तरुणपणचे फोटो होते. पोलिसचा एक बडा अधिकारी रात्रंदिवस माझा शोध घेण्याचा प्रयत्न करत होता. इंग्रज सरकारच्या गुप्तचरांना डोळे नसतात—कान असतात. भावनगरला भारतातील विविध भागांतील तरुणांशी माझा संबंध आला होता व त्यांच्यापैकी अनेकजण आपापल्या ठिकाणी परत गेले होते. यामुळेच आता वेषांतर करून एखाद्या ठिकाणी जाऊन राहणं कठीण होऊन बसलं होतं. आता मी त्वरित देशाचा त्याग करून अन्यत्र कसं जाता येईल, हाच विचार करत राहिलो.

## दुसऱ्यांदा साधुवेष

एके दिवशी सकाळी चार वाजता मी बगलेत मृगाजिन, अंगावर एक काळी घोंगडी, कमंडलु आणि वळकटी यासह बाहेर पडलो. माझं जीवन यम-नियमांनी बांधलेलं होतंच. माझे तरुण मित्र जो. आर. नगरदेवळेकर मला निरोप देण्यासाठी माझ्यासमवेत शहराच्या बाहेरच्या भागापर्यंत आले होते. सध्या ते एक नामांकित इंजिनियर आहेत. व्यायामामुळे माझं शरीर पीळदार, बनलं होतं. दाढीमिशा व डोक्यावरील केसांवरून वस्तरा फिरवला होता. हिमालयाच्या गुंफांतून संसारी लोकांना उपदेश करण्यासाठी बाहेर पडलेल्या एखाद्या तपस्व्याप्रमाणे मी दिसत होतो. माझ्या चेहऱ्यावर तेज होतं. वाणीत मिठास होता, भाषा आणि विचार माझ्या नवीन होते. रस्त्यात कुणाशी चार शब्द बोलण्यासाठी थांबलो म्हणजे नंतर पाऊल तेथून उचलावसंच वाटत नव्हतं. साधु-संतदेखील मला अगत्यानं थांबवून ठेवत. त्यांना बघून मला वाटे की हे लोक देखील

पळालेले कैदी किंवा चोर, डाकू तर नसतील ? किंवा त्यातला एखादा गुप्त पोलिस असण्याचाही संभव होता. मला पान, विडी, सुपारी अथवा चहा, यापैकी कसलंच व्यसन नव्हतं. साधु-संतांना अध्यात्मिक बाबींची चर्चा करण्याची संवय असते. मीही त्यांच्याशी मोठ्या उत्साहाने चर्चा करी. त्यामुळे सर्वच माझा मान ठेवत. साधु-संतांचं विश्व निराळं असतं. त्यांचेही विशेषप्रकारचे अड्डे असतात, गुरुस्थानं असतात आणि गुप्तभाषाही असतात. त्यांच्या राहणीमध्ये निराळेपणा असतो. प्रत्येक पंथाचा स्वतंत्र इतिहास असतो. एखादा कुणी शिष्य म्हणून स्वीकारला गेला की त्याला आपल्या गुरु घराण्याची सर्व माहिती समजते. मी अनेकांना विचारून ही माहिती आत्मसात केली. यामुळं कुणाच्याही साधूच्या प्रश्नांना मी आता उत्तरं देऊ शकत होतो.

एका गावाहून दुसऱ्या गावाला जाण्यासाठी मी शेता-शेतातून मार्ग काढत जात होतो. एका रात्री मी एका साधूच्या झोपडीत मुक्कामाला होतो. त्या साधूनं तयार केलेलं भोजन मी घेतलं. रात्री मला एकाएकीच जुलाब होऊ लागले, ओकाऱ्याही होऊ लागल्या. त्या साधूनं अन्नात काहीतरी मिसळलं असावं, असा मला संशय आला. साधू झोपडीत आतल्या भागात झोपला होता. मला वाटलं की झोपेचं ढोंग करत असावा. मी तेथून गुपचूप निघून जायचं ठरवलं. जंगलात जाऊन पडून राहिलो. रात्रभर सतत संडास होत होते. आपला शेवट जवळ येऊन ठेपला आहे, असंच मला वाटलं. पहाट होईपर्यंत शरीरातील सर्व विषाचा निचरा झाला होता. गावाबाहेरील एका छोट्याशा तळ्यावर जाऊन स्नान केलं आणि जवळच्याच मंदिरात जाऊन झोपी गेलो. या अनुभवानंतर मी परत कधीही साधूनं स्वतः तयार केलेलं अन्न खाल्लं नाही. रस्त्यानं कुणी न कुणी परमेश्वराचा भक्त भेटे व तो प्रेमानं घरी नेऊन जेवण देई, मोठ्या प्रेमानं खाऊ घाली.

आबू पहाडा जवळ देवीचं एक मोठं स्थान आहे. गुजरातचे भाविक लोक या देवीची उपासना करतात. भोवताली जंगल असलेल्या एका पर्वतावर हे मंदिर आहे. परिसर अतिशय निसर्गरम्य आहे. या ठिकाणाची ख्याती ऐकून मीही तिथे जाऊन पोचलो. मंदिरात पोचता पोचता सायंकाळ झाली. अंबामातेचं हे मंदिर खूपच विशाल होतं. मी मंदिरातील महन्तांना भेटलो. त्यांनी माझ्याकडे बघितलं आणि आमचं काही जुजबी बोलणं झालं. माझ्या बोलण्यानं तो चांगला प्रभावित झाला. एका उत्तम ओट्यावर त्यानं माझी राहण्याची व्यवस्था केली. दुसऱ्या दिवशी एक गुजराथी पोलिस अधिकारी त्या महन्ताकडे आला व त्याला त्याने भोजनासाठी आमंत्रण दिलं. एखाद्या साधूला भोजन घालून त्याच्या आशीर्वादानं तुम्हाला यश वगैरे मिळवायचं असेल तर त्या तिथं ओट्यावर असलेल्या साधूला भेटा. तो एक मोठा तपस्वी आहे. त्यानं तुमचं निमंत्रण स्वीकारलं तर तुमचे मनोरथ पूर्ण झालेच म्हणून समजा. पोलिस अधिकारी माझ्याकडे आला. मी त्यावेळी प्राणायाम करत होतो. त्यानं येऊन मोठ्या श्रद्धेनं

मला नमस्कार केला आणि आदबीनं जवळ बसला– म्हणू लागला "मी आपल्या आशीर्वादासाठी आलो आहे." मी हसून म्हणालो–"माझा आशीर्वाद आहे– जाता जा—मी माझ्या साधनेत आहे." तो म्हणाला–"आपण माझ्याकडे भोजन केलं पाहिजे नंतर मी आपला आशीर्वाद घेईन. मी पोलिस अधिकारी आहे. इन्स्पेक्टर आहे. अंबा मातेच्या दर्शनासाठी मी मुलाबाळांसह आलो आहे." हे ऐकून मी मनात म्हणालो– कोणतं पाप केलं आहे? भोळ्या भाबड्या साधूच्या आशीर्वादानं पाप धुवून काढण्याचा प्रयत्न करतो आहेस काय? पोलीस ऑफिसर हे शब्द ऐकताच मला शंका आली की मला पकडण्यासाठी जे प्रकटन सरकारनं प्रसिद्ध केलं आहे– ते कदाचित याच्या खिशात देखील असण्याची शक्यता आहे. माझा फोटोही यानं बघितला असावा. मी मात्र हसत हसत त्याच्याशी बोलत राहिलो. शेवटी मी त्याचं आमंत्रण स्वीकारलं. त्याच्या पत्नीनं स्वतः स्वयंपाक करून मला मोठ्या प्रेमानं जेवू घातलं. मला नवा कपडा आणि एक नवं कोरं धोतर देऊन त्यांनी आशीर्वाद मागितले. मी हसून त्यांना म्हणालो "हा साधू लाच घेऊन आशीर्वाद देणाऱ्यांपैकी नाही– मला कपडे नकोत,– तुमचे पैसेही नकोत.– तुमच्यासारखे दानधर्म करणारे लोक मला रोज भेटतात.– माझ्यापाशी कपडेही पुरेसे आहेत.– आणि वाढवून काय करायचं" मी त्या धोतराला आणि पैशांना फक्त हात लावला आणि म्हणालो–"हा घ्या रुपया आणि धोतर घरी नीट ठेवून द्या—परमेश्वर तुम्हाला सदा सुखी ठेवील– तुम्हाला काही कमी पडणार नाही–" माझा आशीर्वाद मिळाल्यावर तो पोलिस इन्स्पेक्टर महन्ताकडे गेला व पंचवीस रुपये त्याच्या पायापाशी ठेवून म्हणू लागला–"आपल्या मठावर मोठीच कृपा झाली. आपण मला बरोबरच एका महान तपस्व्याचं दर्शन घडवलं. त्यांचे आशीर्वाद लाभल्यामुळे मी सदा सुखी होईन–" हे ऐकून त्या महन्तालाही खूप आनंद झाला. माझ्याविषयी त्यांना अधिक प्रेम आणि आदर वाटू लागला.

एके दिवशी भावनगरचे दोन शेठ दर्शनासाठी आले. ते मुंबईला व्यापार करत होते. यांची दोन मुलं माझ्याकडे शिक्षण घेऊन गेली होती. त्या दोघांनाही मी भावनगरच्या व्यायामशाळेत पाहिलं होतं. त्यांनीही मला भोजनाला बोलावलं आणि माझे आशीर्वाद घेतले. (तेही मला ओळखू शकले नाहीत!) हळूहळू तिथं माझी प्रतिष्ठा वाढू लागली. आता मला भीती वाटू लागली की माझ्यावर प्रेम करणारा माणूस इथं येऊन न भेटो– त्याच्यापासून मी स्वतःला कसं लपवणार?

अंबामातेच्या परिसरापासून तीन मैलांवर आणखी एक रम्य ठिकाण आहे. तिथं एका उंच पर्वतावरून एक ओढा वाहतो कोटेश्वरी– त्या जलप्रपाताजवळ कुंड बांधलेली आहेत. साधूसंतांच्या निवासासाठी तिथं काही खोल्याही बांधलेल्या आहेत. हे ठिकाण दाट जंगलात वसलेलं आहे. त्या गोष्टीला आता तीस वर्षं होऊन गेली. ते स्थळ आता स्पष्टपणे आठवत नाही. मनावर त्याचा ठसा मात्र कायम आहे.

सूर्यास्त झाल्यानंतर मी उठून महन्ताकडे गेलो. त्या ठिकाणचा रम्यपणा फारच मोहक असल्याचं त्याला सांगितलं. महन्ताची अशी समजूत झाली की मी त्या ठिकाणी राहू इच्छितो. मी खरोखरीच तिथं जाऊन राहिलो तर ते स्थानही भरभराटीला येऊ शकेल असा विचार त्याच्या मनात आला. कुणी न कुणी लक्ष्मीपुत्र या साधूच्या आशीर्वादासाठी तिथं एखादं मंदिर बांधून देईल. तो म्हणाला "तुमची इच्छा असल्यास तुमच्यासोबत सेवेसाठी मी एक नोकरही देतो. आपल्या इच्छेनुसार दोन्ही वेळचं भोजन इथून पाठविण्याची व्यवस्था करतो!" मी त्याचं म्हणणं मान्य केलं. दोन्ही वेळचं भोजन नियमितपणे येऊ लागलं. आजूबाजूचं जंगल हिंस्र श्वापदांनी भरलेलं होतं. रात्री ही जनावरं पाणी पिण्यासाठी त्या ओढ्यावर येत— त्यामुळे रात्रीच्या वेळी तिथं राहण्याची कुणाचीच हिंमत नव्हती. मलाही महन्तानं इशारा दिला होता की रात्रीच्या वेळी तिथं थांबू नका,— जीव धोक्यात घालू नका. मी माझ्या पद्धतीनं सर्व परिस्थितीचा अंदाज घेतला. खोलीचं दार मजबूत होतं. शिवाय माझ्यापाशी असरा गळ्याच पिस्तूल होतंच! मी महन्तांना म्हणालो "मला मृत्यूची अजिबात भीती वाटत नाही जंगली जनावरांनाही मी घाबरत नाही." माझं उत्तर ऐकून महन्ताला माझ्याविषयी अधिकच आदर निर्माण झाला. तिथं येणाऱ्या सर्व यात्रेकरूना तो मुद्दाम माझ्याविषयी सांगू लागला. लोक भाविकपणाने माझ्याही दर्शनाला येऊ लागले. मी लोकांपासून लपून राहू इच्छित होतो आणि महन्त माझं माहात्म्य वाढवीत होता. जेवण आटोपल्यानंतर मी उंच पर्वतावर चढून कुठे तरी बसून राही आणि सूर्यास्तानंतर खाली येई. लोकांनी आपल्याला ओळखू नये किंवा एखाद्या गुप्त पोलिसाच्या तावडीत आपण सापडू नये, या उद्देशाने मी पर्वतावर जाऊन बसत होतो. परंतु महन्त मात्र आपल्या स्वार्थासाठी माझं महत्त्व वाढवत होता. या प्रकारामुळे माझा धोका वाढत चालला. अनेक वेळा लोकांच्या आग्रहामुळे मला त्यांना दर्शन द्यावं लागे. जो साधू मृत्यूला भीत नाही, पैशाला हात लावत नाही आणि जंगली जनावर त्याच्यापाशी पाळीव प्राण्यांप्रमाणे फिरताना दिसतात. स्वाभाविकच यात्रेकरूना अशा साधूचं दर्शन मिळणं हे भाग्याचं मानलं जाऊ लागलं. ज्याला कुणाला माझी माहिती होई, तो धावत पळत माझ्या दर्शनासाठी येई. दर्शनोत्सुक लोकांच्यामध्ये चांगल्या घराण्यातल्या मुलीही असायच्या.

मी आता निसर्गाच्या कुशीत राहत होतो. दररोज स्वादिष्ट आणि पौष्टिक भोजन मिळत होतं. दररोज ५०० दंडबैठका आणि उंच पर्वतावर पळत पळत जाऊन पोचणं असा माझा व्यायाम चाले. मला एवढंच काम होतं. मृत्यूशी झुंज द्यायला मी सदैव तयार होतो. माझ्या कणाकणातून पौरुष आणि बेडरपणा ओसंडत होता. शेवटी एके दिवशी तिथून मी कुणाला काही न सांगता निघून गेलो. ज्या ठिकाणी खूप आराम मिळतो आणि लोकांच्या मध्ये मानमरातब वाढतो अशा ठिकाणी साधूंनी फार काळ राहायचं नसतं !

● ● ●

मी कराचीकाठेवाडला जाण्याचा कार्यक्रम ठरवला. पायी पायी चालत तिथपर्यंत पोचायचं होतं. स्टेशनांवर माझ्यासंबंधीची पोस्टर्स लागलेली होती. माझे फोटो झळकत होते. तीन महिन्यांचा अवधी होता. माझ्या पूर्वजांच्या भूमीवरून (जैसलमेर) पायी प्रवास करून तिथं पोचायचं होतं. उदयपूर, चितोड, हळदीघाट ही सर्व स्थळं बघण्याची मला उत्सुकता होती. जंगलातील पहाडांमधून साधू-संतांचा वावर तसा सर्वत्रिकच होता, त्यामुळे प्रत्येक गावांत माझं लोकांनी चांगलं स्वागत केलं. एके दिवशी एका गावात माझी एका गृहस्थाशी गाठ पडली. हे गृहस्थ कलकत्त्याचे करोडोपती असे धनिक होते. आमचं थोडं बहुत बोलणं झालं. ते माझ्या बोलण्यानं प्रभावित झाले आणि मोठ्या श्रद्धेनं त्यांनी सव्वाशे रुपये मला भेट म्हणून देऊ केले. मी पैशाला नकार दिला. त्यामुळे त्यांची श्रद्धा आणखीनच बळावली. एक दानशूर, श्रीमंत माणूस माझ्यापुढे हात जोडून याचक म्हणून उभा राहिला. तो म्हणाला—"आपण एक महान तपस्वी आहात—मला परमेश्वराचं दर्शन घडवा!" त्या काळी परमेश्वराचं दर्शन होऊ शकतं अशीच माझी श्रद्धा होती, आपल्याला परमेश्वर भेटलेला आहे, असंही मी मानत असे.

### केलवा आणि करेडा

प्रवास करत करत मी केलवा या गावी जाऊन पोचलो. कांकरोळी जवळ हे एका छोट्या जहागिरदाराचं गाव होतं. तिथं एका साधूच्या निवासस्थानी जाऊन पोचलो. त्या साधूनं माझं चांगलं स्वागत केलं. गाव छोटं होतं. गावातले लोक दर्शन घेण्यासाठी आले. त्या गावात एक सज्जन गृहस्थ होते—नाव होतं ठाकूर रामसिंह. त्यांनी मला भोजनाचं आमंत्रण दिलं. थोडं फार बोलणं झालं. माझ्या बोलण्यानं ते प्रभावित झाले. त्यांनी मला त्यांच्या घरातल्याच एका स्वतंत्र खोलीत ठेवून घेतलं. खाण्या-पिण्याची व्यवस्था उत्तम होती. गावचे जहागिरदार ठाकूर दौलतसिंह हेही मधून मधून चर्चा करायला यायचे. तेही एक धाडसी तरुण होते. ते शिकले-सवरलेले होते, इंग्लंडलाही जाऊन आले होते, शिकारीचाही त्यांना शौक होता.

माझ्या अंगावर साधूचा वेष होता. परंतु मी भाल्याचा वापर करू शकत होतो. बोलण्याच्या ओघात ही गोष्ट माझ्या तोंडून निघून गेली. गावातील काही तरुणांना मी भाल्याचे आणि तलवारीचे हात करून दाखवले. जहागिरदारांच्या मनात क्षत्रीय-बाण्याविषयी विशेष असं स्थान होतं. ते देशप्रेमीही होते. ते मला म्हणाले—"साधु महाराज! तुम्ही आमच्या गावीच का नाही राहात? एक मैलाच्या अंतरावर डोंगरावर आम्ही तुम्हाला एक आश्रम बांधून देऊ"—त्यांना नकार देणं अवघड होऊन बसलं.

शेजारच्या गावात एके दिवशी वाघानं एक वासरू ठार केलं. गावचे शेतकरी रडत-भेकत जहागिरदारांकडे आपलं गाऱ्हाणं घेऊन आले. जहागिरदारानं त्यांना आसपासच्या गावातील शेतकऱ्यांना एकत्र करायला सांगितलं. दुसऱ्या दिवशी रात्री वाघाची शिकार करायला जायचं त्यांनी ठरवलं. गावाजवळच्या पहाडावर दाट जंगल होतं. गावच्या लोकांनी वाघ या पहाडावरील जंगलात लपलेला आहे असं सांगितलं. पहाडावर शिकाऱ्यांच्या उद्देशानं विटांचा एक बुरूज उभा करण्यात आला होता. ठाकूर दौलतसिंह बंदूक घेऊन त्या बुरुजावर जाऊन बसले. शेतकऱ्यांनी तिन्ही बाजूंनी ढोल पिटीत हाकारे द्यायला सुरुवात केली. वाघाला बुरुजाकडील रस्त्यानं जाण्याशिवाय गत्यंतर नव्हतं. ही सर्व मजा बघण्यासाठी मीही शिकाऱ्यांच्या ताफ्यात सामील झालो होतो. ठाकूरसाहेबांनी मला त्यांच्यासह बुरुजावर चढून बसायला सांगितलं. मी मात्र खाली उभा राहूनच हा सर्व खेळ बघणार असं त्यांना उत्तर दिलं. काही शूर शिपाई बंदुकी भरून बुरुजाच्या भोवती उभे होते. मला खूप समजावून सांगण्यात आलं की खाली उभं राहणं धोक्याचं आहे. मी हसून उत्तर दिलं की संन्यासी मृत्यूला घाबरत नसतो. ठाकूरसाहेबांचा नेम चुकणारा नाही, ह्याची मला खात्री होती. शिवाय इतर शिकारीही बंदुकी रोखून खाली उभे होते. समजा, इतर सर्वांचे नेम चुकले—तरी माझ्या स्वतःच्या नेमबाजीवर माझा पूर्ण विश्वास होता! अकरा गोळ्या भरलेलं पिस्तूल माझ्यापाशी होतं—याचा कुणालाच पत्ता नव्हता. सर्वांवर आपला प्रभाव पडावा या हेतूनं मी म्हणालो—आपणा सर्वांची जरी चूक झाली तर मी नुसत्या हातानं वाघाशी सामना करीन, काळजी करू नका! सर्व जण माझ्यासारख्या संन्याशाविषयी आदर व्यक्त करू लागले.

वाघ लांब लांब उड्या मारत बुरुजाच्या बाजूनं निघाला. त्यानं जेमतेम तिसरी उडी घेतली आणि पहिलीच गोळी त्याच्या वर्मी लागली व तो कोसळला. दुर्बिणीतून ठाकूर साहेबांनी जमिनीवर तळमळत पडलेला वाघ बघितला. त्याच्या अंगातून रक्त येत होतं. काही वेळानंतर शिकारी वाघा नजीक जाऊन पोचले. वाघ ठार होऊन

पडला होता. ठाकूरसाहेब बुरुजावरून खाली उतरले, वाघाजवळ येऊन उभे राहिले, फोटो घेण्यात आला. मलाही त्यांनी आपल्या शेजारी उभं राहायला सांगितलं. कॅमेऱ्याचं बटन दाबतेवेळी मी मोठ्या हिमतीनं आपला चेहरा मागे वळवला. तरुण ठाकूर साहेबांना संन्याशानं आशीर्वाद दिले. ठाकूरसाहेब अतिशय आनंदात होते. म्हणू लागले—"या वाघाची शिकार आपल्या आशीर्वादामुळेच मला करता आली! या वाघाचं कातडं कमावून आणि सजवून मी आपणास भेटीदाखल देऊ इच्छितो—" नंतर त्यांनी त्याप्रमाणे केलं. पंचवीस रुपये, भगवी वस्त्र आणि वाघाचं कातडं मला भेटीदाखल देण्यात आले. रुपये आणि कपडे मी परत केले, मात्र वाघाचं कातडं स्वीकारलं आणि त्यांना तोंड भरून आशीर्वाद दिला.

आजूबाजूच्या गावातील लोकांत हळूहळू बातमी पसरली की केठवा गावात एक अत्यंत वजनाली असा एक तपस्वी संन्यासी राहतो आहे. लांब-लांब अंतरावरून लोक माझ्याकडे येऊ लागले. त्यांना मी हसत हसत आशीर्वाद तर देत होतो परंतु मनात भीतीही वाटे की इंग्रज सरकारचा एखादा गुप्त पोलिस येऊन आपली शिकार करील की काय!

करेडा येथील जहागिरदार श्री. अमरसिंहजी हेही एक शूर पुरुष होते. साधु-संन्याशांचा नेहमी आदर-सत्कार करीत. माझ्या संबंधीची हकीकत ऐकून त्यांनीही येथल्या जहागिरदाराकडे पत्र पाठवून संन्याशाच्या दर्शनाची इच्छा व्यक्त केली. त्यांनी मला घेऊन येण्यासाठी एक स्वतंत्र उंट माझ्या स्वारीसाठी पाठवला. सर्व-सामान्य माणसं तर माझ्या दर्शनासाठी दररोज येतच होती—परंतु राजा अमरसिंहजी वडिलधारे होते व जहागिरदार होते. यामुळं संन्याशाला त्यांच्याकडे आशीर्वाद देण्यासाठी जावं लागलं. त्यांच्या लोकांनी माझं फारच भव्य स्वागत केलं. माझ्या निवासासाठी एक खोली सजवून ठेवली होती. दहा दिवस होऊन गेले तरी राजेसाहेब आशीर्वाद घ्यायला स्वतःहून आले नाहीत. संन्यासीही स्वाभिमानीच होता. आशीर्वाद देण्यासाठी मी त्यांच्या महालात गेलो नाही!

करेडा येथे जहागिरदारांच्या मदतीनं एक मिडल स्कूल चालवण्यात येत होतं. राजपुतांची मुलं त्या शाळेत शिकत होती. तिथल्या दोन तरुण शिक्षकांशी माझा घनिष्ट परिचय झाला होता. त्यांच्या बोलण्यातून त्यांचं देशप्रेम व्यक्त होत होतं. ते चांगले बलशाली व सदाचारसंपन्न तरुण होते. राजकीय विषयावरील लेखन वाचण्याची त्यांना आवड होती. शचीन्द्र सान्याल या लेखकाच्या 'बंदी जीवन' या पुस्तकातील 'काकोरी खटला' हे प्रकरण ते वारंवार वाचायचे. त्यांच्याकडे हे पुस्तक होतं. माझा एक फोटोही त्या पुस्तकात होता. त्यांचा जीवनक्रम बघून माझ्या मनात अशी

गोष्ट येऊ लागली की आपण यांना विश्वासात घेऊन आपले साथीदार बनवावे. माझ्या जीवनाकडे बघून व माझं बोलणं ऐकून ते माझ्याकडे आकृष्ट झाले होते. एके दिवशी एकान्तात त्यांना नेऊन मी सर्व गोष्टी सांगितल्या. त्यांच्या मनाची तशी तयारीही करून घेतली होती. त्या दोन्ही शिक्षकांविषयी गावात आदरभाव होता. जेव्हा ते दोघे माझ्याकडे पूज्य भावनेनं बघू लागले त्यामुळे सर्व गावात माझं महत्त्व अधिक वाढलं. माझ्याविषयींचा त्यांचा आदरही अधिकच वाढला.

राजा अमरसिंह यांनी शाळेसाठी नवीन इमारत बांधून देण्याची एक योजना तयार केली. पैसे जमा केले. इमारतीची कोनशिला उभी करण्यासाठी उदयपूर राज्याचे शिक्षणाधिकारी मोहनसिंह मेहता यांना बोलावण्यात आलं. ते आले व त्यांच्या हस्ते कोनशिला बसवण्यात आली. त्यांच्या सन्मानार्थ राजी महालात भोजन ठेवण्यात आलं. आजूबाजूच्या सर्व जहागिरदारांना निमंत्रणे पाठवण्यात आली होती. संन्याशा-लाही बोलावण्यात आलं. भोजनाच्या अगोदर एक सभा घेण्यात आली. शिक्षण कसं आवश्यक आहे, यासंबंधी जोरदार भाषणं झाली.

रात्रीची वेळ होती. संन्याशाच्या चेहऱ्यावरही चंद्राचं चांदणं चमकत होतं. सर्वांचं त्याच्याकडे लक्ष होतं. आशीर्वाद देण्यासाठी त्यालाही उभं करण्यात आलं. मी म्हणालो— हजारो वर्षं आपण देवीदेवतांची प्रार्थना करीत आहोत परंतु आमची प्रार्थना फलद्रूप का होत नाही? देवीदेवतांसंबंधीची आपली भावना मिथ्या आहे? त्यांना आपली भाषा समजत नाही? का आपली श्रद्धाच उणी आहे? आपण पूजेसाठी जे साहित्य वापरतो, ते पुरेसं नाही? आम्ही ज्या ठिकाणी जाऊन पूजा करतो, ते पूजास्थान असुरक्षित तर नाही? त्याची पवित्रता तर धोक्यात आलेली नाही? माझं तर असं स्पष्ट मत आहे की देशाचं खरं दैवत, आमच्या जीवनाचा आधार म्हणजे देशातील बालकं. जोपर्यंत या देवतेची आम्ही योग्यप्रकारे पूजा करणार नाहीत, तोपर्यंत आमची कुठलीही पूजा देवतेला प्रसन्न करू शकणार नाही. राष्ट्राची आणि समाजाची सर्व शक्ती बालक-रूपी देवतेकडे लागली पाहिजे. हा देव दगडाचा नाही. याकडे विशेष लक्ष देण्याची जरुरी आहे. मुलांचं जीवन आणि त्यांच्या भावना या अत्यंत सूक्ष्म असतात. कठोर वचनं आणि कठोर दृष्टी त्यांना अजिबात सहन होत नाहीत. माता-पिता आपल्या अपत्यांना निर्मळ प्रेम देऊ शकत नसतात. बालकावर खरं प्रेम फक्त शिक्षकच करू शकतो. परंतु या बाबतीत देखील आपला देश मोठा दुर्दैवीच म्हणावा लागेल. कारण देशातील शिक्षक कल्पनाशून्य आहेत. ते सदोदित आर्थिक विवंचनेने ग्रासलेले आहेत. ज्यांच्या ठिकाणी जीवनशक्तीचा अभाव असेल, त्यांच्या डोक्यात ज्ञानाची ज्योत कुठून तेवत राहणार? यामुळेच देशातील आजचा बालक निस्तेज, निष्प्राण आणि प्रेमरहित दिसतो. हे आपल्या देशाचं खरोखरच दुर्भाग्य आहे!

मी भावनावश होऊन बोलत होतो. माझा एक एक शब्द श्रोत्यांच्या थेट हृदया-पर्यंत जाऊन भिडत असल्याची मला जाणीव होती. ते एकाग्रचित्ताने माझं बोलणं ऐकत होते. त्यांचे डोळे माझ्यावर खिळले होते. माझं भाषण ऐकत असतानाच, हा गृहस्थ कोण आहे, असाही विचार त्यांना पडला असेल. ह्याला आपण पूर्वी कधी बघितलं नाही, कधी याचं भाषण ऐकलं नाही. ह्याचा फोटो कधी वृत्तपत्रांत पाहिला नाही. वर्तमानपत्रात कधी याचं भाषण प्रसिद्ध झालं नाही. ह्याचं बोलणं परिणामकारक आहे, याचे विचार अत्यंत मौलिक आहेत. भाषण तर दिलं. परंतु आता मला स्वतःचीच काळजी वाटू लागली. माझ्या मनात एकप्रकारची भीती निर्माण झाली. माझी एकूण स्थिती जंगलातल्या त्या सिंहासारखी झाली होती. सिंहाला भरपूर शिकार मिळाल्यामुळे त्याने यथेच्छ मांसभक्षण केलं, रक्तप्राशन केलं आणि त्या आनंदात त्यानं मोठमोठ्यानं गर्जना देऊन सगळ्या जंगलाचा थरकाप उडवून दिला. सिंह यानंतर लगेच आपल्या देहाचा संकोच करून कुठंतरी झाडीत पडून राहतो कारण शिकाऱ्यांच्या हाती आपण पडू की काय अशी त्याला भीती असते. शिकाऱ्याची गोळी लागायला नको! मीही आपलं सर्व काही आवरून तिथून पळून कसं जाता येईल ह्याचा विचार करू लागलो. परंतु सुटका कशी करून घ्यायची? तिथं जेवढे जहागिर-दार जमा झाले होते, ते सर्वजण मला त्यांच्या गावी येण्याचं आमंत्रण देत होते. माझा होकार मिळवीत होते. मोहनसिंहांनी तर उदयपूरच्या शाळा-शाळांतून माझे कार्यक्रम सुद्धा निश्चित केले होते.

दुसऱ्या दिवशी राजे अमरसिंह स्वतः माझ्या खोलीत आले. दहा दिवसपर्यंत तुम्ही मौनव्रत का बरे पाळलंत? असं त्यांनी विचारलं. मी गंभीर चेहरा करून म्हणालो, आपण आला नाहीत अथवा मलाही बोलावणं पाठवलं नाही. मी आपला स्वतःच्या कामात मग्न होतो. माझी जिथं आवश्यकता नसते, तिथं मी स्वतःहून जात नाही. आपला चेहरा दुःखी-कष्टी करून ते म्हणाले "माझी तर अशीच समजूत होती की इतर साधु-संन्याशांप्रमाणे तुम्ही राजद्वारी याल आणि आपले आशीर्वाद द्याल. मला आपली सेवा करण्याची संधीही द्याल. परंतु आपण निराळ्याच प्रकारचे संन्याशी दिसता! आपण जी जागा निवडाल तिथं आपल्यासाठी आश्रम तयार करण्यात येईल. आपण तिथं राहा आणि आम्हाला आज्ञा करा."

करेडा गावात एक साध्वी स्त्री होती. ती विधवा बनल्यामुळे तारुण्यातच तिच्या मनात विरक्ती उत्पन्न झाली. तिनं तपाचरणाचा अंगिकार केला. तिनंही माझ्या भाषणाची हकीकत ऐकली होती. तिनं मोठ्या आस्थेनं मला भोजनाचं निमंत्रण दिलं. जीवनात पहिल्यांदाच मी एका विधवा स्त्रीकडे भोजनासाठी जात होतो. ती माझी वाट बघत होती. मी तिच्याकडे जाऊन पोचताच, ती पाण्याचा तांब्या घेऊन आली.

तिनं माझ्या हातावर पाणी घातलं. हात धुवून होताच मी तिच्या हातातील तांब्या घेऊन पाय धुण्याचा प्रयत्न करू लागलो. पाय धुवून मगच भोजनास जाण्याची हिंदूंची पद्धत आहे. ती आता याचक बनून माझ्या पुढ्यात उभी राहिली व मला म्हणाली—" भोजन करण्यापूर्वी माझी एक विनंती आपण स्वीकारा. आपलं चरणामृत घ्यावयाची माझी इच्छा आहे."

अशा प्रकारचा विचार देखील क्रांतिकारकाला सहन होणारा नसतो. मी मोठ्या प्रेमानं तिला समजावण्याचा प्रयत्न केला. पण ती आपल्या निश्चयावर ठाम होती शेवटी मी तिला म्हणालो की तुम्ही स्वतः तपाचरण करता, मीही माझ्या परीनं तपाचरण करतो आहे, आपण दोघेही एकाच मार्गाचे प्रवासी आहोत. वयाच्या दृष्टीने मी तुमच्या पित्यासमान आहे. तुम्ही मला असं सांगा की एखादा तरुण तुमच्याकडे येऊन असंच चरणामृत-तीर्थ तुम्हाला मागू लागला तर तुम्हाला काय बरं वाटेल ? तुम्ही हे मान्य कराल काय ? माझ्या या प्रश्नानी मग ती गप्पच झाली. ती एक तपस्विनी विधवा होती तिला कुठून कसला अधिकार की तिच्याकडे आलेल्या संन्याशाच्या बगलेत अठरा गोळ्या भरलेलं पिस्तूल लटकावलेलं आहे.

आता तिन्ही बाजूंनी माझ्याकडे लोकांची रीघ सुरू झाली. मोहनसिंहांमुळे धनिक वर्ग, माझ्या दोन शिष्यांमुळे देशभक्त आणि विधवा तपस्विनीमुळे स्त्रिया ; त्या ठिकाणी व्याख्यान देऊन मी संकटाला आमंत्रण देऊन बसलो होतो. माझ्या गुप्त जीवनात मोह, माया आणि ममता यात मी गुरफटला जाऊ लागलो. मोह, माया आणि ममता ही गुप्त जीवनातील प्रलोभनं कुणालाच एकदम झुगारता येत नाहीत. हे पाश तोडणं कठीणच असते. ही बन्धनं एका क्षणातच तोडावी लागतात. रात्रीच्या वेळी मी ठरवून टाकलं की उद्या आपण येथून पळून जायचं. सकाळ झाली, मी उठून स्नान वगैरे आटोपलं, कांबळी-कमंडलू, व्याघ्राम्बर आणि दंड हे सर्व घेऊन घराबाहेर पडलो बघणाऱ्यांना वाटलं की मी ते स्थान सोडून अन्य ठिकाणी जात आहे. वसतिगृहातील विद्यार्थ्यांनी माझ्या भोवती वेढाच घातला. मी कुठे निघालो, हे ते जाणून घेऊ इच्छित होते. त्यांच्या निष्पाप डोळ्यातून ही भावना ओसंडत होती. मी त्यांच्यातलाच एक होऊन त्यांच्या समवेत राहत असे आणि तेही मला आपलाच मानत. एवढ्यात माझे ते देशप्रेमी तरुण मित्रही तिथं येऊन पोचले. त्या विधवा साध्वीलाही मी निघाल्याचं समजलं स्वतः राजेसाहेबही येऊन थडकले. ते म्हणाले— "आता आता तर आम्हाला आपली खरी ओळख होऊ लागली होती. आपण आमच्या सर्वांच्या मनात एक निराळी भावना निर्माण केली होती. आमच्या ठिकाणी आपण देशप्रेम उत्पन्न केलं होतं. या मार्गाने जाण्याची ओढच आमच्या ठिकाणी आपणच निर्माण केली. आम्ही त्या मार्गानं जायला तयारही आहोत परंतु वाटचाल करताना मार्ग चुकला तर मग आमचं काय होईल ?"

ते दोघे तरुण एखाद्या दगडी मूर्तीप्रमाणे निश्चल उभे होते. त्यांना माझं गुपित माहीत होतं. माझ्या भोवती कोणत्या प्रकारची संकटं उभी आहेत, हे त्यांना पूर्णपणे माहीत होतं. त्यांच्या मनातली वेदना कुणालाच समजण्यासारखी नव्हती. ती तरुण विधवा स्त्री लोकलज्जेखातर लांब अंतरावर उभी होती. मी माझी दुर्बलता झाकण्यासाठी एका निर्लेप साधूच्या आविर्भावात त्यांच्यासमोर उभा होतो. त्या सगळ्यां व्यथित लोकांना एकत्रित संबोधून मी म्हणालो—"गेले काही दिवस मी आपल्यापैकीच एक समजून इथं राहिलो. तुमच्या सर्वांच्या प्रेमानं मी पार ओलावून गेलो आहे. मी मोह, माया आणि ममतेच्या बन्धनात गुरफटत चाललो आहे, असं मला वाटायला लागलं आहे. योगी पुरुष जोपर्यंत चालत राहतात आणि पाणी वाहत राहतं तोपर्यंतच निर्मळ राहतात. मला आपणा सर्वांचं प्रेम लाभलं आहे. विश्वास लाभला आहे. आपणा सर्वांना याची कल्पना आहेच की मी एक योगी आणि साधक आहे. माझी निर्लेप वृत्ती सांभाळणं, हे माझं कर्तव्यच आहे. माझ्यासारख्या साधकानं आपल्याच मार्गानं जावं असंच आपणास वाटत असेल तर कृपा करून माझा मार्ग अडवू नका. मला माझ्या मार्गानं जाण्याची अनुमती द्या. भावनाविवश बनून तेही माझ्याशी बोलले. परंतु शेवटी माझं बोलणं ऐकून ते सर्व शांत झाले. मी त्यांचा निरोप घेतला. गावाच्या सीमेपर्यंत ते मला पोचवायला आले आणि मग ते सर्वजण मागे परतले. ते दोन तरुण मात्र गुपचूप माझ्या बरोबर बराच वेळ चालत राहिले. मग मी त्यानाही हातानं थांबण्याची खूण केली व तेही थांबले. भिजलेल्या डोळ्यांनी आम्ही एकमेकांकडे बघितलं. ते बराच वेळ आपल्या ठिकाणी उभे राहून माझ्याकडे बघत होते. मी हळूहळू त्यांच्यापासून दूर जात होतो.

तरुणपणी मी भाटांच्याकडून हळदीघाटासंबंधी बरंच ऐकलेलं होतं. भाटांची कवनं ऐकताना प्रत्येक वेळी असा विचार मनात यायचा की पूर्वजांनी धार्मिक भावनेतून आणि आत्मसन्मानाच्या आणि देशाच्या रक्षणाच्या कल्पनेतून जिथं आपलं रक्त सांडलेलं आहे आणि स्त्रियांनी आपलं शील सांभाळण्यासाठी 'जोहार' करून आत्माहुती दिल्या आहेत, ती धरणी खरोखरच पुण्यभूमी आहे. या भूमीमधून जे अन्न निपजतं, इथून जे पाणी वाहतं आणि या भूमिवरून जो वारा वाहतो—या सर्वांचं सेवन केलंच पाहिजे. मी एका अज्ञातात प्रवेश करत होतो. ज्या मार्गाने पूर्वज गेलेले होते त्याच मार्गावरून माझाही प्रवास चाललेला होता. या मुळेच हळदीघाटात पोचून तिथल्या वातावरणात थोडा वेळ घालवून आपणही पावन व्हावं, असं मी मनाशी ठरवलं.

## नाथद्वार आणि भूरीबाई

मी हळदीघाटाच्या दिशेने निघालो. रस्त्यात एक मोठं वैष्णवांचं तीर्थधाम लागतं. त्याचं नाव आहे, नाथद्वार. हे श्रीमंतांचं तीर्थक्षेत्र आहे. इथं एक भव्य मंदिर आहे. साधुसंतांच्या निवासासाठी उत्तम निवासस्थानं बांधलेली आहेत. मंदिरात जो काही

भोग म्हणून अर्पण केला जातो तो सर्व साधु-संतांना प्रसाद म्हणून वाटून टाकण्यात येतो. पांढरी डाळ आणि काळी रोटी (खीर आणि मालपुवा) यांचा भरमार करण्यात येतो. धर्मशाळेतील महन्तानं मला एक खोली राहण्यासाठी दिली.

सायंकाळची वेळ होती. नाथांचं द्वार उघडलं जाणार होतं. द्वार उघडण्यापूर्वीच तिथं हजारो लोकांची गर्दी जमा होते. सर्वच यात्रेकरू रेटारेटी करत आपल्याला पहिल्यानं दर्शन घेता यावं म्हणून धडपड करतात. प्रसंगी एकमेकांना ढकलून, खाली पाडून ते पुढे जायचा प्रयत्न करतात. मंदिराचा सेवकवर्ग आणि पुजारी काठ्यांचा वापर करून गर्दीचं नियंत्रण करण्याचा प्रयत्न करतात. वृद्धांना आणि बालकांनाही ते वापर करतात.

देव-दर्शन घ्यायची माझीही इच्छा होती. श्रद्धावान भक्त मंडळी भावनाविवश होऊन तिथं वागताना बघून मला फार दुःख वाटलं. माझा चेहरा त्या दुःखानं व्याकूळ बनला. पडलेल्या चेहऱ्यानं मी बाजूला उभा राहिलो. एका पुजाऱ्याची दृष्टी माझ्यावर पडली. त्यानं सेवकाला खूण करून माझ्यासाठी पुढच्या भागात जागा राखून ठेवायला सांगितले. मी हात जोडून त्यांना म्हणालो की मला सर्वांचं दर्शन घडलेलं आहे.

मी साधूचा वेष परिधान केला होता परंतु मी अजूनपर्यंत कुणाची दीक्षा घेतलेली नव्हती. साधू-संत आपल्या भक्तांना कुठल्या प्रकारे वागवतात आणि कसलं शिक्षण देतात, हे सर्वांना माहीतच आहे. दोन दिवसांनंतर लोकांना धर्मशाळेत एक वेगळाच योगी पुरुष आला आहे, असं समजलं. काही सुशिक्षित मंडळी येऊ लागली. त्यात दोन भाविक वकीलही होते. आमचं थोडंफार बोलणं झालं. सायंकाळी एक कुलीन स्त्री दर्शनासाठी आली. तिच्या अंगावर पांढरी शुभ्र वस्त्रं होती. तिच्या चेहऱ्यावरून भक्तिभाव ओसंडत होता. तिच्या समवेत आणखी चार तरुण स्त्रिया होत्या. एक वकीलही त्यांच्या समवेत होता. तो मला म्हणाला " माता भूरीबाई आपणास त्यांच्या आश्रमात घेऊन जाण्यासाठी आल्या आहेत. कृपा करून त्यांची विनंती आपण स्वीकारा." त्यांची इच्छा पूर्ण करण्याचा मला संकोच वाटू लागला. ममतेचा एक पाश मी नुकताच तोडला होता. पुन्हा नवा पाश समोर दिसू लागला. मी उठलो आणि त्यांच्या समवेत निघालो.

भूरीबाईंना नाथद्वारमध्ये फारच आदराचं स्थान होतं. त्यांनी आदरपूर्वक माझं त्यांच्या आश्रमात स्वागत केलं. मला आसनावर नेऊन बसवलं. सर्वांना आदरणीय वाटणारी व्यक्ती जेव्हा दुसऱ्या एखाद्या व्यक्तीचा आदर, सन्मान करते, तेव्हा सर्वांच्या ठिकाणी त्या व्यक्तीविषयी आदरभाव निर्माण होतो. मी स्वतःकडे बघत होतो आणि परमेश्वराच्या भक्तीनं लीन बनलेल्या भक्तांच्या समुदायाकडेही बघत होतो. मी जे काही संग घेऊन बाहेर होतो त्यासंबंधी अनेक विचार माझ्या मनात उसळत होते. ते सर्व ईश्वर भक्तीत तल्लीन होते आणि मी माझ्या कार्यात लीन झालो होतो. मी तसा पूर्णपणे सावध

होतो. साध्वी भूरीबाई आणि त्यांचे अन्य साथीदार परमेश्वराच्या दरबारात याचक म्हणून उभे होते. भक्तांचं दान मागत होते. आणि मी एका दानी व्यक्तीच्या रूपात उभा होतो, ज्यानं आपल्या देशासाठी जीवनदान केलेलं होतं. त्या लोकांच्या डोळ्यात कल्याणाची अपेक्षा होती आणि माझ्या डोळ्यासमोर भगतसिंह, चन्द्रशेखर आजाद आणि धन्वंतरी या तिघांच्या मूर्ती उभ्या राहत होत्या.

अशाच पद्धतीनं मी तिथं पंधरा दिवस राहिलो. माझ्यासाठी हा एक साधनेचाच काळ होता. परंतु एकदा मोह-मायेचे पाश तोडण्याचा निश्चय करावा लागला. माझी समस्या गुंतागुंतीची झाली होती. एक तपस्विनी साध्वी स्त्री माझी सेवा करत होती. राजकीय वातावरणापासून मी संपूर्णपणे बाजूला सरलो होतो. शेवटी मी नाथद्वार येथील प्रलोभनं झटकून टाकली आणि हळदी घाटाच्या दिशेने निघालो.

साध्वी भूरीबाईच्या आश्रमात मी फार काळ टिकू शकलो नाही. त्यांच्या स्नेहपूर्ण, निर्मळ आणि साधुत्वाच्या भावनांनी माझ्यावर फारच परिणाम केला होता. त्यांच्याविषयी माझ्या मनात एक विशेष असं स्थान निर्माण झालं होतं. त्यांची आठवण मी कधीच विसरू शकलो नाही. अनेक वर्षांपर्यंत माझ्या मनात ही इच्छा होती की आपण त्यांच्या दर्शनासाठी जाऊन त्यांची क्षमा मागावी. साधूचा वेष धारण करून मी त्यांची फसवणूक केली, हे कबूल करून, दिलगिरी व्यक्त करावी !

१० जुलै १९६३ रोजी मला राजस्थानच्या दौऱ्यावर जाण्याची संधी मिळाली. भूरीबाई ज्यांना त्यांचे भक्त महात्माबाई म्हणून संबोधितात, त्यांच्याकडे जाऊन मी त्यांचं दर्शन घेतलं. महात्माबाई नाथद्वाराजवळच सरदारगड येथे आपल्या पित्याच्या घरी राहतात.

## हळदीघाट आणि उदयपूर

नाथद्वाराहून निघून मी हळदीघाटाच्या रस्त्याने चालू लागलो. वाटेत एका साधूच्या इथे थांबलो. दुसऱ्या दिवशी राजस्थानची पुण्यभूमी हळदी घाटाचं दर्शन घेतलं. हळदी-घाटाच्या भोवताली जंगल प्रदेश आहे. छोट्या-छोट्या पहाडांतून रस्ता जातो. तेथली माती पिवळ्या रंगाची आहे, हळदी सारखी आहे. राणा प्रतापच्या घोड्याची समाधी जिथं आहे, त्या ठिकाणी मी गेलो. राणा प्रतापचा "चेतक" हा घोडा आपल्या मालकावर किती प्रेम करत होता, तो किती इमानदार होता आणि मालकाच्या इशाऱ्यावर आपला प्राण द्यायला तो कसा तयार असायचा, ही सर्वच कथा मोठी अद्भुत आहे. इतिहासात असं दुसरं उदाहरण दाखवणं कठीण आहे. महाराणा प्रतापांनी आपल्या "चेतक" या प्रतापी घोड्याचं स्मारक उभं केलं होतं. जवळच निर्मळ पाण्याचा ओढा वाहतो. स्मारकाभोवती प्रशस्त मैदान आहे. सगळं मैदान हिरवळीनं भरलेलं आहे. मी

अंतर्मुख होऊन त्या हिरवळीवर विचार करत बसलो. तीन तास मी हाच विचार करत राहिलो की आपल्या पूर्वजांनी आपल्या अब्रूसाठी, आपल्या स्वाभिमानासाठी काय काय केलं आणि त्यांना काय काय सहन करावं लागलं.

देशसेवेचा माझा निर्धार अधिकच दृढ झाला. मला या ठिकाणी प्रेरणा मिळाली. नवं बळ मिळालं. त्या स्थळाची आजही आठवण झाली की माझं मन भरावून जातं.

हळदीघाटामधून मी उदयपूरला पोचलो. उदयपूरचे भव्य महाल बघितले. महाराणाजी चिलखत घालून लढाई करत त्यांचे ते पोलादी पोशाख बघितले. त्यांचे लोखंडी पोशाख आणि भाल्यांचं वजन बघून ते वीर पुरुष किती बलवान असतील, याचा मी विचार करू लागलो.

उदयपूरमध्ये मी पुष्कळ फिरलो. तिथलं उद्यान सुंदर होतं. उद्यानात इंग्रजांचे पुतळे उभे करण्यात आले होते. त्या सुंदर उद्यानातून मला कुठेही महाराणांची मूर्ती आढळली नाही. इंग्रजांचे दास्यानुदास झालेले लोक किती पतित बनले आहेत, हा विचार माझ्या मनात आला. माणूस किती महान बनू शकतो तसाच तो किती क्षुद्रही बनू शकतो, ह्याची तुलना माझं मन करू लागलं. जी माणसं स्वतःची बन्धनं पाळून जीवन जगतात, त्यांचंच जीवन धन्य मानलं जातं. दुसऱ्याच्या बन्धनात राहून जीवन जगणं ह्याला काय जीवन म्हणायचं? इकबाल कवीनं म्हटलं आहे—

"ऐ तायरे लाहूती, उस रिजकसे मौत अच्छी।
जिस रिजक से आती हो, परवाज में कोताही"।।

[हे ब्रह्मलोकापर्यंत उडू शकणाऱ्या पांखरा (गरुड) नुसतं अन्न भक्षण करून जिवंत राहण्यापेक्षा मरण चांगलं. ज्या अन्नामुळे पंखातलं बळ संपतं—ते अन्न कशासाठी?]

मी कांग्रेस अधिवेशनासाठी कराचीला पोचायचा निश्चय केला होता. तिथं पोचल्यानंतर क्रांतिकारकांच्या आणि देशाच्या अनेक नेत्यांच्या भेटी घेता येतील असा विचार मनाशी होता. मी कराचीच्या दिशेनं निघालो. पंधरा दिवस पायी चालतच प्रवास केला. एक रात्र रेल्वेनंही प्रवास केला.

प्रवासामध्ये नाणखारला माझी सेवा केलेल्या भूरीबाईंची आठवण होत होती. मी त्यांना एक पत्र लिहिलं. "मी मनिऑर्डरने आपणाकडे पन्नास रुपये पाठवत आहे. ही एका भक्तातर्फे भेट म्हणून स्वीकारावी. मला कुठल्याही मायेचे पाश नकोत. आपल्या आश्रमात अनेक साधुसंत येतातच. माझी ही भेट आपण स्वीकारावी."

• • •

कराची येथील काँग्रेस नगरात जाणं हे अत्यंत धोक्याचं होतं याची मला पुरेपूर कल्पना होती. सरदार भगतसिंह आणि त्यांच्या सहकाऱ्यांना फाशी देण्यात येऊ नये यासाठी हिन्दुस्थानातील सर्व तरुण आणि देशप्रेमी ठिकठिकाणी आंदोलन करत होते. तरुणांचे अनेक नेते कराचीला एकत्रित होऊन राष्ट्रीय नेत्यांच्यावर दबाव टाकण्याच्या प्रयत्नात होते. अशा नाजुक वेळेला हिन्दुस्थान सरकारचे गुप्तचर देखील डोळ्यात तेल घालून तिथं वावरत होते. कुणीही क्रांतिकारक आपल्या नजरेतून सुटू नये, असाच त्यांचा प्रयत्न होता.

माझी छायाचित्रं सर्वत्र लावण्यात आली होती. मला पकडण्यासाठी बक्षीसही लावलेलं होतं. जिवंत हाती सापडलो नाही तर सरळ गोळी घालून ठार करण्याच्याही सूचना होत्या. अशा परिस्थितीत क्रांतिकारकांशी संपर्क ठेवणं किंवा पुढाऱ्यांच्या भेटी-गाठी घेणं म्हणजे तलवारीच्या धारेवरून चालण्यासारखं होतं. मी गोळ्यांच्या मैदानात उतरलो होतो. मृत्यू, गोळी अथवा धरपकड यापैकी कशाचीच मला भीती नव्हती. हिंदुस्थान सरकारच्या शिकारी कुत्र्यांना चुकवून आपल्या सहाय्य-कर्त्यांशी संपर्क साधणं हेच माझ्या जीवनाचं सार्थक होतं, असंच माझं मन मला सांगत होतं. माझ्या डोळ्यांपुढं दोन उद्दिष्टं होती—भगतसिंहाच्या सुटकेच्या आंदोलनाला अधिक गतिमान बनवणं हे एक आणि पक्षाच्या आज्ञेनुसार भारताबाहेर जाऊन स्वातंत्र्यप्राप्तीसाठी यशस्वी आंदोलन उभारण्याची योजना आखणे, आवश्यक त्या साधनांनी योजनेची यशस्वी अंमलबजावणी करणे, हे दुसरं.

इ. स. १९३१ मधील काँग्रेसचं कराची अधिवेशन निराळ्याच प्रकारचं होतं, सरदार भगतसिंह, राजगुरू आणि सुखदेव यांच्या फाशीच्या शिक्षेमुळं सर्व भारतीयांची हृदयं हेलावून गेली होती. भारतभरचे क्रांतिकारी आणि उत्साही तरुण मोठ्या संख्येनं या अधिवेशनाला आलेले होते. गदर पार्टीचे जुने व अनुभवी कार्यकर्तेही स्वतःला या पासून अलिप्त ठेवू शकले नाहीत. पंधरा वर्षांची सक्त मजुरीची शिक्षा भोगून ते पतंगाप्रमाणे देशाच्या यज्ञवेदीवर आपली आहुती देण्यासाठी झेपावले होते. त्यांच्या आवेश आणि उदात्त भावनांनी मी खूपच प्रभावित झालो होतो. देशभरच्या क्रांतिप्रिय तरुणांनी काँग्रेस अधिवेशनाचं वातावरण चांगलंच तापवलं होतं. काँग्रेसची कार्यकारिणी आणि महात्मा गांधी यांना दुःख वाटत होतं. सत्य आणि

अहिंसेच्या सिद्धान्तांनी ते बांधले गेले होते. त्यांनी इंग्रजांशी समझोता केलेला होता. सर्व देशातून एकच मागणी करण्यात येत होती की भगतसिंह आणि त्यांच्या साथीदारांना सोडून देण्यात यावं, त्यांना वाचवण्यात यावं. परंतु देशभरचे महान नेते जे देशाला इंग्रजांच्या गुलामीतून मुक्त करू इच्छित होते, हे नेते भारतमातेच्या या तीन सुपुत्रांना फाशीच्या विळख्यातून वाचवू शकले नव्हते!

जेव्हा सरदार भगतसिंहाचे वडील सरदार किशनसिंह आणि काही तरुण क्रांतिकारक भगतसिंह आणि त्यांच्या साथीदारांच्या दहनानंतरच्या अस्थी घेऊन कराचीला येऊन पोचले आणि त्यांच्या दहनाची बातमी जेव्हा त्यांनी सांगितली, तेव्हा लोकांच्या मनात आग भडकली. इंग्रजी राजवटीबद्दल सर्वांना तिरस्कार निर्माण झाला. काही क्रांतिकारकांनी महात्मा गांधींच्या पुढे येऊन त्यांना 'काळी फुलं' दिली तेव्हा बापू म्हणाले—"मला काळी फुलं कशासाठी दाखवता? भगतसिंहाच्या मृत्यूचा घाव माझ्या मनातही खोलवर झालेला आहे". भारतीय तरुणांच्या मनात जी आग भडकली होती, ती शांत करण्यासाठी अधिवेशनात एक ठराव संमत करण्यात आला. या ठरावात सरदार भगतसिंहाच्या आदर्श जीवनाची खूप प्रशंसा करण्यात आली.

ज्या उद्दिष्टपूर्तीसाठी एवढे कष्ट सोसून मी कराचीला येऊन पोचलो होतो, त्या दृष्टीने यथाशक्ती सर्व काही करणं आवश्यक होतं. श्री. बुलसु साम्बमूर्ती, लाला दुनीचंद, अंबाला आणि श्री. पुनय्या यांच्या मदतीनं, आपल्या उद्दिष्टपूर्तीसाठी कांग्रेस अधिवेशनाला आलेल्या अन्य क्रांतिकारकांशी संपर्क निर्माण झाला. कॉंग्रेसनगरच्या एका राहुटीत आम्ही सर्व एकत्रित जमलो. माझे सर्व जुने, वयस्कर साथी बाबा सोहनसिंह भकना, बाबा प्यारासिंह, बाबा गुरुमुखसिंह यांचाही त्यात समावेश होता. इतर क्रांतिकारकांची नावं मला माहीत नव्हती. माझा त्यांच्याशी परिचय नव्हता. त्या सुमाराच्या अनेक गुंतागुंतीच्या समस्यांवर आमची चर्चा चालू असतानाच माझे एक जुने परिचित साथी श्री. ए. कामेश्वरराव तिथं येऊन पोचले. हजर असलेल्या सर्वांवर दृष्टी टाकून ते माझ्यापाशी येऊन बसले आणि माझ्या कानाशी लागून एका व्यक्तीचा निर्देश करून म्हणाले की तो माणूस सरकारचा गुप्तचर आहे. हे ऐकताच माझ्या चेहऱ्याचा रंग बदलला आणि त्याच सुमारास त्या गुप्तचराची माझ्यावर नजर खिळली. मीही एकटक त्याच्याकडे बघू लागलो. शेवटी त्यानं आपली दृष्टी अन्यत्र वळवली. तो जागेवरून उठला व हळूच तंबूबाहेर निसटला. ही चर्चा करत बसण्याची वेळ नव्हती. तावडतोब तिथून निघून जाण्याचा इशारा मिळाला आणि सर्वजण बघता बघता तेथून पसार झाले. मी आणि माझे दोन परिचित साथीदार तिथंच बसून राहिलो. आमच्या समवेत आन्ध्रप्रदेशचे

क्रांतिकारकांविषयी सहानुभूती बाळगणारे श्री. बुलसु साम्बमूर्तीही थांबले होते. श्री. बुलसु साम्बमूर्ती आपला वकिलीचा व्यवसाय सोडून काँग्रेसमध्ये शामील झाल्यापासून डोक्यावर चादर पांघरून वावरत असत. त्यांच्यासारख्या तपस्वी माणसानं भयभीत होऊन तंबूबाहेर पळ काढणं शक्यच नव्हतं. मला त्यांच्याशी काही चर्चा करावयाची होती. चर्चा केल्याशिवाय मीही तिथून निघालो नाही. एवढ्यात तीन माणसं तंबूमध्ये शिरली. त्यांच्या अंगावर पोलिसांचा गणवेष नव्हता, त्यांच्यापाशी काही शस्त्रही दिसत नव्हती. तो गुप्तचर तंबूबाहेर पडू लागला तेव्हाच माझी बोटे खिशातील पिस्तुलाच्या ट्रिगरवर पोचली होती. त्या तीन नवख्या लोकांनी आमच्यावर दृष्टी फिरवली तेव्हा डोक्यावर चादर पांघरलेली व्यक्तीच आमची प्रमुख असली पाहिजे असा त्यांनी अंदाज बांधला. शिकार आपल्या तावडीत सापडली आहे, अशी त्यांची समजूत झाली. ते तिघे त्यांच्या भोवती उभे राहिले व दरडावून विचारू लागले की तुम्ही कोण आहात ? कुठून आलात? काय नाव आहे तुमचं? त्यांच्या या प्रश्नांच्या भडिमारानं काँग्रेस कार्यकारिणीचे सदस्य असलेले श्री. साम्बमूर्ती चांगलेच संतापले आणि हेच प्रश्न तितक्याच जोरात त्यांनी त्या तिघांना विचारले. मी हा सर्व तमाशा शांतचित्तानं बघत होतो. शिकार आपल्या तावडीत सापडली आहे, अशी पोलिसांची खरोखरच खात्री पटलेली होती? मी आणि माझे अन्य दोन साथीदार जागेवरून उठलो व तंबूच्या बाहेर आलो. श्री. बुलसु साम्बमूर्ती यांनाही आता थांबण्यात स्वारस्य राहिलेलं नव्हतं. तेही उठून तिथून निघाले. कार्यकारिणीच्या बैठकीची जिथं व्यवस्था केली होती, तिथं ते गेले. ते तिघेजण त्यांच्या समवेतच होते. दारावर काँग्रेसच्या स्वयंसेवकांनी त्या तिघांना अडवलं व त्यांना आत जायला मनाई केली. त्यांनी चादर पांघरलेली ही व्यक्ती कोण आहे, असं स्वयंसेवकांना विचारलं. आपण जिला शिकार समजत होतो, ती व्यक्ती आन्ध्रप्रदेशातील काँग्रेसचे एक महान नेते आहेत, हे समजताच त्या तिघांची किती घोर निराशा झाली असेल याची कल्पना करता येईल. पोलिसांनी क्रांतिकारकांच्या बैठकीवर जो छापा घातला होता, त्याचा वृत्तांत त्यांनी काय दिला असेल, याचाही अंदाज करता येतो.

जेव्हा भगतसिंह, राजगुरू आणि सुखदेव यांची फाशी अंमलात आली होती, त्या सुमारास ही घटना घडली होती. याच सुमारास श्री. चन्द्रशेखर आजादांनी अलहाबादेतील एका उद्यानात हौतात्म्य स्वीकारलं होतं आणि आपल्या क्रांतिकारी जीवनाचं सर्वांना दर्शन घडवलं होतं. हिन्दुस्थानातील अनेक क्रांतिकारक काँग्रेस अधिवेशनाला एवढ्याचसाठी आले होते की यापुढे आपण कोणता मार्ग स्वीकारावा?

विचारविनिमय करून त्यांना निर्णय घ्यायचा होता. सरकारची गुप्तपोलिस यंत्रणा परिस्थितीचा अंदाज घेत होती. अशी परिस्थिती असतानाही कुठल्याही आडकाठीशिवाय क्रांतिकारक एका तंबूमध्ये एकत्रित होऊ शकत होते, चर्चा आणि विचारविनिमय करू शकत होते, कुठल्याही अडथळ्याशिवाय तिथून बाहेर निसटू शकत होते. देशाचं एकूण वातावरण कसं बदलत चाललं होतं, हे यावरून स्पष्ट होऊ शकतं. भारतातील क्रांतिकारक सरकारबरोबर सामना करायला किती उत्सुक होते, हेही ध्यानात येऊ शकतं.

## महन्ताची कामगिरी !

कराचीला पोचताच सरकारच्या गुप्त पोलिसांचा सर्वत्र संचार चालू आहे, हे माझ्या तात्काळ लक्षात आलं. एका क्रांतिकारकाकडून अशा परिस्थितीत एखाद्या देवळात आश्रय घेणं भाग होतं. कॉंग्रेसचं अधिवेशन एका विशाल मैदानात भरलेलं होतं. तिथं जमा झालेल्या नेत्यांशी कशाप्रकारे संपर्क साधता येईल, या दृष्टीने मी तिथलं निरीक्षण केलं होतं. कॉंग्रेसनगरच्या जवळ एका मैलाच्या अंतरावर देवीचं एक भव्य मंदिर होतं. मी त्या मंदिरात जाऊन पोचलो. त्या मंदिरातील महन्ताचं दर्शन घेतलं आणि मी तिथं काही काळ विश्रांतीसाठी थांबण्याची इच्छा त्यांच्यापाशी व्यक्त केली. महन्तानं माझं रंग-रूप बघून तिथं मला राहण्या-साठी एक खोली दिली. आपलं सर्व सामान खोलीत ठेवून रात्री मी कॉंग्रेस अधिवेशनाला गेलो. आन्ध्रप्रदेशचे विख्यात नेते श्री. बुलसु साम्बमूर्ती यांची माझी गाठ-भेट झाली. त्यांच्यामार्फत तिथं आलेल्या अन्य क्रांतिकारकांशी मला संपर्क प्रस्थापित करता आला. थोडीफार चर्चा झाल्यानंतर असं ठरवण्यात आलं की माझी थांबण्याची व्यवस्था 'सिंध ऑब्झर्व्हर'चे संपादक श्री. पुनय्या यांच्याकडे करण्यात यावी. श्री. बुलसु साम्बमूर्ती कार घेऊन आले. तिथं थांबायला जाण्यापूर्वी आपण महन्तांचा निरोप घ्यावा, असा मी विचार केला. महन्त चांगले उंच व धिप्पाड बांध्याचे होते. मोठमोठे लोक त्यांच्या दर्शनासाठी येत. माझ्यापाशी साधूचा जो पोषाख होता, तो आता टाकूनच द्यायचा होता. या सर्व वस्तू आपण महन्तांनाच भेट म्हणून का बरं देऊ नयेत? असा विचार माझ्या मनात आला. रात्र बरीच झाली होती. महन्त त्यांच्या शेजारच्या खोलीत होते. मी खोलीच्या दारापाशी पोचलो आणि दारावर थाप मारणार एवढ्यात दार सताड उघडलं. खोलीच्या आतल्या बाजूस माझी दृष्टी वळली तेव्हा मला जे दृश्य दिसलं त्यानं माझ्या मनात विलक्षण घृणा व तिरस्कार उत्पन्न झाला. माझ्या सर्वांगाचा तिळपापड झाला. त्या दृश्याचं मी शब्दानं वर्णन करू शकत नाही. मी नेहमीच शत्रूशी सामना करण्याच्या तयारीत असे म्हणून आताही माझी बोट पिस्तुलच्या

चापावर होती. ते दृश्य बघून माझा हात पिस्तुलाकडे गेला. मनात उत्पन्न झालेला क्रोध आवरणं कठीण होतं. परंतु वेळच नाजूक असल्यामुळे मला विचार करणं भागच होतं. कराचीला येण्याचा माझा उद्देश हा काही एखाद्या पातक्याला शासन करण्याचा नव्हता. माझं उद्दिष्ट सर्वस्वी निराळं होतं. मी कृतज्ञता आणि श्रद्धा प्रकट करण्यासाठी महात्म्याकडे आलो होतो. परंतु भयंकर घृणा माझ्या मनात निर्माण झाली. त्या तिरिमिरीतच मी तेथून बाहेर पडलो.

इ. स. १९३१ साली देशातील राजकीय वातावरणात खूपच सनसनाटी निर्माण झाली होती. नागरिकांचे मूलभूत अधिकार काय असावेत, यासंबंधी काँग्रेसच्या अधिवेशनात ठराव मांडण्यात आला होता. याच ठरावात शेतकऱ्यांच्या आणि कामगारांच्या अधिकारांच्या रक्षणासंबंधीही सविस्तरपणे नोंद करण्यात आली होती.

काँग्रेसजनांच्या या वातावरणात माझ्यासाठी कोणतं कार्य आहे, याचा विचार करीत असतानाच मला एक संधी मिळाली. आन्ध्रप्रदेशाचे महान सेवक श्री. पुनय्या, जे 'सिंध ऑब्झर्व्हर' चे संपादक होते व लाला दुनीचंद यांच्या मध्यस्थीने मी खान अब्दुल गफार खानसाहेब यांच्या पाशी जाऊन पोचलो. त्यांना माझी ओळख करून देण्यात आली. मला त्यांनी काबूलपर्यंत पोचवण्याची व्यवस्था करावी, अशी त्यांना विनंती करण्यात आली.

भारतातील क्रांतिकारक सत्य आणि अहिंसेचे उपासक नव्हते. त्यांच्या देश-प्रेमाच्या वेडावर देशातील महान नेते फिदा होते आणि क्रांतिकारकही सत्य-अहिंसेचे व्रत घेतलेल्या लोकांविषयी आदरभाव बाळगून होते.

भारतातले सर्वोच्च गुप्तपोलिस अधिकारी कराचीमध्ये ठाण मांडून बसले होते. तुरुंगातून पळून आलेल्या फाशीवाल्या गुन्हेगारानं तिथं प्रवेश करणं आणि तेथून सही सलामत बाहेर पडणं खूपच धोक्याचं होतं. एका अर्थी हे प्राणाशीच खेळणं होतं.

● ● ●

खान अब्दुल गफ्फारखान यांच्या ही गोष्ट लक्षात आली की मी देशासाठी प्राणार्पण करायलाही तयार आहे. त्यांनी मला सुरक्षित ठिकाणी पोचवण्याचा विचार केला. मी खानसाहेबांसारखा लाल रंगाचा पठाणी वेष परिधान केला आणि त्यांच्या मेळाव्यात मिसळून गेलो. इंग्रज सरकारच्या कुणाही गुप्तहेराच्या स्वप्नात देखील असा विचार आला नसेल की मला अशा प्रकारे मदत करणारे लोक भेटले असतील आणि मी वेषांतर करून हिंदुस्थानच्या बाहेर जाण्याची योजना आखू शकेन. चंद्रशेखर आझादांनी मला जे पिस्तूल दिलं होतं ते मी कामेश्वररावांच्या हवाली केलं. श्री. दौलतसिंह जहागिरदारांनी मला जे व्याघ्रांबर दिलं होतं ते मी साम्बमूर्तींच्या हवाली केलं.

खान अब्दुल गफ्फारखानांनी मला डॉ. खानसाहेबांच्या मुलाच्या हवाली केलं. डॉक्टर साहेबांचा मुलगा चांगला शूर व देखणा होता. तो कॉलेजात शिकत होता. त्यानं मोठ्या शिताफीनं गुप्तचरांची नजर चुकवून मला सुरक्षितपणे तेथून नेण्याची व्यवस्था केली. आम्ही पेशावर स्टेशनवर उतरलो. लाल पोशाखातील इतर माणसं आपापल्या ठिकाणाकडे निघाली. डॉ. खानसाहेबांच्या मुलानं मला एका घोडागाडीत बसवलं आणि गाडी आपल्या घराकडे जलद गतीनं न्यायला सांगितलं. मी त्यांच्या घरी पोहचलो.

डॉ. खानसाहेबांच्या घरी आणखीही काही पाहुणे मंडळी थांबलेली होती. सगळ्यांच्या भोजनाची निवंत व्यवस्था होती आणि झोपायच्या खोल्या शेजारीच होत्या. सर्वांना "दुआ सलाम" करून बोलावं लागे. ते सर्वजण बहुशः पुश्तु मधून एक-मेकांशी बोलत होते. दहा दिवसांपर्यंत लाल पोशाखवाल्यांबरोबर राहिल्यामुळे मीही अनेक पुश्तु भाषेतील शब्द पाठ केले होते. मतलबाच्या गोष्टी समजणं किंवा समजावणं मला शक्य होऊ लागलं. एखादा मला अधिक बोलायला उद्युक्त करू लागला किंवा घसट वाढवू लागला की मी बहिरेपणाचं सोंग करी. एखादी गोष्ट मला समजली नाही म्हणजे मी कानाकडे हात नेऊन मला जरा कमी ऐकायला येतं असं खुणेने सांगे. ते मग जोरात बोलायचा प्रयत्न करत. एक-दोन वेळ आरडा-ओरडा करून शेवटी गप्प होत. माझ्या अगमबंतेवर व त्यांच्या भोळेपणावर मी मनातल्या मनात हसत राही. लोकांना वाटे, हा गृहस्थ बहिरा असल्यामुळे सदोदित हसत राहतो. याच्या डोक्यावरही परिणाम झालेला दिसतो. यामुळे लोकांना माझी कीवही वाटायची. बहिरेपणाचं माझं हे सोंग चांगलंच यशस्वी ठरलं.

सीमाप्रदेशात ब्रिटिश राजवटीचे हेर मोठ्या प्रमाणात होते. येथील तांबड्या रंगाचा पोषाख परिधान करणाऱ्या लोकांकडे या गुप्तचरांची विशेष दृष्टी होती. हे लोक त्यांच्या नजरेत खुपत होते. त्यांच्या संघटनांच्या आजुबाजुला आणि लोकांच्या मागेही गुप्तचरांचा ससेमिरा लागलेला असे. माझ्यावर मात्र त्यांची काकदृष्टी पडली नाही. क्रांतिकारी लोक सामान्यत: गरम डोक्याचे, खूप बडबड करणारे, तापट वृत्तीचे आणि छानछोकीचे भोक्ते असतात. हे गुप्तचर मलाही याच मापाने मोजत असले पाहिजेत. स्वाभाविकच मी त्यांच्या कसोटीवर उतरत नव्हतो. त्यांच्या तराजूत माझं पारडं हलकं ठरलं होतं. त्यामुळेच त्यांची दृष्टी माझ्यावर केंद्रित झाली नाही. दोन समान चतुर व्यक्तींची गाठ पडली म्हणजे जो अधिक कल्पक असतो त्याचाच विजय होतो. आपल्या प्रतिस्पर्ध्यावर तो मात करतो.

ब्रिटिश राजवटीतील मोठ्या पदावरील गुप्तचर अधिकारी निपुण आणि अनुभवी होते परंतु त्यांच्या हाताखालचे नोकर जे गल्लोगल्ली आणि रस्त्यावर टेहळणीचं काम करत ते केवळ पोटार्थी होते. धावपळ करून, एखाद्याचा पाठलाग करून गुप्ततेचा शोध घ्यायची तसदी ते घेत नसत. बुद्धिमान आणि अनुभवी अधिकारी आपली खुर्ची सोडून बाहेर पडत नसत. कुणाच्या घरी अथवा रस्त्यात शोध घ्यायची ते धडपड करत नसत.

तांबड्या पोषाखवाल्यांच्या छावणीत मी पाच दिवस राहिलो. त्यांच्या समवेत आगगाडीने प्रवास करून मी लाहोरपर्यंत जाऊन आलो. पेशावर येथे दहा दिवस थांबलो. मला कुणीही 'तुम्ही कोण आहात, व कुठे चाललात?' हा प्रश्न विचारला नाही. माझी कद-वस्त्र, बोलण्याची पद्धत, हसरा चेहरा व मनमिळाऊ स्वभाव यामुळे मी कुणी परका आहे हे कुणाच्या लक्षातच येत नव्हतं. ज्या माणसाचा चेहरा-मोहरा बोलणं-चालणं, पोषाख आणि वागणूक लोकांचं लक्ष आपल्याकडे खेचून घेत नाही, असा माणूस लोकांच्यात सहजपणे मिसळून जातो.

कराचीच्या काँग्रेस अधिवेशनानंतर खानसाहेब दुसऱ्या काही जरूरीच्या कामात गढून गेले त्यामुळं मला पेशावरला दहा दिवस थांबावं लागलं. ते परत आल्यानंतर मला त्यांनी त्यांच्या उतमंजई नावाच्या गावी पाठवून दिले. सीमा प्रदेशातील एखाद्या खेड्यात राहण्याचा प्रसंग यापूर्वी मी कधीच अनुभवला नव्हता. जवळपास एक महिना पठाणांच्या सहवासात काढावा लागल्यामुळे मीही पठाणच बनलो होतो. मला स्वतःलाही आपण त्यांच्यापैकीच एक आहोत, असंच वाटू लागलं.

खानसाहेबांनी पाकिस्तानचा प्रदेश आणि तिथल्या लोकांशी ज्याचा परिचय आहे असा एक मुलगा शोधून काढला. पाकिस्तानातील हाजी तुरंगजई आणि त्यांचा मुलगा पाशागुल हे इंग्रजांचे कट्टर विरोधक होते व ते बंडखोर समजले जात होते,

खानसाहेबांनी व त्यांची चांगली मैत्री होती. त्यांच्या घरी मला पाठविण्याचा निर्णय घेण्यात आला. पुढे काबूलपर्यंत मला पोचवण्याची जबाबदारी त्यांच्यावर टाकण्यात आली होती.

मी मुल्लासाहेबांच्या समवेत हाजी तुरंगजई यांच्या घरी निघालो. रस्त्याच्या दोन्ही बाजूला शेतं होती आणि छोटी छोटी खेडीही वसलेली होती. या भागातही इंग्रजी राजवटीच्या गुप्तचरांचा सुळसुळाट होता.

मी स्वतःशीच हसत होतो. मनातल्या मनात विचार करत होतो की, आपल्या या प्रवासाचा शेवट काय होणार आहे ? मी आणि माझा साथीदार कधी एकत्र, कधी मागे-मागे आणि कधी अलग अलग होऊन पायवाटेने निघालो होतो. मधून मधून आम्ही बोलतही होतो. सूर्यास्त झाल्यानंतर, जेथून दुसरे दिवशी सकाळी काफिला निघणार होता, त्या गावी आम्ही येऊन पोचलो. माझ्या मनात विचारांचं वादळ उठलं होतं. डोक्यात नानाविध, चमत्कारिक कल्पना उसळत होत्या.

प्रवासाच्या दगदगीमुळे मनाला जरा अस्वस्थ वाटत होतं. काफिल्यातील लोक ज्या ठिकाणी थांबलेले होते तिथं मीही पोचलो आणि त्यांच्यापासून थोड्या अंतरावर जागा बघून जमिनीवर पडलो. मी कुणाशी बोलू इच्छित नव्हतो आणि अन्य कुणी माझ्याशी बोलावं, असंही मला वाटत नव्हतं. कुणी काही विचारू लागला की मी आपला हात कानाकडे नेऊन जाई आणि त्या माणसाकडे नुसता बघत राही. तो माणूस थोडंसं हसून तिथून निघून जाई. जमिनीवर पडून मी आकाशाकडे बघत राहिलो. माझ्या मनात वारंवार एकच शंका उभी राहत होती की, उद्या आपल्याला स्वतंत्र देशातील सूर्याचं दर्शन होणार का अटक होऊन पुन्हा आपल्याला तुरुंगाच्या अंधकारात खितपत पडावं लागणार ? एखाद्या पाकिस्तानी माणसाच्या गोळीनं ठार होणार का, तुरुंगाच्या यातनामय जीवनात जाऊन पडणार ? असेच काही विचार करत करत मी झोपलो. मध्येच एकाएकी मोठमोठे थेंब पडू लागले. पावसामुळे सर्वच जण तिथून उठून पळू लागले. मीही त्यांच्या बरोबर पळत निघालो. सगळे लोक एका मशीदीत शिरले. ज्याला जिथं जागा सापडली तिथं तो झोपू लागला. मीही एके ठिकाणी अंग टाकलं. डोकं कोणत्या बाजूला व पाय कोणत्या बाजूला ठेवायचे, याची मला माहिती नव्हती. एका प्रवाशाने जवळ येऊन लाथ घालून मला उठवलं. मक्केकडे पाय करून तू झोपलेला आहेस, हे तुझ्या लक्षात नाही का आलं? माझी ही मोठीच चूक होती. 'तोबा तोबा' करून मी उठून बसलो आणि पायांची दिशा बदलून परत पडून राहिलो. नमाजची वेळ झाली. सर्वजण नमाजची तयारी करू लागले. मीही त्यांचं अनुकरण करून त्यांच्यात सामील झालो. त्यांची नक्कल वठवताना मला कुठलीच अडचण पडली नाही. खायला माझ्यापाशी काहीच नव्हतं.

नुसतं पाणी पिऊन मी त्यांच्यासह तिथून निघालो. आकाशात ढगांची गर्दी होती. अजून चांगलं उजाडलं नव्हतं. पायाखालचा रस्ता स्पष्ट दिसत नव्हता. पायात जोडे घालून गोल व गुळगुळीत दगडांच्या रस्त्यानं नीट चालता येत नव्हतं. जोडे काढून हातात घेतले व चालू लागलो. अनेक वेळा ठेचाळून मी खाली पडलो. चांगला मारही बसला. विचारपूस करणारं कुणीच नव्हतं. सर्वांप्रमाणंच माझंही होत होतं.

केव्हा केव्हा काफिल्यावर हल्ला होऊन लुटमार होई. आम्ही एका धोक्याच्या भागातून चाललो होतो. सर्वच जण अतिशय सावधपणे चालले होते. कुठून हल्ला होईल आणि गोळी लागून कोण ठार होईल, याचा नेम नव्हता. आम्ही पुढे पुढे चाललो होतो. सूर्य आता हळू हळू वर येऊ लागला. सूर्यप्रकाशात मी माझ्या चहूबाजूला बघितलं. इंग्रज सरकारच्या तुरुंगापासून आता मी खूप अंतरावर येऊन पोचलो होतो. माझी आता खात्री पटली की, एखाद्या पाकिस्तानी माणसाच्या गोळीनं किंवा अन्न-पाण्यावाचून आपणाला मरण आलं तरी बेहत्तर परंतु आता हाता-पायात बेड्या पडण्याची शक्यता राहिलेली नाही !

चहूकडे पर्वतांची शिखरं दिसत होती. एका शिखरानंतर दुसरं शिखर दिसू लागे. रस्त्यात कुठं पाणी नव्हतं. गावाचा ठावठिकाणा नव्हता. उन्हानं पायाखालचे दगड तापू लागले. त्यावरून चालणं अशक्य होऊ लागलं. पायाची बोटं ठेचा बसून बसून फुटलेली होती. जाडे घालणंही त्यामुळे कठीण होऊन बसले. इंग्रजी राजवटीचे पाश तोडून मी माझ्या मुक्कामाच्या दिशेनं चाललो होतो. देशप्रेमाच्या धुंदीत मार्गातील अडचणींचा मला विसर पडलेला होता. सर्व त्रास सहन करत मी चालत होतो. एका डोंगराच्या शिखरापासून निघून आम्ही डोंगराच्या पायथ्यापाशी येऊन पोचलो. समोरच्या बाजूनं इंग्रज सरकारचा एक नोकर येताना दिसला. तो भारतीय पठाण होता. माझ्याकडे बघताच त्यानं ओळखलं की हा कुणीतरी सरकारचा विरोधक असला पाहिजे व हा पळून चालला आहे. त्यानं हिंदुस्तानीत मला काही विचारलं. मी काहीच उत्तर दिलं नाही. नंतर तो पुश्तूमध्ये माझ्याशी बोलू लागला, तरीही मी त्याला प्रत्युत्तर दिलं नाही. त्यानं मला शिव्या द्यायला सुरुवात केली. मला पकडून नेण्याची त्याने धमकीही दिली. माझ्या सोबतचा मुल्ला थोडा दूरवर गेलेला होता. त्या इंग्रजांच्या नोकराच्या शिव्या ऐकून मी नुसता हसलो. त्याच्या धमकीमुळे मी विचलित झालो नाही. माझा हात पकडण्यासाठी त्यानं आपला हात पुढे आणला आणि तो माझ्या तोंडाकडे बघू लागला. माझ्या डोळ्यांचा रंग बदलला होता. माझ्या शक्तीवर माझा पूर्ण विश्वास होता. आम्हाला बघणारा जवळपास कुणीच नव्हता. माझी शिकार करण्यासाठी तो उत्सुक होता. माझ्या डोळ्यातील संतापाची आग बघून त्यालाच आपला मृत्यू दिसू लागला. तेव्हा त्याने मला पकडण्यासाठी पुढे आणलेला हात मागे घेतला. त्याच्या तोंडून यानंतर एक शब्दही

उमटला नाही. आल्या पावलांनी तो तिथून निघून गेला. मी जागेवर उभा राहून त्याच्याकडे आश्चर्यानं बघू लागलो. त्या माणसानं मागे वळून देखील बघितलं नाही. मृत्यूच्या विक्राळ रुपाचं त्याला दर्शन झालं होतं. अशा माणसाच्या कोण वाटेला जाणार? एका गावात पोचल्यानंतर आम्ही घोडसं बाऊन घेतलं. वाळलेल्या रोटीचा तुकडा खात खात मी पाणी प्यालो. रात्र होण्यापूर्वी मुक्कामावर पोहचायचं होतं. एखाद्या ठिकाणी थोडा वेळ विश्रांती घेणं सुद्धा शक्य नव्हतं. रात्री नऊ वाजता आम्ही हाजी तुरंगजई यांच्याकडे पोहोचलो. सकाळी पाच वाजता आम्ही निघालो होतो. संबंध दिवसात केवळ अर्धा तास आम्ही विश्रांतीसाठी थांबलो होतो. हाजीसाहेबांच्या घरी आमची निवासाची उत्तम सोय केलेली होती. दुसऱ्या दिवशी मला हाजीसाहेबांच्या हवाली करून मुल्लांनी माझा निरोप घेतला.

एका सफल क्रांतिकारकाचं जीवन जगताना मला देशप्रेमी बंधु-भगिनींचं फार मोठं सहकार्य लाभलेलं आहे. खान अब्दुल गफार खानसाहेबांकडून मला जे साहाय्य मिळालं तेही मोठं निराळं आणि अद्भुत प्रकारचं होते.

खानसाहेब स्वतः सत्य आणि अहिंसेचे पुजारी होते. असं असूनही माझ्यासारख्या एका देशप्रेमी क्रांतिकाराला मदत करणं त्यांना योग्य वाटलं. माणुसकी म्हणजे काय, या मार्गानं कशा रीतीनं वाटचाल करायची, कोणत्या गोष्टींचा त्याग व कोणत्या गोष्टींचा स्वीकार करावा—मानवी समाजाचे अंतिम हित कशात आहे—या सर्व गोष्टी मला खानसाहेबांच्या कृपेने शिकायला मिळाल्या. मला त्यांचं साहाय्य मिळालं नसतं तर जीव वाचवून बाहेर पडणं मला सर्वस्वी अशक्य होते. मी जिवंत राहू शकलो नसतो आणि क्रांतीच्या तत्त्वज्ञानाचा अभ्यासही करू शकलो नसतो.

हाजीसाहेब हे परिपक्व बुद्धीचे व अनुभवी गृहस्थ होते. पाकिस्तानात त्यांच्या-विषयी लोकांना खूप आदर होता. इंग्रजी राजवटीशी त्यांचा अनेकवेळा संघर्ष उडालेला होता. माझ्यासारख्या इंग्रज सरकारच्या शत्रूला, एका क्रांतिकारकाला, भेटून त्यांनी आपला संतोष व्यक्त केला. आपल्या घरी त्यांनी मला मोठ्या आरामात ठेवलं. अफगाणिस्तानच्या राजे अमानुल्लाखान यांनी त्यांना सन्मानपूर्वक एक सोन्याचं घड्याळ भेट म्हणून दिलं होतं. ही गोष्ट मोठ्या अभिमानानं मला त्यांनी सांगितली.

त्यांचे चिरंजीव पाशागुल कुठंतरी बाहेर गेलेले होते. त्यांची वाट बघत मला तिथं दहा दिवस राहावं लागलं. पाशागुल एकदाचे परत आले. ते हिन्दीतून चांगल्या तऱ्हेनं बोलू शकत होते. इंग्रज आणि त्यांचं सरकार या विषयी त्यांना विलक्षण तिरस्कार होता. ते मोठ्या आवेशानं तुटून पडणाऱ्यांपैकी होते. तीन दिवसपर्यंत आमची राजकीय चर्चा चालली होती. खान अब्दुल गफारखान यांनी जो माणूस माझ्याबरोबर पाठविलेला होता, त्यानं माझ्यासंबंधी जे काय सांगायचं ते त्यांच्या कानी घातलंच होतं

म्हणून हाजी तुरंगजई, पाशागुल किंवा त्यांच्या अन्य मंडळींनी मला एकही प्रश्न विचारला नाही. त्यांचा परस्परांवर किती विश्वास होता, हे त्यांच्या या वागण्यावरून समजून येत होतं.

ह्या पिता-पुत्रांचा निरोप घेऊन त्यांनी दिलेल्या माणसासोबत मी काबूलच्या दिशेनं निघालो. पाकिस्तानच्या पर्वतामधून व जंगलाच्या मार्गानं प्रवास करणं हे त्रासदायक काम होतं. कोणत्याही ठिकाणी चोर-लुटारूंचं भय होतं—मृत्यू कुठून कसा येईल याची सतत धास्ती होती. परंतु माझा मदतनीस त्या भागाशी आणि तिकडील लोकांशी चांगला परिचित होता. रस्त्यात भेटणाऱ्या प्रत्येकाला अभिवादन करत, दुवा-सलाम देत-घेत आम्ही चालत राहिलो. पाकिस्तानातील मुसलमानांचे दुवा-सलाम खूपच उत्साहदायक होते. साधारणपणे 'सलाम आलेकुम' किंवा 'आलेकुम सलाम' म्हणून झाल्यानंतर रस्त्याने भेटलेला माणसं आम्हाला 'मांदा न बासी, जोर बाशी'—(थकू नका—चांगले धडधाकट राहा!) अशी शुभेच्छाही द्यायचे. डोंगराच्या चढ-उतारामुळे माणूस चांगलाच थकून जातो. रस्त्याने खूप तहान लागे परंतु कुठेच पाणी नसे. यामुळं उत्साह कायम टिकावा म्हणून लोक एकमेकाला अशी शुभेच्छा देत. रस्त्याने दोन रात्री आम्ही पाहुणे म्हणून काढल्या. तिसऱ्या दिवशी काबूल नदी ओलांडून आम्ही जलालाबादला पोचलो. इथं पोचल्यानंतर आपण आपल्या साथीदारांचा निरोप घ्यावा व पुढचा मार्ग आपण एकट्यानंच चालून दैवाशी मांडलेला खेळ खेळत राहावा, असे मी मनाशी ठरवलं.

### काबूलमध्ये

काबुलला जाण्यासाठी मी लॉरी स्थानकावर पोचलो तेव्हा एका पोलिसाची माझ्यावर दृष्टी पडली. माझ्याशी बोलतांना त्याचा असा समज बनला की, मी काही तरी लपवा-छपवी चालवली आहे. पोलीसच्या प्रश्नांची समाधानकारक उत्तरं मी देऊ शकलो नाही, यामुळं ते मला त्यांच्या अधिकाऱ्याकडे घेऊन गेले. पोलीस अधिकाऱ्यांच्या एकाही प्रश्नाचं मी उत्तर दिलं नाही. मी विचार करत होतो की एखाद्या प्रश्नाचं आपण काही उलट सुलट उत्तर दिलं तर ते निस्तरणं अवघड होऊन बसेल. पोलीस अधिकाऱ्यांनी त्रस्त होऊन मला लॉक-अप मध्ये ठेवलं. मी कोण आहे ? कुठल्या उद्देशाने तिथं आलो आहे ? इथे माझी कुणाशी ओळख आहे अथवा नाही ? या प्रश्नांची उत्तरं पोलीसांना हवी होती परंतु मी गप्प राहिलो. मी काहीही उत्तर दिले नाही. मी हिन्दी आहे, हे माझ्याकडे बघताच लक्षात येत होतं. मात्र गुप्त खुणा बघितल्या शिवाय मी हिन्दु का मुसलमान, हे मात्र समजू शकत नव्हतं. एकाही प्रश्नाचं मी उत्तर देणार नाही, यावर मी अडून राहिलो. मला तुम्ही गव्हर्नर साहेबांकडे घेऊन चला, एवढंच मी त्यांना सांगितलं. पोलिसांना आता हे एक संकटच होऊन बसलं. गव्हर्नर-साहेबांकडे नेल्याखेरीज आता ते मला सोडूही शकत नव्हते किंवा अफगाणिस्तानातून

बाहेर हाकलून इंग्रज सरकारच्या पोलिसांच्याही हवाली करू शकत नव्हते. शेवटी नाईलाजानं ते मला गव्हर्नरसाहेबांकडे घेऊन गेले. गव्हर्नर चांगलेच तरुण वयाचे होते. काही महिन्यांपूर्वीच इंग्लंडहून बॅरिस्टर होऊन ते आलेले होते. मी इंग्रजीमधून स्वतःसंबंधी माहिती देऊन मी भारतातून परागंदा होऊन इथं आल्याचं त्यांना सांगितलं. अफगाणिस्तानात इस्लामच्या या पवित्र भूमीवर मला एखाद्या स्वतंत्र नागरिकाप्रमाणे फिरता येईल या उद्देशाने आपण इथे आलो, हेही मी त्यांना सांगितलं. इस्लामच्या पवित्र भूमीवरील स्वतंत्र देशातील पोलीस माझ्याशी, गुलामीतील हिंदुस्थानातील पोलीस हिन्दी लोकांशी वागतात तसं वागतील याची मला बिलकुल कल्पना नव्हती. मी ज्या पद्धतीनं आणि ज्या आवाजात बोलत होतो त्यानं ते तरुण गव्हर्नर चांगलेच प्रभावित झाले. शेवटी त्यांच्या तोंडून, तुमची इच्छा काय आहे? एवढेच शब्द बाहेर पडले. मी उत्तर दिलं की काबूलला जाऊन स्वतंत्र नाग-रिकाचं जीवन मी जगू इच्छितो. मला काबूलला जाण्याची अनुमती द्यावी. हीच माझी मागणी आहे. त्यांनी पोलिसांना मला काबूलला पोचवण्याची आज्ञा केली. पोलिस अधिकारी जरा आगाऊच होता. मला पोलिसांच्या ताब्यात देऊन तो मला काबूलला पोचवण्याच्या विचारात होता. मी त्याची ही सूचना स्पष्टपणे फेटाळली. मी त्याला म्हणालो— "मी स्वतंत्र नागरिक आहे. मी काही गुन्हा केलेला नाही; पोलिसांच्या ताब्यात जायचं कारणच काय?" त्या अधिकाऱ्यानं आणखी दोन दिवस पोलिस ठाण्यात डांबून ठेवलं. यागिस्तानमधील अनेक मुस्लीम तरुणांना ही गोष्ट समजली होती की, मी एक निर्वासित म्हणून या प्रदेशात आलो आहे, मी इंग्रजी राजवटीचा शत्रू आहे आणि मुस्लिमांच्या राज्यात आश्रयासाठी आलो आहे. त्यांनी मला यागिस्तानात राहून इंग्रजी राजवटीविरुद्ध तिथं ज्या योजना आखल्या जात होत्या, यात सहभागी होण्याविषयी खूप गळ घातली, अनेक प्रलोभनंही दाखविली. मी काही त्यांना बधलो नाही कारण माझी उद्दिष्टं निराळी होती, माझा त्यांचा मनो-मिलाफ होऊ शकला नाही. पोलीस अधिकाऱ्यानं त्रस्त होऊन मला परत गव्हर्नरांसमोर उभं केलं. मी आता त्या अधिकाऱ्याविषयीच तक्रार केली. गव्हर्नरांना याबद्दल सर्व समजलं—त्यानं त्या अधिकाऱ्यालाच खूप दरडावून मला ताबडतोब सोडून देण्याची त्यांना आज्ञा केली. यांना जसं जायचं असेल तसं ते काबूलला जातील—तुम्ही त्यांना शक्य असेल ती मदत करा. पोलिस अधिकाऱ्यानं हाताखालच्या शिपायाला सांगितलं की, एखाद्या लॉरी-वाल्याला सांगून, ह्याला काबूलला पाठवून द्या. काबूलला पोचण्यास दोन दिवस लागत होते. लॉरीवाल्यानं मला मोफत न्यायला नकार दिला. माझ्यापाशी रुपये होते, परंतु मी ते जोड्यांत, कपड्यात शिवून लपवलेले होते. चोराचिलटांच्या भीतीमुळे हे करावं लागलं होतं. ज्या लॉऱ्यांच्यामधून प्रवासी काबूलला जात होते—तशा प्रकारे लॉरीत बसून मला प्रवास करता येईल असे वाटत नव्हते. सर्वांच्या समक्ष मी जोड्यात किंवा कप-ड्यात लपवलेले पैसे बाहेर कसे काढणार? जनावरांची नुकतीच काढलेली कातडी

घेऊन जाणाऱ्या एका लॉरीवाल्याची मी भेट घेतली, त्याला मी मला काबूलला घेऊन चल, तू मागशील ते भाडं तिथं पोचल्यानंतर देईन, असं म्हणालो. लॉरीचा ड्रायव्हर एक पंजाबी हिंदू तरुण होता– त्यानं माझं म्हणणं मान्य केलं. तो एवढंच म्हणाला की, ओल्या कातड्यावर बसून तुम्ही दोन दिवसांचा प्रवास करू शकाल काय? ओलं कातडं दुर्गंधीयुक्त असतं. ओल्या कातड्याची ती भयानक दुर्गंधी कोणाही भल्या माणसाला दोन दिवस सतत सहन होणं अशक्य वाटीतलं होतं. मी ही मोठ्या निरुपायानं ओल्या चामड्यावर बसून प्रवास करायला तयार झालो. रात्रीच्या वेळी लॉरीवाला विश्रांतीसाठी थांबला तेव्हा मी त्याचे विचार जाणून घ्यायचा प्रयत्न केला. मला असं वाटलं की, हा ड्रायव्हर पंजाबी तरुण आहे आणि त्याच्या मनातही आपल्या देशाविषयी प्रेम असेल. मी त्याला आपल्या विश्वासात घेतलं. त्याला मी मित्र मानल्याबरोबर तो माझ्याशी फारच अगत्यानं वागला. मला चांगलं भोजन दिलं, माझी झोपण्याची चांगली व्यवस्था केली. दुसऱ्या दिवशी आम्ही काबूल शहराच्या हद्दीत येऊन पोचलो. तिथं वाहतुक परवाना दाखवावा लागतो. माझ्यापाशी कुठलेच कागदपत्र नव्हते. लॉरीवाल्यानं तिथल्या लोकांना सांगितलं की, हा माझा भाऊ आहे—काबूल बघण्यासाठी आला आहे—एका आठवड्यानंतर परत जाईल. लॉरीवाल्याचे आणि पोलिसांचे घनिष्ट संबंध असतात. एकूण माझं संकट टळलं. लॉरीवाल्यानं मला माझ्या साथीदारांकडे पोचवलं. गदर पार्टीच्या मुक्कामावर भाई रतनसिंह हजर होते. मी त्यांना माझी सर्व हकीकत सांगितली. माझं सर्व ऐकून घेतल्यानंतर त्यांनी माझी सर्व प्रकारची व्यवस्था केली.

१९२२ साली पुष्कळसे भारतीय देशत्याग करून काबूल येथे येऊन अनेक व्यवसायात शिरत होते. त्यातले अनेकजण आपला देश स्वतंत्र कसा करता येईल, याचीही स्वप्न बघणारे होते. अशा लोकांना भेटून अनेक राजकीय प्रश्नांवर चर्चा करण्याची संधी मला मिळाली. या सर्व मंडळींना मी आपल्या धुंदीत रमलेला एक क्रांतिकारी तरुण आहे, हे कळून चुकलं. राजकीय प्रश्नांचा अभ्यास करण्यासाठी मला रशियामध्ये मॉस्कोला जायचं आहे, हेही मी त्यांना सांगितलं. माझा हा विचार ऐकून ते काहीसे सचिंत बनले. त्यांनी मला सांगितलं की, आजच्या अफगाणिस्थानातील नादिरशहाच्या राजवटीचे इंग्रज राजवटीशी घनिष्ट संबंध आहेत. अफगाणिस्थान प्रांतात काबूल इथं फार काळ लपून राहता येणार नाही. भाई रतनसिंहांनी या प्रश्नाचा खूपच गंभीरपणानं विचार केला, त्यांना भीती वाटू लागली की, अफगाणिस्थानचे पोलीस मला पकडून इंग्रज शासनाच्या पोलिसांच्या हवाली करतील. मला एखाद्या मुसलमान व्यक्तीच्या घरी ठेवणंच उचित होईल, असा त्यांनी विचार केला. मला एका देशत्याग करून आलेल्या सरदाराच्या घरी जागा मिळवून देण्यात आली. सरदाराच्या नातेवाईकांचा परिवार खूप मोठा होता, मला राहण्यासाठी दिलेली

जागा फारच अपुरी होती—परंतु त्यांची मनं मात्र फार विशाल होती. शारिरीक कष्ट सहन करण्याची माझ्या मनाची तयारी मी केली. थंड प्रदेशात राहणारे हे लोक स्वच्छतेबद्दल फारसा विचार करत नाहीत. मी ही स्वतः त्यांच्याप्रमाणेच वागायला प्रारंभ केला. या सर्व माणसांबरोबर राहणं, त्यांच्या समवेत भोजन करणं—याचा मला प्रारंभी संकोच वाटायचा परंतु त्यांची माणुसकी, त्यांचा स्नेह या गोष्टी जसजशा मला अनुभवाला मिळाल्या तसतसा माझा बुजरेपणा नाहीसा होत गेला व शेवटी मी त्यांच्यातला एक होऊनच तिथं राहिलो. मला ज्याच्या हवाली करण्यात आलं होतं तो तरुण अमानुल्लाच्या वेळी विमानाचा अधिकारी होता. त्याच्या मनात भारतीयांविषयी प्रेम आणि इंग्रजांसंबंधी तिरस्काराची भावना भरलेली होती. त्याचा सहवास लाभल्यानंतर हळूहळू मी त्याच्यावर विश्वास टाकायला सुरुवात केली. माझ्या हकीकती ऐकून आणि माझं जीवन बघून तोही चांगलाच प्रभावित झाला. मी त्याला माझा हेतू स्पष्टपणे सांगितला. मग आम्ही अशी एक योजना आखली की, आम्ही दोघांनी लॉरीमधून गजनी-कंधार मार्गे हेरातपर्यंत जायचं. हेरातला पोचल्यानंतर रशियाच्या हद्दीत कसं शिरायचं ह्याची योजना तयार करायची. भाई रतनसिंह यांच्याशी विचारविनिमय करून त्यांना आर्थिक मदत मागितली. त्यांनी आर्थिक मदत केली मात्र हेरातमार्गे रशियाच्या हद्दीत प्रवेश करणं हे अत्यंत धोक्याचं काम आहे, असं त्यांनी बजावलं. त्यांनी अन्य हिन्दी देशत्यागी मंडळींचंही मत आजमावलं. त्या लोकांनीही त्यांना अधिकच घाबरवून सोडलं. एवढ्या लांब प्रवासात पोलिसांच्या नजरेतून सुटणं असंभवनीय आहे, असंच त्यांचं मत पडलं. या मार्गानं जाणं शुद्ध वेडेपणाचं आहे—असं ते म्हणाले. या सर्वांचा परिणाम म्हणजे पुन्हा साखळदंडाच्या बंधनात भारतातील तुरुंगात जाऊन पडावं लागणार. मीही तिरिमिरीत त्यांना म्हणालो—तुम्ही नुसते निर्वासित आहात—देशत्याग करून आलेले लोक! एका क्रांतिकारकाचं मन आणि बुद्धी कशा पद्धतीनं काम करते, ह्याची तुम्हाला कुठून कल्पना असणार? संकटावर मात करण्याचं त्याचं सामर्थ्य तुम्हाला कळून कळणार? माझा हा युक्तिवाद त्यांना फारसा पटला नाही परंतु माझ्या हट्टापुढे त्यांचं काही चाललं नाही, एवढं मात्र खरं! मी माझ्या तरुण अफगाण साथीदारासह—महमूद अली सोबत नशिबाची परीक्षा बघण्यासाठी तेथून निघालो. हेरातला जाणाऱ्या लॉरीची दोन तिकीटं आम्ही खरेदी केली. माझा पोशाख आणि रंग-रूप अफगाण लोकांप्रमाणेच होतं. एका महिन्यात मी फार्शी भाषा चांगलीच आत्मसात केली होती.

आम्ही गजनीला येऊन पोचलो. रात्री तिथंच थांबावं लागलं. अफगाणिस्तानात रात्रीच्या वेळी लॉरीचा प्रवास धोक्याचा होता. लूटमार होण्याची भीती असे. लॉरीतळावर सामान ठेवून मी गजनी शहर बघण्यासाठी निघालो. हिन्दुस्थानवर वारंवार स्वाऱ्या करून हिन्दुस्थान लुटणाऱ्या महमूद गजनवीच्या पडक्या राजवाड्याचे

अवशेष माझ्या दृष्टीस पडले. महमूद गजनवीच्या महालांचीं दारं सोमनाथच्या जड-जवाहिरानं शोभिवंत केलेली होतीं. परंतु आता राजवाडा उद्ध्वस्त झालेला होता आणि मोडके-तुटके अवशेष तिथं विखुरलेले होते. हजारो मण सोनं आणि लक्षावधींचं जड-जवाहिर कुठं गुप्त झालं होतं—कुणास ठाऊक? सूर्यास्त होण्याची वेळ होती—त्या भग्न अवशेषात बसून माझ्या मनात विचार उसळत होते. आपल्या देशाचा आणि गजनीचा जुना इतिहास मला आठवू लागला. त्या इतिहासासंबंधी मी विचार करू लागलो. इतर देशांना लुटून, नवं शहर वसवणं याचा उपयोग नसतो, असं मला वाटू लागलं. भूमीची निर्माणशक्ती आणि उद्यमशील लोकांच्या शक्तीमधूनच प्रत्येक शहराची भरभराट होऊ शकते. ज्या देशाची—भारताची—लूटमार करून गजनी हे शहर वसविण्यात आलं होतं आणि ज्या देशातील शहरात आजदेखील लूटमार चालू आहे—तो देश आणि तिथली शहरं अजून टिकलेली आहेत, उजाड बनलेली नाहीत—वसलेलीच आहेत. परंतु या राक्षसी गजनीमध्ये सुखसमाधान आणि ऐश्वर्याचा लवलेशदेखील दिसत नाही.

सकाळी लॉरीनं आम्ही कंधारला पोंचलो. आमची लॉरी कंधार पर्यंतच जाणारी होती. यापुढं ती जाऊ शकत नव्हती. हेरातला जाण्यासाठी आम्हाला लगेचच लॉरी मिळाली नाही. निरुपायानं आम्हाला कंधारलाच थांबावं लागलं. माझे साहाय्यकरते स्नेही मेहमूद अली यांच्या एका नातेवाईकाकडे आम्ही मुक्काम केला. त्यांनी आमची उत्तम व्यवस्था केली. एका आठवड्यानंतर आम्हाला हेरातला जाणारी लॉरी मिळाली आणि आम्ही तिकडे निघालो. दुपारची वेळ होती. आमची लॉरी नदीच्या पात्रातून चालली होती. नदीतील पाणी फारसं खोल नव्हतं परंतु पात्र चांगलंच रुंद होतं. लॉरीचं एंजिन मध्यावर येऊन पोंचताच बन्द पडलं. जून-जुलैचे दिवस होते—पाऊस केव्हाही येण्याची शक्यता होती. सगळ्यांचेच जीवित धोक्यात होते. नदीचं पाणी खूप वेगानं वाहात होतं. लॉरीवाल्यानं प्रवाशांना हात जोडून मदत करण्याची विनंती केली. प्रवाशांपैकी अधिक लोकं मुसलमान होते. मक्का-मदिनची यात्रा करून ते परत निघाले होते आणि ते श्रीमंत वर्गातले दिसत होते. हे लोकं पाण्यात उतरून लॉरी ढकलून बाहेर काढण्याची शक्यता नव्हती. आता व्हायचं कसं? मी विचार केला की आपण प्रथम नदीत उडी टाकावी—आपला जोडीदारही त्यामुळे खाली उतरेल आणि मदत करील. हज्ज्या यात्रेकरूंनाही मदत करावीशी वाटेलच. आम्ही दोघांनी लंगोट बांधून प्रथम उड्या मारल्या आणि बाकीच्या मंडळींना हाक दिली. सर्वांनी आमचं ऐकलं सर्वजण खाली उतरले आणि आम्ही सर्वांनी ती लॉरी पैलतीरावर ढकलत नेली. दोन तास एंजिनशी खटपट करून ड्रायव्हरनं गाडी सुरू केली आणि आम्ही पुढं निघालो जवळपास कुठंच गाव नव्हतं. दुसरे दिवशी दुपारची बाराची वेळ असावी—एंजिनचा एक छोटा भाग तुटला. पुन्हा गाडी बंद पडली. दुपारच्या उन्हाचे आम्हाला चटके बसू लागले. ड्रायव्हरला, क्लिनरला यंत्राचा तो भाग दुरुस्त करून आणण्यासाठी पाठवलं

क्लिनर दोन दिवसांनी परत आला. जंगलातच मुक्काम करावा लागल्यामुळे खाण्या-पिण्याचे चांगलेच हाल झाले. एंजिन ठाकठीक झाल्यानंतर आमचा प्रवास परत सुरू झाला. चालता चालता रात्र येऊन ठेपली. रस्त्याने आम्हाला एकही गाव लागलं नाही. रात्रीच्या अंधारात बंदुकीचे आवाज आमच्या कानावर पडले. आम्ही चांगलेच घाबरलो. डाकूंनी आपल्याला घेरलं आहे—असंच आम्हाला वाटलं. ड्रायव्हरनं लॉरी रस्त्यावरून खाली उतरवली आणि झुडपांच्या आड उभी केली. हजचे सर्व यात्रेकरू खाली उतरून गुडघे टेकवून परमेश्वराची प्रार्थना करू लागले. भीतीनं ते परमेश्वराकडे रक्षणासाठी दुवा मागू लागले. हे परमेश्वरा ! आमच्या जीवाचं व संपत्तीचं रक्षण कर. दोन यात्रेकरूंच्याकडे बंदुकी होत्या. माझा जोडीदार महमूदअली हा एक धाडसी तरुण होता. मी त्याला म्हणालो– "आपण दोघं बंदुकी घेऊन तयारीत राहू"–माझी गोळी सहसा वाया जात नाही– माझा नेम अचूक असतो– चोर-डाकू आले तर आपण त्यांचा समाचार घेऊ–हाजी मंडळींना सांगा की, काळजी करू नका– परमेश्वराचं आपल्याला साहाय्य लाभेल–तो कृपाळू आहे." मी काहीतरी निमित्त साधून थोड्या अंतरावर गेलो आणि जमिनीत खड्डा करून मी माझ्याजवळील रुपये-पैसे त्यात दडवून ठेवले. सर्व प्रवासी मरण-घटका जवळ आली आहे असं समजून हवालदिल झाले होते. मरण घटिका मोजत बसले होते. एक तास असाच गेला. कुणीही त्या बाजूनं आलं नाही. थोड्या वेळानंतर बंदुकीचा परत आवाज आला. आमच्या मग असं लक्षात आलं की चोर-लुटारू कुणी नसून शेतात येणाऱ्या जंगली जनावरांना घाबरून सोडण्यासाठी शेतकरी मधून मधून साध्या बंदुकीचे बार काढत आहेत!

आम्ही सर्वांनी परमेश्वराचे आभार मानले आणि थट्टा-मस्करी करत हसत-हसत आम्ही प्रवास पुढं चालू ठेवला. माझ्या वागण्यामुळे सर्वांच्या नजरा माझ्यावर खिळल्या. सर्वजण माझ्याकडं आदरानं बघू लागले. कंधार ते हेरात या दोन दिवसांच्या प्रवासासाठी आम्हाला तब्बल सात दिवस लागले. हेरातला पोचल्या-नंतर आम्ही महमूदअलीच्या एका जुन्या मित्राकडे मुक्कामाला गेलो. हेरातचा गव्हर्नर हा नादिरशहाच्या विश्वासू अधिकाऱ्यांपैकी एक होता. भारतीय लोकांकडे तो संशयी नजरेनं बघायचा. पूर्वीचा राजा अमानुल्लाखान क्रांतिकारक हिन्दी लोकांकडे अधिक आस्थेवाईकपणे बघायचा कारण तो स्वतः इंग्रजद्वेष्टा होता. माझ्या साथीदारानं हेरात इथे मला मदत मिळून, मी रशियाला सुरक्षितपणे पोचावा, यासाठी प्रयत्न सुरू केले. यासाठी त्यानं अनेकांच्या भेटी-गाठी घेतल्या. बातमी हळूहळू सर्वत्र पसरली–गुप्तचर यंत्रणेच्या कानापर्यंतही जाऊन पोचली. गुप्तचरांनी आम्हा दोघांना पकडून, पोलीस ठाण्यात डांबून ठेवलं. माझे मित्र मेहमूदअली यांचे वडील अफगाणिस्तानचे एक मोठे सेनाधिकारी होते. हेरातमधील महमूदअलीच्या मित्रांना ही बातमी समजली तेव्हा ते उच्च पोलीस अधिकाऱ्यांना जाऊन भेटले व

सर्व प्रकार त्यांच्या कानावर त्यांनी घातला. मित्रांच्या वैयक्तिक जामिनावर मेहमूदअलीला सोडून देण्यात यावं, असा त्यांनी लेखी आदेश दिला. तो कागद पोलीस ठाण्यापर्यंत आला—तिथं त्यातला मजकूर वाचू शकेल असा एकही माणूस नव्हता. मी तो कागद हातात घेऊन पोलिसांना सांगितलं की, हा बघा कोतवाल-साहेबांचा आदेश—त्यांनी आम्हाला सोडून देण्याविषयी तुम्हाला हुकूम केलेला आहे. तो कागद आणणारा सैन्यातील अधिकारी होता. खरं म्हणजे, सोडण्याचा त्यात उल्लेख होता परंतु एकट्या महमूदअलीचंच त्यात नाव होतं ! माझी युक्ती कामी आली. पोलिसची मंडळी सैन्यातील अधिकाऱ्याला चांगलीच घाबरली.

आम्ही मेहमूदअलीच्या मित्रांच्या घराकडे निघालो. रस्त्यानं चालता चालता मला खट्याळपणा सुचला. मी मेहमूदअलीला शंभर रुपये दिले आणि चांगले खाद्यपदार्थ घेऊन ये—आपण आपल्या सुटकेचा आनंद साजरा करू, असं म्हणालो. तसंच एखादं चांगलं घरही आपल्याला राहण्यासाठी बघ—असंही मी म्हणालो. मेहमूदअली आणि तो सैनिकी अधिकारी कुठंतरी जाऊन मौज-मजा करतील, असा माझा अंदाज होता. रुपये घेऊन ते तिथून गेले. मीही बाजारात जाऊन उगीचच हे-ते बघ असं करत फिरत राहिलो. एका बेकरीपाशी थांबून मी तंदूरच्या दोन रोट्या खरेदी केल्या आणि कपड्यात बांधून मी बाजारातून तावडतोब बाहेर पडलो. मी जवळच्याच एका डोंगरावरील जंगलात पळत निघालो. सायंकाळचा चारचा सुमार असावा—तीन तासांचा अवधी माझ्यापाशी होता. माझा असा अंदाज होता की, मेहमूदअली आपले 'शौक' पूर्ण करून तीन तासांच्या आत काही परत येणार नाही. घरी पोचल्यानंतर तो इकडेतिकडे माझा शोध करील आणि नंतर खरा प्रकार त्याच्या ध्यानात येईल. पोलिसाला ही बातमी दिल्याशिवाय त्याला गत्यंतर राहणार नाही. हे समजताच पोलिसांच्याही लक्षात येईल की, नादिरशहाचा एक शत्रू मोठ्या शिताफीनं आपल्या हातातून निसटला आहे. माझ्यापाशी वेळ भरपूर होता. मी पळत पळत वेगानं चालत हेरात जवळील डोंगराळ प्रदेशात गडप झालो. हेरातहून रशियाच्या हद्दीतील मर्वकुश्क गावी जाणारी सडक नजरेच्या टप्प्यात राहील, ह्याची काळजी घेऊनच मी वाटचाल करू लागलो. आता अंधार पडला होता. लांब अंतरावरून येणारा माणूस आता दिसू शकत नव्हता. अंधाराची कांबळ पांघरून सडके जवळील शेतामधून मी चालत होतो. ती संबंध रात्र मी चालत राहिलो. जेव्हा शेतातला रस्ता खाच खळग्यांचा असे तेव्हा मी काही वेळ सडकेनेही चालत राही. हा सर्व डोंगराळ प्रदेश होता. सडक वळणा-वळणाची होती. दोनवेळा आकस्मिकपणे समोर मोटारचे दिवे दिसले. सडकेच्या दोन्ही बाजूस खोलगट भाग होता—तिथं झाडं-झुडपं होती. मोटारच्या दिव्यांचा प्रकाश तोंडावर पडताच मी मागचा पुढचा विचार न करता सडकेखालील खोल खड्ड्यात उडी घेतली. उडी मारल्यानंतर जो काही मार बसेल—तो सहन करण्याची माझ्या मनाची तयारी होतीच. माझी अंधारातली

ही उडी एखाद्या जंगली जनावराच्या पुढ्यात पडण्याचीही शक्यता होतीच. स्वार्थासाठी माणसाची विक्री करणाऱ्या सभ्यतेचा बुरखा पांघरणाऱ्या माणसापेक्षा जंगली श्वापदं कमी भयंकर आहेत—अशीच माझी मानसिक अवस्था बनली होती. समोरच्या प्रकाशात आपल्याला कुणी बघू नये म्हणून दोन वेळा मी सडकेवरून खाली उड्या मारल्या. मोटारीत बसलेल्या लोकांची माझ्यावर दृष्टी पडली नाही. माझा हातपाय मोडला नाही किंवा जंगली जनावराशीही मला लढाव लागलं नाही. सूर्योदय होताच मी सडकेपासून अंतर ठेवून चालू लागलो. सडक सोडून मी लगतच्या भागातून रस्त्यावरील विजेच्या खांबावर नजर ठेवून चालत राहिलो. दुपारचे बारा वाजले होते. एका छोट्या गावामधला एक माणूस सडकेच्या दिशेने निघाला होता. त्याच्या हातात वळसे असलेला दंड होता आणि खांद्यावर झोळी अडकलेली होती. त्याचा पोषाख आणि चेहरा-मोहरा बघून हा कुणीतरी भिक्षांदेही करणारा आहे, हे मी ओळखलं. मला खूप भूक लागली होती. त्याच्या झोळीत खायला काही असेल, असा मी अंदाज केला. मी त्याला फार्शी भाषेत म्हणालो—"बाबाजी मी एक प्रवासी आहे आणि मला अतिशय भूक लागलेली आहे—तुम्ही मला काही खायला देऊ शकता काय?" माझी विनंती ऐकून तो थोडासा हसला, झोळी उतरून तो खाली बसला त्याने झोळीत दोन्ही हात घालून रोटीचे तुकडे बाहेर काढले आणि ओंजळ माझ्याकडे केली. मी कपडा पसरून ते तुकडे घेतले. एवढ्याच अन्नसामग्रीवर मला जगायचं होतं. मी आकाशाकडे हात उभारून परमेश्वराचे आभार मानले आणि त्याचा निरोप घेतला. त्याच्याशी मी अधिक बोलू इच्छित नव्हतो. तेथून निघून मी एका ओढ्यापाशी पोचलो. भूक मला सतावत होती. काही तुकडे चावून मी भूक शमवली त्याने दिलेले तुकडे चावणं कठीण होतं. मी त्या तुकड्यांची गाठोडी बांधली आणि ओढ्याच्या पाण्यात मी भिजत ठेवून, पाणी पिऊन मी थोडा वेळ विश्रांतीसाठी निवांत पडलो. माझ्यापाशी सदऱ्याच्या दोन भाकऱ्या होत्या पण त्यांना एवढ्यात हात लावायचा नाही, असं मी ठरवलं होतं. पडल्याबरोबर माझा डोळा लागला. दोन तासांनी मला जाग आली. पाण्यात भिजत ठेवलेलं गाठोडं मी बाहेर काढलं त्याचा आकार बदलून गेला होता. पिठाचा एक लगदाच तयार झाला होता. मी तो लगदा खाऊन टाकला. माझं पोट भरलं आणि मोठ्या तृप्तीनं मी पुढे निघालो. दुसऱ्या पर्वताच्या पायथ्याशी भटक्या टोळ्यांचे लोक राहत असावेत, असा मी अंदाज केला. मी त्या दिशेनं निघालो. तिथं जाऊन पोचताच त्यांची कुत्री माझ्याकडे भुंकत आली. कुत्र्यांनी माझं स्वागत केलं. कुत्र्यांच्या भुंकण्याचा आवाज ऐकून त्या टोळीवाल्यांची छोटी मुलं कापडी पालातून बाहेर आली. मी त्या मुलांशी बोलण्याचा प्रयत्न करू लागलो. गरीब देशात असा एक रिवाजच निर्माण झाला आहे की, गरीब शेतकऱ्यांची मुलं चांगल्या कपड्यातला कुणी माणूस दिसला म्हणजे त्याच्याकडे पैसे मागत राहतात. माझ्या खिशात काही सुटी नाणी होती. मी ती नाणी मुलांच्यात वाटून टाकली. मुलं आनंदानं नाचत-बागडत झोपड्यात गेली आणि त्यांनी आपल्याजवळची

नाणी आयांना दाखवून बाहेर कुणीतरी परमुलखातील पाहुणा आला आहे हे त्यांनी सांगितलं—पाहुण्यानं आम्हाला पैसे दिल्याचंही त्यांनी सांगितलं. त्या स्त्रियाही झोपड्यांच्या बाहेर आल्या आणि हसऱ्या चेहऱ्यांनी त्यांनी माझं स्वागत केलं. मग मी तिथं एका ठिकाणी बसलो. मी मुलांना फारच थोडे पैसे दिले होते परंतु त्यांच्या आयांनी मात्र रोटी आणि लस्सीचा गडगा माझ्यासमोर ठेवला. मी मनात म्हणालो "आंधळा मागतो एक डोळा देव देतो दोन"—मला ती रोटी आणि लस्सी अमृता-समान भासली. खाणं-पिणं आटोपून मी तिथंच एका झोपडीत विश्रांती घेण्यासाठी पडून राहिलो. संध्याकाळ झाली तेव्हा एक घोडेस्वार तिथं येऊन पोंचला. आल्याबरोबर त्यानं माझ्याशी बोलायला सुरुवात केली. तिथल्या स्त्रियांनी, मुलांनी त्याला परोपरीनं सांगण्याचा प्रयत्न केला की मी कुणीतरी भला माणूस आहे. त्या तरुणानं मला विचारलं—हिंदुस्थानापासून दूर तुम्ही या आडमार्गावर आलात का? मी त्याला उत्तर दिलं की मी एक हिन्दी मुसलमान आहे. हेरात इथं नोकरीला होतो—परंतु माझी नोकरी सुटली. एवढ्यात मला कळलं की माझा मर्वकुश्क येथं राहणारा भाऊ आजारी पडला आहे. माझ्याकडे बसनं प्रवास करण्याइतके पैसे नव्हते. थोडेफार पैसे माझ्याकडे आहेत ते भावाचा इलाज करण्यासाठी उपयोगी पडतील म्हणून मी पायी चालत त्या बाजूनं निघालो आहे. त्या भोळ्याभाबड्या भटक्या टोळीतील तरुणाचं माझ्या उत्तरानं समाधान झालं. त्याच्याही मनात माझ्याविषयी दयाभाव उत्पन्न झाला. तो म्हणाला की इथल्या झोपडीत मी आराम करायला काहीच हरकत नाही. खुशाल पडा! तुम्हाला मुक्कामापर्यंत पोंचवायला मी मदत करीन. माझ्या घोड्यावर बसवून तुम्हाला बरंच दूरपर्यंत घेऊन जाईन. मी त्याच्या सरळ स्वभावाचा फायदा करून घेण्यासाठी त्याला म्हणालो—"अंधार पडल्यानंतर सडकेनं चालत जाणं मला धोक्याचं वाटू लागलं म्हणून मी आडवाटेनं इथं येऊन पोंचलो. तुम्ही जर सडकेवरून मला एखाद्या अन्य ठिकाणी पोंचवलंत तर तुमचे फार उपकार होतील."

आम्ही दोघं त्याच्या घोड्यावर बसून तिथून निघालो. त्यानं घोड्याला चांगल्या वेगानं पिटाळलं. त्यानं अवघ्या दोन तासात मला पंधरा मैल अंतर कापायला मदत केली. एका घराकडे हात दाखवून तो म्हणाला—ही मशिद आहे.—रात्रभर तिथं विश्रांती घ्या. सकाळ झाल्यानंतर पुढचा प्रवास करा. दुसऱ्या दिवशी सायंकाळी तुम्ही तुम्हाला जिथं जायचं आहे तिथं पोंचाल. मी त्याचे मनापासून आभार मानले. घोड्याला टाच मारून तो तिथून परत फिरला. रात्री दहाची वेळ होती. चांदणं सुरेख पडलं होतं. मी सडकेनं तसाच काही वेळ चालत राहिलो. रात्रीचे दोन वाजले असावेत. टोळीवाल्यांची कुत्री परत माझ्या अंगावर भुंकत आली. कुत्री मोठ्या आकाराची आणि भयंकर होती. मी माझ्या जवळची भाकरी काढली आणि तिचे तुकडे-तुकडे करून दूरवर फेकू लागलो. पांच मिनिटांच्या आतच ती कुत्री परत माझ्या आजू-

बाजूनं येऊन भुंकू लागली. यावेळी त्याचा हल्ला जरा सौम्य स्वरूपाचा वाटला. मी हातातील काठी खाली टाकून दिली व दोन्ही हात पसरून एके जागी उभा राहिलो. ह्याच्याजवळ आता काहीच शिल्लक नाही असं समजून ती मग निघून निघून गेली.

सकाळचा चार वाजण्याचा सुमार असावा. समोरच्या बाजूनं पाठीवर मालाचं ओझं लादलेला एक उंट येताना दिसला. उंट पळत पळत येत होता. उंटाच्या पाठीमागे त्याचा मालकही जोरजोराने आरडा-ओरडा करत धावत-पळत येताना दिसला. उंट दोर तोडून पळत सुटला आहे, हे माझ्या लक्षात आलं. मी उडी मारून उंटाची दोरी पकडली. एवढ्यातच त्याचा मालक येऊन पोचला. हजारो रुपयांचा माल पाठीवर लादलेला उंट हाती लागलेला बघून मालकाला आनंद झाला आणि तो वारंवार लवून मला सलाम करून धन्यवाद देऊ लागला. त्यानं विचारल्यानंतर मी त्याला मला मर्व-कुश्कला जायचं आहे, हे सांगितलं. त्यानं मला उंटावर बसवलं. गप्पा मारत आमचा प्रवास सुरू झाला. बोलण्याच्या ओघातच आपण सध्या कोणत्या भागातून चाललो आहोत, हे मी त्याला विचारलं. मर्व-कुश्क कुठं आहे आणि रशियाच्या हद्दीत ते किती मैल आत आहे हं त्यानं मला सर्व विस्तारानं सांगितलं. आपण सध्या ज्या भागातून चाललो आहोत—हा भाग अफगाणिस्थानच्या तस्करांचा (Smugglers) मोठा अड्डा आहे. येथून जवळच उजव्या बाजूनं एक नदी वाहते. ही नदी रशिया आणि अफगाणिस्थानची सरहद्द आहे. सरहद्दीवर दोन्ही देशांच्या पोलिसांचा कडक पहारा आहे. विनापरवाना कुणी इकडून तिकडे किंवा तिकडून इकडे चोरून जाता-येताना दिसला तर त्याला गोळीला बळी पडावं लागतं. सकाळ व्हायच्या बेतात होती, झुंजूमुंजू उजाडत होतं—आपण आता उंटवाल्याचा निरोप घ्यावा काय, असा मी विचार करत होतो. मी त्याच्याकडे बघून म्हणालो—नमाजची वेळ झाली आहे—आपण असेच चालत राहिलो तर माझी नमाज चुकेल. कृपा करून उंटाला खाली बसवा—म्हणजे मी हातपाय धुवून नमाज पढेन. त्यानं मला या विचारापासून परावृत्त केलं. तो म्हणाला तुम्ही हातपाय धुवायला नदीवर गेलात की, तुमच्यावर गोळ्यांचा वर्षाव होईल. नमाज अर्ध्यावरच राहील. जीव मात्र फुकट गमवावा लागेल. मी त्याला उत्तर दिलं परमेश्वराशिवाय मी अन्य गोष्टीला भीत नाही. तो परमेश्वर कृपाळू आहे—तो आपल्या भक्ताचं रक्षण करतो. नमाज पढत असताना गोळी लागून मृत्यू आला तर मला स्वर्गप्राप्ती होईल. त्या भोळ्या माणसानं माझ्या सांगण्यावर विश्वास ठेवून, उंटाला खाली बसवलं. मी उतरून त्याचे आभार मानले आणि नदीच्या दिशेने निघालो. हेरातहून पळ काढल्याला आता चोवीस तास होऊन गेले होते. हेरातहून मी आता ज्या ठिकाणी येऊन पोचलो होतो, ते अंतर सत्तर मैलांचं होतं. चालून चालून पाय थकले होते. पायांना भेगा पडल्या होत्या—ठेचा लागल्यामुळे बोटं फुटली होती—जखमेतून रक्त येत होतं. जोडे काढून पायांकडे बघणंही कठीण होतं. एकदा का जोडे काढले की ते

धरलं पायात चालणं अशक्य होऊन बसलं असतं. मी जों जों नदीच्या जवळ जात होतो तों तों मला त्या उंटवाल्याचे शब्द आठवत होते. कोणत्या बाजूनं सूं सूं करत गोळी येऊन लागेल कुणास माहीत ? अखेर एकदाचा मी नदीच्या काठावर येऊन पोंचलो. उन्हाळ्याचे दिवस होते. नदीत केवळ गुडघाभर पाणी होतं. मी पाण्यात अंग झोकून दिलं आणि सरपटत सरपटत नदीचं पात्र ओलांडलं. चांदी पडून नदी ओलांडल्यामुळं कुणाचंच माझ्याकडे लक्ष गेलं नाही.



नदी पार करून पैलतीरी पोचल्यानंतर मी जवळच्याच एका टेकडीवर चढून गेलो. तिथून भोवतालचा प्रदेश बघत असतानाच रशियाच्या हद्दीतून बंदुकीचे आवाज माझ्या कानावर पडले. रशियात सर्वत्रच सावधानतेचा इशारा देण्यासाठी बंदुकीचे आवाज काढत आहेत, हे माझ्या लक्षात आलं. त्या भागात फिरणं हे धोक्याचं आहे, हे मी ओळखलं. आता पाय विलक्षण थकले होते. एवढ्या प्रवासानं एकूण शरीरच थकलं होतं. मी चक्क जमिनीवर अंग टाकलं. तासभर मला गाढ झोप लागली. सूर्य चांगला वर आल्यानंतर उन्हाच्या चटक्यांनी मला जाग आली. मी कानोसा घेऊन ऐकत राहिलो—आता कुठून बंदुकीचे आवाज येत नव्हते. ज्या बाजूला माणसांच्या वस्तीच्या खुणा दिसत होत्या, त्या दिशेने मी निघालो. थोड्या वेळानंतर मी कस्टमच्या ऑफिसात शिरलो. तिथे कामावर असलेल्या माणसाला मी त्याचा अधिकारी कुठं राहतो, असं विचारलं. त्यानं मला खुणेनं त्याचं निवासस्थान दाखवलं. मग मी तिथं गेलो. तो अधिकारी सकाळचा नाश्ता करत होता. खुर्चीवर बसल्या बसल्याच त्यानं माझं तिथं येण्याचं कारण विचारलं. मीही स्वच्छ-पणे फार्सी भाषेत त्याला सांगितलं की मी एक भारतीय क्रांतिकारक आहे. इंग्रजी राजसत्तेचा कट्टर शत्रू असून मी तुरुंगातून पळून आलेला एक कैदी आहे. आपल्या राष्ट्राच्या रक्षणाचं साहाय्य लाभेल या अपेक्षेनं आपण तिथं आलो आहोत. माझी हकीकत ऐकल्यानंतर त्या वृद्ध माणसानं मला शेजारी खुर्चीवर बसण्याची खूण केली. माझ्यासमोर खाद्यपदार्थ ठेवले. नाश्ता करत असतानाच आमच्या आणखी गप्पा झाल्या. मी त्याला हेही सांगितलं की ज्या खुर्चीवर मी बसलो आहे—तिथून उठण्याचंही त्राण शरीरात राहिलेलं नाही. पायाचे तळवे अगदी सोलून निघाले आहेत. पायातले बूट रक्तानं बरबटले आहेत. एक बकेटभर गरम पाणी मिळालं तर त्यात पाय सोडून भिजत ठेवल्यानंतरच बूट काढता येतील. तेव्हा त्यांनी ही मेहेरबानी करावी, असं मी त्याला सांगितलं. त्यानं पाण्याची व्यवस्था केली. पाण्यात पाय सोडून मी दोन तास तसाच बसून राहिलो. नंतर मी जेव्हा बूट काढले तेव्हा पायाचं कातडं बुटाबरोबर लोंबू लागलं. मी सत्य तेच सांगितलं आहे, यावर त्या अधि-काऱ्याचा विश्वास बसला. मला मदत करणं आवश्यक आहे, हे लक्षात घेऊन त्यांनी कंपाउंडरला बोलावून मलमपट्टीची व्यवस्था केली. पायांना पट्ट्या बांधून त्यांनी कॅनव्हासचे बूट पायात घालण्यासाठी दिले. तो अधिकारी कपडे करून आला

व आपल्यासोबत मला ऑफिसात घेऊन गेला. मला उत्तम प्रकारचं भोजन दिलं आणि विश्रांतीसाठी तिथलीच एक खोली दिली. मी अंथरुणावर पडलो. मला ताबडतोब झोप आली. रात्री बाराच्या सुमारास एका पोलीस अधिकाऱ्यानं मला जागं केलं. पोलिसांचे दोन शिपाई हातात पिस्तूल घेऊन माझ्या दोन्ही बाजूस उभे राहिले. मला उभं राहण्यास भाग पाडण्यात आलं. माझे पाय शरीराचं ओझं सांभाळायला तयार नव्हते. रशियन पोलीसांच्या या क्रूर वर्तणुकीचा मला खूप राग आला. रागाच्या भरात शारीरिक यातनांचा मला विसर पडल्यासारखा झाला. त्यांना माझा सर्व त्रास दिसत होता. दोन्ही शिपायांनी माझे हात पकडून मला तिथून ओढत ओढत बाहेर काढू लागले. जवळच्याच एका बन्द खोलीपाशी त्यांनी मला नेलं. पहारेकऱ्यानं खोलीचं दार उघडलं. त्या खोलीत अनेक माणसं कोंडलेली दिसली. तिथं ऐसपैस बसण्यासाठी किंवा अंग टाकण्यासाठी टिचभरही जागा दिसत नव्हती. खोलीमध्ये कोंबलेली माणसं एकमेकांच्या अंगावर रेलून कसाबसा श्वास घेत होती. खोलीचं दार उघडलेलं बघून ते सगळेच सावध होऊन बघू लागले. या अरुंद खोलीत आणखी एकाची भरती झाली आहे, हे त्यांच्या ध्यानात आलं.

## रशियातील कैदी जीवन

माझी दाढी लांब होती शिवाय गळ्यात माळ होती—मी एखाद्या मस्त कलंदर फकिरासारखा दिसत होतो. मला पाहताच खोलीत बंदिवान असलेल्या मुसलमानांना वाटलं की मी अल्लाचा कुणीतरी अवलिया, फकीर असलो पाहिजे. ते सर्वजण मला उद्देशून मोठ्या आवाजात म्हणू लागले की हे अवलिया! परमेश्वराजवळ ही जुलुमी राजवट समाप्त होण्याबद्दल प्रार्थना कर! ही राजवट आम्हा मुसलमानांचा छळ करत आहे. माझ्यावर पूर्ण विश्वास टाकून त्यांच्यापैकी प्रत्येकजण आपली हकीकत मला सांगू लागला. अशा परिस्थितीत विश्रांती व झोप कशी मिळणार? त्यांच्या कर्म-कहाण्या ऐकता ऐकता रात्र संपली.

सकाळी खोलीचं दार उघडण्यात आलं. दरवाजा उघडताच माझी नजर एका गणवेषातील फौजी तरुणाकडे गेली. सबंध रात्रभर मी नरक यातना सहन केल्या होत्या. त्यांच्या हकीकती ऐकून ऐकून माझे कान किटून गेले होते. आपल्याला वेड लागेल की काय असंच मला वाटत होतं. तो तरुण फार्सी भाषा जाणत असावा मी त्याला उद्देशून फार्सीत विचारलं की तुम्ही माणसं आहात का पशू? माझ्या मनात जे भाव उचंबळून आले होते ते मी जोरदार शब्दात मांडण्याच्या प्रयत्नात होतो. त्याचा परिणाम काय होईल, हे मला स्पष्टपणे समजत होतं. मी सर्व प्रकारच्या अन्यायांची आणि अत्याचारांची समाप्ती होऊन, स्वातंत्र्यपूर्ण जीवन जगायला मिळेल या अपेक्षेनं रशियाच्या भूमीवर पाऊल ठेवलं होतं. या भूमीत माणसाला माणूस म्हणून समजलं जात नाही, त्याचं म्हणणं सत्य म्हणून स्वीकारलं जात नाही. ह्याची

मला कुठून कल्पना असणार? रशियाच्या भूमीवर एक माणूस दुसऱ्या माणसाचा इतका छळ करत असेल, यावर माझा विश्वास बसत नव्हता. हे सर्व शब्द आगीच्या लोळाप्रमाणे माझ्या मुखावाटे बाहेर पडत होते. त्या सैनिकी पोषाखातील युवकानं काहीही उत्तर दिलं नाही. रागारागानं खोलीचं दार पूर्वीप्रमाणेच बंद करून तो तिथून निघून गेला. ज्यांनी आपला एवढा छळ केला, त्यांच्याकडून यापेक्षा दुसरी अपेक्षा करणं व्यर्थच होतं. हे लोक आपल्याला बंदिवान करून आपलं जीवन संपुष्टात आणणार, असा माझा समज बनला. एवढ्यातच खोलीचं दार परत उघडण्यात आलं आणि सर्वांना खोलीबाहेर येण्याची आज्ञा फर्माविण्यात आली. खोलीच्या दाराजवळ एक खुर्ची ठेवण्यात आली होती. मला त्या खुर्चीवर बसण्याची सूचना करण्यात आली. बाकीच्या बंदिवानांना एका अन्य खोलीत घेऊन गेले. दोन शिपाई पाण्याचं बकेट घेऊन आले. खोलीची फरशी धाबून स्वच्छ करण्यात आली—खोलीत फिनाईल शिंपडण्यात आलं. भिंती पोतेऱ्यानं स्वच्छ पुसण्यात आल्या. खोलीत एक पलंग आणि एक छोटं टेबल आणून ठेवण्यात आलं. फौजी शिपायांच्या कॅंटीनमधून माझ्यासाठी गरमा गरम नाश्ता मागवण्यात आला. खोलीचं दार उघडंच ठेवण्यात आलं. तिथं सगळीकडं फौजी शिपाई वावरताना दिसू लागले. त्यांच्या ही गोष्ट लक्षात आलेली होती की माझी शारीरिक अवस्था निभून पडून जाण्यासारखी नाही. दोन तासांपूर्वी त्या नरकात एक मिनिटभरही जगण्याची मला इच्छा राहिली नव्हती. माझ्या संतापयुक्त उद्गारांनी त्या लोकांच्या मनावर बराच परिणाम केला होता. माझं नशीब यानंतर बदललं. याच अवस्थेत मी तिथं दोन दिवस राहिलो. दोन दिवसानंतर ताश्कंदहून काही वरिष्ठ पोलिस अधिकारी विमानानं तिथं येऊन पोचले. सर्वजण माझ्या खोलीबाहेर येऊन उभे राहिले. त्यांच्यापैकी दोघेजण इंग्रजी भाषा उत्तम तऱ्हेने जाणत होते. बोलण्याच्या ओघात त्यांनी मला माझी सर्व हकीकत विचारली. मी म्हणालो की मला प्रश्न करणारे आपण कोण आहात हे कृपा करून सांगाल काय? आपला परिचय झाला तर मी आपला आभारी होईन. त्यांनी एका माणसाकडे निर्देश करून ते या विभागाचे गुप्तचर प्रमुख असल्याचं त्यानं सांगितलं. तसंच तुमच्यासंबंधी सर्व माहिती मिळवून तुम्हाला जिवंत राहू द्यायचं की नाही, याचा निर्णय तेच करणार असल्याचंही त्यानं मला सांगितलं. सकाळी प्रथम जेव्हा खोलीचं दार उघडण्यात आलं तेव्हाच मी ठरवून टाकलं होतं की रशियन अधिकाऱ्यांशी एक क्रांतिकारक याच नात्यानं बोलायचं. माझ्याशी ओळख करून दिल्यानंतर मी म्हणालो की हे गृहस्थ रशियाचे एक प्रमुख अधिकारी आहेत? माझ्या चेहऱ्यावर हसू होतं. मी जरा जोरानेच हसून विचारलं की कामगार आणि किसानांच्या राजवटीचे हे प्रतिनिधी आहेत? मग हे एवढे लठ्ठ कसे काय बनले? सगळेच अधिकारी तरुण वयाचे होते. माझ्या चेष्टेनं विचारलेल्या प्रश्नावर ते सर्वजण हसायला लागले. त्यांची ही मोकळेपणाची वागणूक बघून आपण अनुसरलेला मार्ग योग्य आहे, ह्याची

मला खात्री पटली. सकाळच्या वेळी त्या फौजी तरुणाला उद्देशून मी जे शब्द उच्चारले होते तेच शब्द अधिक धारदार शैलीत मी त्यांनाही ऐकवले. एक-दोन प्रश्न विचारून त्यांनीही माझ्यासंबंधी अधिक माहिती मिळविण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या प्रश्नांना मी उत्तरे दिली. माझं सर्व ऐकून घेतल्यानंतर त्यांनी कागद व पेन मला आणून दिले व माझी सर्व हकीकत सविस्तरपणे लिहून द्यायला सांगितलं. माझ्या निवेदनात जर खोट्या गोष्टी आढळल्या तर तुम्हाला सरळ गोळी घालण्यात येईल, हेही त्यांनी स्पष्टपणे बजावलं. मीही त्यांना बाणेदारपणे उत्तर दिलं की मृत्यूची भीती दाखवून मला लिहायला सांगत असाल तर मग तुम्ही खुशाल मला गोळी घाला. मात्र माणुसकीच्या भूमिकेतून सत्य समजून घेण्याची तुमची इच्छा असेल तर लिहून द्यायला माझी काहीच हरकत नाही. मी एकूणच पवित्रा असा घेतला होता की, माझ्यासमोर उभे राहिलेले अधिकारीच खरोखर अपराधी आहेत आणि त्यांच्या अंतःकरणातील उरल्या-सुरल्या माणुसकीसंबंधी मीच निर्णय करतो आहे. दोन तासपर्यंत मी माझी सर्व हकीकत लिहून काढली व नंतर ती त्यांच्या हवाली केली. ती वाचल्यानंतर त्या अधिकाऱ्यानं फैसला दिला की हा माणूस भयंकर स्वरूपाचा दिसतो. अशा ठिकाणी त्याला अधिक काळ ठेवणं धोक्याचं आहे. याला त्वरित ताश्कंद येथील राजकीय गुन्हेगारांच्या तुरुंगात पाठवून द्या. दुसऱ्या दिवशी सायंकाळी मला तीन फौजी शिपायांच्या ताब्यात देण्यात आलं. ते मला एका छकड्यात बसवून स्टेशनवर घेऊन गेले. मला रेल्वेत बसवून माझी पुढे रवानगी करण्यात आली. त्या सैनिकी छावणीतून जाण्यापूर्वी तिथला एक अधिकारी म्हणाला की रशियात भयंकर स्वरूपाच्या गुन्हेगारांनाही हातकड्या आणि बेड्या घालण्याची पद्धत नाही. आमच्या राजवटीच्या संदर्भात तुम्ही काय भयंकर बेत केले आहेत, त्याची आम्हाला कल्पना नाही तरीही आम्ही तुमच्या शरीरावर कुठलही बंधन घालू इच्छित नाहीत. मात्र एक गोष्ट चांगली लक्षात ठेवा– तुम्ही कुठेही पळण्याचा प्रयत्न केलात तर या तीन शिपायांच्या गोळ्या तुम्हाला क्षणात ठार करतील. त्या सीमाप्रदेशामधून ताश्कंदला पोचण्यास दोन दिवसांचा अवधी लागला. स्टेशनहून मला एका मोटारीनं राजकीय कैद्यांच्या तुरुंगापर्यंत नेण्यात आलं. त्या तुरुंगात मला डांबण्यात आलं. तिथं २५ बंदी आधीच होते. त्यांच्याकडे बघताच ते सुशिक्षित आहेत मात्र रशियन शासनाचे विरोधक आहेत, हे लक्षात येत होतं. ओळख झाल्यानंतर त्यांच्यापैकी तिघेजण इंग्रजी भाषा जाणणारे आहेत, हे कळलं. दोन-चार दिवसांच्या बोलण्या-सवरण्यातून ते सर्व कोण आहेत, कोणकोणत्या राजकीय पक्षांशी संबंधित आहेत– त्यांची राजकीय उद्दिष्टं काय आहेत हे मला समजून चुकलं. चार दिवस तिथं ठेवल्यानंतर मला एके दिवशी कार्यालयात बोलावण्यात आलं. माणुसकीनं मला वागवून त्यांनी मला माझा जीवनवृत्तांत लिहून द्यायला सांगितलं. मी रात्रभर लिहीत बसलो. दुसरे दिवशी सकाळी मी लेखी निवेदन त्यांच्या हवाली केलं.

खोलीत जे बंदिवासात होते त्यांना सर्व गोष्टींची मुभा होती. लिहिण्या-वाचण्याची सर्व व्यवस्था करण्यात आली होती. त्यांना भेटी-गाठींची परवानगी होती. त्यांच्या घरून खाण्या-पिण्याच्या वस्तू येत होत्या. भेटी-गाठींच्या वेळी आणि खाण्या-पिण्याच्या वस्तू आणून देणाऱ्या लोकांबरोबर बाहेर संदेश पाठवले जात होते आणि बाहेरच्या मंडळींचे संदेश त्यांना व्यवस्थित पोचत होते. या सर्व गोष्टींची मला गंमत वाटत होती आणि मी आनंदितही होत होतो. हा सर्व प्रकार बघतांना मी अनेक गोष्टी नव्याने शिकत होतो. रशियन सरकारच्या अधिकाऱ्यांच्या बुद्धिमत्तेपेक्षा त्यांनी पकडलेले राजकीय बंदी अधिक सरस आहेत व हे लोक अधिकाऱ्यांवर मात करतात, हे मी बघत होतो. काही दिवसांनंतर सकाळ-संध्याकाळ मला बाहेर फिरायला जाण्याची मोकळीक मिळाली. माझ्या खाण्या-पिण्याच्या वस्तूही बाहेरून मागवल्या जाऊ लागल्या. मी बंदिवान होतो परंतु माझे दिवस आनंदात चालले होते. माझ्या पायांच्या जखमा बऱ्या झाल्या. याच अवस्थेत एक महिना संपला. एके दिवशी माझ्या खोलीचं दार उघडलं गेलं. तुरुंगाच्या प्रवेशद्वारापाशी एक मस्त मोठी मोटर उभी होती. मोटारीत एक रशियन अधिकारी व एक रशियन स्त्री बसलेली होती. त्यांच्याशी माझा परिचय करून देण्यात आला. ती रशियन स्त्री मला म्हणाली की आमच्या सरकारनं भारतामधून तुमच्या संबंधीची सर्व माहिती हस्तगत केली आहे. तुम्ही तिथले एक विख्यात क्रांतिकारक आहात असं आमच्या सरकारला समजलं आहे. तुम्ही तुरुंगात जो जीवनवृत्तांत लिहून दिला आहे तो पूर्णपणे सत्य आहे—याबद्दल आम्हाला आता शंका राहिली नाही. आजपासून तुम्ही रशियन सरकारचे पाहुणे आहात. तुम्ही पूर्णपणे सुरक्षित आहात— कसलीच काळजी करण्याचं कारण नाही.

मोटारीत बसवून ते मला एका अलिशान हॉटेलात घेऊन गेले. हॉटेलच्या खोल्या प्रशस्त व सर्व सुखसोयींनी सज्ज होत्या. तिथल्या पलंगावर मी जाऊन अंग टाकलं, जवळ जवळ दोन महिनें मी जमिनीवरील लाकडी फळ्यांवर बिनअंथरुण-पांघरुणाचा झोपलो होतो. आता रेशमी चादरी व मखमली गाद्या-गिरद्यांवर लोळत पडलो, तेव्हा मनात विचार चमकून गेला की दैवाचे आणखी कोणते रंगी-बेरंगी खेळ आपल्याला बघायचे राहिले आहेत— कुणास ठाऊक? संध्याकाळ झाल्यानंतर मला परत एका मोटारीत बसवण्यात आलं. सारं ताश्कंद शहर मला दाखवण्यात आलं— रात्री एका नृत्यगृहात ते लोक मला घेऊन गेले. वैभवशाली असं जीवन जगत असतांना मला ज्या नरक यातना भोगाव्या लागल्या होत्या— त्या सतत आठवत होत्या. नाच-गाणं बघून मला फारसा आनंद वाटत नव्हता. या विषयात मला पूर्वीपासूनच फारशी रुची नव्हती. माझ्या अंगात तोच सदरा होता. पायजमाही तोच होता. मी रशियाच्या भूमीवर पाय ठेवण्यापूर्वी मी हे कपडे घातले होते. माझ्या मनात विचार आला— "रेशमी आणि मखमली गाद्यांवर आपण झोपतो आहोत— माझं वास्तव्य सध्या एका अलिशान हॉटेलात आहे मला सर्वोत्कृष्ट भोजन मिळतं— परंतु अंगावरील कपडे मात्र पूर्वीचेच आहेत—जुन-पुराणे आहेत"— माझ्या बुटात मी जे अमेरिकन डॉलर्स लपवले होते ते बाहेर काढले. पैसे अधिकाऱ्याच्या हवाली करून मी

त्यांना मला नवीन कपडे शिवून आणा असं सांगितलं. त्यांनी नाईलाज प्रकट केला. कपडे लवकर शिवून मिळू शकणार नाहीत व इथं रेडीमेड कपडे मिळू शकणार नाहीत, असं त्यांनी सांगितलं.

दुसऱ्या दिवशीच माझी रवानगी मॉस्कोला व्हायची होती. रेल्वेच्या एका सुंदर कॅबिनमध्ये माझी बसण्याची व्यवस्था केली होती. गाडीचा वेग खूपच कमी होता मॉस्कोला पोचण्यास चार दिवस लागले. बंदिवासातील काळात मी रशियन भाषा बऱ्याच प्रमाणात आत्मसात केली होती. मोठ्या वयाच्या स्त्री-पुरुषांना माझ्याशी बोलतांना संकोच वाटे, परंतु दहा-बारा वर्षांची मुलं माझ्या अवती-भोवती असत. ती मुलं मला नाना प्रकारचे प्रश्न विचारून हैराण करत. मी एक भारतीय क्रांतिकारक आहे आणि क्रांतीचा अभ्यास करण्यासाठी रशियामध्ये आलो आहे हे जेव्हा त्यांना समजलं त्यामुळे तर ते अधिकच माझ्याकडे आकृष्ट झाले. नाना प्रकारचे खाद्यपदार्थ आणि फळफळावळ माझ्या डब्यात पाठवण्यात येऊ लागले. रशियन नेत्यांनी आपल्या देशातील मुलांच्या मनात, जे देश भांडवलदारांच्या मगरमिठीत पडलेले आहेत तेथील पीडित लोकांविषयी सहानुभूती आणि बंधुभाव निर्माण व्हावेत असेच प्रयत्न केले होते. त्या मुलांचं प्रेम बघून प्रारंभी रशियन राजवटीविषयी माझ्या मनात जो तिरस्कार उत्पन्न झाला होता— तो आता नाहीसा झाला.

## ईस्टर्न युनिव्हर्सिटी

मॉस्को स्टेशनवर 'कम्युनिस्ट इंटरनॅशनल' च्या दोन अधिकाऱ्यांनी माझं स्वागत केलं. ते मला त्यांच्या कार्यालयात घेऊन गेले. त्यांना माझी संपूर्ण माहिती होती शिष्टाचार म्हणून आमचं थोडफार बोलणं झालं. त्यानंतर त्यांनी मला 'ईस्टर्न युनिव्हर्सिटी' या ठिकाणी पोचवलं. इथं जगातल्या सर्व क्रांतिकारकांना राजकारणाचं पद्धतशीर शिक्षण देण्याची व्यवस्था केलेली होती. खोलीत अंघरूण-पांघरुणाची व्यवस्था करण्यात आलीच— परंतु माझ्या कपड्यात मात्र काहीच बदल झाला नाही. त्याच सदऱ्यात व त्याच पायजाम्यात मॉस्कोच्या रस्त्यावरून जेव्हा मी फिरू लागलो तेव्हा सगळ्यांच्या नजरा माझ्याकडे वळत. ज्या खोलीत माझी थांबण्याची व्यवस्था केली होती तिथंच एका इंडोचिनी तरुणाचीही व्यवस्था केलेली होती. माझ्या गरजेचे कपडे त्यानं आपल्या सूटकेसमधून काढून मला दिले. पुढे त्याच्याशी माझी दाट मैत्री झाली. मी जोपर्यंत रशियामध्ये होतो तोपर्यन्त त्याची मैत्री अधिकाअधिक दृढ बनत गेली. मी रशियामध्ये येण्याच्या अगोदर पासूनच काही भारतीय क्रांतिकारक शिक्षणासाठी तिथे आलेले होते. त्यांना माझ्यासंबंधीची सगळी माहिती होती परंतु मी मात्र त्यांच्याशी अपरिचीत होतो. युनिव्हर्सिटीमध्ये एका प्रोफेसरांच्या मार्गदर्शनाखाली माझं इंग्रजीतून शिक्षण सुरू झालं. दोन आठवड्याच्या आतच त्यांनी कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या अधिकाऱ्यांना सांगितलं की ह्या राजकीय विद्यार्थ्याला राजकारणाची चांगली जाणकारी आहे— त्याची पूर्वतयारी चांगली आहे. ह्याला दुसऱ्या केंद्रात पाठवा.

राजकीय क्षेत्रात मी एव्हाना चांगलाच तिसमारखाँ बनलो होतो. मात्र आता जे अध्ययन सुरू झालं, आपल्याला यातलं अ-ब-क च ही ज्ञान नाही हे माझ्या लक्षात आलं. माझ्या राजकीय ज्ञानाचा पायाच मुळी कच्चा होता. ही गोष्ट हळूहळू माझ्या लक्षात येऊ लागली. नवं शिक्षण, नवं वातावरण, नवा सहवास या सर्व गोष्टींमुळे माझ्या जीवनाला एक नवंच वळण लागलं. कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या अधिकाऱ्यांनी माझ्या मनाचा व बुद्धीचा कबजा घेतला. प्रत्येक गोष्टीबाबतच माझं मूल्यमापन बदलू लागलं. फक्त एकच गोष्ट बदलली नाही. ती म्हणजे भारतात परत जाऊन आपल्याला देश स्वतंत्र करायचा आहे, ही. ज्या क्रांतिकारकांच्या सहवासात मी राहत होतो त्या सर्वांना टोपणनावं दिलेली होती. मलाही माझं टोपणनाव करावं लागलं– आता मी स्वतःला 'पॉल रिचर्ड मॉर्गो' या नावानं संबोधू लागलो.

### भारतीय क्रांतिकारक आणि साम्यवाद

इ. स. १९२३ ते १९३० पर्यंत मी हिंदुस्थानात साम्यवाद्यांच्या 'मेरठ कटा' संबंधी बरीच माहिती करून घेतली होती. १९२४ मध्ये कानपूर आणि १९२९ मध्ये मेरठमध्ये जे खटले चालले होते, त्यांचा मी बारकाईने अभ्यास केला होता. साम्यवादी लोकांना भेटण्यासंबंधी मी कधीच फारसा उत्साही नव्हतो. शिवाय त्यांच्या प्रामाणिकपणाविषयी आणि त्यांच्या देशभक्तीविषयी मी साशंक होतो. त्यांच्याकडे अविश्वासानेच बघत होतो. बोलण्याच्या ओघातच मला असं समजलं होतं की भारतातील साम्यवाद्यांना रशियाची आर्थिक मदत मिळते आणि त्या बळावरच भारतातील साम्यवादी रशियन नेत्यांच्या आज्ञाचे पालन करून भारतीय कामगारांची आणि शेतकरीवर्गाची संघटना निर्माण करत आहेत. साम्यवादी तत्वज्ञान व सिद्धांत मला ज्ञात नव्हते. क्रांती यशस्वी करण्यासाठी कामगार आणि किसानांची एकजूट करावी लागेल, ह्याची मला कल्पनाही नव्हती.

भारतातील साम्यवादी मंडळी बोल्शेव्हिक पद्धतीची क्रांती करू इच्छित होते. सरदार भगतसिंहांना ह्याची नीट कल्पना असती तर त्यांनीही कदाचित या मंडळींशी संपर्क प्रस्थापित करून एखादी संघटना उभी केली असती. सरदार भगतसिंहांनी 'इन्कलाब जिंदाबाद' ची घोषणा दिली– परंतु क्रांती यशस्वी करण्यासाठी किसान मजदुरांची संघटना उभी केली पाहिजे ही गोष्ट त्यांच्या गावीही नव्हती. ते आणि त्यांचे साथीदार 'इन्कलाब जिंदाबाद' च्या घोषणा देत प्रजासत्ताक सेना उभारून शस्त्रबळाने बोल्शेविहक पद्धतीची क्रांती भारतात करू इच्छित होते. सरदार भगतसिंह आणि त्यांच्या साथीदारांच्या प्रामाणिक हेतूविषयी माझ्या मनात कधीच शंका निर्माण झाली नाही. मला स्वतःला त्यांची विचारसरणी पटलेली होती म्हणून तर मी रशियाकडे निघालो होतो. रशियाला येण्याच्या अगोदर मी कधीही साम्यवादी पक्षाचं काम केलेलं नव्हतं– साम्यवादी तत्त्वज्ञान आणि अर्थशास्त्राचाही मी कधी अभ्यास केलेला नव्हता.

## साम्यवादी विचाराचं अध्ययन

माझं जीवन तसं शिस्तबद्ध होतं. साम्यवादी विचारप्रणालीमध्ये शिस्तीला महत्वाचं स्थान आहे. केवळ यांत्रिक पद्धतीच्या शिस्तीला नव्हे तर पोलादाप्रमाणं मजबूत शिस्तीला महत्त्व होतं. रशियन साम्यवादी नेते माझ्या वागणुकीवर संतुष्ट होते आणि प्रत्येक बाबतीत त्यांचं मला साहाय्य लाभत होतं. तीन महिन्यानंतर त्यांच्या लक्षात ही गोष्ट येऊन चुकली की युनिवर्सिटीच्या अन्य विद्यार्थ्यांशी माझा ताळमेळ बसू शकत नाही. त्यांना असं वाटलं की माझी एकूण समज आणि शिक्षणाचा दृष्टिकोण एखाद्या अनुभवी साम्यवाद्याप्रमाणे दृढ बनलेला आहे. परिणामी ईस्टर्न युनिवर्सिटीमधून काढून मला साम्यवादी पक्षाचा सदस्य बनवून जिथं अनेक वर्षं कम्युनिस्ट पार्टीचं निष्ठेनं कार्य केलेले क्रांतिकारक काम करतात, अशा एका खास संस्थेत दाखल केलं. ह्या क्रांतिकारकांसमवेत काम करताना माझ्या लक्षात आलं की ह्या लोकांनी कामगारवर्गात काम केलेलं आहे. या कामाचा त्यांना खूप अनुभव आहे.

मी साम्यवादी तत्वज्ञानाचा सखोल अभ्यास केला व त्यातले सिद्धांत प्रत्यक्ष जीवनात आणण्याचे प्रयत्न केले. त्याउपरही मला नाविन्याचा चित्तथरारक असा अनुभव येत नव्हता.

सर्व देशातील साम्यवादी त्या संस्थेत अभ्यास करत होते. त्यांच्यात वेगळ्या प्रकारची आवड होती. त्या सर्वच क्रांतिकारकांचं जीवन सुंदर तऱ्हेनं व्यतीत होत होतं. जर्मन, स्पॅनिश, इंडोचीनी, आणि चिनी या सर्वच लोकांची समज, क्रांतीसंबंधीची भावना, कार्यदक्षता आणि देशप्रेम– अतिशय प्रामाणिक होतं. आपल्या देशातील लोकांची जुलमी राजवटीच्या मगरमिठीतून सुटका करण्याची त्यांची तीव्र इच्छा– या सर्व गोष्टींनी मी प्रभावित झालो होतो. त्या सर्वांच्या सहवासामुळंच मला साम्यवादी सिद्धान्त लक्षात येऊ लागले. आपल्या देशावर प्रेम कसं करावं हे मी रशियन लोकांकडून नव्याने शिकलो देशप्रेम माझ्या रोमरोमी भिनलेलं होतं परंतु ह्या प्रेमाला प्रत्यक्षात आणण्यासाठी आपल्याला काय काय केलं पाहिजे, कशा रीतीनं कार्य केलं पाहिजे. यशस्वी क्रांतीनंतर देशाची नव्याने घडी बसवताना आपणास कसं तपस्व्यासारखं वैराग्यपूर्ण व निःस्वार्थ जीवन जगावं लागेल, हे सर्व चित्र रशियन साम्यवाद्यांकडे बघून माझ्यासमोर साकार होऊ लागलं. इ.स.१९३१ ते १९३४ पर्यंत रशियन राज्यकर्ते ज्या प्रकारे आर्थिक संकटाचा सामना करत होते–त्यांची ती जिद्द बघून मी अगदी लज्जित होऊन जाई. क्रांतिकारक या नात्यानं मी रशियन शासनाचा पाहुणा होतो. सबंध रशिया आर्थिक संकटाशी सामना करत असतांनाही माझी बडदास्त उत्तम प्रकारे ठेवण्यात आली होती. पाहुणचारात काहीच उणीव नव्हती– मला सर्व सोयी उपलब्ध होत्या. सबंध रशियन जनता आणि प्रमुख कार्यकर्ते अत्यंत हलाखीचं जीवन जगत होते– हे बघीतल्यावर मला याची जाणीव झाली की रशियातील बालकं देखील जीवनसंग्रामाला सामोरी जात आहेत, परिस्थितीची आव्हान स्वीकारून उभी आहेत.

A—287—18—B

मृत्यूनंतर स्वर्ग प्राप्ती होईल की नाही, अशी त्याना विवंचना नव्हती. ते त्यांच्या वाट्याला आलेल्या ह्याच आयुष्यात आपल्या मातृभूमीवर स्वर्ग निर्माण करण्याच्या प्रयत्नात होते. आपले मनोरथ पूर्ण व्हावेत यासाठी ते सर्वस्व-त्यागाला उद्युक्त झाले होते. तरुण-तरुणी, आबाल-वृद्ध सर्वांचेच चेहरे मलूल वाटत होते. मी स्वतः आपल्या डोळ्यांनी मोठमोठ्या नेत्यांना आणि अधिकाऱ्यांना काळपट रंगाचे ब्रेड गरम पाण्यात बुचकळून खाताना पाहिलं होतं. असं कदन्न खातानाही ते आनंदी होते. तोंडाची चव बदलण्यासाठी शेवटी ते चिमूटभर साखर तोंडात टाकत होते. सोळा सोळा तास कारखान्यात काम करणारा रशियन कामगार, कामावरून परतल्यानंतर दोन छटाक आटा, सहा छटाक डाळ व चिमूटभर मीठ एवढ्या सामग्रीवर गुजराण करत होता. हे मी पाहिलं होतं. हे सर्व बघून माझ्या मनासमोर प्रश्न उभा राहिला, आपल्या देशातही यशस्वी क्रांतीनंतर अशाच परिस्थितीला सामोरे जावे लागणार ? अशा प्रकारचं तपाचरण करून माझे देशवासी आपली संपूर्ण ताकद नव्या राष्ट्राच्या उभारणीसाठी याच जिद्दीने लावतील काय ? काही वर्षांसाठी मनुष्य अतोनात कष्ट सहन करण्यास तयार होऊ शकतो— परंतु कायमचं तपस्वी, कष्टप्रद जीवन जगणं माणसाला शक्य नसतं.

रशियाचं आजचं वैभव हे जनतेच्या त्यागातून, तपश्चर्येतून निर्माण झालेलं आहे. तिथल्या जनतेची आपल्या नेत्यांवर अपार श्रद्धा होती. राष्ट्राच्या उभारणीसाठी ते स्वतःचे आत्यंतिक हाल करून घेत होते. आपल्या राष्ट्राचं भविष्यकालीन चित्र त्यांच्या ज्ञानचक्षूंना स्पष्टपणे दिसत होते— त्यासाठी वाटेल तो त्याग करण्याची त्यांची तयारी होती. उद्दिष्टपूर्तीसाठी ते लोक आपल्या रक्ताचा शेवटचा थेंब सांडायला तयार होते; देशासाठी सर्वस्व अर्पण करत होते.

माझ्या देशवासियांच्या संदर्भात माझं मन विश्वासानं मला आश्वासन देत होतं की इंग्रजांच्या सैनिकी बळापुढे आता ते फार काळ तगणार नाहीत. भारतात क्रांती यशस्वी होईलच. माझ्या मनात एकच शंका होती— आपल्या नेत्यांसंबंधी! माझं मन असं ग्वाही देत होतं की नेते जर बलिदानाची तयारी ठेवत असतील तर माझ्या देशाची जनता सर्व प्रकारच्या त्यागाला तयार होईल.

### काफ पर्वतावरील पन्धा

कॅस्पियन समुद्राच्या किनाऱ्यावर काफ पर्वताजवळ एक प्रख्यात आरोग्यधाम आहे. त्याचं नाव आहे— 'किस लो वोस्क' झार राजवटीत केवळ धनिकांनाच या आरोग्य धामात प्रवेश मिळत होता. रशियन राज्यक्रांतीनंतर प्रमुख कार्यकर्त्यांसाठी हे आरोग्य-धाम खुलं करण्यात आलं. महिन्याभराच्या विश्रांतीसाठी माझी या आरोग्य-धामात रवानगी करण्यात आली.

उंच उंच पर्वत शिखरांनी वेढलेलं 'किस लो वोस्क' हे एक छोटंसं सुंदर शहर आहे. काफ पर्वताची बर्फाच्छादित शिखरं ही तिथून बघायला मिळतात. रशिया मधला हा भू-प्रदेश अनेक दृष्टींनी सौंदर्याचा खजिना समजला जातो. काफ पर्वतावरील पऱ्यांच्या कथा वाङ्मयात प्रसिद्ध आहेत. तिथल्या स्त्रियांचं सौंदर्य परी पेक्षा कुठंही उणं नाही. रात्रीच्या वेळी पर्वताच्या एका विशिष्ट शिखरावरून शहराकडे बघितलं तर असा भास होतो की आपण स्वप्नातील एका सुंदर शहराचं दृश्य बघतो आहोत— स्वप्ननगरीचं सौंदर्य बघून आनंदित होतो आहोत. एके दिवशी मी त्या पहाडाच्या शिखरावर पोहचलो. चांदण्या रात्रीची वेळ होती. काही रशियन युवक-युवतीही तो आनंद लुटण्यासाठी तिथं आलेली होती. आपल्या आनंदात ते मग्न होते.

हे रम्य दृश्य बघून आनंदित झालो असतानाच मी अंतर्मुख होऊन विचार करू लागलो. मी एक क्रांतिकारक आहे. भगतसिंह आणि चन्द्रशेखर आझाद यांनी मला रशियात जायची सूचना केली, ती केवळ एवढ्यासाठीच की मी एक उत्कृष्ट क्रांति-कारक बनून व क्रांतीचं शिक्षण घेऊन मायदेशाला परत येईन. परंतु मी तर इथं बसून काफ पर्वतावरील पऱ्यांचा विचार करत आहे. या स्वर्गासारख्या सुंदर भूमीवरील मनाला मोहून टाकणारी दृश्य बघत आहे. माझ्यातला निष्ठावान क्रांतीकारक एकाएकी जागृत झाला. मी एका आवेशातच तिथून उठलो—एक क्षणभरही त्यानंतर मला तिथं थांबावं वाटलं नाही. माझं मन मला सांगू लागलं—हे क्रांतिवीर! मन मोहून टाकणाऱ्या या सौंदर्यपूर्ण दृश्याचा आस्वाद आणि आनंद तेच लोक घेऊ शकतात ज्यानी या भूमीसाठी आपलं रक्त सांडलं आहे; रक्ताचं शिंपण करून त्यांनी हा अधिकार प्राप्त करून घेतला आहे.

१९३३ चा सुमार होता. रशियाच्या भूमीवर मी अर्धंच वर्ष वास्तव्य केलं होतं. माझ्या जीवनातला हा काळ एखाद्या स्वप्नासारखा होता. बालपणचं दारिद्र्य जगभराच्या भ्रमंतीचे कष्ट, तुरुंग व अज्ञातवासाच्या यातना—या सर्वांचा मला इथं विसर पडला होता. तिथल्या सर्व साथीदारांकडून मला आदर व प्रेम मिळत होते— परंतु त्या रात्रीनंतर रशियामध्ये राहणं मला काट्यासारखं सलू लागलं. स्वर्गात प्रवेश मिळवणं जेवढं कठीण असतं तेवढंच रशियामध्ये प्रवेश करणं कठीण असतं !

देशप्रेमाच्या ज्या ऊर्मीनं मला बर्मामधून पंजाबला जायला भाग पाडलं होतं, तीच भावना, धुंदी पुन्हा माझ्या ठिकाणी निर्माण झाली. रशियन प्राध्यापकाकडून तसेच अनेक प्रख्यात क्रांतिकारकाकडून देशप्रेमरूपी अमृताचे चषक मी भरभरून प्यालो होतो. साम्यवादी सिद्धांतावर आधारलेली राजकीय तत्त्वप्रणाली आत्मसात केल्यानंतर व अनेक प्रख्यात क्रांतिकारकांचा सहवास लाभल्यामुळे माझ्या मनात क्रांतीचे नवेच तरंग प्रगट होऊ लागले. जन्मभूमी मला साद घालत होती आणि तिथं पोचण्याची मी जुळवा-जुळव करू लागलो.

लाहोर कट खटल्यातील तसेच अंदमान बेटावरील तुरुंगातले माझे साथीदार बाबा गुरुमुखसिंह मला येऊन भेटले. अफगाणिस्थानमार्गे भारतीय क्रांतिकारकांना बाहेर पाठवून, त्यांचं शिक्षण वगैरे आटोपून त्यांना परत भारतात कसं पोचवता येईल, हयाची त्यांना काळजी लागली होती. ज्याच्या मदतीनं ही गोष्ट करता येईल, असा कुणी सहाय्यकर्ता त्यांना मिळत नव्हता. ते स्वतः अफगाणिस्थानचे नागरिक होते. त्यांच्याकडे पासपोर्ट असल्यामुळे ते उघडपणे अन्य देशांना जाऊ शकत होते. पासपोर्टची गरज पडणार नाही असा मार्ग त्यांना हवा होता. असा रस्ता फारच बिकट स्वरूपाचा होता. रशियन हद्दीत राहणाऱ्या हिन्दी नागरिकाची आम्ही मदत मिळवली. या माणसाला जंगलाचे आणि पर्वतावरील रस्ते चांगले माहीत होते. दोन रशियन साथीदारासमवेत आम्ही आमू नदीच्या काठावर येऊन पोचलो. ही बर्फानं आच्छादलेली डोंगराळ प्रदेशातील नदी अफगाणिस्थान व रशिया या दोन देशांचं विभाजन करत होती. पैशाचं आमिष दाखवून पैलतीरावरील एका अफगाण माणसाची आम्ही मदत घेतली. तो उत्कृष्ट पोहणारा होता. पोहण्याचा नांगला सराव असल्यामुळे हा माणूस बर्फाच्छादित नदी पार करू शकत होता.

## बर्फाळ नदीच्या पलीकडे

रात्रीची वेळ होती. आम्ही रशियन साथीदारासमवेत नदीतीरावर येऊन पोचलो. सायंकाळच्या वेळीच आम्ही नदीत कुठं उडी घ्यायची म्हणजे आपण अमक्या ठिकाणी पोचू शकू, याचा अंदाज घेतला होता. जूनचा महिना होता. नदीच्या प्रवा-हाचा वेग ताशी पंधरा-वीस मैलाचा होता. नदीच्या पात्रात कुठं-कुठं खडकाळ भाग

होता. नदीचं पात्र असेल चारशे गज रुंदीचं. कुणाही नैपुण्य प्राप्त केलेल्या माणसाला तरंगणाऱ्या साधनांच्या सांगडीच्या मदतीनं नदी पार करणं फारसं कठीण नव्हतं. परंतु सर्वसामान्य नदीही पोहून पार करण्याचा अनुभव नसलेल्या आमच्या सारख्यांना प्रचंड वेगानं धावणाऱ्या बर्फाच्छादित नदीतून पैलतीरावर सुरक्षित जाऊन पोचणं ही बाब जिकिरीची वाटत होती. आमच्या काळजात धडधड होत होती. आम्ही पर्वतावरून किंवा जंगलातील रस्त्यानं प्रवास करण्यासाठी एक घोडा व एक खेचर अशी व्यवस्था केली होती. त्या जलतरणपटू माणसाने आपली सांगड घोड्याच्या शेपटाला बांधली आणि त्या सांगडीवर पोटाच्या बाजूनं पडून राहायला मला सांगितलं. मी माझे दोन्ही हात व दोन्ही पाय पाण्यात सोडून सांगडीवर पडून राहिलो. तो तरुण घोड्याच्या पाठीवर हात ठेवून नदीतून चालू लागला. नदीच्या लाटांनी मला अनेकवेळा वरती उडवण्याचा प्रयत्न केला—— मी जर सांगडीचा आधार नीट सांभाळला नसता तर माझा निश्चितच मृत्यू घडून आला असता. एखाद्या प्रचंड खडकावर जाऊन मी आदळलो असतो आणि शरीराचे तुकडे-तुकडे झाले असते. चारशे गजांच्या त्या प्रवासात मी तीन वेळा मरता मरता वाचलो होतो.—त्या अफगाण माणसाने घोड्याच्या मदतीनं अशा रीतीनं मला नदीच्या पलीकडील काठावर नेऊन पोचवलं. बर्फमय पाण्यामुळं माझं शरीर बर्फाप्रमाणं गारठून गेलं होतं. काही मिनिटांनंतर शरीरात थोडीशी ऊब आली. तो अफगाण जल-तरणपटू एका मिनिटाचीही विश्रांती न घेता घोड्याच्या पाठीवर हात ठेवून परत नदीच्या पात्रात शिरला व पहिल्या किनाऱ्याकडे निघाला. त्या ताकदवान, धाडसी तरुणाकडे मी टकमका बघतच राहिलो. नदीचं बर्फयुक्त पाणी त्याच्या स्पर्शानं गरम होत असलं पाहिजे, या विषयी माझी पक्की खात्री झाली. त्या जलतरणपटूबरोबर घोड्याच्या मदतीनं नदीचं पात्र मी पंधरा मिनटात ओलांडलं असावं. त्याला जाऊन एव्हाना एक तास होऊन गेला होता परंतु माझे साथीदार बाबा गुरुमुखसिंह यांना तो घेऊन आला नव्हता. मला कमालीची अस्वस्थता जाणवू लागली. माझे जोडीदार बाबा गुरुमुखसिंह यांची शरीरप्रकृती फार चांगली नव्हती. त्यांना एखादा अपघात तर झाला नसेल, ही शंका मला सतावू लागली. जाणाऱ्या प्रत्येक क्षणानंतर माझं मन अधिकाधिक व्याकूळ होऊ लागलं.—— तिथं थांबून, डोळे फाड-फाडून नदीकाठाकडे बघण्याखेरीज मी काहीही करू शकत नव्हतो. अंधार एखाद्या पर्वता-प्रमाणे नदीवर पसरला होता. दोन तासानंतर तो जलतरणपटू बाबा गुरुमुखसिंह यांना घेऊन तिथं पोचला. खेचराच्या शेपटाला सांगड बांधली होती परंतु ते शेपूटच तुटलं आणि सांगड ऐन प्रवाहात वाहत निघाली, हे नंतर मला समजलं. त्या शूर जलतरणपटूनं नुसत्या सांगडीच्या मदतीने बाबा गुरुमुखसिंह यांना नदीच्या ह्या किनाऱ्यावर आणून पोचवलं होतं. खेचर त्यांच्या पद्धतीनं माघारी गेलं होतं. बाबा गुरुमुखसिंहांना तिथं सोडून तो अफगाण तरुण पुन्हा अंधारात अदृश्य झाला.

आम्ही दोघांनीही आपले कपडे नीट पिळून झाडां झुडुपांवर सुकविण्यासाठी टाकले. उन्हाळ्याच्या कोरड्या हवेनं ते तावडतोब अर्धवट सुकले. अर्धवट सुकलेले कपडे अंगावर चढवून आम्ही आपापल्या घोड्यांवर स्वार होऊन तिथून निघालो. घोडेच रस्ता शोधत-शोधत निघाले होते. आम्ही कुठं जात आहोत, याचा आम्हालाच पत्ता नव्हता. सकाळ झाली. सूर्योदय झाला. आम्ही तसेच पुढे पुढे निघालो. सकाळची आठची वेळ असावी. समोरच्या बाजूने एक अफगाण पोलिसांची तुकडी आमच्या नजीक येऊन पोचली. आम्ही तिथं अगदीच नवखे होतो. सीमा भागात इकडे तिकडे फिरायला माणसं घाबरतात. कोणत्याही क्षणी पोलीस पकडतील, अशी त्यांना धास्ती असते. त्या भागात कुणा अपरिचितानं म्हणून राहणं अशक्य होतं. आम्हाला पाहताच पोलिसांना असं समजून आलं की आम्ही कुणाचे तरी हेर असलो पाहिजेत. त्यांच्या एकाही प्रश्नाचं समाधानकारक उत्तर आम्हाला देता आलं नव्हतं. त्यांनी आम्हाला ताब्यात घेतलं. तिथून सुमारे पंधरा मैल अंतरावर असलेल्या फैजाबाद या ठिकाणी ते आम्हाला घेऊन गेले. फैजाबादच्या मोठ्या अधिकाऱ्यानं आमच्या जबान्या घेतल्या. जबान्या देतांना आम्ही भारतातील हिंदु व्यापारी आहोत, असं सिद्ध करण्याचा आम्ही प्रयत्न केला. पैसा कमावण्यासाठी आम्ही रशियामध्ये गेलो होतो. परंतु तिथल्या जुल्मी राजवटीचे अत्याचार आम्ही सहन करू शकलो नाहीत. आम्हाला आता अफगाणिस्थानामध्ये आश्रय मिळेल या आशेने अनेक संकटं सहन करत इथं येऊन पोचलो आहोत. येथली दयाळू राजवट आम्हाला निश्चित आश्रय देईल व इथं वास्तव्य करण्याची अनुमती देईल, अशी आमची अपेक्षा आहे. जबानी देते वेळी आमच्या चेहऱ्यावर कमालीची नम्रता होती. शिवाय जबानीवर विश्वास बसावा असाच आमचा आविर्भाव होता. आमची युक्ती सफल ठरली. त्या अधिकाऱ्याचा आमच्यावर विश्वास बसला.

जवळ पास एक आठवडा आम्ही फैजाबादला राहिलो. या भागातलं एक मोठं शहर खानाबाद इथं आम्हाला तीन पोलीस सोबत देऊन पाठवण्यात आलं. मोठ्या विचित्र परिस्थितीत आमची रवानगी करण्यात आली. आम्हा दोघा बंदिवानांना घोड्यावर बसवण्यात आलं मात्र आमचे रक्षक बिचारे चालत निघाले. अफगाण शिपाई हे किती वेळ सहन करणार? त्या काळी एखादा स्वतंत्र हिंदु व्यापारी घोड्यावर स्वार होऊन शहरातून फिरू शकत नव्हता. आम्ही तर जाणून बुजून कैदी होतो. शिपायांनी आम्हाला खाली उतरून पायी चालायला भाग पाडलं. चालत चालत आम्ही शहरापासून तीन मैल दूर आलो. आम्ही चांगलेच थकून गेलो होतो. गावाबाहेर आल्यानंतर अफगाण शिपायांनी घोडे आम्ही त्यांच्या स्वाधीन करावे, अशी मागणी केली. ते आता घोड्यावर स्वार झाले व आम्ही त्यांच्या मागे पायी चालत निघालो. मी आणि बाबा गुरुमुखसिंह दोघेही क्रांतिकारक होतो. आमचं शारीरिक बळ त्या तीन शिपायांना लोळवण्याइतपत निश्चितच होतं. आम्ही मोठ्या नम्रपणाने त्यांना 'आम्ही प्रतिष्ठित व्यापारी आहोत' हे

सांगितलं, 'पायी प्रवास करण्याची आम्हाला सवय नाही. त्यांनी आमच्यावर जुलूम करू नयेत.' दोन हिंदु माणसं आरामात घोड्यावर बसून प्रवास करणार आणि सरकारी शिपाई त्यांच्या मागे पायी चालणार या गोष्टीची ते कल्पनाही करू शकत नव्हते. आम्ही जर घोडी त्यांच्या हवाली केली नसती तर लगेच भांडण सुरू झालं असतं. आम्ही एकमेकांच्या अगदी जवळ उभे होतो. मी घोड्याच्या गळयात बांधलेला दोर आपल्या हाती पकडला. मी शिपायाला दरडावून म्हटलं की, या दोरानं त्याला असं पिटण्यात येईल की, चामडी उधडून निघेल. त्यांच्यापाशी बंदुकी होत्या. परंतु बंदुकीत काडतुसं भरायला व आमच्यावर गोळया झाडायला त्यांना आम्ही अवसरच ठेवला नव्हता. आमचा संतापानं लाल झालेला चेहरा बघताच काहीही हालचाल केली की, हे लोक आपल्याला पिटून काढतील, हे त्यांनी ओळखलं. आमच्या क्रांतिकारक पद्धतीचा त्यांच्यावर आमच्या अपेक्षेप्रमाणेच परिणाम घडून आला. आता आम्ही घोड्यावर स्वार झालो व ते निमूटपणे आमच्या मागे चालत निघाले. रस्त्यानं अनेक ठिकाणी आम्ही त्यांना उत्तम प्रकारचं भोजन आमच्या खर्चानं दिलं, त्यामुळे ते आमचे मित्र बनले. खानाबादच्या अधिकाऱ्यासमोर त्यांनी आम्हाला उभं केलं. पोलीस ठाण्यावर पोचण्यापूर्वीच तिथल्या बाजारात आम्हाला मदत करू शकणारा कुणी हिंदु व्यापारी मिळू शकतो काय, याची आम्ही चौकशी केली होती. बाबा गुरमुखसिंहांनी विश्वासपात्र अशा एका शीख युवकाची भेट घेतली होती. त्याला आम्ही बरोबर घेऊन निघालो. आम्ही पोलीस चौकीवर येऊन पोचलो. तिथल्या अधिकाऱ्याला त्याच्या जामिनकीवर आमची मुक्तता करण्याची विनंती केली. आमचं निवेदन वाचून व जामिन बघून त्या अधिकाऱ्याची खात्री पटली की, आम्ही प्रतिष्ठित व सभ्य माणसं आहोत. त्यानं आम्हाला एक आठवड्यासाठी जामिनावर मुक्त केलं. आम्ही एका धर्मशाळेत मुक्काम ठोकला. या नव्या कटकटीतून कशी सुटका करून घ्यावी यावर आम्ही विचार करू लागलो. आम्ही एक योजना आखली. आम्ही शासनाकडे अर्ज केला की, जमानतीवर आम्हाला सोडून काबूल येथे जाण्याची परवानगी मिळावी. तो अधिकारी म्हणाला की पंधरा दिवसांच्या आत तुम्ही काबूल येथे पोचा व तिथं अधिकाऱ्यांच्या स्वाधीन व्हा व तसा शासकीय निरोप आमच्याकडे रवाना करा. दुसऱ्या दिवशी त्या अधिकाऱ्याला आश्वासन देऊन आम्ही तिथून निघालो. ज्या शीख तरुणानं जामिनावर आमची सुटका केली आता तो संकटात सापडला. काबूल येथे जर आम्ही शासनाच्या स्वाधीन झालो नाहीत तर तो अधिकारी त्या शीख तरुणाला जिवंत ठेवणार नाही, हे आम्हाला कळून चुकलं. त्याचा जीव वाचवण्याची मग आम्ही योजना आखली. खाना-बादहून काबूलला पोहचण्यासाठी आम्हाला पंधरा दिवसांची मुदत मिळाली होती. हा वास आम्ही सात दिवसात पुरा करण्याचं ठरवलं. त्या मित्राला अदृश्य शाईनं पत्र लिहून प्रआम्ही त्याला एका वेगळया मार्गानं खानाबाद सोडून रशियामध्ये जायला सांगितलं रशियन सरकार त्याचं स्वागतच करील, त्यानं कसलीही चिंता करू नये असं त्याला कळवलं.

घोड्यावर बसून आम्ही वेगानं दौड आरंभली. हिंदुकुश पर्वताची पंधरा-सोळा हजार फूट उंच शिखरं आम्हाला पार करावयाची होती. नद्या ओलांडायच्या होत्या. कधी घोड्यावर बसून तर कधी घोड्यांचे लगाम हातात धरून आम्ही मार्ग कापीत होतो. पडेल ती किंमत देऊन आम्ही घोड्यांचं खाद्य विकत घेतलं. आमच्यासाठीही चांगले पौष्टिक पदार्थ खरेदी केले. काबूल दहा मैलांच्या अंतरावर राहिलं तेव्हा आम्ही घोडे अल्पशा किमतीत विकून टाकले. अंधार पडल्यावर आम्ही शहरात दाखल झालो. बाबा गुरुमुखसिंह काबूल शहराशी चांगले परिचित होते. इथं शेकडो माणसं त्यांच्या विश्वासातली होती, मित्र होती. आम्ही त्यांच्या घरी गेलो. सर्व परिस्थिती त्यांना सांगितली आणि दुर्गम डोंगराच्या आडवाटांनी आम्हाला भारताच्या हद्दीत पोचविण्याची व्यवस्था करण्याबद्दल सांगितलं. त्यांच्या सहकार्यानं आम्हाला हवा तसा एक मदतनीस मिळाला. आम्ही त्याच्या समवेत तिथून लगेचच निघालो. रात्रंदिवस, कुठेही विश्रांती न घेता, आम्ही मार्गक्रमण करत होतो. प्रवासाच्या दुसऱ्या दिवशी रात्रीच्या वेळी आम्ही एका गावाजवळून जात असताना तिथली कुत्री जोरजोरात भुंकत आमच्या स्वागताला आली. पोलिस ठाण्यातून शिपाई बाहेर पडले व त्यांनी आमच्याभोवती कडं केलं. त्यांच्या प्रश्नांची संतोषजनक उत्तरं आम्ही देऊ शकलो नाहीत. त्यांचा संशय बळावला. ते आम्हाला ठाण्यावर घेऊन गेले. सकाळी चौकशी होईपर्यंत तिथेच झोपण्याची त्यांनी आम्हाला सूचना केली. एवढे बोलून पोलिस शिपाई झोपी गेले परंतु आम्हाला कुठली झोप लागणार? आम्ही तिथून पळ काढला. रस्ता अतिशय बिकट होता. एका बाजूस बर्फाळ काबूल नदी होती. दुसऱ्या बाजूस उंचच उंच पर्वत होते. बाबा गुरुमुखसिंहांनी असा विचार केला की पर्वत ओलांडून पलीकडे जावं. रात्रीची वेळ आणि उन्हाळा. पर्वतांची चढण चढताना आम्ही पार थकून गेलो. अत्यंत तहानेनं आम्ही व्याकूळ झालो होतो. रस्त्याचं नेमकं अंतर किती आहे आणि किती वेळात हा पर्वत आम्हाला ओलांडणं शक्य होईल, ह्याबाबत आम्हाला कसलीच जाणकारी नव्हती. नाइलाजास्तव आम्ही परत नदीच्या काठाकाठानं चालू लागलो. पाणी पिऊन आम्ही थोडावेळ विश्रांती घेतली. रस्ता सोडून पर्वताच्या पायथ्याशी असलेल्या शेतांमधून आम्ही चालू लागलो. रस्त्यातच एक रात्र काढून दुसऱ्या दिवशी आम्हाला परत एका पोलिस ठाण्याच्या हद्दीतून जावं लागणार होतं. आम्ही अशाप्रकारे पोलिस ठाण्यावरून निसटलो की पोलिसांना आमचा संशय देखील आला नाही. चालता चालता आम्ही जलालाबादला पोचलो. इथेच जलालाबादमध्ये गव्हर्नरांच्या मेहरबानीमुळे मला या अगोदर काबूलला जाण्याची परवानगी मिळाली होती.

काबूल ते जलालाबादचा हा प्रवास अत्यंत कष्टप्रद झाला होता. चालून चालून पायांचे हाल झाले होते. बाबा गुरुमुखसिंहांच्या पायात अमेरिकन बनावटीचे बूट होते परंतु माझ्या पायात जुने रशियन बूट होते. त्या बूटांचे खिळे बाहेर आले होते.

जलालाबाद शहरातून आम्ही लपत छपत कसेबसे बाहेर निघालो. गावाबाहेर आल्या-नंतर मात्र आम्ही सरळ हमरस्त्यानं चालू लागलो. प्रवासानं सगळं शरीर ठणकत होतं. समोरच्या बाजूनं एक रिकामा टांगा येतांना दिसला. कसलाही मागचा पुढचा विचार न करता आम्ही टांग्यात चढलो व समोर चलण्याद टांगेवाल्याला सांगितलं. टांगा जोरात धावू लागला. काही वेळानंतर घोडा थकल्यामुळं तो एका ठिकाणी थांबला. रस्त्याच्या कडेला एक घर होतं. टांगेवाला म्हणाला की, तहान लागली आहे मी पाणी पितो व घोड्यालाही पाणी पाजतो. आम्ही नाही कसं म्हणणार? टांगेवाला त्या घरात शिरला. त्या घरातल्या माणसानं टांगेवाल्याला कुठून आला कुठं जाणार, अशी विचारणा केली. तो सहजच म्हणाला की दोन हिन्दु व्यापा-ऱ्यांनी आपल्याला पकडलं असून ते पुढे-पुढेच घेऊन जायला सांगत आहेत. त्या घरात पोलीस चौकी होती. पोलीसच त्याला प्रश्न करत होते. त्याच्या सांगण्यानं पोलीसांना संशय आला. आम्हाला प्रश्न विचारण्यासाठी ते स्वतःच घरातून बाहेर आले. त्यांनी चौकशी सुरू केली. आमचे चेहरे बघून काही तरी काळंबेरं आहे अशी त्यांची खात्री पटली. आमच्याशी नरमाईनं बोलून आम्ही पाणी प्यायला खाली उतरावं व पाणी पिऊन नंतर पुढचा प्रवास करावा, अशी त्यानी सूचना केली. हे पोलिसांचे लोक आहेत, याची आम्हाला खात्री पटली. त्यांना नकार देऊन चालण्यासारखं नव्हतं. आता पळायची किंवा त्यांच्याशी चार हात करण्याची आमची ताकद नव्हती. गुपचूप खाली उतरून आम्ही त्यांच्या समवेत निघालो. ते आम्हाला एका पाठोपाठ एक प्रश्न विचारू लागले आणि त्यांचा संशय वाढू लागला. दोन तास चौकशी केल्यानंतर आम्ही शासनाचे शत्रू आहोत, असा त्यांनी निर्वाळा दिला. त्याना आम्हाला बंदिवान केलं. बाबा गुरु-मुखसिहांनी अनेक युक्त्या अवलंबिल्या, परंतु कशाचाच उपयोग झाला नाही. सर्व प्रयत्न निष्फळ ठरले.

## पुन्हा बंदिवासात

आम्हाला बंदिवान अवस्थेत जलालाबादला पोचवण्यात आलं. तिथून पोलीसच्या गाडीत घालून आम्हाला जलालाबाद नजिकच्या एका किल्ल्यावर पाठवण्यात आले. आम्ही आमच्या जबानीमध्ये व्यापार करण्याच्या उद्देशानं सीमा ओलांडून आल्याचं कबूल केलं. बाबा गुरुमुखसिहांनी पैशाच्या बळावर पोलीसांच्या तावडीतून सुटकेचा प्रयत्न केला. त्यांनी आपल्या बुटात लपविलेले सर्व पैसे बाहेर काढून पोलिसांच्या हातावर ठेवले व आम्हाला सोडा असं त्यांना सांगितलं. पोलीसांनी पैसे स्वीकारले, मात्र त्याची लेखी नोंद कुठेच केली नाही. आमच्यापाशी आता एक दिडकी देखील शिल्लक नव्हती. बंदिवान लोकांना आपल्या खर्चानं जेवण मागवावं किंवा कुणा नातेवाईकाकडून भोजनाची व्यवस्था करावी, असा अफगाण सरकारचा हुकूम होता. बंदिवान लोकांना जिवंत ठेवण्याची सरकारची जबाबदारी नव्हती. तुरुंगाच्या अधिकाऱ्यानं आम्हाला सांगितलं उपाशी पोटी इथं पडून राह्यची तुमची तयारी असेल तर तसं तुम्ही करू शकता.

किंवा गावातल्या दुकानांवर जाऊन भीक मागून खायची तयारी असेल तर तसंही करू शकता. अफगाणिस्तानातील अनेक हिन्दु लोक बाबा गुरुमुखसिंहांना चांगलं ओळखत होते. त्यांना स्वतःला बाजारात जाऊन भीक मागणं प्रशस्त वाटत नव्हतं. मग मी एकटाच बाजारात गेलो. एका हिंदु माणसाला सर्व हकीकत सांगितली. त्याच्या घरी जाऊन मी जेवण केलं आणि बाबा गुरुमुखसिंहांसाठी खायचे पदार्थ घेऊन आलो. थोडा वेळ विश्रांती घेतल्यानंतर, अशा पद्धतीनं आपण कसं काय जगू शकणार, यासंबंधी आमचा विचार सुरू झाला. आम्ही या निर्णयावर येऊन पोचलो की अधिकाऱ्यांना सर्व सत्य परिस्थिती सांगून टाकावी. अधिकाऱ्याला बोलावून आम्ही त्याला सर्व हकीकत सांगितली. त्याचा त्वरित परिणाम घडून आला. आम्हाला बंदीवान्यांच्या खोलीतून काढून दुसऱ्या एका प्रशस्त खोलीत ठेवण्यात आलं. नंग्या तलवारी हातात धारण केलेले चार पहारेकरी आमच्यावर तैनात करण्यात आले. संध्याकाळचं भोजन अधिकाऱ्यांनी आपल्या घरून मागवून आम्हाला दिलं. त्या अधिकाऱ्यानं तिथल्या बादशहाकडे—नादिरशहापर्यंत आमचा वृत्तांत तारेनं कळवला.

रात्रीचा दोनचा सुमार असावा. आकाशात ढगांनी गर्दी केली होती. चार बंदुकधाऱ्या व्यक्ती बंदुकींना संगिनी लावून आमच्या खोलीत आल्या. आम्हाला झोपेतून उठवण्यात आलं—उठून उभं राहण्याची आम्हाला आज्ञा करण्यात आली. आम्ही दोघांनी एकमेकाकडे बघितलं. बंदुकधारी शिपायांना बघताच बंदुकीची गोळी आणि आमच्यात बिलकुल अंतर नाही, हे आम्हाला समजून चुकलं. तिथून बाहेर चलण्याची त्यांनी आम्हाला आज्ञा केली. अंधारात ते लोक आम्हाला कुठं घेऊन चालले आहेत, काही समजत नव्हतं. पावला पावलावर आम्हाला आमचं काही बरं वाईट होतं की काय, अशी भीती वाटत होती. चालत चालत आम्ही एका पोलीस लाईनपाशी येऊन पोचलो. तिथं एक मोटार गाडी उभी होती. आम्हाला गाडीत बसायला त्यांनी सांगितलं. गाडीत बसल्यानंतर आम्हाला वाटलं की बहुधा एखाद्या निर्जन स्थळी नेऊन हे लोक आपल्याला ठार करणार! मोटर रस्त्यानं वेगानं धावत होती. सूर्योदय होण्यापूर्वी आम्ही काबूलच्या मध्यवर्ती तुरुंगाच्या दारात येऊन पोचलो होतो.

## काबूलच्या तुरुंगात

बाबा गुरुमुखसिंह आणि राजे अमानुल्ला यांचे चांगले संबंध होते. गुरुमुखसिंहांनी बादशहाचा विश्वास संपादन केला होता. राजे अमानुल्ला इंग्रजांना शत्रु मानत होते. बाबाजींची खुद्द बादशहा नादिरशहा यांच्याशीही ओळख होती. परंतु नादिरशहा इंग्रजधार्जिणे होते आणि त्यांच्याच मदतीनं ते सत्तेवर आले होते. त्या काळातही अफगाण राजवट इंग्रजी राजवटीशी मैत्रीचे संबंध ठेवून होती. तिथलं शासन आमच्यासारख्या क्रांतिकारकांना कट्टर शत्रू म्हणून मानत होतं. यामुळेच तिथं आम्हाला कुणाही माणसाचं तोंड दिसू शकणार नाही—आम्हाला अशा कोठडीत डांबण्यात आलं. आमचा

आवाज कुणाच्या कानावर पडू शकणार नाही, अशी व्यवस्था केली. योगायोगाची गोष्ट म्हणजे ज्या दिवशी आम्हाला काबूलच्या मध्यवर्ती तुरुंगात डांबण्यात आलं त्याच दिवशी रात्री एका भारतीय तरुणानं इंग्रजी सैन्याच्या एका अधिकाऱ्यावर प्राणघातक हल्ला केला. इंग्रज सैन्याच्या छावणीत आम्ही मध्यवर्ती तुरुंगात बंदिस्त होऊन पडलो आहोत, ही बातमी पोचली होती. तिथल्या अधिकाऱ्यांनी भारतीय तरुणानं केलेला हल्ला आमच्या तिथं येण्याशी जोडला. अफगाणिस्थानच्या राजवटीनं हे आमचंच कृत्य आहे, असं घोषित केलं कारण यापूर्वी कुणाही इंग्रज अधिकाऱ्याचा तिथं अवमान झालेला नव्हता. अफगाणिस्थानानं आम्हाला प्रथम पासूनच शत्रू म्हणून ठरवलं होतं. आता इंग्रजी सैन्याकडून अधिकाऱ्याच्या इशाऱ्यावर ते नाचू लागले. आमच्यावर सर्व प्रकारचे जुलूम करण्यात येऊ लागले. या सर्व गोष्टींचा आमच्या प्रकृतीवर प्रतिकूल परिणाम होऊ लागला. ज्या दिवशी आम्ही तुरुंगात दाखल झालो त्यादिवशी आमचं प्रत्येकाचं वजन एकशे ऐंशी पौंड होतं—परंतु तेरा महिन्यानंतर आम्ही जेव्हा तुरुंगाबाहेर आलो तेव्हा आमचं वजन केवळ एकशे दहा पौंड भरलं होतं.

इंग्रज सैनिकांच्या तुकडीतील अधिकाऱ्यावर हल्ला झाल्यानंतर दोन दिवसांनी तिथला सर्वोच्च पोलीस अधिकारी, जो त्या तुरुंगाचाही प्रमुख होता, तुरुंगात पाहणी करण्यासाठी आला. तुरुंगातल्या सर्व शिपायांना आणि अधिकाऱ्यांना आपल्या जवळील हंटर दाखवून तो म्हणाला की दोन हिन्दु काफिर तुमच्या हवाली केलेले आहेत. या लोकांचा बाहेरच्या जगाशी कुठल्याही प्रकारे संपर्क निर्माण होऊ देऊ नका. यांचं वारं बाहेरच्या जगाला लागू देऊ नका आणि बाहेरचं वारं त्यांच्यापर्यंत पोचू देऊ नका. या बाबतीत कुणाची चूक झाली किंवा कुणाचा निष्काळजीपणा दिसून आला, तर या हंटरनं त्याचं चामडं लोळवण्यात येईल. मग काय विचारता ? अशी जबरदस्त तंबी मिळाल्यानंतर दहा-दहा पौंडाच्या बेड्या आम्हाला घालण्यात आल्या. आम्हाला अशा एका खोलीत बंदिवान करण्यात आलं, जिथं तुरुंगाच्या अधिकाऱ्याच्या ऑफिसच्या खोलीतूनच जायचा मार्ग होता. ह्यामुळं कुणालाही आमच्यापर्यंत येऊन पोचणं अगदीच अशक्य होऊन बसलं. अफगाणिस्थान सरकारच्या नियमानुसार परदेशातील कैद्यांना चांगल्या प्रकारे वागवणं आवश्यक होतं. आमच्यापाशी एकही पैसा शिल्लक नव्हता, त्यामुळं आम्ही बाहेरून काहीही मागवू शकत नव्हतो. अशा असहाय्य परिस्थितीतील कैद्यांना सकाळ-संध्याकाळ एक-एक रोटी देण्याची पद्धत होती. रोटीबरोबर भाजी-आमटी तर सोडाच परंतु साधं तिखट-मीठही मिळत नव्हतं. सर्व कैद्यांना आपलं भोजन स्वतः बनवण्याची किंवा बाहेरून मागवण्याची परवानगी होती.

हळूहळू थंडीचे दिवस येऊ लागले. हिवाळ्यात काबूल शहरात शून्य अंशापासून २४ अंश सेन्टिग्रेडपर्यंत थंडी असते. अशा कडाक्याच्या थंडीत आमच्या अंगावर सुती कपड्याशिवाय दुसरं काही नव्हतं. थंडी पडू लागल्यानंतर आम्हाला पांघरण्यासाठी रजाया देण्यात आल्या. जे कैदी थंडीमुळे आदल्या रात्री मरण पावले होते—त्यांच्या

या रजाया होत्या. त्यांच्या मृत शरीरावरून या रजाया काढून आम्हाला देण्यात आल्या होत्या. अर्धी रजाई अंथरायची व अर्धी पांघरायची—असा प्रकार आम्ही सुरू केला. शौच-लघवी आदि गोष्टींसाठी सकाळ-संध्याकाळ आम्हाला सक्त पहाऱ्याखाली बाहेर पाठवण्यात येई. नैसर्गिक विधी आटोपून परत येतेवेळी आम्ही आपल्या-सोबत माती आणत असू. मातीचा चिखल करून, दरवाजे खिडक्यांच्या फटी आम्ही लिंपून टाकत होतो. म्हणजे बाहेरची थंडी आमच्यापर्यंत येऊ शकणार नाही—आम्हाला ठार करू शकणार नाही, असा आमचा अंदाज होता. आमचं दोघांचंही शरीर व्यायामानं सुदृढ बनवलेलं होतं. आम्ही प्राणायामादि गोष्टींचाही सराव केलेला होता. या आधारावर केवळ एका भाकरीच्या आहारावर जगण्याचा आमचा प्रयत्न चालला होता. तिथलं शासन कैद्यांच्या जीवनासंबंधी किती बेफिकीर होतं, हे खालील एका उदाहरणावरून स्पष्ट होईल.

अफगाणिस्थानात वाहतं पाणी शुद्ध मानलं जातं—मग ते पाणी कितीही घाण भागातून वाहात असो. अशा पाण्याला अशुद्ध मानणं हे पापकर्म मानलं जाई. गावातली सगळी घाण घेऊन, तुरुंगाच्या आवारातून वाहात जाणारं पाणी, अफगाणिस्थानच्या लोकांच्या दृष्टीनं अत्यंत पवित्र व स्वच्छ होतं. एक ग्लास पाण्यात कमीत-कमी ५-६ कीटक होते. ते पाणी गाळून पिणं याशिवाय दुसरा तरणोपाय नव्हता.

एके दिवशी तिथला जेलर आजारी पडला. वेदनांनी तो मोठमोठ्याने किंचाळू लागला. त्याची कंबर धरली होती. मी तेल मागवून त्याच्या कंबरेला मालिश केली. त्याचं दुखणं बरं झालं. यानंतर तो आमच्याशी सहानुभूतीनं वागू लागला. त्यानं आम्हाला सांगितलं की, तुम्ही कुणी आणून दिलेले पदार्थ खाऊ नका व कुणावरही विश्वास ठेवू नका. सरकारी उच्च अधिकाऱ्यांनी आदेश पाठवले आहेत की, रात्री तीक्ष्ण सुऱ्यांनी तुमच्या माना कापून टाका व सुऱ्या तुमच्या उशाशी ठेवून तुम्ही आत्महत्या केली आहे, असा अहवाल वर पाठवा. तुमची प्रेतं गाडून टाकण्यासही आम्हाला सांगितलं आहे!

एक अफगाण युवक जेलरचा मेहुणा होता. जेलर बरोबर त्याचं पटत नव्हतं. दिवसेंदिवस त्याची प्रकृती क्षीण होत होती. जेलरच्या कार्यालयात त्याचं येणं जाणं होई, यामुळंच त्याच्याशी गप्पागोष्टी होत. मी त्याला त्याच्या अशक्त प्रकृतीबद्दल विचारलं. त्यानं मोठ्या संकोचानं जेलरनं मांत्रिकाच्या करवी आपल्यावर काहीतरी जादूटोणा केला आहे, असं उत्तर दिलं. ह्या प्रकारामुळं आपली झोप पार उडाली आहे व भूक देखील लागत नाही, असं तो तरुण म्हणाला. आमच्या संबंधी त्याच्या मनात आदराची भावना निर्माण झाली होती म्हणूनच तो आमच्याकडं येत होता. आमच्या विषयी त्याची ही धारणा बनण्याचं कारण पुढीलप्रमाणे होतं :—

कडाक्याची थंडी सहन न होऊन रोज तुरुंगातल्या दोन-चार कैद्यांचा मृत्यू होई—मग त्यांची प्रेतं ओढत ओढत बाहेर नेऊन कुठंतरी फेकून देण्यात येत. तुरुंगात कुठलाही कैदी मरण पावला की तुरुंगातल्या हिंदू कैद्याचा मृत्यू झाला आहे, अशी अफवा पसरविण्यात येत असे. आमच्या मृत्यूची ते लोक उत्सुकतेनं वाट बघत होते कारण आमच्यापाशी अंथरुण-पांघरुण नव्हतं, गरम कपडे नव्हते, पौष्टिक आहार आम्हाला मिळत नव्हता—परंतु आम्ही सकाळ-संध्याकाळ पूर्वीच्याच जोमाने वावरत होतो. यामुळं सर्व कैद्यांची अशी धारणा बनली की, आमच्यापाशी काही तरी दैवी शक्ती आहे. हे कुणीतरी देवदूत आहेत—परमेश्वरच यांचं रक्षण करतो.

मनात अशीच काही तरी भावना ठेवून तो अफगाण तरुण आम्हाला भेटत होता—आपला जीव वाचविण्यासंबंधी तो हात जोडून आम्हाला विनवीत होता. मी जरा कपट कारस्थान करायचं ठरवलं. मी त्याला सांगितलं की उद्या सकाळी तू स्वच्छ स्नान करून आपल्या बरोबर हिरव्या दूर्वा एका कोऱ्या व स्वच्छ कागदात लपेटून घेऊन ये. मी मंत्र टाकून तुला एक ताईत बनवून देतो. तो तू आपल्या हातात बांध—म्हणजे मग कुणाचाही जादूटोणा तुझ्यावर चालू शकणार नाही. काही काळजी करू नकोस. त्यानं मी सांगितल्याप्रमाणं केलं. तो तरुण मोठा श्रद्धाळू होता. तिसऱ्या दिवशी हातात ताईत बांधून तो आमच्याकडं आला. त्याचा चेहरा उजळला होता. त्याच्या मनात असा विश्वास निर्माण झाला की कुणाच्याही जादूटोण्याचा आता आपल्यावर परिणाम होणार नाही. हात जोडून तो आमच्यापुढे उभा राहिला आणि आमच्यासाठी तो प्राणाची बाजी लावायला तयार आहे, असं तो म्हणाला. 'तुम्ही केवळ आदेश द्या'—त्याची ही विनंती ऐकून मी बाबा गुरुमुखसिंह यांच्याकडे साभिप्राय कटाक्ष टाकून, या परम भक्ताकडून कोणतं काम करून घ्यायच? असा प्रश्न केला. बाबांनी त्याला विचारलं की आमच्या एका मित्राकडे तू एक पत्र पोचवशील काय? आमचं हे काम करण्याचं त्यान आश्वासन दिलं.

बाबा गुरुमुखसिंहांनी रात्री एक सविस्तर पत्र लिहिलं. त्यात आतापर्यंत घडलेल्या सर्व घटनांचा उल्लेख केला व लौकरच मदत न मिळाली तर आमच्या जिवाला धोका आहे व आमचं जिवंत राहणं कठीण आहे, हेही लिहिलं. त्या तरुणानं ते पत्र व्यवस्थित पोचवलं. पत्र रशियन सैन्याच्या तुकडीकडे पाठविण्यात आलं होतं. तिसऱ्या दिवशी जगातील सर्व प्रमुख वृत्तपत्रात बातमी झळकली की दोन प्रसिद्ध भारतीय क्रांतिकारकांना अफगाण सरकारनं तुरुंगात डांबून ठेवलं आहे. भारतातल्या इंग्रजी राजवटीच्या सल्ल्यानुसार या क्रांतिकारकांना मृत्यूच्या जबड्यात ढकलण्यात आलं आहे.

चौथ्या दिवशी शहरातला पोलीस प्रमुख तुरुंगात येऊन पोचला. सगळ्या शिपायांना आणि काफिरांना एकत्र जमा करून त्यांच्यापुढे हंटर नाचवत त्यानं प्रश्न केला की या दोघा हिंदूंनी बाहेरच्या जगाशी कशा तऱ्हेनं संपर्क प्रस्थापित केला? त्यांची

बातमी बाहेर कशी काय फुटली ? त्यांच्या या प्रश्नानं वातावरणात कमालीची शांतता पसरली. प्रश्नाचं उत्तर कोण देणार ? शेवटी एकाची दातखीळ उघडली. तो म्हणाला की हे दोघे काफिर अत्यंत हरामखोर व बदमाश आहेत—त्यांना मंत्र-तंत्र अवगत आहेत व ते माणसाची माशी बनवू शकतात. आम्ही त्यांच्यापुढे काय करणार ? हे ऐकून तो प्रमुख एकदम गप्प झाला. त्यालाही कदाचित भीति वाटली असावी की आम्ही त्याला माशी बनवून टाकू !

दुसऱ्या दिवशी आमच्या पायातल्या बेड्या तोडण्यात आल्या. आमचे कपडे बदलण्यात आले. आम्हाला बिछाने देण्यात आले—आमचं भोजन बनविण्यासाठी स्वतंत्र नोकर नेमण्यात आला. आमच्या सुटकेसाठी बाबा ज्वालासिंह यांनी हिंदुस्थानात एक मोठी चळवळ सुरू केली. अमेरिकेत स्थायिक झालेल्या गदर पार्टीच्या सभासदांनी अफगाण सरकारवर दबाव टाकण्यास सुरुवात केली. आमच्यावर खटला तरी भरा किंवा आम्हाला सोडून द्या, अशी त्यांनी मागणी केली. आमच्यावर खटला भरला तर आमच्या बचावासाठी अमेरिकेहून एका बॅरिस्टराची नेमणूक केल्याचंही त्यांनी सांगितलं.

साम्यवादी जगात साम्यवाद्यांनी क्रांतिकारकांच्या मदतीसाठी एक संघटनाच स्थापन केली आहे. त्या संघटनेचं नाव आहे– 'Red International Aid' या संघटनेमार्फत जगभरच्या सर्व क्रांतिकारकांच्या संघटनांनी आमच्या संबंधी सहानुभूति व्यक्त केली. अशा एकूण परिस्थितीत अफगाणिस्तान सरकारला आम्हाला तुरुंगात डांबून ठेवणं अशक्य होऊन बसलं. त्यांनी जरा दूरदृष्टीनं विचार केला. आम्हाला तुरुंगाच्या दाराबाहेर सोडून, पाहिजे तिथं निघून जाण्याचा त्यांनी आदेश दिला. आम्हाला अफगाणिस्थानात राहण्याची परवानगी नव्हती. मनोमन त्यांचा असा विचार होता की खुनी डाकूंच्या मार्फत रस्त्यातच आम्हाला ठार करून टाकावं. गदर पार्टीनं रशियन शासनाला निवेदन सादर करून आम्हाला विमानात घालून रशियन भूमीवर आणून सोडण्याची विनंती केली. रशियन सरकारनं अशीच व्यवस्था केली. एके दिवशी सकाळी आम्हाला जेलच्या बाहेर आणण्यात आलं आणि मोटारीतून आम्हाला विमानतळापर्यंत पोचवण्यात आलं. समोर मैदानात एक विमान उडण्याच्या तयारीत होतं. अफगाण-सरकारनं आम्हाला रशियनांच्या हवाली केलं. रशियन अधिकारी—एक क्रांतिकारक दुसऱ्या क्रांतिकारकाशी ज्या बंधुभावाने वागतो–तसे प्रेमाने आमच्याशी वागले. गुरुमुख-सिहांच्या ओळखीचा एक तरुण अधिकारी त्यांच्या कानाशी लागून म्हणाला, की अफगाण सरकारनं बऱ्या बोलानं तुमची सुटका केली नसती तर तुरुंग फोडून तुम्हाला इथून मुक्त करण्याची सर्व योजना आखण्यात आली होती !

• • •

आमचं विमान रशियन सेनादलाचं होतं. विमान काही हिंदूकुश पर्वताच्या उंच शिखरांवरून उडत होतं केव्हा मध्येच खाली गुळकांडी मारत होतं. चार तासांच्या उड्डाणानंतर विमान एके ठिकाणी खाली उतरलं. एक सेनाधिकारी तिथं आम्हाला येऊन भेटला. १९३३ चा जून किंवा जुलैचा महिना असावा. विमानातून उतरल्यानंतर तिथल्या गव्हर्नरांनी आम्हाला दुपारच्या भोजनासाठी निमंत्रित केलं होतं. चांगल्यापैकी भोजन मिळावं अशी आमच्या मनात इच्छा निर्माण झाली होती आणि योगायोग तसाच जुळून आला होता. गव्हर्नरांच्या निवासस्थानी आम्ही पोचलो. तिथं काळपटलेले ब्रेडचे तुकडे ठेवलेले दिसले. ग्लासामध्ये चहाच्या रंगाचं पाणी होतं. एका प्लेटमध्ये मिठाईचे तुकडे ठेवलेले होते. आम्हाला खुर्चीवर बसवण्यात आलं. डायनिंग हॉल फार उत्तम तन्हेनं सजवलेला होता. आमच्या समोरच्या खुर्चीवर गव्हर्नरसाहेब येऊन बसले. त्यांनी काळपा ब्रेडचा तुकडा तोंडात टाकून खायला सुरुवात केली. दुःखित स्वरात ते आम्हाला सांगू लागले की आमच्या देशातील उत्तमोत्तम खाद्य पदार्थ भांडवलदारी राष्ट्रांना आम्हाला विक्री करणं भाग पडतं. त्याशिवाय आम्हाला गत्यंतरच नाही. आमच्या कारखान्यांसाठी आधुनिक यंत्रसामग्री व संरक्षणासाठी सर्व प्रकारची शस्त्रास्त्र मिळवण्यासाठी आम्हाला पैसा मिळवणं भाग आहे. आमच्या देशातली लहान मुलं देखील पोटं बांधून सोळा-सोळा तास कामं करत आहेत. जिवंत राहण्यासाठी जे मिळेल ते खायचं. तुम्ही दोघंही रशियन शासनाचे पाहुणे आहात—जुने क्रांतीकारक आहात. आमच्या देशाची वास्तव परिस्थिती तुम्हाला माहीत असावी, हे मी गृहीत धरत आहे. माझ्याबरोबर भोजनासाठी मी तुम्हाला एवढ्यासाठीच बोलावलं आहे की, भारतीय क्रांतीकारकांसंबंधी आम्हाला प्रेम आहे, आदर आहे, हे स्पष्ट करावं.

भोजन आटोपून आमचं विमान परत तिथून निघालं व आम्ही ताश्कंदला येऊन पोचलो. तीन दिवस आम्ही तिथं राहिलो. त्यानंतर एका स्वतंत्र डब्यात आमची व्यवस्था करून आम्हाला मॉस्कोला पाठवण्यात आलं. कम्युनिस्ट इण्टरनॅशनलच्या दोन अधिकाऱ्यांनी आमचं स्वागत केलं. आमची थांबण्याची व्यवस्था एका आलीशान हॉटेलात करण्यात आली होती. डॉक्टरांनी तिथं येऊन आमची प्रकृती तपासली. त्यांच्या सल्ल्यानुसार आमची देखरेख सुरू झाली. औषध पाण्याची व पौष्टिक आहाराची व्यवस्था करण्यात आली. काही आठवड्यानंतर आम्हाला दोघांना वेगवेगळ्या केंद्रावर आरोग्य प्राप्तीसाठी पाठविण्यात आलं. आमचं घटलेलं वजन आणि शक्ती तीन महिन्यांत पूर्ववत झाली.

इण्टरनॅशनलच्या अधिकाऱ्यांनी येऊन पुढं काय विचार आहे, असं मला विचारलं. रशियन भूमीत कायमचं वास्तव्य करण्याची तुमची इच्छा असेल तर तुम्ही आनंदानं इथं राहू शकता. रशियन सरकारनं नियमच केलेला आहे की जगातला कुठलाही क्रांतिकारक रशियाचा नागरिक बनून इथं राहू शकतो. त्याचं बोलणं ऐकताना माझ्या मनात अफगाण सरकारनं आमच्यावर केलेल्या जुलुमांची आणि छळाची आठवण ताजी झाली—ते चित्र मनापुढं उभं राहिलं. मी माझ्या देशात परत जाऊ इच्छितो—असं मी त्याला ताबडतोब उत्तर दिलं. माझ्यासमोर अन्य पर्याय नव्हता.

## समुद्रमार्गे प्रवास

कोणत्या प्रकारे व कोणत्या मार्गाने माझी आमच्या देशात रवानगी करावी, यासंबंधी सविस्तर योजना आखण्यात आली. एक बनावट पासपोर्ट बनवण्यात आला. तो पासपोर्ट खिशात ठेवून मी आपल्या मातृभूमीकडे परत निघालो. पासपोर्ट मधील एका भयंकर चुकीकडे आधी माझं लक्षच गेलं नाही. ही घटना १९३४ सालची आहे. त्यावेळी माझं वय होतं ४२ वर्षं. परंतु पासपोर्ट मध्ये वयाची नोंद होती २७ ची. ४२ वर्षांचा माणूस २७ वर्षांचा म्हणून युरोपातील स्टेशनं आणि बंदर यातून मुक्तपणे कसा प्रवास करणार, हा माझ्यासमोरचा मोठा प्रश्न होता. रशियाच्या 'ओडेसा' या बंदरावर मी एका इटालियन जहाजावर चढून बसलो. त्या जहाजाच्या कप्तानानं पासपोर्टवर मी 'ओडेसा' बंदरातून जहाजावर चढल्याची स्पष्ट अक्षरांत नोंद केली. अशा प्रकारची नोंद असलेल्या पासपोर्टमुळे भारतातल्या बंदरावर माझं कशा प्रकारे स्वागत होणार, हे मला स्पष्टपणे दिसत होतं.

रुमानिया, बल्गेरिया, टर्की, इटली या देशांतील बंदरं ओलांडीत आमचं जहाज इटलीतील नेपल्स बंदरावर येऊन पोचलं. टर्कीमधील कॉन्स्टॅण्टिनोपल हे शहर आणि नेपल्स बंदर अतिशय प्रेक्षणीय स्थळं आहेत. या स्थळांचं सौंदर्य खरोखरच अप्रतिम आहे. या स्थळांचं सौंदर्य वर्णन करायची ही जागा नाही. त्यांच्या आठवणी अजूनही मनात ताज्या आहेत. नेपल्सला उतरून मी रोमला पोचलो. रोमहून नंतर फ्रान्सची राजधानी पॅरिसला मी गेलो. जगातल्या अत्यंत प्रख्यात अशा शहरातून माझा प्रवास होत होता. माझ्या मनात निराळ्याच प्रकारचे विचार घोळत होते. त्यामुळं या शहरांचं सौंदर्य मला आकृष्ट करत नव्हतं. मी कुणाशीही संबंध येऊ देत नव्हतो कारण युरोपच्या राजधान्यांमध्ये देशोदेशीच्या हेरांचे व गुप्तचरांचे अड्डे होते, हे मला माहित होतं. एखाद्या इंग्रज गुप्त पोलिसाच्या तावडीत सापडलो तर पंचाईत झाली असती, मला सतत ही भीति वाटत होती. मी एखाद्या रेस्टॉरंटमध्ये बसून भोजन करू लागलो म्हणजे तिथं कुठल्यानं कुठल्या प्रकारची चर्चा होत राहते, ही गोष्टही माझ्या ध्यानात आली होती. माणूस स्वतःला इतरांपासून कितीही लपवण्याचा प्रयत्न करू लागला

तरी त्याच्या भाषेवरून व बोलण्यावरून तो कुठला राहणारा आहे ही गोष्ट लोकांना समजतेच. मी ज्या हॉटेलात थांबलो होतो तिथं आपल्या खोलीतच खाण्याचे पदार्थ मागवून घेई. कुणाही माणसाशी आपला संबंध येऊ नये, याची मी हरप्रकारे दक्षता घेत होतो.

फ्रान्समधील साम्यवादी मंडळींशी मी संपर्क साधून, मला भारतातील एखाद्या बंदरावर पोचायचं आहे, यासंबंधी त्यांच्याशी विचारविनिमय केला. माझ्या पासपोर्टवर जहाजाच्या कप्तानानं मी रशियातल्या ओडीसी बन्दरावरून प्रवास सुरू केल्याची नोंद केली होती. रशियामधून परतणाऱ्या माझ्यासारख्या माणसाला भारतातली इंग्रज राजवट सरळ तुरुंगात पोचवील. फ्रान्समधल्या साम्यवादी मंडळींनी मला कसलीच मदत केली नाही. कप्तानानं माझ्या पासपोर्टमध्ये केलेली नोंद कुठल्यातरी रासायनिक प्रक्रियेने ती मिटवून टाकायला त्यांनी मदत करावी, एवढीच माझी अपेक्षा होती.

माझ्या मनात विचार आला की आपण जहाजातून सरळ अमेरिका गाठावी आणि गदर पार्टीच्या कार्यकर्त्यांना भेटावं. पुन्हा मनात असाही विचार आला की, लोक आपल्याला असंही म्हणतील हा असा कसा क्रांतिकारक आहे जिवाच्या भीतीनं इथं-तिथं पळ काढणारा!

मी सर्व विचार करून एक योजना आखली. मी अशा एका फ्रान्सीसी जहाजात चढलो जे मार्सेल्स मार्गे कोलंबो-मद्रास इथं जाऊन नंतर पाँडिचेरीला जाणार होतं. पाँडिचेरीला थांबून तिथून ते शांघाईकडे जायचं होतं. ते जहाज पाँडिचरीला पंधरा दिवस थांबणार होतं. या जहाजानं आपण भारतात निश्चित पोचणार याविषयी माझी खात्री होती. मार्सेलसहून जहाज निघालं. रस्त्यानं ते अनेक बंदरांवर थांबलं. बंदराजवळच्या शहरात जाऊन यायचं असलं तर मला माझा पासपोर्ट तिथल्या पोलिसांना दाखवून परवानगी घ्यावी लागे. मी स्वतःलाच बजावलं की पोलिस पासपोर्टमधल्या नोंदी वाचणार, वयाची नोंद वाचून आपल्या चेहऱ्याकडे बघणार म्हणून मी कुठल्याही बंदरावर उतरायचं नाही असं ठरवलं.

जहाजाच्या कप्तानानं माझ्या पासपोर्टवर लिहिलेला मजकूर मी घासून घासून मिटवला व त्यावर काळी शाई फासली, कुणी याबद्दल विचारलं तर काय सांगायचं हेही मी ठरवून ठेवलं. बंदरावर पासपोर्ट दाखवताना तिथं कुणी तरी शाई सांडली असं सांगायचं मी ठरवले.

४२ वर्षांचा माझ्यासारखा माणूस २७ वर्षं वयाचा म्हणून फिरत होता. मी केस खूप चापून चोपून बसवायचो. मी घोटून घोटून दाढी करत असे. चांगला नेकटाय बांधून मी तरुण दिसण्याचा प्रयत्न करत होतो.

अखेरीस जहाज पॉंडिचरीला येऊन पोचलं. जहाज या ठिकाणी पंधरा दिवस थांबणार होतं. तो रविवारचा दिवस होता. सर्व प्रवासी जहाजावरून खाली उतरले. मीही आपलं सामान सुमान घेऊन खाली उतरण्याचा विचार केला. बंदरावरील अधिकाऱ्यांनी माझ्या पासपोर्टवरील शाई बघितली. शाई कशी काय सांडली, असं त्यांनी मला विचारलं. मी हसून उत्तर दिलं की ऑफिसातल्या कुण्यातरी कारकुनानं हा प्रकार केला असेल. माझ्या उत्तरावर ते लोकही हसू लागले. हसण्या हसण्यात मी प्रश्नाला बगल दिली आणि सामान घेऊन जहाजातून खाली उतरलो.

• • •

मी एका आलिशान हॉटेलात थांबलो. खोलीत सामान ठेवून मी बाजारात जाऊन यावं म्हणून बाहेर पडलो. दोन गुप्तचर माझ्या बाजूने निघाले. बोलण्या-बोलण्यातून त्यांनी मी कुठं चाललो आहे, अशी विचारणा केली. उत्तरादाखल मी एवढंच म्हणालो हे बघा, माझ्यापाशी फक्त अमेरिकन डॉलर्स आहेत दुसरं कुठलंच चलन नाही. मला पैशांची आवश्यकता आहे. आज रविवार असल्यामुळे बँका बन्द आहेत, मला डॉलर्स बदलून भारतीय चलन हवं आहे. माझ्यापाशी चहा-पाण्यासाठी दुसरे पैसे नाहीत. माझं म्हणणं ऐकून ते दोन्ही गुप्तचर मला एका उपाहारगृहात घेऊन गेले. मला चांगलं खायला घातलं. संकोच करू नका, असंही ते म्हणाले. चहा फराळाला जे काही पैसे पडतील, ते आम्ही उद्या तुमच्याकडून घेऊ.

मी दोन सूटकेस आणि एक मोठा होल्डॉल हॉटेलच्या माझ्या खोलीत ठेवला होता. माझ्या खिशात अमेरिकन डॉलर खेरीज अन्य चलन नव्हते. मी त्या गुप्तचरांबरोबर बाजारात इकडे तिकडे भटकलो. अखेरीस फिरून फिरून ते दमले व त्यांनी माझा निरोप घेतला. आपण उद्या परत भेटू एवढं बोलून ते निघून गेले.

मग मीही हॉटेलकडे निघालो. हॉटेलमध्ये परतल्यानंतर मी कपडे बदलले. कपड्यांचं एक बंडल कागदात गुंडाळून, ते घेऊन मी पुन्हा हॉटेलबाहेर आलो. सूर्यास्त झाल्यानंतर, गल्ली बोळातून चालत चालत मी गावालगतच्या शेतात शिरलो. आपल्यावर कुणाची पाळत तर नाही, याची खात्री करून घेतली. कुणीच पाठलाग करत नव्हतं. शेतातून चालत चालत मी बराच दूर येऊन पोचलो. मग मी अंगावरील कोट-पँट हे कपडे काढून त्यांचं बंडल तयार केलं. लुंगी आणि सदरा या वेषात चालत चालत दूर निघून जायचा माझा विचार होता. पाँडिचेरीच्या उत्तरेच्या दिशेनं जाणाऱ्या रस्त्याच्या कडेला असलेल्या शेतांमधून मी चालू लागलो. सकाळ होईपर्यंत मी चालत राहिलो. सकाळ झाल्याबरोबर रेल्वे रूळालगत मी चालू लागलो. रात्रभर पायी प्रवास केल्यामुळं खूप थकवा जाणवत होता. कुठंतरी पडून विश्रांती घ्यावी, असं वाटू लागलं. पडल्याबरोबर डोळा लागला. उन्हाचे चटके बसू लागले तेव्हा जागा झालो आणि रेल्वे लाईनच्या कडेकडेनं पुन्हा निघालो. समोरच्या बाजूनें एक महिला डोक्यावर पाटी ठेवून येतांना दिसली. डोक्यावरची पाटी तिनं कपड्यानं झाकली होती. ती जवळ आली तेव्हा पाटीतल्या पदार्थांचा सुगंध माझ्या नाकात शिरला. टोपलीत काय आहे, याचा अंदाज

आली. तिची भाषा मला कळण्यासारखी नव्हती. मी त्या स्त्रीला पाटी खाली उतरवण्याबद्दल खुणेनं सांगितलं. खिशातून काही पैसे काढून तिच्या हातावर ठेवत, पाटीतले पदार्थ मला देण्याबद्दल तिला सांगितले. तिनं जवळपास एक पाव भजी माझ्या हातात ठेवली. मी खाली बसून सर्व भजी खाऊन टाकली. जवळच एका खड्ड्यात पाणी होतं. तिथं जाऊन पाणी प्यालो. चालून-चालून मी विशेष असा दमलो नव्हतो. आता तर गरमागरम भजी खायला मिळाली होती, पाणीही मिळालं होतं. आता नव्या जोमानं चालायला सुरुवात केली, वेगानं पाय उचलू लागलो. एवढ्यात कुणीतरी एक माणूस अचानकच समोर आला. तो मला काही विचारू लागला. त्याच्या खाणाखुणा बघून माझ्या लक्षात आलं की, तो मला कुठून आला आहात? कुठं जायचं आहे? हे प्रश्न करतोय. मी थोड्या अंतरावर दिसणाऱ्या रेल्वे स्टेशनकडे जायचं आहे, असं त्याला समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. आपण एक मुसाफिर आहोत, हेही त्याला सांगितले. तो माझ्याबरोबर तसाच पुढे निघाला. जवळजवळ एक मैल अंतर तो माझ्यासमवेत चालत होता. तो माझ्यासमवेत का निघाला आहे, याचं कारण मला समजेना. मध्येच मी रेल्वे लाईन सोडून शेतातला रस्ता पकडला. तो त्या रस्त्यानं माझ्याबरोबर निघाला. नंतर मी परत खळ्याच्या बाजूने निघालो व थोडावेळ तिथं थबकलो. तो तरीही माझ्याजवळ बसून राहिला. एवढ्या सगळ्या युक्त्या-प्रयुक्त्या करूनही तो माणूस जेव्हा माझी पाठ सोडेना तेव्हा माझ्या लक्षात आलं की, तो बहुधा सरकारी गुप्तचर असावा—कुणाची तरी मदत मिळाली की, तो आपणास पकडण्याचा प्रयत्न करणार. ह्याच्यापासून सुटका कशी करून घ्यावी, यासंबंधी मी मनातल्या मनात एक योजना आखली. मी रेल्वे स्टेशनच्या दिशेनं झपाझप पावलं टाकत निघालो. त्यानंही माझा कित्ता गिरवला. चालता-चालता मी मध्येच थांबलो व हातातलं कपड्याचं बंडल खाली ठेवून नजीकच्याच झुडपाजवळ गेलो. तो त्या बंडलावर लक्ष ठेवून माझ्या परतण्याची वाट बघत तिथंच उभा राहिला. मी शौच्यास बसण्याचा बहाणा करून थोडावेळ झाडीच्या आड थांबलो. थोड्या वेळानंतर मी परत आलो. बंडल उचलून घेण्यापूर्वी मी सहजच सदऱ्याचे खिसे चाचपल्यासारखं केलं आणि आपलं पैशाचं पाकीट झाडीच्या जवळपास पडलं की काय, असा चेहऱ्यावर आविर्भाव आणला. माझं पैशाचं पाकीट झाडीत पडलं आहे, हे त्या माणसालाही समजलं. आता पाकिटाचा शोध घेण्यासाठी मी परत झाडीकडे निघालो. तोही माझ्याबरोबर झाडीच्या बाजूस आला. झाडीजवळ पोचल्यानंतर आपल्याकडे कुणाचं लक्ष नाही, याची खात्री करून मी त्या माणसाला एक लाथ घालून खाली पाडलं आणि त्याच्या अंगावर झेपावून त्याला यथेच्छ चोप द्यायला सुरुवात केली. तो जोरजोरात आरडा-ओरड करू लागला. त्याच्या मदतीला कोणीही धावून येऊ शकत नव्हतं. मी त्याला बडवू लागलो. या गडबडीत त्याची लुंगी फिटली. त्याच्याच लुंगीनं त्याला बांधावं आणि तोंडात बोळा कोंबून त्याला झाडीत टाकून द्यावं, असा मी विचार केला. मी लुंगीचा एक कोपरा त्याच्या तोंडात कोंबू लागलो. कपड्याबरोबर माझं

एक बोट अभावितपणे त्याच्या तोंडात गेलं. 'बुडत्याला काडीचा आधार' या न्यायानं त्यानं माझा बोट दातात पकडून जोरदार चावा घेतला. आपले बोट त्याच्या तोंडातच अडकून पडेल असंच मला क्षणभर वाटलं. मी गुडघ्यानं एक जोरदार ठोसा त्याच्या पोटात मारला—वेदनेनं तो जोरात किंचाळला. मी झटकन बोट सोडवून घेतलं. बोटातून रक्त येत होतं परंतु सुदैवानं ते तुटलं नव्हतं. त्या माणसाबरोबर अधिक भांडण्याची गरज राहिली नव्हती. लुंगी जागेवरच सोडून उघडया-नागडया अवस्थेत त्यानं शेतातून पळायला सुरुवात केली. तो जोर-जोराने काहीतरी बडबडत होता. जवळपासच्या शेतात लोक कामं करत होते परंतु कुणीच त्याच्या मदतीला धावून आला नाही. दोन मैलांच्या अंतरावर मला डोंगराळ प्रदेशातील जंगल दिसलं. खिशातून हातरुमाल काढून मी बोटाची जखम बांधली. दाढीच्या सामानांचा डबा माझ्याबरोबरच होता—त्यातून 'यू-डी-कोलोन' ची बाटली मी काढली. ते थंडगार द्रव मी जखमेवर शिंपडलं आणि पळत-पळत जंगल गाठलं. मी पहाडावर चढून एका ठिकाणी लपून बसलो. तो पहाड चांगलाच उंच होता. दोन तास मी तिथं पडून विश्रांती घेतली. नंतर आजूबाजूला बघू लागलो. त्या पहाडाच्या बाजूनं कुणीही येताना दिसत नव्हतं. तेव्हा माझी खात्री झाली की, त्या गुप्तचराला तिथल्या गावात कसलीच मदत मिळाली नाही. संध्याकाळ होण्यापूर्वी मी पहाडावरून खाली आलो आणि परत रस्त्याने चालू लागलो. जवळच्याच गावात जाऊन मी खाण्यापिण्याच्या वस्तू खरेदी केल्या आणि गावालगतच्या एका मळयात येऊन थांबलो. थोडं खाऊन तिथंच विश्रांती घ्यावी, असा मी विचार केला. खाणं-पिणं आटोपून थोडासा पडतो न पडतो तोच तिथं एक माणूस अचानकच येऊन पोचला, तो माझ्याजवळ येऊन बसला. तो एक भारतीय मुसलमान होता. तो माझ्याशी बोलू लागला. तसा माझा चेहरा अगदी भोळा-भाबडा होता. मी त्याला आपण एक फकीर असल्याचं व असाच भ्रमंतीसाठी त्या भागात आलो आहोत असं सांगितलं. त्या तरुणालाही आध्यात्मिक विषयाची आवड दिसली. मी फकीर आहे, हे समजताच तो चर्चेसाठी पुढं सरसावला. त्याच्याबरोबर मी खूप आध्यात्मिक बाबींवर चर्चा केली. माझ्या बोलण्यानं तो चांगलाच प्रभावित झाला. माझ्या पाया पडून तो जागेवरून उठला व खायला काही तरी घेऊन येतो आपण आज्ञा द्या असं म्हणाला. त्याचा हा विचार मला पसंत पडला नाही. मी त्याला म्हणालो "बाळ! तू खाली बैस. मी तुला परमेश्वरप्राप्तीचा आणि मुक्तीचा मार्ग सांगितला आहे. तो जर तू स्वीकारलास तर तुला मुक्ती मिळेल. मी तुला जे काही ज्ञान दिलं त्याच्या बदल्यात मी तुझ्याकडून काही घेऊ लागलो तर ते अयोग्य होईल. तू मला शुद्ध आचरणाचा माणूस दिसतोस. आपलं मन स्वच्छ बनवून तिथं जरा पलीकडे ध्यानमग्न अवस्थेत, डोळे बंद ठेवून तू तासभर बसून राहा, ईश्वराचं चिंतन कर." माझ्या या शब्दांचा त्याच्यावर जादूसारखा परिणाम झाला आणि खरोखरच तो माणूस पलिकडच्या बाजूस डोळे मिटून परमेश्वराचे

चिंतन करत बसला. मी तिथून उठलो आणि शेतांचा रस्ता सोडून दुसरस्त्याने चालत निघालो. तो तरुण शिष्य किती वेळ ध्यानमग्न अवस्थेत बसून राहिला, हे जाणून घ्यायची मला मुळीच उत्सुकता नव्हती. अंधार पडल्यानंतर मी सडकेने निघालो. सडक मद्रासला जाणारी होती. चालून चालून थकल्यामुळे पडता क्षणीच झोप लागली. जाग आल्यावर घड्याळ बघितलं—दोन वाजले होते. उठून उभा राहिल्यानंतर, आपण कोणत्या बाजूने चालत आलो—हेच समजेना, कोणत्या दिशेनं निघावं, हेही ठरवता येईना. शेवटी एका बाजूने निघायचं ठरवलं आणि मी चालू लागलो. एक मैल चालल्यानंतर एक छोटासा पूल रस्त्यात दिसला. ह्या पुलावरच मी काही तासांपूर्वी विश्रांती घेत बसलो होतो—हे मी ओळखलं. आपण पुन्हा आलो त्याच दिशेने चाललो आहोत, हे माझ्या लक्षात आलं. पुन्हा तोंड फिरवून विरुद्ध दिशेने निघालो. पायी पायी प्रवास करून मी खूपच थकलो होतो. आपलं इच्छित स्थळ किती अंतरावर आहे,ह्याची काहीच कल्पना नव्हती. रस्त्यानं परत एक गाव लागलं. गावातला चौकीदार पळतच माझ्याकडं आला—माझ्याजवळ येऊन पोचला. सकाळ होत होती—वातावरणात प्रकाश हळूहळू पसरत होता. माझ्या तोंडाकडे बघताच त्याच्या हे लक्षात आलं की, मी कुणी गावातून पळालेला चोर, लफंगा नाही. कुणीतरी दूर प्रांतातील मुसाफिर आहे. त्यानं मला अडवलं नाही. तिथून पुढं मी आणखी एका गावात येऊन पोचलो. ह्या गावात समोरच बसस्टँड दिसत होता. मी बसस्टँडवर जाऊन बसून राहिलो. विचारपूस करत असताना मी मद्रासला जाणारी बस केव्हा येईल, हे विचारलं. तिथून मद्रास जवळ पाच मैल दूर होतं. बस यायला अर्ध्या तासाचा अवधी होता. मी थोडासा फराळ केला आणि बसनं मद्रासला येऊन पोचलो. मद्रासला एका सायकल रिक्षात बसलो आणि 'जीवनलाल कंपनी' च्या ऑफिसात घेऊन जाण्याविषयी त्या रिक्षावाल्याला सांगितलं. ज्या काळात मी भावनगर येथे 'स्वामीराव' बनून दक्षिणामूर्ती भवनात शिक्षक म्हणून काम करत होतो, तेव्हा तिथं जे विद्यार्थी माझ्या हाताखाली शिकत होते—त्यातले काही निरनिराळ्या ठिकाणी जाऊन उद्योग-व्यवसायात पडले होते—काही मद्रासलाही उद्योगधंदा करत होते. मी 'जीवनलाल कंपनी'त येऊन पोचलो. श्री. हेमचंद्र शहा हे त्यावेळी या कंपनीत मॅनेजर म्हणून काम करत होते. मी त्यांच्या पुढ्यात जाऊन उभा राहिलो. मी त्यांना म्हणालो की, मी त्यांना भेटू इच्छितो—माझं थोडसं काम आहे. त्यांनी मला बसायला सांगितलं. मी बसलो नाही मात्र तहान लागली आहे—पाणी हवं आहे, हे सांगितलं. आतला शिपाई पाणी आणायला बाहेर गेला. मी त्यांना घाईघाईनं सांगितलं की माझं नाव 'स्वामीराव' आहे. स्वामीराव या नावाशी सर्वच गुजराथी बांधव परिचित होते. हे नाव ऐकताच त्यांच्या चेहऱ्यावरील भाव बदलले. नंतर मी त्यांना आपण इंग्रजांच्या तावडीतून पळून आल्याचं सांगितलं. चालून चालून शरीराचा पार बुराडा झाला आहे व आपण फार थकलो आहोत, हेही त्यांना सांगितलं.

एकदा का खाली बसलो तर नंतर उठून उभं राहणंही मुष्किल आहे—ही माझी अडचण सांगितली. तुम्ही मला काही मदत करू शकाल का ? असं मी विचारलं. माझं बोलणं ऐकून तो चांगलाच प्रभावित झाला व त्यानं मला पुन्हा एकदा खुर्चीवर बसण्याचा इशारा केला. एवढ्यात चपराशी पाणी घेऊन आला. पाणी पीत असतानाच, माझी खात्री झाली की, आपण योग्य अशा आश्रयस्थानावर आलो आहोत. आणखी काही बाबी विचारल्यानंतर त्यानं आपल्या एका विश्वासातल्या मित्राला बोलावून घेतलं आणि त्याला माझी सगळी हकीकत सांगितली. त्याचा हा मित्र श्री. चतुर्भुज शुक्ल राजकोटचा रहिवासी होता आणि 'स्वामीराव' या नावाशी तो चांगला परिचित होता. स्वामीरावाचं भाषणही त्यानं कदाचित ऐकलेलं असावं. नाश्त्यासाठी अनेक पदार्थ मागवून, दोन नोकरांकरवी मला खुर्चीसह उचलून दुसऱ्या खोलीत नेण्यात आलं. माझ्यासाठी अंथरुणाची व्यवस्था करण्यात आली व नंतर त्यावर मला झोपवण्यात आलं. रात्री दहा वाजता मला एका मोटारगाडीत बसवून आन्ध्र केसरी श्री. टी. प्रकाशम् यांच्याकडे पाठविण्यात आलं. आन्ध्रमधील दोन काँग्रेस नेत्यांनाही मी तिथं आल्याची बातमी देण्यात आली. दुसऱ्या दिवशी सायंकाळी श्री. बुलसु सांबमूर्ती तिथं येऊन थडकले. श्री. बी. सांबमूर्ती हे काकिनाडाचे प्रख्यात वकील होते. काँग्रेस कार्यकारिणीचे ते सभासद होते. मद्रास राज्याच्या पहिल्या असेंब्लीचे ते स्पीकरही झाले. काही वेळानंतर आन्ध्रचे प्रख्यात कार्यकर्ते डॉ. सुब्रह्मण्यमही तिथं आले. माझ्या बोटाच्या जखमेवर त्यांनी मलमपट्टी बांधली. माझ्या मांड्यांची परिस्थिती अशी झाली होती की चिमटा घेतला तरी मला तो समजत नव्हता. मांड्यांचे स्नायू चालून चालून टणक बनले होते. दोन्ही मित्रांनी माझी सर्व व्यवस्था केली. चौदा दिवसांच्या विश्रांतीनंतर व उपचारानंतर मी परत ताजातवाना झालो. बोटाची जखमही भरून आली. दोन्ही मित्रांनी स्टेशनवर बरोबर येऊन मला गाडीत बसवलं. तिथून मी मुंबईला डॉ. नारायण दामोदर सावरकर यांच्याकडे आलो. डॉ. सावरकरांनी मोकळ्या मनानं माझं स्वागत केलं. एका खोलीत माझी राहण्याची व्यवस्था केली. मी दातांचा एक रोगी आहे, असं त्यांनी जाहीर करून टाकलं. दातांचे उपचार करण्यासाठी ज्या विशिष्ट खुर्चीवर बसवतात अशा खुर्चीवर तासभर बसवून मला जेवण देण्यात येई. मुंबईतल्या माझ्या अनेक विश्वासू मित्रांची त्यांनी गाठ घालून दिली. सर्व मित्रांची मी भेट घतली.

काही दिवसांनंतर परत एकदा भावनगरला जाण्याची व तिथल्या मित्रांना भेटण्याची इच्छा माझ्या मनात निर्माण झाली. माझे एक हितचिंतक श्री. गणेश रघुनाथ वैशंपायन, कुठे होते याचा मला काहीच पत्ता नव्हता. भावनगरला एकट्यानं जाणं कठीण होतं म्हणून मी एखादा मदतनीस बरोबर घ्यावा, असं ठरवलं. सहायकाच्या शोधार्थ मी परत एकवेळ माझे गुरू प्रो. माणिकराव यांच्याकडे बडोद्याला येऊन पोचलो. मी भेटल्याबरोबर

त्यांना अतिशय आनंद झाला. त्यांना मी माझी सर्व हकीकत सांगितली. मी त्यांच्याकडे येण्याचा माझा हेतू सांगितला व मला भावनगरला जायचं आहे, हेही सांगितलं. मला एक सहायक द्या असं त्यांना म्हणालो. राजकोटचे एक तरुण श्री. पोपटानी त्यांच्याकडे व्यायामाचं शिक्षण घेत होते, त्यांना माझ्यासोबत पाठवण्यात आलं. त्यांच्या समवेत मी भावनगर जवळील सीहोर या स्टेशनावर उतरलो. श्री. पोपटानी यांना मी सांगितलं की भावनगरकडून जी सडक सीहोरकडे जाते त्या सडकेवर दहाव्या मैलापाशी मी झाडाखाली त्यांची वाट बघतो. मी अंदाज केला होता की, एवढ्या वेळात माझे अत्यंत विश्वासू स्नेही श्री. बहाउद्दीन उस्मान शेख, निरोप मिळताच माझ्याकडे निश्चित येऊन पोचतील. ते ठरल्यावेळी निश्चितच तिथं पोचले देखील. मी माझ्या सर्व जुन्या मित्रांना भेटलो. काही दिवस तिथं राहून मी पुन्हा मुंबईला परत आलो. या सुमारास मुंबईला काही साम्यवादी कार्यकर्ते भूमिगत अवस्थेत पार्टीचं काम करत होते. मी प्रयत्न करून त्यांच्याशी संपर्क साधला. त्या काळात श्री. पी. सी. जोशी पार्टीचे मुख्य चिटणीस होते. त्यांना भेटण्याची मी योजना आखली.

श्री. जोशी यांना निरोप पाठवला की, तुम्ही सांगाल त्या ठिकाणी येऊन मी तुम्हाला भेटतो. मी त्यांना समर्थ व्यायाम मंदिराच्या श्री. काळे गुरुजी यांच्या निवासस्थानी भेटीसाठी बोलावलं. त्यांचं उत्तर आलं की ते स्वतः येऊ शकत नाहीत, त्यांचा एक प्रतिनिधी समर्थ व्यायाम मंदिरात येऊन मला त्यांच्या भेटीसाठी घेऊन जाईल. त्या व्यक्तीच्या येण्याची मी तिथं वाट बघत बसलो. ती व्यक्ती तिथं आल्याबरोबर मी म्हणालो कृपा करून मला त्या विशिष्ट ठिकाणी घेऊन चला, मी माझ्या मित्राला भेटू इच्छितो. त्या व्यक्तीनं उत्तर दिलं की ज्यांना तुम्ही भेटू इच्छिता तो मीच आहे! त्याचं उत्तर ऐकून माझं डोकं भणाणलं. आमचं गुपित फुटल्याचं माझ्या ध्यानात आलं. मी जाळ्यात सापडलो आहे, हेही माझ्या लक्षात आलं. मी त्या व्यक्तीला बसायला सांगितलं. त्याच्यासाठी काही खायला आणतो असं सांगून श्री. काळे गुरुजींना बोलावून घेतलं. श्री. काळे गुरुजींना मी म्हणालो की, काहीतरी घोटाळा झाला आहे.—जरा सांभाळून वागायला हवं. समोर खुर्चीवर बसलेला माणूस तिथून तासभर उठणार नाही याची तुम्ही काळजी घ्या. तसंच झालं. मी हळूच तिथून निसटलो व बाहेर पडलो. श्री. काळे गुरुजींनी त्या माणसाला एक तास तिथंच बसवून ठेवलं. नंतर आम्हाला कळलं की, ती व्यक्तीच श्री. पी. सी. जोशी होते. ही घटना पार्टीच्या वर्तुळात सगळ्यांच्या हसण्याचा विषय बनली.

मुंबईहून मी कलकत्त्याला गेलो. कम्युनिस्ट पार्टीनं या भागात चांगलं कार्यक्षेत्र निर्माण केलं होतं. माझे अनेक जुने विद्यार्थी तसंच प्रसिद्ध व्यापारीही तिथे होते. त्यांच्याकडून आर्थिक साहाय्य मिळवून मी कम्युनिस्ट पार्टीच्या कार्याला मजबूत बनवण्याचा प्रयत्न केला. मी सुमारे दोन वर्षे कलकत्त्यात राहिलो. विशेष उल्लेखनीय असं या कालावधीत काहीच घडलं नाही. माझ्या सर्व मित्रांनी मला सुरक्षित ठेवलं.

एके दिवशी एका पोलीस सी. आय. डी. ला माझा संशय आला. त्यानं माझा पाठलाग सुरू केला. माझ्या हातात काठी होती यामुळं माझ्याजवळ यायला तो घाबरत होता. कुणाची तरी आपल्याला मदत मिळेल व त्यानंतर मला जाळ्यात पकडता येईल या अपेक्षेनं तो माझा पाठलाग करू लागला. मी त्याची ब्याद टाळण्याचा विचार करू लागलो. गल्लीमधून जात असताना मी एका बड्या डॉक्टरांच्या दवाखान्यात शिरलो. दवाखाना खूप मोठा होता. अनेक खोल्या ओलांडल्यानंतरच डॉक्टरांना भेटता येत होते. खोलीतून जातेवेळी मी मुद्दामच गुडघा दुखावलेला आहे, अशा पद्धतीनं चालत होतो. मी हातानं गुडघा दाबून धरला होता आणि लंगडत लंगडत खोल्या ओलांडत निघालो. डॉक्टरांच्या समोर पोचताच त्यांनी मला टेबलावर झोपवलं. त्यांनी गुडघ्याची तपासणी करण्यासाठी गुडघ्याला हात लावल्याबरोबर मी जोरात ओरडलो. "गुडघा दाबू नका, फार दुखतो आहे कृपा करून मला एखादं इन्जेक्शन द्या व मलमपट्टी वगैरे करून माझ्यासाठी टॅक्सी मागवा, टॅक्सीतून मला घरी पाठवा" अशी मी त्यांना विनंती केली. मी दहा रुपयांची नोट त्यांच्या हातावर ठेवली. त्यांनी मला खुर्चीत बसवून, दोन नोकरांकरवी खुर्ची उचलून टॅक्सीपर्यंत पाठवलं व मला टॅक्सीनं पाठवण्याची व्यवस्था केली. टॅक्सीनं मी घरी आलो. तो गुप्तपोलीस माझी वाट बघत दवाखान्याबाहेर किती वेळ उभा राहिला, कुणास माहीत?

उघड उघड काम करणं माझ्यासाठी आता कठीण होऊन बसलं. मुंबईला जाऊन मित्र-मंडळींशी विचार विनिमय करून आपण आपलं कार्यक्षेत्र ठरवून घेणं योग्य होईल, असा विचार करून मी मुंबईला परत आलो. मुंबईतील मित्रांच्या भेटीगाठी घेऊन मी माझं कार्यक्षेत्र निश्चित केलं. योजना तयार झाली.

मी भूमिगत होऊन काम सुरू केलं. भोवतालच्या वातावरणात झपाट्यानं बदल होत होते. अत्यंत सावधगिरीनं काम करावं लागे. यावर खूप विचार केला. खोलीबंद जीवनाला मी लौकरच कंटाळलो व शेवटी बाहेर पडून माझे एक जुने मित्र अमृतलाल सेठ यांना जाऊन भेटलो. श्री. अमृतलाल सेठ हे 'जन्मभूमी' या वृत्तपत्राचे संपादक व मालक होते. माझ्या जीवनाशी ते चांगल्या तऱ्हेनं परिचित होते. मी त्यांना माझ्या रशिया-वारीची सर्व हकीकत सांगितली आणि आता मुंबई इथं सुरक्षितपणे राहून गुप्त पद्धतीनं काम करण्याची माझी इच्छा आहे, असं मी त्यांना सांगितलं. अमृतलाल सेठ हे एक निधड्या छातीचे राजकीय कार्यकर्ते होते. मी ज्या काळी 'स्वामीराव' होतो त्याकाळात एकवेळ अडचणीच्या वेळी त्यांनी माझ्याकडे मदत मागितली होती. जिवावर उदार होऊन, मी त्यांच्या मदतीला धावून आलो होतो. त्या गोष्टीचा त्यांना विसर पडला नव्हता त्यांनी मला विचारलं-'स्वामीराव'! जन्मभूमीच्या प्रवेश द्वारापाशी रक्षक म्हणून काम करायला, तुम्हाला कसं वाटेल? त्यांची कल्पना मला आवडली. एका भैय्याचा पोषाख घालून मी दारावर उभा राहिलो.

अमृतलाल यांच्या भेटीसाठी येणाऱ्या अनेक गुजराथी बांधवांना स्वामीरावची चांगली ओळख होती, ह्याचा मला विसर पडला नव्हता. परंतु माझ्या हेही लक्षात आलं की मोठी माणसं कार्यालयात प्रवेश करताना दारावरच्या पहारेकऱ्याकडं क्वचितच लक्ष देतात. पहारेकऱ्यानं सलाम ठोकला की हे लोक मुंडी हलवून, छाती पुढं काढून ऐटीत आत प्रवेश करतात. कित्येकदा तर सलाम न स्वीकारताच ते तडक आत निघून जातात.

रात्रीच्या वेळी श्री. अमृतलाल सेठ यांच्याशी चर्चा करत असे. एके दिवशी मी सहजच त्यांना म्हणालो–"सेठ, मला इथं नोकरीवर ठेवून तुम्ही जोखीम तर पत्करत नाही आहात? एखाद्यावेळी कुणी मला ओळखलं तर त्याचा परिणाम काय बरं होईल?"–मोठ्या गंभीरपणानं मी हा प्रश्न त्यांच्यासमोर उपस्थित केला. थोडा वेळ विचार करून ते म्हणाले "तुम्ही ज्या कुणाकडे जाऊन राहाल त्यालाही संकटाशी सामना करावाच लागेल अशा गोष्टीचा मला धोका आहे—तोच धोका इतरांनाही आहे. माझं संकट टाळण्यासाठी मी अन्य कुणावर हे संकट टाकणार? मी असं करणं कठीण आहे." त्यांचं म्हणणं एका दृष्टीनं बिनतोडच होतं. तरीही काही मित्रांबरोबर आपण यासंबंधी चर्चा करू, एवढं ते म्हणाले. काही मित्रांबरोबर बोलणं झाल्यानंतर सर्वांनी मिळून मार्ग काढला. 'जन्मभूमी' च्या प्रवेशद्वारावर पहारेकरी म्हणून उभे राहण्यात धोका आहे, यावर सर्वांचं एकमत झालं. तिथं दररोज शेकडो सामाजिक कार्यकर्त्यांचा ये–जा चालते. यापेक्षा एखाद्या कारखान्याच्या दारावर एका पहारेकरी म्हणून कामावर ठेवणं कमी धोक्याचं होतं. भावनगरचे प्रख्यात व्यापारी श्री. मणीलाल बक्षी यांच्या एका मित्राचा मुंबईला कारखाना होता. त्यांचं नाव होतं श्री. बबलचंद के. मोदी. कारखाना वडाळ्यास होता. श्री. मणीलाल बक्षी यांना एवढंच कळवण्यात आलं की एका राजकीय कार्यकर्त्याला संरक्षण द्यायचं आहे. तुम्ही त्याला पहारेकरी म्हणून ठेवू शकाल काय? त्यांनी सेठ यांच्या म्हणण्यास संमती दिली आणि मला कारखान्यात पहारेकऱ्याची नोकरी मिळाली.

दुसऱ्या दिवशी मी श्री. मोदी यांची भेट घेतली. आमचं थोडं बोलणं झालं. आमचं संभाषण इंग्रजीतूनच झालं. यानंतर त्यांना जरा संकोचल्यासारखं वाटलं. तुम्हाला पहारेकरी म्हणून कसं नेमायचं, असा त्यांनी प्रश्न केला. मी तुम्हाला ऑफिसात घेतो. तुम्ही हळूहळू ऑफिसचं काम शिकून घ्याच्यात कठीण काहीच वाटणार नाही. मी ऑफिसचं काम सुरू केलं. काही दिवस अशाच प्रकारे गेले. या सुमारासच श्री. मोदी यांचे छोटे बंधू श्री. कांतिलालजी मोदी परदेशातून व्यापारी शिक्षण पूर्ण करून परत आले. ते एक भावनाशील वृत्तीचे तरुण होते. बाहेरचं जग पाहिल्यामुळं, त्यांचा एकूण दृष्टिकोनच बदलला होता. आमचा दोघांचा परिचय झाला. आमची आपसात चर्चा होऊ लागली तसतशी आमची मैत्री व परस्परांवरील विश्वास वाढत चालला. मी त्यांचा एक विश्वासू एजंट बनलो. एजंट म्हणून

काम करताना मी संबंध भारतभर फिरलो. त्यांच्या कारखान्याचा मी काही काळ मॅनेजरही झालो. या कालावधीत मला अनेक युरोपियन अधिकाऱ्यांनाही भेटण्याचे प्रसंग आले. शेवटीस, १८ मे १९३८ रोजी ज्या कांतिलालजींकडे मी नोकर म्हणून काम करत होतो त्यांच्याकडून मी महात्मा गांधींकडे गेलो आणि स्वतःला गांधीजींना समर्पित केलं.

श्री. बबलचंद आणि त्यांचे बंधू श्री. कांतिलाल यांच्याशी मी ज्याप्रकारे चर्चा करत होतो, त्यावरून आणि एकूण माझं जीवन बघून, मी कुणी सर्वसामान्य माणूस नाही, ही गोष्ट त्यांना कळून चुकली होती. माझं व्यक्तीमत्त्व काहीसं गूढ आहे व माझी जीवनस्वप्नही निराळी आहेत, हेही त्यांनी ओळखलं. मात्र मी तुरुंगातून फरार झालेला एक कैदी आहे, हे मात्र त्यांना माहीत नव्हतं. मुंबई मधल्या गोळीबाराच्या खटल्यात पोलीस माझ्यामागे हात धुवून लागलेले आहेत; हे त्यांना ज्ञात नव्हतं. श्री. कांतिलाल मोदी हे एक मोठे व्यापारी आहेत. ते देशभक्त असून कॉंग्रेस पक्षाचे एक निष्ठावंत कार्यकर्ते आहेत. भारतामधल्या प्रत्येक प्रख्यात व प्रगतिशील व्यक्तीशी त्यांचे निकटचे संबंध आहेत. त्यांचं माझं १९३६ च्या सुमारास जे नातं जडलं त्यातून निर्माण झालेला विश्वास आणि प्रेमभाव संध्याकाळच्या सावल्याप्रमाणं वाढतच गेला. आजही तो तसाच कायम आहे. वेळोवेळी श्री. कांतिलालजी मोदी माझ्या पाठीशी उभे राहिले आणि हरप्रकारे त्यांनी मला मदत केली.

श्री. कांतिलाल मोदी यांच्या कारखान्यातील सर्वप्रकारची कामं मी शिकून घेतली होती. कारखान्यात तयार होणाऱ्या मालाची विक्री करण्यासाठी त्यांचा एजंट म्हणून मी संबंध भारतभर दौरा केला होता. व्यापारीजगतात आवश्यक असणारी चालाखी व हुशारी मीही आत्मसात केली होती. सर्व बाबींचा मला परिचय झाला होता.

मी सतत आठ वर्षं सौराष्ट्रातील तरुणवर्गाची सेवा केली होती. हजारो तरुण माझ्या सान्निध्यात आले होते. त्यातल्या शेकडो विद्यार्थ्यांना मी माझ्या हातानं खाऊ-पिऊ घातलं होतं. या तरुणांपैकी अनेकजण आता मुंबईला स्थायिक झाले होते. ज्या तरुणांच्या मनात माझ्याविषयी प्रेम होतं, त्यांच्या नजरेतून सुटणं फार कठीण होतं.

इ. सन १९३७–३८ सालचं राजकीय वातावरण खूप उत्साहजनक होतं. देशावर प्रेम करणाऱ्या व्यक्तीकडं देशातले तरुण स्नेहानं आणि आदरानं बघत होते. देशातील तरुणांच्या मनात कशाप्रकारचा उत्साह संचरला होता व त्यांच्या मनात कसं प्रेम निर्माण झालं होतं, यासंबंधी काही उदाहरण देणं उचित होईल.

मुंबई गोळीबार खटल्यानंतर मला पकडून देणाऱ्या व्यक्तीला मोठं बक्षीस देण्यात येईल असं पोलिसांनी जाहीर केलं होतं. तरुण वर्गाला याची पूर्ण माहिती होती.

एके दिवशी कारखान्याच्या ऑफिसात काम करणाऱ्या दोन तरुणांसमवेत काही कापड खरेदीसाठी मी एका दुकानात गेलो. दुकान खूप मोठं होतं. काऊंटर वरील तरुणाला मी कापड दाखवायला सांगितलं. माझ्याकडे बघून तो तरुण हसू लागला. मी म्हणालो—अरे बाबा! हसत काय राहिलास कापड दाखव. तो लाजला परंतु तरीही हसतच राहिला. माझ्या बरोबरच्या माणसांनीही त्याला विचारलं— तुला हसायला काय झालं? तो म्हणाला मला हे गृहस्थ स्वामीरावसारखे वाटतात. माझा साथीदार म्हणाला— कोण स्वामीराव? तो उत्तरला— मला हे आमच्या स्वामीजींप्रमाणे वाटले. म्हणून तर मी मोठ्या प्रेमानं त्यांच्याकडे हसत बघत होतो. माझं काही चुकलं असल्यास, क्षमा करा. दुकानाच्या मालकानंही आमच्याकडे बघितलं. तो तरुण एकदम गप्प झाला आणि आम्हाला कापड दाखवू लागला. तो वारंवार मला बारीक नजरेनं न्याहाळीत होता आणि मी त्याच्या डोळ्याला डोळा द्यायला टाळू लागलो. मी तिथून कपडा घेऊन बाहेर पडलो. परत कधी त्या बाजारात पाऊल ठेवलं नाही.

एके दिवशी रात्री दहाच्या सुमारास मी माझ्या मित्रासमवेत बाजारातून चाललो होतो. एका उपाहारगृहातून एक तरुण धाईनं माझ्याकडे आला आणि त्यानं भररस्त्यावर माझ्या पायांना हात लावून मला नमस्कार केला. तो समोर उभा राहिला. प्रयत्न करूनही मला त्याची ओळख पटेना. तो म्हणाला—तुम्हाला आमच्या घरी यावं लागेल. मोठे भाऊ तुमची सतत आठवण करतात. त्यानं आपल्या मोठ्या भावाचं नाव सांगितलं तेव्हा आपण कुणाच्या पुढ्यात उभे आहोत, हे मला समजलं. तो तरुण हॉटेलात चहा पीत होता. त्यानं मला लांबून येताना बघितलं आणि तरीही तो मला ओळखू शकला. त्यानं माझं छायाचित्र बघितलं होतं. माझ्यावरील प्रेमामुळं त्याच्या मनात माझं चित्र कायम होतं. त्याला माझा विसर पडला नव्हता. माझ्या सोबतच्या माणसापासून सर्व गोष्ट लपविण्याची माझी इच्छा होती. मी माझा पाय त्या तरुणाच्या पायावर ठेवून दाबला व त्याला म्हणालो— भावाला सांग, उद्या मी भेटायला येईन. त्या तरुणाला माझा इशारा समजला व तो दुसरीकडे बघत तिथून निघाला.

एके दिवशी बंगलोरला हिंदू लॉजमध्ये मी भोजन करत होतो. टेबलावर आणखी दोन तरुण भोजन करत होते. त्यातला एक तरुण वारंवार माझ्याकडे बघत होता. भोजनाकडे त्याचं लक्षच नव्हतं. जेवण आटोपून मी जेव्हा माझ्या खोलीत आलो तेव्हा तो तरुणही माझ्या मागे मागे येऊन खोलीत दाखल झाला. त्यानं आपली ओळख करून दिली व माझ्यासंबंधी विचारणा करू लागला. मी त्याला जे काही सांगितलं त्यानं त्याचं समाधान झालं. तो देखील एक व्यापारी एजंट म्हणूनच काम करत होता. नंतर दोन आठवडे मी ज्या ज्या ठिकाणी राहिलो तोही तिथंच

मुक्कामाला आला. माझ्याविषयी त्याच्या मनात प्रेम व आदराची भावना निर्माण झाली व ती वाढतच गेली. मी कोण आहे, हे आपण ओळखलं आहे, असं मात्र तो चुकूनही म्हणाला नाही.

आन्ध्रप्रदेशातील प्रसिद्ध शहर बेजवाडा येथल्या एका हॉटेलच्या खोलीत तीन अन्य एजंटांसमवेत मी पत्ते खेळत बसलो होतो. आणखी एक चौथा माणूस खेळात सामील झाला. तो मला 'गुरुजी' म्हणून संबोधू लागला. तो तरुण जरा चंचल स्वभावाचा होता. पत्ते खेळणं झाल्यानंतर तो माझ्या खोलीत आला व म्हणायला लागला की, आपलं नाव–गाव काय आहे, हे जाणण्याची माझी बिलकुल इच्छा नाही. मात्र एवढं मी अत्यंत ठामपणे सांगू इच्छितो आपण माझे गुरु आहात. भावनगरला मी आपल्या हाताखाली शिकलो आहे. त्यानं स्वतःहूनच मला आश्वासन दिलं की ही गोष्ट तो इतर कुणालाही सांगणार नाही. जेव्हा अशा प्रकारच्या घटना घडत होत्या तेव्हा राहून राहून एखाद्या प्रिय व्यक्तींशी आपला कुठं संघर्ष तर उडणार नाही, ह्याची मला धास्ती पडली. आतापावेतो जे तरुण मला भेटले होते ते व्यापारक्षेत्रातले होते. माझ्या ओळखीच्या तरुणांपैकी एखादा पोलिसात गेला असण्याचीही शक्यता होती. अशा एखाद्या तरुणानं मला ओळखलं तर मग मात्र कठीण परिस्थिती होती.

देशातील राजकीय वातावरण बदललं होतं. हिंदुस्थानातल्या अनेक प्रांतात काँग्रेसला बहुमताच्या आधारावर मंत्रिमंडळं स्थापन करता आली होती. काँग्रेसचे जे कार्यकर्ते तुरुंगात होते, त्यांची सुटका होत होती.

ज्या तरुणांनी सशस्त्र क्रांती करून ब्रिटिश राजवट उखडण्याचा प्रयत्न केला होता ते सर्व क्रांतिकारक असहाय्य अवस्थेत तुरुंगात खितपत पडले होते. त्यांची सुटका होण्याची मुतराम शक्यता दिसत नव्हती. काँग्रेसचे शांततावादी नेते या क्रांतिकारकांच्या सुटकेसंबंधी इंग्रज सरकारवर दबाव आणण्याचा प्रयत्न करत नव्हते. हे राजकीय बंदी शेवटी उपोषणाचा, अन्न सत्याग्रहाचा मार्ग अनुसरण्यास उद्युक्त झाले. बंगालच्या तुरुंगात शेकडो राजकीय कैदी सुटका व्हावी म्हणून अन्नसत्याग्रह करू लागले तेव्हा सबंध देशभर अस्वस्थता निर्माण झाली. देशाची जनता या राजबंद्यांविषयी सहानुभूती प्रकट करू लागली परंतु ब्रिटिश सरकारचे अधिकारी या राजबंद्यांना सोडायला तयार नव्हते.

● ● ●

माझा साथीदार बाबा गुरुमुखसिंह एका विश्वासघातक्यामुळं पकडला गेला होता. देशातील राजकीय बदलांमुळे मी वेगळ्या पध्दतीनं विचार करायला प्रारंभ केला. नाव व वेष बदलून मी मोठ्या आरामानं जीवन जगत होतो. त्या सुमारास जी माणसं मला मदत करत होती त्यांच्यावर कोणत्याही क्षणी आपत्ती कोसळू शकत होती. माझ्यामुळं त्यांच्यावर बालंट येऊ शकत होतं. एखाद्याच्या घरी मला पकडण्यात आलं तर त्या माणसाचं सबंध घर-दार उद्‌ध्वस्त व्हायला वेळ लागला नसता. भूमिगत अवस्थेत एखाद्या चोराप्रमाणं लपत-छपत जगणं मला मानवण्यासारखं नव्हतं. त्यात काहीच अर्थ नव्हता. त्या काळी शस्त्रास्त्रं जमा करणं व्यर्थ होतं तसंच गुप्त रीतीनं प्रेस चालवून पत्रकं वगैरे काढण्याचीही आवश्यकता राहिली नव्हती. कुणाला ठार करण्याची किंवा बॉम्बस्फोट करण्याचीही गरज उरलेली नव्हती. देशाची जनता जागृत झाली होती. जागी झालेली जनता स्वातंत्र्याच्या दिशेनं वाटचाल करत होती. स्वातंत्र्याचं आपलं उद्दिष्ट गाठूनच ती थांबणार होती. तिला कुणीच थोपवू शकत नव्हतं. मी कांहीकाळ भूमिगत अवस्थेत राहून बघितलं होतं. या अवस्थेत मला विशेष असं कुठलंच कार्य करता येत नव्हतं. एक व्यक्ती म्हणून मी काहीबाही करू शकलो असतो परंतु एखाद्या व्रतस्थ व्यक्तीसारखं ते कार्य ठरलं नसलं. महान ध्येयवादी म्हणून देशसेवा करणाऱ्या व्यक्तीप्रमाणं माझा समाजावर कुठलाच ठसा भूमिगत कार्यानं उमटला नसता. तेव्हा भूमिगत अवस्थेतून बाहेर कसं पडावं, यासंबंधी मी विचार करू लागलो. माझ्या साम्यवादी मित्रांशीही मी विचारविनिमय केला. मी माझ्या भूमिगत जीवनाचा त्याग करण्याचं ठरवलं आहे, हे मी त्यांना निक्षून सांगितलं. मी महात्मा गांधींकडे जाऊन आत्म-समर्पण करणार आहे व ब्रिटीश राजवटीकडे स्वतःच जाऊन कैदी बनणार आहे. देशसेवा करण्यासाठी आता भूमिगत राहून कार्य करण्याची गरज राहिलेली नाही–अशी माझी धारणा आहे. कै. डॉ. पट्टाभिसीतारामय्या आणि कै. श्री. नानाभाई भट्ट या दोन थोर देशभक्तांच्या मध्यस्थीनं मी महात्माजींपर्यंत जाऊन पोचलो. महात्माजी मला 'स्वामीराव' म्हणून ओळखत होते. स्वामीरावचं खरं नाव काय आहे व त्यानं कशा-प्रकारे जीवन व्यतीत केलं आहे–हा सर्व वृत्तान्त महात्माजींच्या कानावर घालण्यात आला तेव्हा मोठ्या गंभीरपणानं त्यांनी माझी सर्व हकीकत ऐकून घेतली. माझी हकीकत ऐकून महात्माजी म्हणाले–"तुमची जीवन कहाणी खरोखरच मोठी अद्‌भुत आहे. मला विस्तारानं तुमच्या जीवनासंबंधीची जाणकारी हवी आहे. उद्यापर्यंत तुम्ही तुमचा जीवन वृत्तान्त लिहून आणू शकाल काय ?"

माझा असा समज होता की आपण जाऊन महात्माजींची भेट घेऊ. गांधीजी पोलीसला फोन करून बोलावून घेतील आणि मला त्यांच्या स्वाधीन करून टाकतील. त्यानंतर जे काय व्हायचं ते होईल. बापूजींचं म्हणणं ऐकून माझी जरा निराशाच झाली. आता रात्रीच्या वेळी कुठं तरी बाहेर जाऊन थांबायच—दुसरे दिवशी पुन्हा इथं परत यायचं—या गोष्टी निर्विघ्नपणे कशा पार पडू शकतील ? परिस्थिती मोठी कठीण होती. त्यांच्या आज्ञेनुसार वागण्याखेरीज दुसरा कुठलाच मार्ग नव्हता. एखाद्या गोष्टीची आपणास भीती वाटते, हे सांगणं मला अपमानास्पद वाटत असे.

महात्माजींची भेट घेतल्यानंतर मी माझ्या साम्यवादी मित्रांना भेटणार होतो. ठरलेल्या ठिकाणी मी वेळेवर जाऊन पोचलो. परंतु मला भेटायला कुणीही आला नाही. साम्यवादी मित्रांच्या या बेफिकीरीच्या वागण्याचं मला खूप वाईट वाटलं. आत्मसमर्पणाचा प्रश्न माझ्या लेखी जीवनमरणाचा प्रश्न होता. रात्रभर श्री. कांतिलाल मोदी यांच्या घरी बसून मी माझा जीवन वृत्तान्त लिहून काढला. सकाळ होताच मी श्री. शांतिलाल शाह (महाराष्ट्र मंडळाचे सदस्य) यांच्याकडे गेलो. श्री. शहा १९२६ साली माझ्या व्यायामवर्गात विद्यार्थी होते. दिवसभर त्यांच्या घरी थांबून सूर्यास्त झाल्यानंतर मी महात्मा गांधीजींच्या जुहू येथील निवासस्थानी गेलो व इंग्रजीमधून लिहिलेलं— 'राष्ट्रनेत्याकडे आत्मसमर्पण'— या शीर्षकाचं माझं जीवन-वृत्त, त्यांना सादर केलं. महात्मा गांधींनी लक्षपूर्वक तो वृत्तान्त वाचून काढला व गंभीर आवाजात ते मला म्हणाले— "इंग्रज सरकारच्या दृष्टीनं तुम्ही अत्यंत धोकादायक व्यक्ती आहात. तुमची सुटका होणं केवळ अशक्य दिसतं. ते तुम्हाला जिवंत तरी ठेवतील किंवा नाही, हा खरा गंभीर प्रश्न आहे". तुम्ही आत्मसमर्पणाचा विचार सोडून देणंच ठीक राहील व सोळा वर्षं तुम्ही जशी काढली तसंच बाकीचंही जीवन काढणं योग्य होईल, असंही ते म्हणाले. आता देश स्वतंत्र होणारच आहे. एकदा देश स्वतंत्र झाला की तुम्हीही आपोआपच स्वतंत्र व्हाल. ज्या भावनेनं त्यांनी प्रश्न उपस्थित केला त्याच भावनेनं मी त्यांना उत्तर दिलं— "जिवंत राहून परत स्वातंत्र्य अनुभवण्याच्या हेतूनं मी हे आत्मसमर्पण करत नाही आहे. देशातल्या तरुणांसमोर आता भूमिगत राहण्याची आवश्यकता नाही, याचं उदाहरण मी घालून देऊ इच्छितो. देशाची सेवा करायची असेल तर ती उघडपणे करावी, असं मला वाटतं. हे ऐकून बापूजी म्हणाले की तुम्ही अजून विचार करा, मीही यासंबंधी विचार करतो.

बर्ध्याला पोचल्यानंतर माझ्या आत्मसमर्पणासंबंधी व माझ्या सुटकेविषयी व्हॉइस-रॉयशी पत्र-व्यवहार करण्याचा बापूजींचा विचार होता. दुसऱ्या दिवशी सायंकाळच्या वेळी, माझे जुने मित्र बहाउद्दीन उस्मान शेख यांना मी आत्मसमर्पण करण्याचं ठरवलं आहे, हे समजलं. ते इथं येऊन कै. महादेवभाई देसाई यांना भेटले. मी प्रगट होऊन बाहेर आल्याची बातमी सगळीकडे पसरली आहे हे जेव्हा गांधीजींना समजलं

तेव्हा त्यांनी आपला विचार बदलला. त्यांनी ताबडतोब मुंबईच्या कमिश्नरांना एक पत्र पाठवलं. पत्र महादेवभाई देसाई यांच्या हाती पाठवून त्यांनी कमिश्नरसाहेबांना असं सांगायला सांगितलं की इंग्रज सरकारचा एक बंडखोर व तुरुंगातून फरार झालेला पृथ्वीसिंग हा कैदी माझ्याजवळ आहे. मी त्यांच्या सुटकेचा प्रयत्न करीन. आपण जर त्यांना माझ्याजवळ राहण्याची परवानगी द्याल तर ते माझ्यापाशी राहतील—आपण त्यांना अटक करू इच्छित असाल तर आपण तसे करू शकता. मुंबईचे कमिश्नर हे खिलाडूवृत्तीचे गृहस्थ होते. त्यांच्या मनात हा विचार आला की आमचं सरकार ज्या माणसाला सोळा वर्षं पकडू शकलं नाही, तो माणूस आत्मसमर्पण करतो आहे. त्याला मी कोणत्या गुन्ह्यासाठी जाऊन अटक करू? त्यांनी उत्तर पाठवलं की मी या माणसाला अटक करण्यासाठी येणार नाही, मात्र सरकारकडे त्याची माहिती पाठवतो. सरकारचा जो आदेश असेल—त्याप्रमाणे मी वागेन. काही तासांच्या आतच व्हॉईसरॉयनी कमिश्नरांना आदेश दिला की पृथ्वीसिंह फारच धोकादायक मनुष्य आहे—त्याला पकडण्यात विलंब करू नये—सर्व गोष्टींची काळजी घ्या. कमिश्नरांनी महात्माजींना फोन करून सांगितलं की त्याला मला अटक करण्यासंबंधी हुकूम आला आहे. उद्या दुपारी दोन वाजता आम्ही येऊन त्याला अटक करू. कृपा करून त्याला आमच्या हवाली करा. माझ्या अटकेसंबंधी सकाळ-संध्याकाळ गांधीजींशी चर्चा केली. मला अजिबात खंत वाटत नव्हती. माझी मानसिक स्थिती बघून त्यांनाही मोठा संतोष वाटला. दुपारचं भोजन करून मी आपल्या खोलीत जाऊन झोपून राहिलो.

मुंबई पोलिसलाही मी बापूजींच्याकडे पोचल्याची व माझ्या अटकेविषयीची बातमी समजली होती. पोलीसांच्या दोन लॉऱ्या तिथं येऊन थडकल्या. त्यांनी गांधीजींच्या निवासस्थानाभोवती गराडा घातला. कमिश्नर तिथं आल्याबरोबर त्यांनी हे दृश्य बघितलं. त्यांनी चौकशी केली व सांगितलं की एकाही पोलिसाची तिथं गरज नाही. तुम्ही सर्वजण येथून ताबडतोब निघून जा. मी एकटाच त्यांना तुरुंगात आणून सोडीन. मुंबईचे कमिश्नर एका गुप्तचर विभागाच्या अधिकाऱ्याबरोबर महात्माजींच्याकडे गेले. महादेवभाई देसायांनी माझ्या खोलीचं दार ठोठावलं. मला झोप लागली होती—मी झोपलो आहे, याचं त्यांना आश्चर्य वाटलं. बापूजींच्या समवेत जे बंधू-भगिनी तिथं होते—त्यांनी भजन म्हणायला सुरुवात केली. अशा पध्दतीनं मला निरोप द्यायचा कार्यक्रम पार पडला. मी बापूजींचा आशीर्वाद घेऊन कमिश्नरांच्या समवेत तिथून बाहेर पडलो. श्री. कनुभाई यांनी तेवढ्यातच माझा एक फोटोही घेतला. ही घटना १९ मे १९३८ ची आहे.

२० मे १९३८ च्या 'हरिजन' मध्ये महात्माजींनी माझ्या अटकेसंबंधी एक निवेदन प्रसिद्धीला दिलं. सारांशरूपानं ते मी खाली उद्धृत करत आहे.

## यात्रेतील एक साथी
## (हरिजन–२८ मे १९३८)

मुंबई उपनगर जिल्ह्याच्या कलेक्टरांनी, १९१५ लाहोर कट-खटल्यातील जन्मठेपेची शिक्षा झालेले कैदी सरदार पृथ्वीसिंह यांना आपल्या ताब्यात घेतलं. सरदार पृथ्वीसिंहांनी आपल्या शिक्षेचा काही काळ अंदमान येथे भोगला व तिथल्या आंदोलनाचा परिणाम म्हणून बाकीची शिक्षा भोगण्यासाठी त्यांना मद्रासला पाठवण्यात आलं. तेथून त्यांची रवानगी राजमहेन्द्री येथील तुरुंगात करण्यात आली. तिथल्या जेल-जीवनाला कंटाळून त्यांनी दोन वेळा पळून जाण्याचा प्रयत्न केला १९२२ च्या दुसऱ्या प्रयत्नात ते तुरुंगातून पळण्यात यशस्वी झाले आणि तेव्हा पासून पोलीसांच्या डोळ्यात धूळ फेकण्यात सफल होत गेले. आपला मार्ग त्यांनी स्वतःच शोधून काढला. ते एक महान क्रांतिकारक होते. केव्हा केव्हा ते सशस्त्र क्रांतिसंबंधी फेरविचार करत. अखेरीस आपल्या काही मित्रांशी विचार-विनिमय करून त्यांनी स्वतः माझ्याकडे येऊन आत्मसमर्पण केलं व माझं नेतृत्व स्वीकारण्याचा निर्णय घेतला. त्यांच्याशी सर्व बाबींवर चर्चा करून व विचार–विनिमय करून मी त्यांना माझ्या कार्यक्षेत्रात घ्यायचं ठरवलं. मी त्यांना स्पष्टपणे सांगितले की माझ्या विचारसरणी-नुसार कुठल्याही गुप्त कार्याची आवश्यकता नाही आणि सरकारी अधिकाऱ्यांच्या समक्ष आत्मसमर्पण करणं ही देखील देशाची महान सेवाच आहे. त्यांना माझं हे मत पटलं· ते माझ्याकडे १८ मे रोजी सकाळी आले आणि १९ मे रोजी मी कलेक्टरांना पृथ्वीसिंहांनी माझ्याकडे येऊन आत्मसमर्पण केलं आहे. त्यांच्या सुटकेसंबंधी मी भारत सरकारकडे प्रयत्न करणार आहे. आपण पृथ्वीसिंहांना कायदेशीररीत्या माझ्याकडे राहण्याची परवानगी देऊ शकत नसाल तर आपण त्यांना अटक करून येथून नेऊ शकता, असं कळवलं. जिल्हा न्यायाधीशांनी मला उत्तर पाठवलं की अशा कैद्याला स्वतंत्र करण्याचा त्यांना कुठलाच अधिकार नाही. त्यांनी पोलीस अधीक्षकांच्या मदतीनं त्याच दिवशी दुपारी एक वाजता माझ्या जुहू येथील निवासस्थानी येऊन त्यांना अटक केली.

प्रथम श्रेणीच्या राजकीय कैद्याप्रमाणं वागवण्यात येईल असं आश्वासन मला देण्यात आलं. मी पृथ्वीसिंह आझादांना त्यांच्या जीवनातल्या घटना लिहून काढायला सांगितलं. अंगावर शहारे आणणाऱ्या घटना त्यांच्या जीवनात घडल्या होत्या. एक साहसपूर्ण (रोमँटिक) जीवन ते जगले. त्यांचा माझा जो काही संबंध आहे, त्यावरून मला स्वच्छपणे हे दिसतं की लाज वाटावी असं एकही कृत्य त्यांच्या हातून घडलेलं नाही. त्यांनी कुठला अपराध केलेला नाही. तरुण वयात ते कॅनडा इथं गेले तेव्हाच त्यांनी क्रांतीच्या विचारांचा अंगीकार केला. कॅनडाच्या किनाऱ्यावरून चोरून-लपून निघालेल्या 'कोमागाटामारू' या जहाजावर कॅनडामधल्या आपल्या अन्य साथीदारांसमवेत ते चढले आणि भारतात परत येऊन इथं क्रांती घडवून आणण्याचा त्यांनी निश्चय केला.

अशा तऱ्हेने पोलीसांच्या तावडीतून निसटून राष्ट्रासाठी अनेक उपयुक्त कार्यं त्यांनी केली आहेत. ते एक सुदृढ आणि सशक्त राजपूत आहेत. अंदमान येथे त्यांनी केलेलं पाच महिन्यांचं उपोषण, पोलिसांशी झटापट किंवा चालत्या गाडीतून त्यांनी उडी मारून काढलेला पळ—या सर्व गोष्टींमुळे त्यांना ज्या जखमा झाल्या त्यांच्या साध्या खुणाही त्यांच्या शरीरावर मागे राहिल्या नाहीत. ते एक पहिल्या दर्जाचे व्यायाम-शिक्षक म्हणून राहिले. त्यांनी शारीरिक विज्ञान तसेच स्नायूंचा उत्तम अभ्यास केला आणि अनेक शाळांमधून व्यायाम-शिक्षक म्हणून काम केलं.

माझ्या जीवनाच्या अखेरच्या कालखंडात राजकीय बंद्यांच्या सुटकेचा प्रयत्न करावा अशी प्रेरणा ईश्वराकडून मिळाली. ह्या उद्देशप्राप्तीसाठी पृथ्वीसिंहांच्या सुटकेचा प्रयत्न, हा एक महत्त्वाचा योग आहे. त्यांनी मला असं सांगितलं की देशाच्या स्वातंत्र्यासाठी जो अहिंसक मार्ग आपण दाखवला आहे, त्यावर मी गंभीरपणानं विचार करीन. त्यांचे काही क्रांतिकारक मित्रही अहिंसात्मक मार्ग स्वीकारण्याचा विचार करत आहेत, असं त्यानी सांगितलं. भारताला स्वतंत्र करणं याशिवाय त्यांचं अन्य कुठलंच उद्दिष्ट नाही ज्या गांभीर्यानं ते माझ्याशी बोलत होते, त्यानं मी अतिशय प्रभावित झालो. त्यांच्या शब्दाशब्दांवर माझा विश्वास बसत गेला. अशा माणसांच्या सोबतीने स्वातंत्र्याच्या मार्गावर वाटचाल करण्यात, मला निश्चितच आनंद वाटेल. हा आनंद मी अनुभवला आहे."

गुप्तचर विभागाच्या अधिकाऱ्यानं मी सोळा वर्षं कुठं काढली, असा प्रश्न केला. मी त्यांना उत्तर दिलं की मलाच तुम्ही ही गोष्ट विचारत आहात—मग तुम्हाला पगार कशाबद्दल मिळतो? त्यानं टोपी काढून मला अभिवादन केलं. मी तुमच्यासमोर नतमस्तक आहे—एवढंच तो म्हणाला. कमिशनरांच्या कारमध्ये बसून आम्ही ठाण्याच्या तुरुंगात आलो. जेलच्या खोलीत माझ्यासाठी कोणकोणत्या व्यवस्था करायच्या ह्याबद्दल संबंधितांना त्यांनी सूचना दिल्या व माझा निरोप घेतला.

सोळा वर्षं स्वातंत्र्य उपभोगून आजची रात्र मी परत तुरुंगाच्या खोलीत कंठत होतो. मला खोलीत बंद करण्यात आलं होतं. माझ्या मनात नाना प्रकारचे विचार येऊ लागले. उन्हाळ्याचे दिवस होते. खोलीत पंखा नव्हता—खूप डास होते–मच्छरदाणी लावण्याचाही उपयोग नव्हता—झोप येत नव्हती. स्वतःहूनच जेलमध्ये येण्याचा मी निर्णय घेतला होता. या सर्व गोष्टी मला आता त्रासदायक वाटत नव्हत्या. माझ्या धरपकडीची बातमी मुंबईच्या सर्व वृत्तपत्रांनी ठळकपणे प्रसिद्ध केली होती. महात्माजींच्या निवेदनामुळे माझ्या अटकेला आगळंच महत्त्व आलं. गांधीजींच्या विरोधकांनी त्यांच्या निवेदनावर कडक टीका केली. एका वृत्तपत्रानं तर मथळाच दिला होता "महात्मा गांधींचा एका क्रांतिकारकासंबंधीचा द्रोह" या वृत्तपत्रानं बातमी देताना म्हटलं की भोळ्या-भाबड्या वृत्तीचे क्रांतिकारक पृथ्वीसिंह महात्माजींची भेट घेण्यासाठी गेले

असतांना—त्यांनी गप्पा-गोष्टी करत त्यांना जवळ बसवून घेतलं आणि पोलीसला कळवलं की तुरुंगातून फरार झालेला कैदी माझ्यापाशी बसलेला आहे. अशी विपर्यस्त बातमी वाचून मला खूपच वाईट वाटलं. राजकीय क्षेत्रात इतरांच्यावर चिखलफेक करण्याची आणि एकमेकांना बदनाम करण्याची ही प्रवृत्ती बघून माझं मन दुःखी, कष्टी झालं.

दुसऱ्या दिवशी मला कैद्याच्या सविस्तर नोंदींचं कार्ड देण्यात आलं. त्यावर माझ्या सुटकेचं वर्ष १९६६ असं नोंदवलं होतं. माझ्या आत्मसमर्पणाकडे खुनशीपणानं बघणाऱ्या शासनाकडून यापेक्षा निराळं काय घडणार? शासन माझ्याशी दयाबुद्धीनं वागेल, ही अपेक्षा करणंच चुकीचं होतं! तुरुंगातल्या प्रत्येक क्षणी मी पोलीस अधिकारी केव्हा येतात, भूमिगत क्रांतिकारकांची माहिती माझ्याकडून मिळवण्यासाठी मला कोणकोणत्या यातना देतात, त्यांच्याशी आपण कशा तऱ्हेनं वागावं, ह्याच प्रश्नांचा विचार करत बसलो. अशा प्रकारचे विचार मनात घोळवून मी माझं मन अधिक मजबूत बनवत होतो. एखादी बाजूही कम-कुवत राहिली तर चुका होण्याची शक्यता होती. दिवस जात राहिले परंतु कुणीच चौकशीसाठी आलं नाही. कॉंग्रेसच्या मंत्रिमंडळात श्री. के. एम. मुन्शी गृहखात्याचे सचिव होते. तुरुंगात माझे मित्र मला भेटायला येत होते. त्यांना कुणी अडवीत नव्हतं.

महात्मा गांधींच्या आज्ञेनुसार मी संबंध दिवस माझा जीवन-वृत्तान्त लिहिण्यात घालवत होतो. दिवस केव्हा संपायचा ते कळायचं देखील नाही.

वर्तमानपत्रांतील बातम्यांमुळं मला अटक करण्यात आली आहे, ही गोष्ट माझ्या भावांनाही समजली. महात्माजींची परवानगी घेऊन ते मला भेटायला तुरुंगात आले. जेलच्या इंग्रज अधीक्षकानं भाऊ माझ्या भेटीसाठी आल्याचं सांगून तो अधिकारी म्हणाला— तुमचे धाकटे बंधु एखाद्या राक्षसाप्रमाणं धिप्पाड दिसतात! मी त्यांच्याशी हस्तांदोलन केलं, या राकट हातानं त्यांनी कुणाच्या चेहऱ्यावर प्रहार केला तर इकडचं तोंड तिकडे करण्याची, त्यांची ताकद जाणवली. जेलच्या अधिकाऱ्याच्या खोलीतच मी भावाला भेटलो. तब्बल सोळा वर्षांनंतर मी त्याला बघत होतो; पाहता क्षणीच मी त्याला ओळखलं. त्याच्याबरोबर पायात बूट घातलेले दोन तरुण बघून मी जेलच्या अधिकाऱ्याला म्हटलं की आमच्या भेटीच्या वेळी परक्या लोकांना तुम्ही काय म्हणून परवानगी दिली? जेलचा अधिकारी हसत हसत म्हणाला की हे दोघेही तुमचे बंधूच आहेत. वीस वर्षांहूनही कमी वय असलेल्या या माझ्या सावत्र भावांना मी कधीच बघितलेलं नव्हतं. नंतर आमच्या गप्पा सुरू झाल्या. जुन्या गोष्टी ज्या माझ्या स्मरणात होत्या, त्यासंबंधी विचारणा केली. वडिलांच्या विषयी काही विचारण्याची माझी हिम्मत झाली नाही. त्यांनीही स्वतःहून काही सांगितलं नाही. दुसरे दिवशी ते परत भेटायला आले तेव्हा मन कठोर बनवून मी वडिलांसंबंधी त्यांना विचारलं. माझा प्रश्न ऐकून त्यांचे डोळे

अश्रूंनी डबडबले. अश्रू बघून जे समजायचं ते मी समजलो. घडला प्रकार लक्षात यायला वेळ लागला नाही. त्यांच्या निधनासंबंधी मी विस्तारानं माहिती करून घेतली. क्रांतिकारकाचं जीवन किती विचित्र असतं! पित्याला आपल्या मुलाची माहिती नव्हती व मुलाला वडिलांच्या निधनाची माहिती नव्हती! बापानं मुलाला परमेश्वराच्या भरवशावर सोडलं होतं आणि मुलाला वाटत होतं की जिथं आपण सर्व जीवनच देशाला वाहिलेलं आहे—तिथं मग अन्य गोष्टींचा विचार करण्यात काय अर्थ आहे ? सतत तीन दिवस भाऊ भेटीसाठी येत होते. कौटुंबिक जिव्हाळ्यानं आम्ही एकमेकांशी बोलत होतो. राजकारणाला इथं अजिबात स्थान नव्हतं. महात्माजींची परत एकवेळ भेट घेऊन भाऊ बर्माला परत गेले. ठाण्याच्या तुरुंगातील पन्नास दिवसांच्या आत्मचर्चेचा त्या सुमाराच्या राजकीय वातावरणानुसार जेवढा जीवन वृत्तान्त मला योग्य वाटला, तेवढा मी लिहून काढला.

• • •

या सुमारास सिकंदर हयात खान हे पंजाबचे मुख्यमंत्री होते. त्यांनी व्हॉइसरॉयमार्फत मुंबई राज्याकडे मागणी केली की पृथ्वीसिंह आमचे कैदी आहेत. तेव्हा त्यांना आमच्या हवाली करण्यात यावं. मुंबई राज्याच्या काँग्रेस सरकारसंबंधी त्यांना भीती पडली होती की काही ना काही निमित्त काढून ते माझी सुटका करतील. पंजाबच्या तुरुंगात मला घेऊन जाण्यासाठी एका शीख पोलीस इन्स्पेक्टरला पाठविण्यात आलं. मुंबई सरकारनं सांगितलं की आम्ही कैद्याला तुमच्या ताब्यात देतो, तुम्ही त्यांना घेऊन जा. एकट्यानं मला घेऊन जाण्याची त्या इन्स्पेक्टरची हिंमत नव्हती. त्यानं पोलिस पार्टीची मागणी केली. मदत मिळाल्यानंतर त्यांनी मला ठाण्याच्या तुरुंगाबाहेर आणलं आणि गाडीत बसण्यासाठी ते मला कल्याण स्टेशनवर घेऊन गेले. तिथं पहिल्या वर्गाच्या वेटिंगरूममध्ये मी थांबलो तेव्हा तो शीख इन्स्पेक्टर माझ्या पाशी येऊन बसला. माझ्या गतायुष्यासंबंधी तो जाणून घेऊ इच्छित होता. मी मोकळ्या मनानं त्याला सर्व हकिकत सांगितली. दोन तास गप्पा मारल्यानंतर त्यानं मला गाडीच्या इंटरक्लासच्या आरक्षण केलेल्या डब्यात नेऊन बसवलं. वरच्या बर्थवर झोपण्यासाठी म्हणून मी अंथरूण टाकलं. रात्री झोपायची वेळ झाली तेव्हा इन्स्पेक्टर मला म्हणाला की वरच्या बर्थवर चढण्या-उतरण्याचा तुम्हाला त्रास होईल. तुम्ही खालच्या बर्थवरच का नाही झोपत ? त्याचा आग्रह बघून मी खालच्या बर्थवर झोपण्याची तयारी केली. त्याचं भरलेलं पिस्तुल माझ्या सीट जवळच लोंबकळत होतं. शिपाई, इन्स्पेक्टर सर्वांनाच झोप लागली. बेड्या घातल्या असताना, चालत्या गाडीतून दोन वेळा पळालेल्या माझ्यासारख्या कैद्याला घेऊन जाणारा इन्स्पेक्टर निवांतपणे झोपू शकत होता. याची दोन कारणं होती. एक म्हणजे हा इन्स्पेक्टर पंजाब युनिव्हर्सिटीचा पदवीधर होता. दोन तासांच्या बोलण्यात त्याला समजलं होतं की सोळा वर्षं मी पोलिसांना सापडलो नव्हतो आणि निश्चित उद्देशानं आता मी स्वेच्छेनं आत्मसमर्पण केलेलं आहे. दुसरं म्हणजे, त्याला मी ज्या अवस्थेत आत्मसमर्पण केलं होतं, याची पूर्ण माहिती होती. आता मी पळून जाण्याची शक्यताच नव्हती.

पंजाब सरकारनं माझ्यासाठी रावलपिंडीच्या तुरुंगाची निवड केली होती. याचं मुख्य कारण हे की या तुरुंगाचा अधीक्षक एक इंग्रज सेनाधिकारी होता. त्याचं नाव होतं कॅप्टन होडर आणि उप-अधिक्षक म्हणून चौधरी मुरीद अहमद (मुसलमान राजपूत) काम बघत होते. हे दोन्ही अधिकारी आपल्या सचोटीबद्दल, प्रामाणिकपणाबद्दल आणि कडक वागणारे म्हणून विख्यात होते. मी जेलच्या दारात पाऊल ठेवल्याबरोबर जेव्हा चौधरी मुरीद अहमद

यांच्या ऑफिसात गेलो तेव्हा उभं राहून त्यांनी माझं स्वागत केलं. त्यांनी मला प्रेमानं अलिंगनही दिलं. त्यांचं हे वागणं बघून आपण एखाद्या सन्त महात्म्याला भेटतो आहोत का सैतानाला, याची मला कल्पना नव्हती. तुरुंगाचा अधिकारी म्हणून अनेक वर्षं काम करणारा माणूस अशा प्रकारे कसा काय वागत होता ? मी त्याच्या डोळ्याकडे बघू लागलो तेव्हा तो म्हणाला—तुम्ही मला आपला भाऊ समजा—तुम्ही जोपर्यंत या जेलमध्ये आहात मी तुमच्याशी भावाप्रमाणेच वागेन. शान्त चित्तानं तो आपल्या खुर्चीवर बसला. मलाही खुर्चीवर बसायला सांगितलं. तो म्हणाला की मी तुमचं जेलचं रेकॉर्ड वाचलं तेव्हा किती भयंकर स्वरूपाच्या कैद्याशी आपला संबंध येणार, म्हणून मी काळजीत होतो. या कैद्याला जेलमध्ये कोंडून ठेवण्यासाठी काय काय उपाय योजावे लागतील, यासंबंधीही मी विचार केला होता. मी काळजीपूर्वक सर्व बाबींची व्यवस्था केली आहे. तुम्हाला बंदिवान करून ज्या खोलीपाशी कुणालाही पोचता येणार नाही, अशा ठिकाणी तुमची व्यवस्था केली होती. परंतु आता मी ज्या कैद्याला भेटतो आहे—हा तो कैदी नाही—त्याचा वृत्तान्त मी वाचलेला होता. त्यानं आपल्या तीन सहायकांना बोलावून माझी व्यवस्था युरोपियन वॉर्डमध्ये करण्याविषयी सांगितलं

ते लोक मला युरोपियन वॉर्डमध्ये घेऊन गेले. या वॉर्डात तीन खोल्या होत्या. एक खोली लिहिण्या-वाचण्यासाठी, दुसरी झोपण्याची आणि तिसरी सामान-सुमान ठेवण्यासाठी, अशी व्यवस्था होती. तीन कैदी माझ्या सेवेसाठी देण्यात आले. त्यातला एक पहारेकरी होता, दुसरा साफ-सफाई करणारा होता व तिसरा माझं जेवण तयार करणारा होता. मला रावळपिंडीच्या तुरुंगात ठेवण्यात आल्याची बातमी वर्तमानपत्रांनी दिली होती. अनेक काँग्रेस कार्यकर्ते मला भेटायला येऊ इच्छित होते. अनेक इंग्रज अधिकारीही कुतूहलानं मला पाहण्यासाठी व गप्पा मारण्यासाठी माझ्याकडे यायचे. काही वेळा खूप चर्चा व्हायची. रावळपिंडी विभागाचा म्हातारा इंग्रज कमिशनरही मला भेटायला आला. गप्पा मारत असतांना तो सहजच म्हणाला—"तुम्हाला राहण्यासाठी प्रशस्त घर आहे, भोवताल बागबगीचा व सुंदर फुलं आहेत, दिमतीला नोकर-चाकर आहेत. इंग्रज सरकारविषयी अजूनही तुमचं मन वाईटच आहे काय?" अजूनही सरकारला तुम्ही शत्रूच मानता? मीही हसत हसत उत्तर दिलं की इंग्रज सरकार प्रत्येक भारतीय माणसाची अशीच व्यवस्था करणार असेल तर अशा सरकारचं मी जरूर अभिनंदन करीन—त्या सरकारला आपला मित्र समजेन. माझ्या खोलीच्या समोरच्या भागातच माझं टिपण असलेलं कैद्याचं रेकॉर्ड लटकावलेलं होतं. काळेपाणी आणि रावळपिंडीची ही जेल, दोन्हीत किती अंतर होतं ? काळ्यापाण्यावर कैद्याची नोंद लाकडी पाटीवर करण्यात येई व लोखंडी सळई वाकवून ती पाटी कैद्याच्या गळ्यात अडकवीत. आता माझी माहिती एका कार्डवर नोंदवून ते दारावर अडकवलेलं होतं. त्यावर माझ्या सुटकेची मुदत १९६६ अशी लिहिलेली होती. माझ्या सुटकेचं साल वाचून, त्यानं मला विचारलं—'एवढे दिवस तुम्ही जगणार

आहात काय ?" मी हसून उत्तर दिलं—"मी १९६६ पर्यंत जगेन ह्याची खात्री देतो परंतु तुमचं इंग्रजांचं राज्य १९६६ पर्यंत टिकण्याची तुम्ही खात्री देऊ शकता काय ?" माझं हे उत्तर ऐकताच आपण एका सर्वसाधारण कैद्याशी बोलत नाही आहोत—एका क्रांतिकार-काशी बोलत आहोत, हे त्याच्या ध्यानात आलं. त्याच्या चेहऱ्यावरचे भाव लगेचच बदलले व खाली मान घालून तो झटकन तेथून निघून गेला.

पंजाब प्रान्तात १९३८ मध्ये शेतकरी संघटनेनं एक मोठा सत्याग्रह केला होता. परिणामी सुमारे ४०० सत्याग्रहींना रावळपिंडीच्या जेलमध्ये डांबण्यात आलं. शेतकरी तरुण वयाचे व बेफिकिर वृत्तीचे होते. त्यांनी साम्यवाद्यांच्या नेतृत्वाखाली हा सत्याग्रह केला होता. या सर्वांना नियंत्रणाखाली ठेवणं जेलच्या अधिकाऱ्यांना कठीण होऊन बसलं. चौधरी मुरीद अहमद यांच्याशी बोलत असतांना मी म्हणालो की तुम्ही यांना माझ्या हवाली करा—मी यांना नीट सांभाळीन. त्यांनी माझं म्हणणं मान्य केलं. शेतकऱ्यांच्या जवळपास सर्वच साम्यवादी नेत्यांशी माझा परिचय होता. त्यांचे प्रमुख बाबा सोहनसिंह भकना हे माझेही नेते होते. माझ्या इच्छेप्रमाणं काम करण्यास शेतकऱ्यांनी मुळीच खळखळ केली नाही. सकाळ-संध्याकाळ दोन-दोन तास मी त्यांच्याकडून व्यायामाच्या कसरती, परेड आणि खेळ करवून घेत होतो. दुपारी एक तास त्यांच्या मेळाव्यात बसून राजकीय प्रबोधन करत होतो. मलाही या निमित्तानं काम करण्याची संधी मिळाली. शेतकरी बंधूंना अनेक प्रश्नांची माहिती मिळू लागली आणि जेलच्या अधिकाऱ्यांचं संकट टळलं. शेतकऱ्यांनी साम्यवादाचा स्वीकार केला होता. मी गांधीवादी बनलो होतो. तरीही मी त्यांना साम्यवादी तत्त्वज्ञानावर भाषणं देत होतो. याखेरीज माझ्यापाशीही शिकवण्यासारखं दुसरं काही नव्हतं. गांधीवादाचा मी नुकताच अभ्यास करत होतो.

महात्मा गांधीजींची मला पत्र येऊ लागली. ते स्वतः मला पत्रं लिहीत. पाकिटावरील पत्ता देखील त्यांच्याच हस्ताक्षरात असे. चौधरी मुरीद अहमद यांनी मला सांगितलं की १९१९ पासून अनेक राजकीय बंदी माझ्याकडे राहून गेले—त्यांच्यापैकी काहीजण पंजाबचे मोठमोठे नेते होते—राजकीय कैद्यांनी लिहिलेली अनेक पत्रं महात्माजींकडे मी पाठवली असतील—परंतु त्यांच्याकडून कुणाला उत्तर आलं आहे, हे माझ्या पाहण्यात आलं नाही. माझ्याकडे महिन्याकाठी दोन पत्रं तर येतच होती. पाकिटातलं पत्र मला दिलं जाई आणि जेलचा अधिकारीवर्ग पाळी पाळीने महात्माजींच्या हस्ताक्षरातली पत्ता लिहिलेली पाकिटं, आपल्यापाशी आठवण म्हणून ठेवून घेत. गांधीजींचं हस्ताक्षर त्यांनी याप्रकारे संग्रहीत केलं.

महात्माजींनी माझ्या सुटकेसाठी व्हॉइसरॉय यांच्याशी बराच पत्रव्यवहार केला. शेवटी व्हॉइसरॉयांनी गांधीजींना लिहून कळवलं की आमच्या माहितीनुसार पृथ्वीसिंह इंग्रज सरकारच्या लेखी अजूनही तेवढाच धोकादायक आहे. कुठल्याही परिस्थितीत सरकार त्यांच्यावर विश्वास टाकू शकत नाही. त्यांच्या सुटकेची मागणी आपण करू

नये. आत्मसमर्पणाच्या वेळीच महात्मा गांधींनी मला सुटका होण्याची आशा नाही, हे स्पष्टपणे सांगितलं होतं. व्हॉइसरॉयच्या या उत्तरानं त्यांना अजिबात खेद वाटला नाही. ही बातमी पत्र लिहून मला न कळवता त्यांनी कै. महादेव भाई देसाई यांनाच माझ्या भेटीसाठी पाठवलं. भेटीमध्ये सर्व सांगण्याची त्यांनी त्यांना सूचना केली होती. बातमी ऐकून मी काय प्रतिक्रिया देतो, हे जाणण्याचीही त्यांची इच्छा होती. ज्या दिवशी महादेव भाई देसाई माझ्याकडे निघाले त्या दिवशी बापूजींचं मौन होतं. त्यांनी आपल्या हातानं लिहिलं--पृथ्वीसिंह, तुमच्या सुटकेची बिलकुल आशा नाही. परमेश्वराचं स्मरण करा.

श्री. देसाई मला भेटायला आले. त्यांच्याशी माझं बरंच बोलणं झालं, प्रश्नोत्तर झाली. आमच्या भेटीनंतर श्री. महादेव भाईंनी वर्तमानपत्रातून जे निवेदन प्रसिद्धीला दिलं, त्यावरून सर्व चित्र स्पष्ट होतं. त्यांचं हे निवेदन खालीलप्रमाणे होतं—

## कैद्यांच्या मधला एक वेगळा कैदी

(हरिजन–सप्टेंबर १९३९)

"सरदार पृथ्वीसिंहांना मी रावळपिंडीच्या तुरुंगात जाऊन भेटलो. गांधीजींच्याकडे स्वतःहून येऊन आत्मसमर्पण केल्यानंतर तसेच सरकारी अधिकाऱ्यांच्या ताब्यात स्वतःला सोपवून अटक करून घेतल्यानंतर गांधीजींनी त्यांच्या सुटकेसाठी व्हॉइसरॉयना पत्रं पाठवली, त्यांची सुटका करणं हे गांधीजींनी आपलं कर्तव्य मानलं. अशा प्रकारचं कार्य करत राहण्याची त्यांची निराळीच पद्धत होती. मी पृथ्वीसिंहाकडे त्यांनी शांत रहावं, असा संदेश घेऊन गेलो. त्यानंतर अशाच प्रकारचा संदेश घेऊन बंगालमध्ये अन्नसत्याग्रह करणाऱ्या कैद्यांना भेटायला मी गेलो. अन्नसत्याग्रह करणाऱ्या कैद्यांविषयी ज्याप्रकारे पृथ्वीसिंह विचार करत होते—तो विचार माझ्या मनांत देखील नव्हता. माझ्या मनांत संदेह आणि भीती वसत होती, हे खरं. मी जेव्हा या विषयावर पृथ्वीसिंहाशी बोलू लागलो तेव्हा त्यांनी त्वरित माझ्या संशयी व भित्र्या वृत्तीबद्दल मला चार शब्द सुनावले. त्यांनी केलेल्या आत्मसमर्पणाबद्दल ते एवढे खूश होते की सुटका व्हावी असा विचार चुकून सुद्धा त्यांच्या मनात आला नव्हता. जेवढा काळ ते माझ्याकडे होते—त्या सगळ्या गोष्टींनी त्यांची डायरी भरली होती. पृथ्वीसिंहानी अगोदरच जवळ जवळ ८० पौंड लोकर कातलेली होती व आता ते सूत कातत होते. या कामाव्यतिरिक्त त्यांनी एक सतरंजी विणायला सुरवात केली होती. ते इतर कैद्यांना व्यायाम–कसरती शिकवतात आणि बाकीच्या वेळेत लेखन-वाचन करितात. मुलाखतीच्या वेळी तिथं हजर असलेल्या सरकारी अधिकाऱ्यांना मी म्हणालो—"पृथ्वीसिंहाच्या वर्तणुकीनं तुम्हाला त्रास होत नसेल अशी मला आशा आहे". नेमकी विरुद्ध प्रतिक्रिया देत त्यांच्यापैकी एकजण उद्गारला—'माझ्या तीस वर्षांच्या नोकरीत मी अनेक सर्वसाधारण आणि असामान्य कैदी बघितले आहेत. मात्र पृथ्वीसिंहांच्या तोडीचा त्यांच्यापैकी कुणीच नव्हता–यांची कुणाशी तुलनाच होऊ शकत नाही"

पृथ्वीसिंहानी आपल्या स्वतःच्या व बंगालमधील उपोषण करणाऱ्या सत्याग्रहींसंबंधी सुटकेबद्दल जे उत्तर दिलं त्याचं मला अजिबात आश्चर्य वाटलं नाही. "कृपा करून बापूजींना माझ्या सुटकेसंबंधी चिंता करू नका, असं सांगा". ज्या दिवशी मी स्वतःहून बापूजींच्याकडे आत्मसमर्पण केलं त्याचवेळी आपल्याला पुन्हा अनेक वर्षे तुरुंगात काढावी लागणार, हे मला माहीत होतं. यामुळंच आपली सुटका व्हावी, हा विचारही माझ्या मनात येत नाही. परंतु ज्या दिवशी राजकोटच्या निर्णयानुसार अवार्ड रद्द करण्यात आला तेव्हा माझ्या ठिकाणी एक नवी शक्ती आणि विश्वास निर्माण झाला. मी बापूजींचं निवेदन अनेक वेळा वाचून काढलं—त्याचा अन्वयार्थ लावून मी काही मित्रांना पत्रंही लिहिली. माझ्या मनांत मी दृढ निश्चय केला की माझ्या सुटकेसाठी कुणीही प्रयत्न करू नयेत. मी स्वतःच हे सारं सहन करीन. माझ्या दृष्टिकोणात एक स्वाभाविक परिवर्तन घडून आलं आहे. मी मन, वचन आणि कर्मानं अहिंसेचा उपासक बनलो आहे—अहिंसेवर माझी श्रद्धा जडली आहे. माझ्या मनात शब्द उमटले की "जर मी खरोखरीच अहिंसाप्रिय बनलो असेन तर सरकार कुणालाही न विचारता मला सोडून देईल." मला आता सरकारचा विश्वास संपादन केला पाहिजे—आणि हे कार्यकृतीद्वारेच सिद्ध होऊ शकेल. म्हणून तुम्ही कृपा करून, गांधीजींना माझी चिंता करू नका असं सांगा व बंगालमधल्या माझ्या बांधवांना संदेश देण्याची मला अनुमती द्या. बंगाल-मधल्या सत्याग्रहींनी उपोषणाचा जो मार्ग स्वीकारला आहे, तो उचित नाही—असंच मला वाटतं. सरकारवर अशा तऱ्हेनं दबाव आणून काहीही उपयोग नाही. त्यांचा अन्नत्यागाग्रह योग्य नाही. यासंदर्भात मी बापूजींना सविस्तर पत्र लिहिणार आहे. माझं हे पत्र त्यांना योग्य वाटल्यास बंगालच्या सत्याग्रहींच्यासाठी प्रसिद्ध करावं.

ह्या सर्व गोष्टी मी माझ्या शब्दांत व संक्षिप्त रूपात सांगत आहे. यानंतर सरकारी अधिकाऱ्यांच्या परवानगीने त्यांनी मला १९ व २० मे या दोन दिवसांची आपल्या डायरीतील पानं दाखवली. १९ मे ला त्यांनी 'मृत्युदिन' आणि २० मे ला 'पुनर्जन्मदिन' असं नोंदवलेलं होतं. ठीक एक वर्ष आधी १९ मे ला त्यांनी असं म्हटलं होतं की भूतकाळ आता मृतवत झालेला असून त्याचा मी त्याग केला आहे. ह्यामुळेच त्यांनी भूतकाळाला 'मृत' असं म्हटलेलं आहे.

ज्या दिवशी त्यांनी गांधीजींकडे आत्मसमर्पण केलं आणि स्वेच्छेने तुरुंगवास पत्करला तो दिवस त्यांनी पुनर्जन्मदिन म्हणून स्वीकारला होता. त्यांनी असंही म्हटलं की त्यांनी सत्य, अहिंसा आणि संकटमय जीवन स्वीकारलं आहे.

"खरोखरच, त्यांना आपल्या सुटकेची चिंता नाही". मी जेव्हा जेलच्या बाहेर आलो तेव्हा मी स्वतःशीच विचार करू लागलो की बाहेरच्या जीवनातल्या अनाकलनीय गोष्टींना आणि गुंतागुंतीच्या समस्यांना तोंड देण्यापेक्षा ते तुरुंगातच अधिक सुखी आणि आनंदात आहेत. मात्र आपण त्यांच्या सुटकेसाठी शक्य ते सर्व प्रयत्न केले पाहिजेत कारण त्यांच्या सुटकेइतकं दुसरं काहीच श्रेयस्कर नाही.

सबंध दिवस मी लिहिण्या-वाचण्यात घालवत होतो. शिवाय, काम करण्याची सवय टिकावी म्हणून कष्टाची काही कामं करत होतो. चटई विणणे, वेताची खुर्ची तयार करणे इ. कामं मी शिकून घेतली होती. जेलचे अधीक्षक कॅप्टन हौडर यांनी सूत कातण्यासाठी मला एक चरखा आणून दिला. या चरख्याचं चाक पायानं फिरवता येत होतं आणि हाताने सूत कातता येत होतं. या चरख्यावर मी लोकर कातू लागलो. माझी अट एकच होती की मी कातलेली लोकर स्वत: खरेदी करून गांधीजींना पाठवणार आहे. आठ महिन्यांत मी जवळ जवळ ४० पौंड लोकर कातली असेल. प्यारेलालजी जेव्हा मला भेटायला आले तेव्हा जेलच्या अधिकाऱ्यांची परवानगी घेऊन ती लोकर मी महात्माजींना अर्पण करण्यासाठी त्यांच्याकडे दिली. लोकर काततेवेळी केव्हा केव्हा मी अतिशय तल्लीन होऊन जाई. कॅप्टन हौडर माझ्यासमोर येऊन पंधरा पंधरा मिनिटं माझं काम बघत उभे राहात—परंतु मला ते समजायचं नाही. लोकरीच्या धाग्यावरून माझी दृष्टी अन्य कुठे वळतच नसे. त्या सुमारास मेजर बार्कर पंजाबचे इन्स्पेक्टर जनरल ऑफ प्रिझन्स होते. ते अंदमानला जेल-सुपरिन्टेण्डेण्ट व मेडीकल ऑफिसर म्हणून काही काळ होते. तिथं त्यांच्याशी अनेक वेळा माझा संघर्ष उडालेला होता. ते इथल्या युरोपियन वॉर्डमध्ये आले. त्यांनी पाहणी केली. मी त्यावेळी लोकर कातण्याचं काम करत होतो. ते माझ्या पुढ्यातून पलीकडे गेले. त्यांनी शब्दानेही मला काही विचारलं नाही—व मीही माझं लोकर कातण्याचं काम थांबवलं नाही. हे अधिकाऱ्यांच्या ताफ्यातच युरोपियन वॉर्डच्या बाहेर गेले. कुणास ठाऊक, त्यांना काय वाटलं—ते परत मागं आले आणि माझ्यासमोर उभे राहून मला म्हणाले—पृथ्वीसिंह, तुम्हाला इथं काही त्रास तर होत नाही ? तुम्हाला काही वस्तु हव्या आहेत काय ? आमचं बोलणं इंग्रजीतच चाललं होतं. मी त्यांना उत्तर दिलं की मी राष्ट्रनेत्याकडे आत्मसमर्पण केलेलं आहे—त्यांच्या आज्ञेनंच मी हे कैदी जीवन स्वीकारलं आहे. माझ्याशी जो काही व्यवहार चाललेला आहे आणि मला जे काही मिळतं त्यात मी संतुष्ट आहे. आपण मुद्दामहून विचारल्याबद्दल मी आपले आभार मानतो. आपल्या सौजन्याबद्दल धन्यवाद ! शिष्टाचाराचा भाग म्हणून त्यांनी अंदमानच्या काही आठवणींना उजाळा दिला. काही जुन्या साथीदारांची माहिती विचारली. यानंतर त्यांनी जेलच्या अधिकाऱ्यांपाशी मला भेटायला, बोलायला कुणी येतं किंवा नाही—असं विचारलं. त्यांनी उत्तर दिलं की कुणीच येत नाही. त्यांनी अधिकाऱ्यांना सूचना दिली की सकाळी यांना कुणीतरी फिरायला न्या. तसेच काही बैठे खेळ यांना मागवून द्या. त्यांच्याशी बैठे खेळ खेळत जा. मला ते म्हणाले की तुमच्यासाठी वाचायला काही पुस्तकं तसंच खेळण्याची साधनं व व्यायामाची आयुधं पाठवून देतो. लाहोरला जाऊन त्यांनी माझ्यासाठी पुस्तकं, बॅडमिंटन व फुटबॉलाचा पट, चेस्ट-एक्स्पांडर व डम्बेल्स इ. गोष्टी खरेदी केल्या व त्या माझ्याकडे पाठवून दिल्या. त्या दिवसापासून माझी राहण्याची जागा——युरोपियन वॉर्ड——हा जेल-अधिकाऱ्यासाठी एक क्लब म्हणून अस्तित्वात आला. कॅप्टन हौडरनी मला बॅडमिंटन खेळायला शिकवलं—दररोज सायंकाळी एक तास ते माझ्याशी बॅडमिंटन खेळायला येऊ लागले. चौधरी मुरीद अहमद

सकाळी माझ्याबरोबर नियमितपणे फिरायला येऊ लागले. डॉ. शोभराज, श्री. गिरधारीलाल सप्रू आणि श्री. चड्ढा हे तर माझे घनिष्ट मित्र बनले. या तिघांनी मैत्री आणि प्रेम-भाव आजवर टिकवला आहे.

१९३९ साली सौराष्ट्रातील राजकोट संस्थानच्या राजाच्या दुर्व्यवहाराबद्दल महात्मा गांधींनी सत्याग्रह आंदोलन सुरु केलं—आमरण उपोषणाला त्यांनी प्रारंभ केला. आंदोलनानं भयंकर रूप धारण केलं. महात्माजींचं जीवन धोक्यात आलं. कॅप्टन होडर चिंतामग्न चेहऱ्यानं मजजवळ आले आणि म्हणाले, पृथ्वीसिंह तुमच्या सुटकेची यापुढं अजिबात शक्यता नाही. महात्मा गांधी उपोषणाचा ताण अधिक काळ सहन करू शकतील, असं वाटत नाही. त्यांचं दुर्दैवानं यातच निधन झालं तर तुमच्या सुटकेसाठी कुणीच हालचाल करणार नाही. त्या उपोषणाच्या काळात माझा गांधीजींशी जो पत्रव्यवहार झाला तो उल्लेखनीय आहे. त्यावर मी जे भाष्य केलं होतं ते बापूंना फारच आवडलं होतं. ते पत्रच मी इथे उद्धृत करतो.

२१ मे १९३९ रोजी महात्मा गांधींनी मला लिहिलेलं पत्र—

(हिंदी पत्राचा मराठी अनुवाद) राजकोट:
२१ मे १९३९.

माझे प्रिय मित्र—

तुमचं पत्र वाचून खूप चांगलं वाटलं. या अगोदरचंही तुमचं पत्र पोचलं होतं. तुमचं पुस्तक प्रकाशित व्हावं यासाठी मी शांतीलाल यांच्याशी पत्रव्यवहार करत आहे. मला वाटतं या संदर्भात घाई करण्याचं काही कारण नाही.

मला वाटतं तुमचं जेलचं एक वर्ष पूर्ण झालं आहे. मला याचा आनंद वाटतो की, तुम्ही आंतरिक अनुभव प्राप्त करून घेतला आहे. अलीकडल्या माझ्या लेखांतून मी अहिंसेच्या भावनेची वृद्धी होण्यासाठी सूतकताई अत्यंत उपयुक्त असल्याचं स्पष्ट केलं आहे. माझे लेख तुम्ही बघितलेच असतील. सूतकताई हे अहिंसेचं प्रतीक आहे—हीच कताई मला अभिप्रेत आहे. यांत्रिक दृष्टीनं देखील, एखादा माणूस तासन् तास सूतकताई करतो—आपल्या या कार्यात विलक्षण रस घेतो—असा माणूस सहजासहजी चिडत अथवा संतापत नाही. त्याचा चरखा उत्तम प्रकारे काम करू लागला तर कातत असताना असा माणूस विचारमग्नही होऊ शकतो. चरख्याचं संगीत त्याच्या विचारांना चालना देतं. ज्याचा आपल्या चरख्यावर ताबा नाही तो चांगला कातणारा नाही. माझी हीच मनोकामना आहे की अहिंसेच्या विकासाला सहायक होण्यासाठी तुम्ही कताई अधिक काळजीनं करावी. तुमचं दुसरं वर्ष आता सुरू होत आहे. तुमचे अनुभव आणि प्रयोग हे मला अत्यंत उपयुक्त ठरणार आहेत, कारण माझी अशी खात्री आहे की, तुम्ही तुमचं मन चांगल्या तऱ्हेनं ओळखू शकता. त्याचं खरं रूप तुम्ही

जाणू शकता. फार थोड्या लोकांना हे जमतं. लोक इतरांपेक्षा स्वतःकडूनच आपली आत्मवंचना करून घेतात. राजकोट येथील माझं भाषण तुम्हाला आवडलं हे वाचून आनंद झाला. दुसरं भाषणही आता तुमच्यासमोर आहे. हे भाषण तसं कठीण परिस्थितीतील होतं–परंतु आता सगळा भार माझ्या खांद्यावरून उतरला आहे.

महादेव आता चांगला आहे आणि माझ्यासोबतच आहे. जमनादास मुंबईला आहेत.

तुमचा,
बापू
(एम. के. गांधी)

## २७ मे १९३९ ला महात्माजींना लिहिलेलं माझं पत्र

### (मूळ हिन्दी पत्राचा मराठी अनुवाद)

"आपलं २१ मे चं पत्र पोचलं. माझ्या कसोटीच्या दुसऱ्या वर्षाला प्रारंभ होत असताना आपण दिलेल्या आशीर्वादाबद्दल मी आपला आभारी आहे. कताईसंबंधी आपण मांडलेल्या विचारांशी मी संपूर्णपणे सहमत आहे. सर्व लोकांनी आपला दृष्टिकोण आत्मसात करून या विषयाकडे बघितलं पाहिजे.

पुस्तक प्रकाशित करण्याची मलाही घाई नाही. आपल्या दुसऱ्या भाषणाच्या संदर्भात आपल्या उपोषणाची बातमी सगळीकडे पसरली. दुसऱ्या दिवशी सकाळी रेडीओवरून मला ती समजली. बातमी ऐकल्यानंतर मी सर्व बाबींवर सखोल विचार केला. माझ्या मनात निर्माण झालेल्या भावना मी खालील शब्दांत मांडत आहे :

विजयप्राप्तीसाठी दोन भिन्न प्रकारच्या शक्ती एकमेकांशी झुंजल्या. एका देशी संस्थानाचा राजा, ज्याचा आपल्या सत्ताबळावर पूर्ण विश्वास आहे, एका कुशल आणि निपुण मक्तीमार्फत तो आपली साधनं उपयोगात आणतो. न्यायान्यायाची पर्वा न करता, शस्त्र नवडण्याची व त्याचा उपयोग करण्याची, ज्याला पूर्ण मुभा आहे, अशी राजाची शक्ती एका बाजूला तर दुसऱ्या बाजूला शोषित आणि संतप्त असा पक्ष यांचा संघर्ष उभा राहिला. या पक्षाचं नेतृत्व करणारा नेता न्यायप्राप्तीसाठी न्यायसंगत मार्ग स्वीकारणं, हे आपलं कर्तव्य मानतो. या संघर्षामध्ये अशी एक अवस्था निर्माण झाली जेव्हा उभय पक्षांना आपल्या साधनांचा पुरेपूर उपयोग करण्याची आवश्यकता भासली. अंतिम हार-जीतसाठी दोन्ही पक्षांनी निर्णायक बळाचा वापर केला. सगळ्या जगाचं लक्ष- -राजकोटच्या संघर्षभूमीकडे लागलं. विजय कुणाचा होणार ? संस्थानिकाचा का जनतेच्या राजाचा ? प्रत्येकाच्या मनात हाच प्रश्न उभा राहात होता–उत्तर मात्र कुणालाच सुचत नव्हतं. आध्यात्मिक शक्ती हेच ज्याचं बलस्थान आहे, अशी व्यक्ती विजयप्राप्तीसाठी भौतिक व व्यावहारिक मार्ग अनुसरणार काय ? आपल्या प्रतिस्पर्ध्यावर मात करण्यासाठी, सर्वशक्तीमान परमेश्वरानं त्याला जी

देणगी दिली आहे, ती तो उपयोगात आणणार काय ? या झगडयाचा अंतिम निर्णय काय होईल–हे कुणीच सांगू शकत नव्हता. ज्या आध्यात्मिक नेत्यानं आपला महान प्रयोग सिद्ध करण्यासाठी सर्वस्व पणाला लावलं–त्यानं अखेरीस आपलं आध्यात्मिक शस्त्रच उपयोगात आणायचं ठरवलं.

सतत चालू रहाणाऱ्या संघर्षानं दोन्ही पक्षांना आपली पूर्ण ताकद उपयोगात आणायला भाग पाडलं. एकाला ऐतिहासिक परंपरेनुसार राजसत्तेचा पूर्ण वापर करावा लागला–दुसऱ्याला सर्वश्रेष्ठ हत्यार निवडण्यासाठी सगळं आध्यात्मिक शस्त्रभांडार शोधावं लागलं. शेवटी मोठया हुशारीनं ब्रम्हास्त्राचा प्रयोग करनं भाग पडलं. युद्धाचा शेवट चांगला झाला आणि तो सर्वांना बोधप्रदही ठरला. लोकांची अशी भावना झाली की त्यांनी धैर्य आणि क्रोध यांबाबत संयम राखण्याची कला आत्मसात केली आहे. लोकांनी दोन परस्पर विरुद्ध शक्तींचा संघर्ष आपल्या डोळयांनी बघितला होता. या संघर्षात आध्यात्मिक शक्तीची निर्विवाद श्रेष्ठता त्यांच्या प्रत्ययाला आली होती. त्यागामुळं जी महानता वाटयाला येते ती संपत्तीनं मिळविता येत नाही, हे सत्यही लोकांना उमगलं. राजकोटच्या धर्मक्षेत्रात लोकांना जो अनुभव आला – तो मनुष्य प्राण्यांच्या दृष्टीनं अत्यंत लाभदायक आहे."



१९३९ च्या सप्टेंबरच्या दुसऱ्या आठवड्यात महायुद्धाला प्रारंभ झाला. व्हॉइसरॉय आणि महात्मा गांधी यांच्या दरम्यान बोलणी झाली. ब्रिटिश सरकारला भारताचा युद्धाला पाठिंबा हवा होता. सर्व प्रकारच्या सहकार्याची अपेक्षा होती. बोलणी करण्यासाठी महात्माजींना दिल्लीला बोलावण्यात आलं. श्री. महादेवभाई देसायांनी सिकंदर हयातखान आणि व्हॉइसरॉय यांच्याकडे माझ्या सुटकेसाठी बरेच प्रयत्न केले. व्हॉइसरॉय यांनी महात्मा गांधींची भेट झाल्याबरोबर त्यांना सांगितलं की आम्ही पृथ्वीसिंहाच्या सुटकेसाठी आदेश दिले आहेत. ज्या व्हॉइसरॉयनं महात्मा गांधींना पत्र लिहून पृथ्वीसिंह इंग्रज सरकारच्या दृष्टीनं अत्यंत धोकादायक माणूस आहे, हे कळवलं होतं त्याच व्हॉइसरॉयनं माझी सुटका व्हावी अशी महात्माजींची हार्दिक इच्छा आहे, हे लक्षात घेऊन आदेश जारी केले होते. इंग्रज सरकारला माझ्याविषयी खात्री नव्हती—असंही व्हॉइसरॉयनं म्हटलं होतं. महात्माजींनी मला निरोप पाठवला की, तुम्हाला सोडून देण्यात येणार आहे, मात्र सरकारनं काही अटी घातल्या तर त्या स्वीकारा, मान्य करा.

ज्या खोलीत मला बंदिवान म्हणून ठेवलं होतं, त्या खोलीच्या दारावर पाटी लटकवलेली होती. त्या पाटीवर रोज माझी दृष्टी पडत होती. पाटी दर्शवीत होती की, तुझी सुटका १९६६ मध्ये होणार. आत्मसमर्पणाच्या वेळी माझ्या एकूण वृत्तीच बदलून गेल्या होत्या. सर्व गोष्टींकडे बघण्याचा दृष्टिकोण बदलला होता. तुरुंगवास व सुटका या दोन्ही शब्दांना माझ्या लेखी कुठलाच अर्थ राहिला नव्हता. तुरुंगाबाहेरच्या जगात एखाद्या उडाणटप्पूसारखं भटकण्याची मला इच्छाच राहिली नव्हती. मी आपल्याच तंद्रीत मग्न होतो. दुसऱ्या कुणाच्या पाशात—बंधनात अडकण्याची शक्यताच उरली नव्हती. इ. स. १९३८ मध्ये मला परत जेव्हा पकडण्यात आलं आणि तुरुंगात डांबून, याच अवस्थेत १९६६ पर्यंत राहवं लागेल, असं सांगण्यात आलं, अशा माझ्यासारख्या कैद्याला एकाएकीच तुमची सुटका करण्यात येत आहे असं सांगितल्यामुळे माझ्या मनावर विशेष असा कोणता परिणाम होणार?

सुटकेची बातमी ऐकून माझ्यावर काहीच परिणाम झाला नाही. मी कुणाच्या बंधनात असतो तर मात्र सुटकेचा निश्चितच आनंद वाटला असता. मी कुणाच्या बंधनांनी जखडला गेलो असतो तर मग बंधनांचे दोर कापणाऱ्यांचे मी आभार मानले असते. बंधनमुक्त झाल्याबद्दल आनंदानं नाचलो असतो. इथं तर मीच माझ्या हातांनी स्वतःला बंदिवान केलं

होतं. माझ्याच बंधनात मी जखडलो होतो आणि एखाद्या तपस्व्याचं जीवन मी जगत होतो. १९ मे १९३८ रोजी मी जेव्हा आत्मसमर्पण केलं तेव्हा बापूंनी मला सांगितलं होतं की ते माझ्या सुटकेसाठी सर्व प्रयत्न करतील. दोन महिनेपर्यंत मी सुटकेची आशा बाळगून होतो. बापूंनी महादेवभाई देसाई यांच्यामार्फत मला निरोप पाठवून हे सांगितलं की इंग्रज सरकार तुम्हाला घाबरतं, तुम्ही त्यांना धोकादायक वाटता—तेव्हा तुम्ही निमूटपणे परमेश्वराचं स्मरण करत बसा. भारत जेव्हा स्वतंत्र होईल, तेव्हाचं तुम्ही स्वतंत्र व्हाल. बापूजींच्या या संदेशानं मी निश्चिंत होऊन भारताच्या स्वातंत्र्याचं चित्र मनासमोर काढू लागलो. माझ्या मनाची मी पूर्ण तयारी केली.

२३ जानेवारी १९३९ रोजी सुटकेची बातमी मला समजली. ही बातमी ऐकून मनोमन मी दु:खी, कष्टीच झालो. देशातल्या जनतेच्या पारतंत्र्याच्या बेड्या कायम होत्या. देशातली जनता मुक्त झाली नव्हती.

अनेक योगायोगांच्यामुळे इंग्रज सरकारला माझी सुटका करणं भाग पडलं होतं. बापूंनी मला लिहून कळवलंहोतं की तुम्ही जेलची बंधनं ज्याप्रमाणं स्वीकारली होती आता जेलबाहेरची बंधनं स्वीकारा.

२३ जानेवारी १९३९ रोजी मला जिथं बंदी म्हणून ठेवलं होतं त्या ठिकाणी जेलचे सर्व अधिकारी आले. सर्वच जण आनंदी दिसत होते. माझी सुटका व्हावी म्हणून सर्वांनीच प्रयत्न केले होते. सुटकेसाठी जिथं जिथं शिफारशी करणं शक्य आहे तिथं त्यांनी शिफारशी पाठवल्या होत्या. माझ्या सुटकेसाठी ते लोक प्रार्थना करत होते. माझ्या मनाची दु:खपूर्ण अवस्था मला त्यांच्यापासून लपवता आली नाही. आम्ही परस्परांचे चांगले स्नेही बनलो होतो. सर्वांशीच जवळचे संबंध निर्माण झाले होते. कुणाच्या सहवासात आलो, निकट आलो की मी त्याचाच होऊन जाई. माझा हा स्वभावच बनला होता. या गोष्टीचा व्हायचा तोच परिणाम होई. तो दुसरा माणूसही माझा होऊन जाई. मी त्यांचा झालो होतो, ते सर्व माझे झाले होते. तुरुंगातून बाहेर पडताना या मंडळींच्या सहवासाला यापुढं आपण मुकणार, या गोष्टीच मला, जेव्हा एखादा कैदी कायद्याच्या कचाट्यात सापडून तुरुंगात आल्याबरोबर जसा दु:खी, कष्टी होतो, तसं दु:ख झालं. ज्यांच्याबरोबर मी रहातो ते माझे मित्र बनतात. जे लोक माझ्या सुखदु:खाचे वाटेकरी बनले होते त्यांना सोडून बाहेरच्या नव्या साथीदारांकडे जाणं भाग पडत होतं. तुरुंगाच्या दारातून बाहेर येऊन मी टांग्यात चढून बसलो. माझ्या-सोबत एक पोलीस इन्स्पेक्टर होता. मी रावळपिंडी स्टेशनवर जाऊन वेटिंगरूममध्ये बसलो. माझ्या सुटकेची कुणालाच माहिती नव्हती.

पंजाबमधील इंग्रज सरकारचे मंत्री सर सिकंदर हयातखान यांना माझी सुटका व्हावी असे वाटत नव्हते. पंजाब सरकारनं मी यापुढं पंजाबात राहू नये, एवढ्याच अटीवर आपली अनुमती दिली होती. दुसऱ्या दिवशी मी वर्ध्याला पोहचलो. मला वर्धा येथील तुरुंगाच्या

दारात पोचवण्यात आलं. तिथं दाखल करून नंतर सुटकेच्या आदेशाचं पालन करण्यात आलं. जेलचा एक अधिकारी मला टांग्यात बसून महात्मा गांधींच्या सेवाग्राम येथील आश्रमापर्यंत पोचवायला आला. बापूंना मी तिथं पोचल्याची बातमी अगोदरपासूनच माहीत होती. रात्रीचे आठ वाजले असावेत. मी बापूंच्या कुटीत प्रवेश केला. बापू आपल्या बैठकीवर बसून काहीतरी लेखन करत होते. मी खाली वाकून त्यांना नमस्कार केला. ते बोलले काही नाहीत मात्र पाठ तीन वेळा थोपटली. त्यांच्या चेहऱ्याकडे बघून व डोळ्यांकडे बघून, त्यांना किती आनंद झाला होता, स्पष्ट होत होतं. माझ्या सुटकेची आशा त्यांनी सोडूनच दिली होती. बापूंशी थोडं बोलणं झालं रात्र बरीच झाली होती झोपायची वेळ झाली होती. माझ्या ओळखीचं आश्रमात कुणीच नव्हतं. मी एकटा बाहेरच्या मोकळ्या मैदानात अंथरूण पसरून झोपलो. तुरुंगात कोणत्याही गोष्टीची फिकिर नसे. आता माझ्यासमोर कैद्याचा जीवनक्रम नव्हता. नंतरचा बंदिवास मी स्वेच्छेने स्वीकारला होता. परंतु आता तुरुंगाबाहेर जे जीवन माझ्या वाट्याला आलं होतं ते माझ्या मनासारखं नव्हतं. यापुढं मला महात्माजींच्या आश्रमात रहावं लागेल आणि पंजाबमध्ये मी जाऊ शकत नव्हतो या दोन्ही अटी जाचक होत्या. माझ्या मनाविरुद्ध त्या माझ्यावर लादण्यात आल्या होत्या. महात्मा गांधींच्या इच्छेनुसार जीवन जगत जगत देशसेवा करायची, हे बंधन मी स्वीकारलं होतं. म्हणूनच ही गोष्ट मला आता बंधनासारखी वाटेनाशी झाली.

त्या रात्री ज्या प्रकारचं जीवन माझ्या वाट्याला आलं, त्याची मी कधी कल्पनाही केलेली नव्हती. इंग्रज सरकार माझी सुटका करून मला आश्रमात बन्दिस्त करून टाकतील, हे माझ्या स्वप्नात देखील नव्हतं. जे इंग्रज सरकार सतरा वर्षं मला पकडू शकलं नाही, त्या सरकारकडे मी स्वतःहून जाऊन परत कैदी बनतो आणि आता ते मला १९६६ पर्यंत सोडणार नाहीत, तुरुंगातच सडत सडत मरणं, एवढंच माझ्या हाती होतं. त्याचा हुकूमच तसा होता! या गोष्टीचा मला एवढासाही खेद झाला नव्हता. मात्र आता ज्या प्रकारची बंधनं माझ्यावर लादून मला सोडण्यात आलं होतं, जरी मी मोकळ्या आभाळाखाली झोपलो होतो, तरी ही बंधनं मला काट्याप्रमाणे बोचत होती. इंग्रजी राजवटीविषयी प्रारंभापासूनच मला तिरस्कार होता. या बंधनामुळं त्यांच्या विषयीचा तिरस्कार अनेक पटींनी वाढला. माझ्या मनाला शांत करण्यासाठी मी एकच गोष्ट त्याला वारंवार बजावत होतो की जोपर्यंत इंग्रजी राजवट अस्तित्वात आहे तोपर्यंत तुरुंगाच्या आत आणि बाहेर विशेष असा फरक नाही!

शिमल्याहून परतल्यावर बापूजींशी शांतचित्तानं माझं बोलणं झालं. स्त्री-पुरुषांच्या परस्पर संबंधाबद्दल बापूजी नेहमीच जागरूक असत. आश्रम-जीवनाचे नीती-नियम त्यांनी मला विस्तारानं समजावून सांगितले. त्यांनी हेही स्पष्ट केलं की आश्रमातल्या स्त्रियांकडे माता, भगिनी आणि मुलगी या नात्यांखेरीज अन्य कुठल्याही दृष्टीनं बघायचं नाही. ते म्हणाले—तुम्ही देखील या आज्ञेचं पालन कराल, अशी मी आशा करतो. मी म्हणालो की बापूजी, माता, भगिनी, कन्या ही सारीच मोठी पवित्र नाती आहेत. मी या नात्यांची पवित्रता जपण्याचा पुरेपूर प्रयत्न करीन. माझ्या जीवनात काही बाबींचं मला विशेष आकर्षण आहे. माझ्या ठिकाणी प्रेमभावनेचा आवेग जास्त आहे तरीही या नात्यांची पवित्रता मी सांभाळीन. माझा निश्चय दृढ करण्याचा मी प्रयत्न केला. माझ्या ही गोष्ट लक्षात आली की बापूंनी आपल्या जीवनात ही पवित्रता सांभाळलेली आहे. मी देखील त्यांच्यासारखंच नियमबद्ध व्हावं, अशी त्यांची इच्छा होती. त्यांच्या प्रत्यक्ष जीवनाचा माझ्यावर प्रभाव पडत गेला. त्यांचं म्हणणं मला संपूर्णपणे पटलं. त्यांच्या पावलावर पाऊल ठेवून चालण्याचा मी दृढ संकल्प केला. बापूंनी जो नियम सांगितला होता तो खरोखरच चांगला होता. त्या नियमाचं पालन करण्यात महानता होती. परंतु प्रत्येक गोष्टीला शेवटी काही मर्यादा असतात. तिचं असं एक प्रमाण असतं. त्याचं उल्लंघन झालं की मग परिणाम भोगावेच लागतात. बापूजींच्या नियमांचं पालन करताना मला कोणकोणत्या संकटांना तोंड द्यावं लागलं, हे विस्तारानं सांगण्याची आवश्यकता आहे, असं मला वाटतं.

आश्रम-जीवनाचा एक विशेष असा होता की तिथला प्रत्येक माणूस एका वेगळ्याच तन्द्रीत वावरायचा. बापू आपल्याच तन्द्रीत मग्न होते. दुसऱ्या क्रमांकावर होते भन्साळी काका. त्यांना केवळ तन्द्रीत वावरणारे म्हणणे योग्य होणार नाही. तन्द्रीची ते साक्षात मूर्ती होते. मोकळ्या मैदानात भूमिशय्येवर झोपणे, कच्च्या भाज्या खाणे, दिवसभर हसऱ्या चेहऱ्यानं आश्रमातील पशू-पक्ष्यांपासून ते तिथं भेटायला येणाऱ्या लोकांपर्यंत सर्वांची सेवा करणे—ही त्यांची दिनचर्या होती. एकदा काकांना विंचवानं डंख मारला. त्यांनी काहीही औषधोपचार केला नाही. विंचू चावल्यानंतर खूप वेदना होतात परंतु आपल्या सहन-शक्तीच्या बळावर त्यांनी वेदना आपल्या चेहऱ्यावर प्रकट होऊ दिली नाही. एकदा त्यांना एका प्राण्यानं दंश केला. लोकांनी सल्ला दिला की तुम्ही लस टोचून घ्या. भन्साळी काकांनी कुणाचंच ऐकलं नाही. या गोष्टीला आता वीस वर्षं होऊन गेली आहेत. आजपर्यंत त्यांच्यावर त्या दंशाचा काहीही परिणाम दिसून आलेला नाही. काही वेळा ते फक्त गोड फळांचा आहार

घेत, तर केव्हा केव्हा दोनशेर मजूर खाऊन राहत. मी त्यांना कधीही आजारी पडलेलं बघितलं नाही. त्यांचं जीवन एखाद्या घड्याळासारखं नियमित होतं. भन्साळी काका बापूजींच्याकडे आश्रमात येण्यापूर्वी एका कॉलेजात नामांकित प्राध्यापक होते. बापूजींच्या जीवनाकडं आकृष्ट होऊन ते आश्रमात दाखल झाले आणि आश्रम-जीवनाशी एकरूप झाले.——

बापूजींचे कपडे, त्यांचा कमोड आणि त्यांची खोली या सर्वांच्या स्वच्छतेच्या कामाची त्यांच्या चाहत्यात स्पर्धा चाललेली असे. बापूंच्या सेवेचे कार्य करण्यात आश्रमवासियांना गौरव वाटत असे. संडासाची स्वच्छता आणि मैल्यापासून कंपोस्ट खत तयार करण्याचं काम खूपच गलिच्छ समजलं जाई. परंतु बापूजींचे अनुयायी हे काम देखील न कंटाळता व आवडीने करत. स्वतःचा संडास स्वतःच स्वच्छ करण्याची मला अगोदरपासूनच संवय होती परंतु दुसऱ्यांचा संडास साफ करून त्यापासून कंपोस्ट खत बनविणे, हा एक वेगळाच अनुभव होता. अशा कामासाठी फार मोठी हिंमत लागते. आपण व्यक्तीशः हे काम करून संतुष्ट होण्यात अर्थ नसतो. आपली काम करण्याची पद्धत इतरांना प्रेरणादायक ठरली पाहिजे. बापूंनी आपल्या हयातीत देशवासियांसाठी खूपच सेवेची कामं केली. त्यांनी शिकवलेल्या अनेक गोष्टींपैकी फारच थोड्या गोष्टी लोकांनी स्वीकारल्या. साधी राहणी ही तत्त्वतः आम्ही मान्य केली परंतु प्रत्यक्षात फार थोड्या लोकांनी ती अंमलात आणली. सत्य आणि अहिंसा ही महान मूल्ये म्हणून आम्ही मान्य केली परंतु गेल्या चाळीस वर्षांचा अनुभव बघितला तर ही मूल्ये क्वचितच कुणी आपल्या जीवनात प्रत्यक्षात आचरली.

प्रत्येक प्रगतिशील देश आपल्या भूमितून अधिक उत्पादन काढण्याचा प्रयत्न करतो. आपला देश तर खूपच दारिद्री आहे. सदैव जागरूक राहून आपण आपल्या शक्तीचा व वेळेचा सदुपयोग केला पाहीजे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतरही आपण या गोष्टींचा अवलंब केलेला नाही. भारतात कोट्यावधी लोकांच्या आणि पशू-पक्षांच्या मल-मूत्राचा योग्य असा उपयोग आपण करून घेत नाही-यामुळे दररोज आपला लक्षावधी रुपयाचा तोटा होतो. महागडी रासायनिक खतं खरेदी करून त्यांचा शेतीसाठी उपयोग करून उत्पादन वाढवणं, सामान्य शेतकऱ्यांच्या ताकदीबाहेर आहे. ह्याच कारणानं आमच्या जमिनींची उत्पादनक्षमता दिवसेंदिवस कमी होत चालली आहे. जमिनींचा कस कमी होण्यानं देशवासियांवर घातक परिणाम होत आहे.

बापूंनी आश्रमवासियांमार्फत कंपोस्ट खत बनवण्याचं शिक्षण देण्याचा प्रयत्न केला होता. या गोष्टीचं यथोचित महत्त्व लोकांनी लक्षात घेतलं नाही, हे देशाचं दुर्भाग्यच म्हटलं पाहिजे. संडास सफाईचं महत्त्व केवळ स्वच्छतेच्या दृष्टिकोणातून नाही—मी त्याकडं स्वच्छता आणि आर्थिक फायद्याची बाब म्हणून बघत होतो. संधी मिळेल तिथं लोकांनाही या गोष्टीचं महत्त्व पटविण्याचा प्रयत्न करतो. या गोष्टीचं महत्त्व लक्षात घेऊनच मी स्वतःही कामं करत राहातो. पुष्कळसे आश्रमवासी मात्र ही कामं गांधीजींचा आशीर्वाद मिळेल या अपेक्षेनं करत होती.

पाच वाजेपर्यंत आपापली कामं करून सर्वजण भोजनासाठी एकत्र जमत. सर्वांच भोजन एकाच ठिकाणी तयार करण्यात येई आणि एकत्र बसूनच सर्वजण जेवीत. आमटी भाजीमध्ये कसलेही मसाले वापरले जात नसत. मीठ सुद्धा घालत नसत. ज्याला हवं त्याला वेगळं मीठ वाढण्यात येई. सामान्य परिस्थितीतील लोक सुद्धा आपल्या घरी भाज्यांना फोडणी देऊन तिखट-मीठ त्यात घालतात. आश्रमातलं जेवण पौष्टिक होतं परंतु ते खमंग व चवदार नसे. असं भोजन करण्यात, मला विशेष असा त्रास जाणवला नाही, कारण इंग्रज सरकारच्या जेलमधल्या भोजनाची आणि काळ्यापाण्यावरील भोजनाची मी चव घेतलेली होती. तसलं भोजन करूनच मी जीवन कंठलं होतं. भोजन रुचकर असावं, हेच मी विसरून गेलो होतो. अनेक वर्षांच्या सवयीमुळं आज देखील जेवताना, ते पौष्टिक आहे की नाही, एवढंच मी बघतो, पदार्थांच्या चवीकडे माझं लक्ष क्वचितच जातं.

भोजन आटोपल्यानंतर सर्व आश्रमवासी आपापली कामं करायला निघून जात. कातण्या-विणण्याचं कामच जास्त चाले. दोन्ही वेळच्या भोजनात कच्चा-भाजीपाला खाण्यावर विशेष भर दिला जाई. सायंकाळचं भोजन आटोपल्यावर आश्रमवासी परत काम करत. पुष्कळसे लोक फिरायला देखील जात. त्यानंतर सायंकाळची प्रार्थना होत असे. या प्रार्थनेला सर्वजण एकत्र येत. तुलसी रामायणामधील चौपायांचे (श्लोकांचं) रात्री नऊ वाजता पठण होई. सर्वजण आपापल्या ठरलेल्या ठिकाणी आराम करायला जात. आश्रम वासियांच्यावर कसल्याही प्रकारचे निर्बंध नव्हते. तरीही त्यांचं जीवन शिस्तबद्ध होतं.

वृद्धावस्था असूनही बापूंनी आपली प्रकृती उत्तम तऱ्हेनं सांभाळली होती. त्यांनी नियमांचं आणि संयमाचं कशा तऱ्हेनं पालन केलं होतं, यासंबंधीही थोडं लिहिणं उचित होईल. विशेष स्वरूपाचं कुठलं काम नसलं तर बापू नऊ ते दहाच्या दरम्यान झोपी जात. झोपण्यापूर्वी त्यांचा एखादा शिष्य डोक्याची आणि शरीराची तूप लावून मालिश करून देई. सकाळी चार वाजता ते न चुकता जागे होत. प्रार्थनेनंतर आवश्यकता वाटली तरच ते थोडावेळ विश्रांती घेत. गूळमिश्रित सरबत, ऊसाचा रस किंवा फळांचा रस सकाळच्या वेळी ते प्राशन करीत. रस घेतल्यानंतर पंचेचाळीस मिनिटं ते फिरायला जात. फिरून आल्यानंतर एक तास ते सर्वांगाला मालिश करून घेत. मालिशनंतर ते गरम पाण्याच्या टबात पडून राहात. कपड्यानं अंग चांगलं घासून तेलकटपणा नाहीसा करण्यात येई. बापू साबूचा वापर करण्याच्या विरुद्ध होते. त्यांनी अंग स्वच्छ करण्यासाठी साबण कधीच वापरला नाही. त्यांच्या दररोजच्या भोजनात फळांचा समावेश असे. सुका मेवा आणि गोड फळं यांचंही ते सेवन करत. खजूर, अंजीर, किसमिस आणि मोसमी फळं त्यांच्या आवडीची होती. बकरीच्या दुधाखेरीज अन्य कुठलं दूध त्यांना चालत नव्हतं. ते बकरीच्या दुधापासून बनवलेल्या तुपाचाच वापर करत.

इ. स. १९३१ ते १९४२ या कालखंडात जी माणसं बापूंच्या निकट आली, ती माणसं आपापल्या परीनं बापूंची सेवा करत असत. श्री. महादेव भाई देसाई हे तर बापूंच्या सावलीप्रमाणं सदैव त्यांच्या जवळच राहायचे. इंग्रजी, हिंदी आणि गुजराथी या भाषांवर त्यांचं प्रभुत्व होतं. ते फार मोठे प्रतिभावान होते. बापूंच्या विचारांना ते फार चांगल्या तऱ्हेने शब्दबद्ध करत. आपल्या कार्यकुशलतेमुळं आणि गांधीजींवरील त्यांच्या श्रद्धेमुळं त्यांना बापूंचे आशीर्वाद होते. बापूंचा त्यांच्यावर खूप विश्वास होता. केवळ बापूजींचाच नव्हे तर सरदार वल्लभभाई पटेलांचाही त्यांच्यावर अतोनात विश्वास होता. इंग्रजांच्या तावडीतून माझी सुटका व्हावी म्हणून त्यांनी सरकारशी बराच पत्र-व्यवहार केला.

भाई श्री. प्यारेलाल हे मोठे रसिक, साहित्यिक, विचारवंत आणि समर्थ लेखक होते. त्यांचा स्वभाव शांत होता-संतासारखं त्यांचं व्यक्तिमत्व होतं. त्यांना मी कधी इतरांच्या कामात ढवळाढवळ केल्याचं किंवा कुणाशी त्यांचं बिनसल्याचं बघीतलं नाही. ते फक्त लेखणीचे धनी होते. ते कुणाची प्रशंसा करताना किंवा कुणाला काही लिहून देतानाही मी त्यांना बघितलं नाही. एकवेळ ते कुणाच्यातरी प्रेमात पडले व या घटनेनंतर त्यांचं जीवन निराशेनं भरलं. या प्रकारानंतर त्यांच्या चेहऱ्यावर कधी स्मितरेषा उमटली नाही. अनेक वर्षेपर्यंत त्यांनी कुणाशी प्रेम-संबंध जोडला नाही. त्यांच्या जीवनाकडे बघताना मला त्यांच्या विद्वत्तेचाही प्रत्यय येई.

सर्व देशभक्त आणि विचारवंत राजकुमारी अमृतकौर यांच्या नावाशी परिचित आहेत. त्यांनीही बापूंचा अनुग्रह आणि विश्वास संपादन केला होता. बापूंच्या चोवीस तासांच्या जीवनात अधिक काळ त्या त्यांच्या निकट असत. त्यांचं कुणावर प्रेम आहे किंवा त्या एखाद्याचा तिरस्कार करतात, असं मी कधीच बघितलं नाही. त्या नेहमी बापूंच्या सेवेत गढून गेलेल्या असत. मात्र आश्रम-जीवनात त्या आनंदी आहेत, असं कधी त्यांच्या चेहऱ्याकडे बघून वाटलं नाही !

बापूंचा बाहेरच्या जगाशी जो संपर्क होता, तो बहुधा या तीन व्यक्तींच्या मार्फतच व्हायचा. हे तिघेही जण आत्मसमर्पणाच्या भावनेतून त्यांच्या सेवेत गढून गेले होते. हे तिघेजण म्हणजे प्यारेलाल यांची धाकटी बहीण सुशीला नायर, अम्तुल अस्लाम व मीरा बेन. तरुण वयातच वैद्यकीय अभ्यास पूर्ण करून सुशीला बापूंकडे आली होती. मोठ्या सरळ मनानं आणि कुशलतेनं गरीबांची सेवा करताना मी यांना बघितलं आहे. त्यांची व्यक्तिगत सेवा बापूंना चांगली आवडायची. डॉक्टर असल्यामुळे सेवा करण्यात त्या चांगल्या निष्णात होत्या. बापूंची सेवा करायला मिळाल्यामुळे त्यांनाही खूपच चांगलं वाटायचं.

भगिनी अम्तुल अस्लाम म्हणजे मूर्तीमंत सेवाच होती. त्यांच्या जीवनाचा विचार करताना असं वाटायचं की त्यांचा जन्मच मुळी बापूंची सेवा करण्यासाठी झाला आहे. बापूंच्या जवळ राहून सेवा करताना ती कधी दिसायची नाही. संडासची सफाई, कपडे धुणं, कमोड स्वच्छ करणं, बापूंच्यासाठी उचित भोजन तयार करणं, ठरल्यावेळी त्यांना जेवण देणं आणि बापूंची

सगळी कामं नियमानुसार होत आहेत अथवा नाही, यावर लक्ष ठेवणं ही तिची जबाबदारी होती. या कामांत कुणी ढवळाढवळ केलेली तिला खपत नसे. भगिनी अन्तुल अस्लाम यांना बापूंची शिष्या म्हटलं तर त्यात काहीही वावगं नाही. बापूंच्या हयातीपर्यंत त्या त्यांची सेवा करत राहिल्या आणि त्यांच्या पश्चातही त्यांचंच नाव जपत त्या सेवाभावी कार्यकर्त्या म्हणून काम करत राहिल्या. 'कस्तुरबा सेवा मंदिर' आणि 'कस्तुरबा रूरल इन्स्टिटयूट' या दोन संस्था त्यांच्याच परिश्रमातून उभ्या राहिल्या आहेत आणि कस्तुरबा मातेचं या संस्था म्हणजे स्मारकच आहेत. अन्तुल अस्लाम या भगिनीनं बापू आणि कस्तुरबा या दोघांचेही आशीर्वाद मिळवले होते. नंतरच्या काळात आपल्या सेवाभावी कार्यामुळं त्यांनी पंतप्रधान कै. जवाहरलाल नेहरूंचा आणि पहिले राष्ट्रपती कै. डॉ. राजेन्द्रप्रसाद यांचाही विश्वास संपादन केला होता.

## मीराबेन

बापूंचे अनुयायी आणि जगभरचे विचारवंत सर्वांनाच मीराबेनचं नाव परिचित आहे. बुद्धिमान, भक्ती, सदाचार, सेवा आणि प्रेम या सर्वांची ती साक्षात मूर्ती आहे. या सद्गुणांमुळेच बापूंनी त्यांना 'मीरा' म्हणून संबोधिलं होतं. बापूंच्या अंत:करणातले भाव समजून ते आपल्या जीवनात आत्मसात करून त्याप्रमाणे जीवन जगण्याचा प्रयत्न केला तो मीराबेननंच. त्यांचं पूर्वाश्रमीचं नाव 'मिस् स्लेड' असं होतं. संत मीरा ज्याप्रमाणं कृष्ण-भक्तीत तल्लीन होऊन गेली होती त्याप्रमाणेच ही इंग्रज स्त्री बापूंच्या सेवेत तल्लीन होऊन गेलेली मी बघितली. तिच्या चेहऱ्यावर मला कधी हसू उमटलेलं दिसलं नाही. सदा गंभीर चेहऱ्यानं वावरणाऱ्या या लोकांकडे बघून माझ्या मनांत विचार येई की, हे लोक बापूजींचा जीवन-मंत्र का बरं आत्मसात करत नाहीत ? बापूंची सेवा तर सर्वजणच करत होते परंतु मीराबेनच्या कामात प्रेम आणि सुसंस्कार दृष्टोत्पत्तीस येत होते. तरीही मला जे दृश्य दिसत होतं, त्यानं माझं समाधान होत नव्हतं. एक इंग्रज बाई एवढी कठोर तपस्या कशासाठी करत आहे, असा विचार मला पडे. ही बाई इंग्रज असल्यामुळं तिचा प्रामाणिकपणा, तिचा भक्तिभाव, तिची सत्यपूर्ण वागणूक, हे सर्व मला ढोंग वाटायचं. यावर विश्वास ठेवायला माझं मन तयार नव्हतं. ज्या रीतीनं भारतात इंग्रजांनी कपट-नीतीचा अवलंब केला, लोकांना फसविण्यासाठी जाळं पसरलं, लोकांवर अत्याचार केले, अनेकांचा त्यांनी विश्वासघात केला, या सर्व गोष्टी माझ्या मनात ताज्या असताना, एक इंग्रज महिला सचोटीची वागणूक करिते यावर माझा विश्वास बसणं कठीण होतं !

बापू आणि मीरा दोघांनाही सोडून दूर निघून गेल्यानंतर मीराबेनच्या प्रत्येक बारीक-सारीक गोष्टींकडे माझं लक्ष होतं. बापूंच्या निधनानंतर मीराबेननं भारतवासियांच्या सेवेचं काम तितक्याच निष्ठेनं चालवलं. निर्लेप मनानं त्यांनी आपली जीवन-कहाणी "आत्म्याची तीर्थयात्रा" (Spirit's Pilgrimage) या आपल्या आत्मचरित्रात मांडलेली आहे. त्यांचं आत्मचरित्र वाचल्यानंतर मिस स्लेड यांना 'मीरे' चं पद प्राप्त झालं होतं, त्या पदाच्या

त्या अधिकारी होत्या, ही गोष्ट लक्षात येते. इंग्रज या जमातीवरूनच माझा विश्वास उडालेला होता. माझी तर अशी धारणा बनली होती की जिवंत मनाचा माणूस या जमातीत जन्माला सुद्धा येऊ शकत नाही. ज्या जातीच्या सरकारनं, देशावर प्रेम करणं हा अपराध ठरवून, एका तरुणाला मृत्युदंडाची शिक्षा केली होती, ज्या सरकारनं शेकडो भारतीय तरुणांना अत्याचारांच्या धगधगत्या कुंडात लोटून भस्मसात केलं होतं, अशा जातीत माणुसकी असलेली, माणसाचं हृदय असलेली व्यक्ती जन्म घेऊ शकते, या गोष्टीवर माझा विश्वास नव्हता. ही गोष्ट मी स्वीकारूच शकत नव्हतो ! मीरेच्या निर्लेप जीवनानं माझा दृष्टिकोण बदलून टाकला आहे.

ज्या जातीचे लोक जबरदस्तीनं दुसऱ्या देशावर कब्जा करतात, तिथं आपलं शासन कायम करतात, त्यांच्या या कृत्याला त्यांच्या समग्र जातीचा पाठिंबा असतो. परंतु सरकार बनवलेल्या लोकांचा एक नवाच गट तयार होतो व हे लोक आपल्या जातीच्या नावावर मनमानी करून सरकार चालवतात. मीरा देशातील सरकारच्या कुठल्याही गटात नव्हती. तिच्यात केवळ मानवता वसत होती आणि माणूस या नात्यानं मानवतेची सेवा करणं, एवढंच ती जाणत होती.

बापूंच्या निधनानंतर मीरानं भारताशी एकरूप होण्याचा खूप प्रयत्न केला. बापूंच्या नावाचे फलक उभारून पैसे कमावण्यासाठी दुकानं उघडणाऱ्या लोकांबरोबर मीराबेनचा मेळ जुळण्यासारखा नव्हता. तिनं अनेक ठिकाणं बदलली, अनेक क्षेत्रं सोडली, सुखांचा त्याग केला, परंतु त्यांचं कुठंच जमू शकलं नाही. कुणाच्याही मनात बापूंचं चित्र त्यांना आढळलं नाही. त्यांचं बापूंवर आणि बापूंच्या तत्त्वज्ञानावर प्रेम होतं. ज्यांच्या जीवनात बापूंच्या जीवनाची साधी खूणही शिल्लक नव्हती, अशा भारतीयांवर मीराबेन प्रेम करू शकत नव्हती. अत्यंत दुःखपूर्ण व निराश मनानं मीराबेननं भारत सोडण्याचं ठरवलं--त्या भारत सोडून आपल्या देशात परत गेल्या. भारतासंबंधी किंवा भारतवासियांसंबंधी त्यांना घृणा निर्माण झाली म्हणून त्यांनी भारत सोडला असं नसून बापूंच्या विचारांचे अंकुर अन्य एखाद्या भूमित रुजवता येतात काय हे बघण्यासाठी त्या इथून गेल्या.

बापूंचं जीवन, त्यांच्या अनुयायांनी, त्यांच्या पक्षातील लोकांनी, टीकाकारांनी व विरोधकांनी--आपापल्या तऱ्हेने रंगवून जगासमोर मांडलं आहे. मीराबेननं "आत्म्याची तीर्थयात्रा" (Spirit's Pilgrimage) हे पुस्तक लिहून भारत देशाची महान सेवाच केली आहे. या पुस्तकात, त्यांच्या डोळ्यापुढं बापूंचं जे चित्र तरळत होतं--ते चित्र त्यांनी काढलं आहे. तसं तर अनेकांनी बापू विषयी खप लिहून ठेवलं आहे. ते चांगलंही आहे. परंतु मीराबेननं ज्या वास्तव पद्धतीनं बापूंचा जीवन-वृत्तान्त निवेदन केला आहे--तेवढ्या सुंदर रीतीनं दुसऱ्या कुणाला क्वचितच लिहिता आलं आहे.

माझ्या व्यक्तीमत्वातला हिंसक प्राणी समाप्त व्हावा आणि मी अहिंसेचा पूर्णपणे स्वीकार करावा अशी बापूंची हार्दिक इच्छा होती. एके दिवशी बापू मला म्हणाले—तुम्ही तुमच्या मालिश करण्याच्या कलेनं अनेकांना व्याधिमुक्त केलं आहे, ह्या कलेत तुम्ही निपुण आहात. पुढे बापू म्हणाले—गाय हा आपल्या सर्वांच्याच जीवनातला एक पवित्र प्राणी आहे—तिची आपण सेवा केली पाहिजे. तुम्ही जर गायींची मालिश करू शकलात तर मला फार आनंद वाटेल. हे काम करण्यात तुम्हाला संकोच वाटत नसेल तरच करा. मी हसत त्यांना उत्तर दिलं की आश्रमात वास्तव्य करणारे सर्व बंधू-भगिनी आणि गायी, या सर्वांकडे मी एकाच दृष्टीने बघतो. माझी बोच बापूंच्या लक्षात आली. ते हसून म्हणाले—बरं बरं ! सर्वजण सारखेच आहेत. त्यांच्या इच्छेनुसार काही दिवस मी गायींची मालिश केली. ही खरोखरच घडलेली गोष्ट आहे. गायींची मालिश करण्या-अगोदर बापूंनी आजारी भगिनींची मालिश करण्याचं काम मला सांगितलं होतं. बापू ज्यावेळी मला अशा प्रकारच्या आज्ञा करत तेव्हा मी ते आपल्याला तावून सुलाखून घेत आहेत, कसोटी बघत आहेत, हे मला समजे. अशा प्रकारची सेवा म्हणजे एक कसोटी आहे असं समजून मी प्रसन्न मनानं स्वीकार करी. मी हे मोठ्या अभिमानानं सांगू इच्छितो की अशा प्रकारच्या कसोट्यांना उतरून मी बापूंकडून आणि अन्य सन्माननीय व्यक्तींकडून प्रमाणपत्रं मिळविली आहेत.

बापूजींनी आहाराच्या संदर्भात आपल्या जीवनात आणि इतरांच्याही बाबत अनेक प्रयोग केले आहेत. त्यांच्या जीवनाच्या अखेरीच्या काळात त्यांनी आहारासंबंधी जे लेखन केलं आहे ते अतिशय बोधप्रद आहे. त्यांच्या जीवनात एक वेळ अशी आली होती जेव्हा त्यांनी ब्रह्मचर्य-पालनात दुधाचं सेवन करणं घातक असल्याचं म्हटलं होतं. परंतु वर्ध्याच्या आश्रमात राहू लागल्यानंतर त्यांचा हा विचार बदलला होता. आश्रमवासियांच्या भोजनात दुधाचा समावेश असे. सकाळ-संध्याकाळ प्रत्येकाला २० तोळे दूध देण्यात येई. मला तर बापूंनी दुधाबाबत कुठलीच आडकाठी ठेवली नव्हती. मी हवं तेवढं घेऊ शकत असे. गोशाळेत वरचेवर घेऊन जा व हवं तेवढं दूध पी—असं त्यांनी मला सांगून ठेवलं होतं. माझा व्यायाम झाल्यानंतर मी लोटी घेऊनच गोशाळेकडे जात असे. गोशाळेचे अधिकारी श्री. बलवन्तसिंहजी मला मोठ्या प्रेमानं दूध पाजायचे.

बापूंच्या जीवनासंबंधी कुतूहल वाटल्यामुळे एक बंगाली डॉक्टर आपला व्यवसाय सोडून आश्रमात येऊन राहिले होते. त्यांना निसर्गोपचाराची आवड होती. हिरव्या, कच्च्या भाज्या खाल्ल्या पाहिजेत, यावर त्यांचा भर होता. अशा प्रकारच्या भाज्या खायला त्यांनी सर्व लोकांना पटवलं. मी थोड्या प्रमाणात कच्च्या भाज्या खात होतो, परंतु जेवढ्या प्रमाणात त्या खाव्या म्हणून डॉक्टर आग्रह करीत—त्याला मात्र माझा विरोध होता. ही गोष्ट माझ्या बुद्धीला पटत नव्हती. एके दिवशी जेवतेवेळी कच्च्या भाज्यांचं काय महत्त्व आहे, याविषयी चर्चा होऊ लागली. सर्वजण हे महत्त्व मान्य करत होते—त्याबद्दल

प्रशंसोद्‌गार काढत होते. बंगाली डॉक्टर म्हणाले—बापू आणि पृथ्वीसिंह हे दोघे वगळता बाकी सर्वांना माझे विचार पटल्यासारखे दिसतात. मी त्यांनाही माझा विचार पटविण्याचा प्रयत्न करतो आहे. बापू मला उद्देशून म्हणाले—सर्वांना याचा फायदा होतो तर तुम्ही का बरं या पासून वंचित रहाता ? मी म्हणालो—बापू, मी समतोल आहार घेतो. मी माझं आरोग्य आणि प्रकृती उत्तम तऱ्हेनं सांभाळली आहे. मी जर डॉक्टरांचं म्हणणं मान्य केलं तर माझी प्रकृती बिघडण्याची मला अधिक शक्यता वाटते. माझं हे परखड मत डॉक्टरांना जरा बोचल्यासारखं झालं. चर्चेला कलाटणी देण्याच्या उद्देशानं मी म्हणालो—बापू, यावर माझ्यापाशी एक उपाय आहे ? कोणता उपाय आहे ? बापूंनी विचारलं. मी म्हणालो की डॉक्टर ज्या प्रमाणात कच्च्या भाज्या खायला सांगतात—ते प्रमाण जरा अधिक आहे. आपलेच जे बंधु-भगिनी स्वयंपाकघरात कामे करितात, त्यांना खूप कामं करावी लागतात. तेव्हा माझी योजना अशी आहे की आम्हा सर्वांना शेतच वाटून देण्यात यावं—आम्ही वेळच्या वेळी तिथंच जाऊन भाजीपाला खाऊ तिथंच चरायला जाऊ. माझी ही योजना ऐकून सर्वांना हसू आलं. बापूही आमच्या हास्यात सामील झाले—हसतच मला म्हणाले की तुमच्या योजनेचा मी स्वीकार करतो. सगळ्यांनाच ती मान्य होण्यासारखी असेल तर सगळा त्रासच संपुष्टात येईल

बापूंच्या प्रकृतीसाठी डॉक्टर अन्सारी यांनी लसणाची चटणी त्यांना खायला सांगितली होती. जवळ जवळ दोन तोळे लसणाची चटणी बापू दररोज आहारात घेत होते. हेच त्यांच्या उत्तम प्रकृतीचं रहस्य होतं.

प्रकृती उत्तम राहावी म्हणून बापू कडूनिंबाच्या पाल्याची चटणीही खात होते. आश्रमात मोठे-मोठे नेते बापूंना भेटण्यासाठी व त्यांच्याशी विचारविनिमय करण्यासाठी येत असत. भोजनाच्यावेळी त्यांच्या ताटात असणारा एक पदार्थ आपल्या ताटात वाढलेला नाही हे बघून जेव्हा ते विचारत की बापू, तुम्ही तो कोणता पदार्थ खात आहात ? बापू, नमुन्यादाखल थोडी चटणी त्यांच्या ताटात वाढायचे—तिची चव त्यांनी घेतल्यानंतर त्यांना विचारायचे—कशी लागते ही चटणी ? कुणाच्या तोंडून, तिची चव कडू आहे किंवा वाईट आहे, असं मी ऐकलं नाही. सर्वजण म्हणायचे—वा ! फारच छान आहे ! जो पदार्थ बापू आवडीनं खात होते—त्याला वाईट अथवा कडू कोण म्हणणार ? त्यांचं उत्तर ऐकून मला हसू येई. लोक लबाड का बोलतात—हे मला समजायचं नाही. जरा विचार केल्यानंतर माझ्या लक्षात आलं की लोक एखाद्या महापुरुषाला दुखवू इच्छित नाहीत. महापुरुषच जर एखाद्या गोष्टीला चांगली म्हणतो, तेव्हा आपणही ती गोष्ट चांगली आहे, असं म्हणण्यात काय अडचण आहे ?

बापूंनी आपलं समग्र जीवनच जनतेच्या सेवेसाठी वाहिलेलं होतं, ही गोष्ट जगजाहीर आहे. मोठे-मोठे नेते आणि श्रद्धाळू स्त्री-पुरुष बापूंची सेवा करायला उत्सुक असत आणि बापूही सेवेची कुणाला गरज आहे, याचा शोध घेत व ज्याला कुणाला सेवेची आवश्यकता

आहे, त्याची सेवा करायला ते लोकांना सांगत. दररोज सकाळी फिरून परत येतेवेळी आश्रमात कुणी आजारी वगैरे असला म्हणजे बापू स्वतः त्याच्याकडे जाऊन सेवा-शुश्रूषा करत. संस्कृतच्या एका महान पंडिताला बापूंनी आश्रमात ठेवून घेतलं होतं, ते कुष्ठरोगी होते. ते महाराष्ट्रीय होते—त्यांचं नाव परचुरे शास्त्री असं होतं. बापू त्यांची सेवा करत, त्यांच्या जखमा आपल्या हातांनी स्वच्छ करून बापू त्यांना मलमपट्टी करीत.

मी आश्रमात राहायला गेल्यानंतर जुने मित्र मला भेटायला येऊ लागले. त्यांची असंख्य पत्रंही येऊ लागली. पहिल्या दोन आठवड्यात माझी डाक बापूंच्या बरोबरीनं होती. बापू याबद्दल माझी थट्टाही करायचे.

इ. स. १९३१ मध्ये साम्यवादी नेत्यांशी विचारविनिमय करूनच मी आत्मसमर्पण केलं होतं. त्यासुमारास ही नेते मंडळी भूमिगत अवस्थेत होती. त्यांच्यापैकी कुणीच मला भेटायला येऊ शकला नव्हता. या नेत्याकडून मला निरोप येऊ लागले की तुम्ही काही न काही कारणानं बापूंपासून वेगळे होऊन साम्यवादी पक्षात या. पक्षाच्या लोकांचं हे वागणं मला खटकलं. मी त्यांना स्पष्टपणे कळवलं की मी माझ्या इच्छेने आत्मसमर्पण केलं आहे कारण शोधून इथून बाहेर पडण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. ज्यांचं माझ्यावर प्रेम आहे ज्यांचा मी विश्वास संपादन केला आहे-त्यांना मी कधीही फसवणार नाही. पार्टीच्या लोकांनी माझ्या प्रामाणिकपणाचा व निष्ठेचा आदर केला. काही तरी निमित्ताने, ठिकठिकाणी मला भेटायला ते यायचे. आमच्या भेटी गाठी चालू होत्या. ही परिस्थिती माझ्या लेखी नाजूक होती. एके दिवशी व्याकूळ मनानं मी बापूंना म्हणालो-तुमचा माझ्यावर पूर्ण विश्वास आहे-माझा तुमच्यावर विश्वास आहे-काही साम्यवादी नेत्यांशीही माझे असेच संबंध आहेत. परंतु या साम्यवादी नेत्यांचा आपल्यावर किंवा आपला त्यांच्यावर अजिबात विश्वास नाही. हे बघून मला मोठं दुःख होतं. तुम्हाला ज्या उत्कटतेनं आपल्या देशाचं हित व्हावं असं वाटतं-तसंच साम्यवादी नेत्यांनाही वाटतं. तुम्ही जर एकमेकांना जवळून समजून घ्यायचा प्रयत्न केलात तर देशाचं भवितव्य खूपच आशादायक बनू शकेल. तुमचा समेट घडविण्याचं काम मला करता आलं असतं, तर फार चांगलं झालं असतं.

अज्ञातवासाच्या काळात मी लपत-छपत काँग्रेसच्या सभांना जात असे. काँग्रेसच्या अधिवेशनांना सरकारी गुप्तचर मोठ्या संख्येने हजर असत. निडरपणे जाऊन मी मिसळत होतो. खरं म्हणजे यात धोका होता. १९२४ साली पहिल्यांदा मी बेळगाव येथे झालेल्या काँग्रेस अधिवेशनाला गेलो होतो. तिथं नाशिकचे व्यायाम-तपस्वी श्री. कृष्णाजी बलवन्त महाबळ हे माझे सहायक होते. ते सर्व गोष्टींची काळजी घेत असल्यामुळे मला काहीच चिंता नव्हती. त्यावेळी मी भाई परमानन्द आणि लाला लाजपतराय यांचीही भेट घेतली. लालाजींनी मला सर्व प्रकारची आर्थिक मदत करण्याचं आश्वासन दिलं होतं. गरज पडली तशी मी त्यांच्याकडून आर्थिक मदत घेतली होती.

१९३९ च्या अखेरीस वर्धा येथे अखिल भारतीय काँग्रेस कमेटीची बैठक झाली. यावेळी काँग्रेसचे अनेक नेते मी जवळून बघितले. त्यांचं खरं रूप मला दिसलं. त्यांचं एकमेकांशी हे गारं बोलणं मी ऐकलं. मला असा विचार पडला की बापूजी सत्य, अहिंसा आणि चरखा-खादी या गोष्टींवर एवढा भर देतात, देशातले लोक त्यांचं म्हणणं का खरं ऐकत नाहीत ? मी जेव्हा काँग्रेसच्या नेत्यांचं खरं रूप बघितलं तेव्हा मला या मागचं कारण समजलं. राजकीय दृष्टिकोनातून माझ्या हे स्पष्टपणे लक्षात आलं की मूठभर सज्जन मंडळी वगळल्यास कुणा-चाही चरखा-खादी, सत्य, अहिंसा यावर विश्वास नाही. भारतामधल्या भोळ्या, भाबड्या सामान्य माणसांना बापूंच्या जवळ येणं, त्यांचं जवळून दर्शन घेणं, कठीण होतं. जे नेते लोकांमध्ये राहत होते, त्यांनाच लोक बघू शकत होते. या नेत्यांचाच त्यांच्यावर प्रभाव पडत असे.

अखिल भारतीय काँग्रेस-कमेटीचा मंडप महिला-आश्रमाजवळ उभारण्यात आला होता. अनेक वेळा त्या बाजूला जावं लागल्यामुळे महिला-आश्रमाच्या व्यवस्थापकांशी माझी ओळख झाली. त्यांच्यापैकी एका महिलेचं नाव होतं श्रीमती बासन्ती राय. त्यांचे पती बंगालचे एक मोठे काँग्रेसचे नेते होते. त्यांचे पाच बंधू काँग्रेस पक्षाचे सभासद होते. त्यांच्या तेजस्वी जीवनाचा आणि देशप्रेमाचा माझ्यावर खूपच परिणाम झाला. आश्रमात सगळेच लोक भारावल्यासारखे वागत होते. प्रत्येक जण आपल्याच तंद्रीत मग्न असे. त्यांना निराळं असं सामाजिक जीवन राहिलेच नव्हतं. श्रीमती बासन्तीदेवींच्या ओळखीमुळं माझ्या अनेक श्रेष्ठ मंडळींच्या ओळखी झाल्या. सामाजिक जीवनाची माझी तहान थोडीशी या सर्वांमुळे भागली. १९१४ पासून आजतागायत मला कधी सामाजिक जीवन जगायला मिळालं नव्हतं. एवढ्या प्रदीर्घ काळात मी कधीच माझ्या खऱ्या रूपात खऱ्या नावानं समाजासमोर येऊ शकलो नव्हतो. बासन्तीदेवींच्या संपर्कात मला जमनालाल बजाज, श्रीमन्नारायण व त्यांच्या मित्रमंडळींशी परिचय झाला. महिला-आश्रम व तिथल्या कॉलेजातील अध्यापकांशीही माझी ओळख झाली. त्यांच्याशी माझ्या अनेक वेळा चर्चाही होऊ लागल्या.

शेकडो बंधू-भगिनींनी मला जेव्हा बघितलं तेव्हा त्यातले अनेकजण या ना त्या कारणाने माझ्या निकटही आले. मला जेव्हा सवड मिळे, तेव्हा तीन-तीन मैल पळत जाऊन मी महिला आश्रमातील बंधू-भगिनींना भेटत होतो. बेळगाव काँग्रेसच्या आठवणी बाजूस ठेवून मी परत आश्रमीय वातावरणाकडे वळतो.

## मीरा भगिनीचा प्रसंग

बापूंचा मला आदेश मिळाला होता की, मी चरखा कताई, कापूस धुनणे, पेळू बनविणे आणि कापड विणणे इ. कामांत नैपुण्य संपादन केलं पाहिजे. महादेवभाई देसायांकडून मला रावळ-पिंडी जेलमध्येच चरखा मिळाला होता आणि पायानं फिरविण्याच्या चरख्याचा मला चांगला

सराव होता. इतर गोष्टी मात्र शिकण्याची मला संधी मिळाली नव्हती. मी बापूंना म्हणालो की, या गोष्टी शिकवणारा मला कुणी मिळाला तर हे सर्व शिकण्याचा मी जरूर प्रयत्न करीन. हे शिकवण्याचं काम भगिनी मीराला सांगण्यात आलं. त्यांनी मन लावून सर्व गोष्टी शिकवायला सुरुवात केली. त्यांचं मोकळं वागणं मला जरा अवघड वाटू लागलं. मी त्यांच्याकडून धडे घेऊ लागलो. मात्र त्यांचं प्रेम आणि आकर्षण मला असह्य होऊ लागलं. मी त्यांच्यापासून दूर सरू लागलो. आपल्या प्रेमातच काही तरी उणीव आहे असा त्यांचा ग्रह होऊ लागला. मी त्यांच्या प्रेमाचा वर्षाव सहन करू शकलो नाही. मी मीराच्या प्रेमासंबंधी आतापर्यंत एक शब्दही लिहिला नाही. माझ्या मनात त्यांच्याविषयी फार मोठा आदर आहे. भावाच्या नात्यानं मी माझं सर्वस्व जीवन त्यांच्यावरून ओवाळून टाकलं असतं. परंतु त्यांच्या प्रेमात वासनेचा अंतर्भाव आहे हे बघून मला वाईट वाटे. त्यांची दुर्बलता यातून प्रकट होई. यामुळेच मी त्यांच्या या प्रेमासंबंधी कुठं काही लिहिलं नाही. त्यांच्या मनाचा हा दुबळेपणा मी जगापुढे मांडू इच्छित नव्हतो. परंतु त्यांच्या लेखणीतूनच उतरलेला, इंग्रजी साप्ताहिक 'इलस्ट्रेटेड विकली' मध्ये एका लेखमालेत प्रसिद्ध झालेला त्यांचा लेख माझ्या वाचनात आला. त्या लेखात त्यांनी आपल्या प्रेमाची हकिकत मोकळ्या मनानं लिहिली होती. त्यामुळे तर त्यांच्याविषयीचा आदर आणि सन्मान अनेक पटींनी वाढला. त्यांनी स्वतःला माझ्या प्रेमाची पुजारीण असं संबोधिलं होतं. मीही त्यांचा श्रद्धाळू भक्त बनलो. मीराबेननं मला जेवढी पत्रं लिहिली होती आणि त्यांच्या प्रेमासंबंधी बापूंनी मला जी पत्र लिहिली, ती सर्व मी जपून ठेवली आहेत.

प्रेमकथा लिहिणारे लोक काल्पनिक गोष्टी लिहितात. मीराबेनचं प्रेम या कल्पित कथांनाही मागे टाकणारं आहे. माझ्या प्राप्तीसाठी मीरानं जे कांही केलं, मला पत्र पाठवून आपलं हृदगत कळवलं. ज्या प्रकारचं तप त्यांनी केलं, खऱ्या प्रेमाची जिज्ञासा असणाऱ्या लोकांना या सर्व गोष्टी समजल्या तर ते देखील मीरापुढं नतमस्तक झाल्याशिवाय राहणार नाहीत.

प्रेमाची भावना एखाद्या सामान्य माणसालाही आकाशाएवढी उंची देते. त्याला देवतातुल्य बनवते. मीरानं मला असंच भावनावश बनवलं आणि ती आराधनेत तल्लीन होऊन गेली. मीराबेन मोठ्या विचित्र प्रकारची श्रद्धाळू स्त्री होती. त्यांचं जीवन प्रेमासारख्या भावनांनी ओतप्रोत होतं आणि मी होतो राजकारणाच्या डावातला एक खेळाडू. सतत जीवन-संघर्ष वाट्याला आल्यामुळे मी सर्वच बाबतीत सावध होतो. तीक्ष्ण बुद्धीने प्रत्येक प्रश्नाचा उलट सुलट विचार करत होतो. आपल्या जीवनातली प्रेमकहाणी मीरानं 'स्पिरिट्स पिलग्रीमेज' या पुस्तकात लिहिल्यामुळे तिनं स्वतःला आणि बापूंना अजरामर बनवण्याचा प्रयत्न केला. हे कार्य पूर्वीच्या काळी त्यांना जमण्यासारखा नसावं.

प्रेमकथा वाचायला सर्वांनाच आवडतात. मीराचं प्रेम किती शुद्ध होतं, प्रेमाच्या या बंधनात गुरफटल्यामुळे त्यांना आपला जीवन-मार्ग कसा बदलावा लागला आणि मी माझ्याच निर्धारावर हट्टानं कसा चिकटून राहिलो किंबहुना त्यामुळंच मला बापू आणि मीरापासून वेगळं व्हावं लागलं, ही सर्व कहाणी वेगळ्याच प्रकारची आहे. श्रद्धाळू वाचकांना ती कहाणी वाचण्यात आनंद वाटेल म्हणून जरा विस्तारानं मी लिहीत आहे.

इंग्लंडच्या एका लॉर्ड घराण्यात जन्माला आलेली ही स्त्री, आपलं सर्वस्व सोडून बापूंकडे येते—त्यांच्याकडून तिला मीरा ही पदवी मिळते. दुसरीकडे ज्या पुरुषाच्या व्यक्तिमत्वाकडे बघून बापूंनी असं लिहिलं होतं की,—स्वातंत्र्य संग्रामाच्या तीर्थ-यात्रेत असेच साथीदार सोबतीला असावेत—अशा दोन सामर्थ्यसंपन्न व्यक्तींच्या जीवनात प्रेमाची बन्धनं निर्माण झाल्यामुळं दोघांची जीवनं कशी वेगळ्या दिशेनं वाटचाल करू लागली, ही कहाणी लिहिण्यासाठी एखाद्या समर्थ लेखकाची किंवा कवीचीच लेखणी हवी. माझ्या ठिकाणी कवीचं हृदयही नाही आणि मनही नाही. मी कुणी साहित्यिक नाही, तरीही मी माझ्या भावना व्यक्त करण्याचा प्रयत्न करतो.

मी मीराचं प्रेम पेलू शकलो नाही. काय करावं, मला काहीच समजेना. सत्य-अहिंसेचा मी काही उपासक झालो नव्हतो तसं असतं तर सत्य मी बापूंपुढे प्रकट केलं असतं. मीरा माझ्या प्रेमात पडलीआहे, परंतु मी तिचं प्रेम स्वीकारू शकत नाही. हे बापूंना सांगायचं कसं? समजा मी सांगितलं असतं तर मीरानं आपल्या मनाची दुर्बलता स्वतःच्या तोंडानं मान्य केली असती ? तिनं ती मान्य केली तर मग माझं उत्तर काय असेल ? यासंबंधी काय निर्णय घ्यावा, ही माझ्यापुढे मोठीच समस्या होती. शेवटी भिऱ्या माणसाप्रमाणं मी तिथून पळून जायचं ठरवलं. परंतु आश्रमातून पळून जायला निमित्त काय शोधणार ? शेवटी निमित्त मला सापडलं. मी बापूंना म्हणालो—"बापू, मी माझ्या भावाला व अन्य नातेवाईकांना भेटण्यासाठी ब्रम्हदेशात जातो." बापूंनी उत्तर दिलं—वाटखर्च पाठवून त्या सर्वांना इथंच बोलावून घेऊ. तरीही जायचा हट्ट मी सोडला नाही. मी म्हणालो "त्या सर्व लोकांची तिथं नीट व्यवस्था आहे अथवा नाही, ते कशा रीतीनं राहतात—हे सर्व बघण्याची माझी इच्छा आहे." बापूंनी मला चिडवण्यांच्या उद्देशानं परत म्हटलं. "पृथ्वीसिंह ! मी तुम्हाला वाघ समजत होतो—तुम्ही तर अगदीच शेळपट निघालात" । यावर मी काय बोलणार ? एका स्त्रीची दुर्बलता आपण सांगायची नाही, हा माझा पक्का निर्धार होता. बापूंचं हे मत ऐकून आपल्याला वाईट वाटलं, हे तर सांगितलंच पाहिजे. मी जरा धुश्शातच म्हणालो—"बापू इंग्रजांनी मला तुरुंगातून सोडून तुमच्या आश्रमात कैदी बनवलं आहे. हे मला ठाऊक आहे. मी या कैदेत राहू इच्छित नाही-मला तुम्ही इंग्रजांच्या तुरुंगात परत पाठवा." माझ्या अशा कटू वचनांनी बापू रागावले नाहीत. मोठ्या प्रेमानं त्यांनी मला समजावलं, आश्रम हा तुमच्यासाठी जेल नाही-तुमच्या इच्छेप्रमाणे पाहिजे तिथं जायला तुम्ही मोकळे आहात.

एकूण माझा कार्यभाग पार पडला. बापूंनी सरकारला कळवलं की पृथ्वीसिंहाच्या ब्रम्हदेशात जायला तुमची हरकत असण्याचं कारण नाही.

ज्या दिवशी मी वर्ध्याहून निघणार होतो-त्याच दिवशी वर्ध्याला कॉंग्रेस कार्यकारिणीची बैठक होती. सबंध दिवस बैठकीचं कामकाज आटोपून सायंकाळी बापू वर्ध्याहून आश्रमात आले तेव्हा माझी निघायची वेळ झाली होती. मी बापूंचा निरोप घेण्यासाठी गेलो. मोठ्या प्रेमानं त्यांनी मला जवळ बसवून घेतलं, भगिनी अन्तुल अस्लामला त्यांनी विचारलं- "पृथ्वीसिंहाच्या सोबत देण्यासाठी जे करायला सांगितलं होतं-ते तयार केलं का ?" अन्तुल अस्लामनं खाण्याचा डबा समोर आणून ठेवला. बापूंनी ज्या प्रेमानं मला जवळ बसवलं, ज्या पद्धतीनं त्यांनी त्या भगिनीला विचारलं-हे सगळं चित्र माझ्या मनावर कायमचं कोरलं गेलं. बापूंची वत्सलता, माणसं जोडून ठेवण्याची त्यांची हातोटी, याबाबतीत त्यांची कुणीच बरोबरी करू शकणार नाही. बापूंचं व्यक्तिमत्व लोकोत्तर होतं.

## एकवेळ परत ब्रम्हदेशामध्ये

वर्ध्याहून निघून मी कलकत्त्याला पोचलो. दुसरे दिवशी मी जहाजात बसलो तेव्हा बंगाल सरकारला सूचना मिळाली की पृथ्वीसिंह ब्रम्हदेशात जात आहेत. जहाजावरून खाली उतरून माझी तपासणी करण्याची कल्पना बंगालच्या अधिकाऱ्यांना योग्य वाटली नाही. त्यांनी माझ्यावर लक्ष ठेवण्यासाठी गुप्तचरांची नियुक्ती केली. रंगूनला पोचताच पोलिसांनी माझं मोठं जंगी स्वागत केलं. त्यांनी माझ्या शरीराची झडती घेतली. माझं सर्व सामान ताब्यात घेतलं. रंगूनला माझे जे मित्र होते त्यांना माझ्या येण्याची बातमी समजली होती. माझी बहीण व मेहुणे माझ्या येण्याची वाटच बघत होते. नशीबानं, तिथले गुप्तचर विभागाचे एक बडे अधिकारी सौराष्ट्राचे निघाले. त्यांच्या मनात माझ्याविषयी आदरभाव होता. माझ्याजवळ येऊन ते म्हणाले की सरकारचं तुमच्या हालचालींवर बारीक लक्ष आहे. तुमचे कपडे, कागदपत्रं, पुस्तकं सर्वांची कसून तपासणी होईल सर्व गोष्टी माझ्या हवाली करा. तुमच्या सामानात आक्षेपार्ह असं तुम्ही काहीच आणलेलं नसणार, याची मला पूर्ण खात्री आहे. तुमचं सर्व सामान मी तुमच्या मुक्कामावर पोचवीन. आश्वासन दिल्याप्रमाणं त्या अधिकाऱ्यानं खरोखरच दोन तासांच्या आत माझं सर्व सामान व्यवस्थित रीतीनं घरी पाठवून दिलं. रंगूनला पोचल्यावर माझं दोन प्रकारे स्वागत झालं. एक सरकारी पोलिसांच्या वतीनं आणि दुसरं मला ओळखणाऱ्या भारतीय बांधवांकडून. पहिल्या अपमानजनक वागणुकीचा, प्रेमानं केलेल्या स्वागतामुळं विसर पडला. रात्रीच्या वेळी खूप मोठा जल्लोष झाला. तिथल्या गुजराथी बांधवांनी माझ्या सन्मानार्थ भोजन दिलं. बर्मा सरकारनं मला पंधरा दिवस तिथं राहण्याची परवानगी दिली. दुसऱ्या दिवशी भावांच्या भेटीसाठी मी गाडीनं निघालो. बर्माचे गुप्तचर तत्परतेने माझी देखरेख करत होते. मंडाले इथं पोचल्यानंतर भारतीय

आणि बर्मी बंधूंनी मोठ्या प्रेमानं माझं स्वागत केलं. मोनेवालाही भारतीय व बर्मी लोकांनी शानदार आदरातिथ्य केलं. माझ्या बंधूचा आणि वडिलांचा तिथं चांगलाच जम बसलेला होता. आपला देश स्वतंत्र करू इच्छिणारे बर्मी तरुण माझ्याकडे मोठ्या आदराने बघत होते. त्यांच्याविषयी माझ्याही मनात प्रेम होतं. मी तिथल्याच शाळेत काही काळ शिक्षण घेतलं होतं. मोनेवाला पोचायला मला सायंकाळ झाली होती. घरी पोचल्याबरोबर सर्व प्रथम मी वडिलांचा अग्निसंस्कार ज्या ठिकाणी झाला होता; त्या जागेवर गेलो. तिथं जाऊन उभा राहिल्याबरोबर माझ्या डोळ्यासमोर त्या इंग्रज सर-कारचं चित्र उभं राहिलं-ज्यानं शेकडो पिता-पुत्रांचा वियोग करून, त्यांची जीवनं उध्वस्त केली. १९१५ साली लाहोर जेलमध्ये मी वडिलांना भेटलो होतो. तीच आमची शेवटची भेट ठरली होती. त्यानंतर १९२१ पर्यंत मला त्यांची काहीच बातमी समजली नव्हती. आपल्याला सभ्य म्हणविणाऱ्या सरकारनं पत्राद्वारे देखील आमची भेट होऊ दिली नव्हती. जुलमी सरकारनं वडिलांच्या शेवटच्या दिवसातही मला त्यांची सेवा करण्याची संधी दिली नव्हती. हेच विचार माझ्या डोक्यात राहून राहून येत होते. त्या स्थळावर उभे राहून मी मनाशी हाच निश्चय केला की हे सरकार लौकरात लौकर संपविले पाहिजे. आणखी किती पिता-पुत्रांना ताटातुटीची झळ बसेल, हे सांगणे कठीण होते. या भावनेनं आणि निश्चयानं मी पूज्य पिताजींच्या बलिवेदीपुढं श्रद्धांजली अर्पण केली.

चळवळ्या स्वभावाच्या बर्मी युवकांना मी भेटलो. अत्याचार करणाऱ्या परकीय सर-कारच्या तावडीतून बर्माची कशी सुटका करता येईल, ही गोष्ट प्रत्यक्षात आणण्यासाठी भारतात महात्मा गांधी आणि कांग्रेसपक्षाचे नेते काय काय प्रयत्न करत आहेत, ह्याची मी त्यांना माहिती सांगितली. या विषयावर आमची बरीच चर्चा झाली. भावांच्या संसारात राहून त्यांचंही जीवन जवळून समजून घेण्याचा मी प्रयत्न केला. माझ्या व त्यांच्या जीवनात काहीच समानता नाही, ही गोष्ट वरवर बघितलं तरी लक्षात येत होती. ते बिचारे आपल्या संसारात रमलेले होते. देशप्रेमानं भारावून जाऊन मी काय केलं, कोणती संकटं साहिली यासंबंधी विचार करायला त्यांच्यापाशी जराशाही वेळ नव्हता. त्यांचा जीवनव्यवहार बघून आणि त्यांच्याशी बोलताना, मी कशा तऱ्हेनं जीवन कंठलं किंवा पुढील काळात मी कसं जगणार आहे, यासंबंधी त्यांना विशेष आस्था नाही, हे माझ्या लक्षात आलं. ते माझ्या मार्गाने जगूच शकत नव्हते. माझ्याप्रमाणं देशावर प्रेम करण्याची कल्पना त्यांच्यापासून अनेक योजनं दूर होती. मीही त्यांच्या मनात देशप्रेमाची भावना निर्माण करू शकलो नव्हतो.

एकाच मातापित्याच्या पोटी जन्मलेली आम्ही भावंडं भिन्न भिन्न स्वभावधर्माची होतो. निरनिराळ्या परिस्थितीत आम्ही वाढलो होतो. ज्या प्रकारच्या भावना मनात बाळगून मी जीवन जगलो होतो, तशा प्रकारच्या भावना माझ्या भावांच्या ठिकाणी कधीच निर्माण होऊ शकत नव्हत्या. ज्या परिस्थितीत ते वाढले होते तिथं देशप्रेम वगैरे बाबी अस्तित्वात नव्हत्या.

उत्तमोत्तम विचार ऐकण्या-समजण्याच्या अनेक सुवर्णसंधी माझ्या जीवनात आल्या होत्या. इथं येऊन, प्रत्यक्ष वस्तुस्थिती बघितल्यानंतर आपल्या व आपल्या भावांच्या विचारात जमिन-अस्मानाचं अंतर आहे, हे मला जाणवलं. भावनाशील बनून वडिलांना श्रद्धांजली वाहण्यासाठीच मी इथं आलो होतो. हे काम पार पडलं शिवाय तिथं थांबण्याची माझी मुदतही संपत आली होती. भावांचा निरोप घेऊन मी रंगूनचं प्रस्थान ठेवलं.

मी रंगूनला पोचल्यानंतर परत एकवेळ माझ्या सन्मानार्थ भारतीयांची एक मोठी सभा झाली. स्वातंत्र्य-संग्राम यशस्वी करण्यासाठी त्यांना काय केलं पाहिजे, याचा ऊहापोह करून मी त्यांना हेही सांगितलं की जर तुम्ही बर्मामध्येच वास्तव्य करणार असाल तर बर्मी लोकांशी बंधु-भावानं वागा. हा आपलाच देश मानून येथल्या लोकांच्या सुखदुःखाशी एकरूप व्हा. तुम्ही हे केलं नाही तर ब्रम्ही लोक तुम्हालाही इंग्रजांसारखे परके मानतील, इंग्रजांचे हस्तक मानतील व परकीयांशी जसे वागतात तसेच तुमच्याशीही वागतील. अशा परिस्थितीत इंग्रज हा देश सोडून गेले तर तुम्हालाही येथून बाहेर पडावं लागेल. माझ्या भावांनी माझं म्हणणं मान्य केलं व त्यांनी बर्माचं नागरिकत्व स्वीकारलं—त्यामुळे त्यांना कसलेही त्रास झाले नाहीत, सुखासमाधानानं राहाता आलं. दुसरे भारतीय लोक इंग्रज निघून गेल्यानंतर तिथं राहिले खरे, परंतु ते बर्मी लोकांना सतत खुपत राहीले. आज या लोकांना बर्मी जनतेच्या मनात मुळीच स्थान राहिलं नाही.

बर्माहून कलकत्त्याला आल्यानंतर तिथही हीच दोन प्रकारची स्वागतं वाट्याला आली. पोलीसांकडून व जनतेकडून स्वागत करणाऱ्या लोकांत कुणीही पंजाबी आढळला नाही. सर्वच गुजराथी लोक होते. याचं कारण, मी माझ्या जीवनाचा मोठा भाग, गुजराथमध्ये काढला होता व गुर्जर बंधुंची सेवा केली होती. भवानीपूर येथे तरुण गुजराथी लोकांनी मोठी सभा आयोजित केली. या सभेत, जे तरुण गुजराथमध्ये माझ्या संपर्कात आले होते, तेच अधिक संख्येने होते. मी त्यांना महात्मा गांधींच्या स्वातंत्र्य-संग्रामासंबंधी विस्ताराने माहिती सांगितली. चरखा-खादीचं अर्थकारण त्यांना समजावून देशाच्या अर्थकारणावर याचे काय काय परिणाम घडून येणार हेही तपशीलानं सांगितलं—अनेक मुद्दे स्पष्ट केले.

दुसऱ्या दिवशी मी कलकत्त्याहून वर्ध्याकडे निघणार होतो. स्टेशनवर अनेक चाहते निरोप देण्यासाठी आले होते. त्यांत एक मारवाडी मधले शेटजीही होते. तेही माझ्या भाषणाला हजर होते. जेव्हा गाडी सुरू झाली तेव्हा ते माझ्याजवळ आले आणि माझ्या हातात एक पाकिट देत म्हणाले, 'पाकिटात एक पत्र आहे, गाडी चालायला लागल्यानंतर तुम्ही ते वाचा.' थोड्या वेळानं मी पाकीट उघडलं. आत पत्र-बित्र काहीच नव्हतं. एका कागदाच्या कपट्यावर त्यांचा पत्ता लिहिलेला होता आणि सोबत होती एक हजार रुपयांची नोट! मी वर्ध्याला पोचलो. एक हजार रुपयांची नोट बापूंच्या हवाली केली आणि सर्व प्रकार त्यांच्या कानावर घातला. एक हजार रुपये एवढी मोठी रक्कम हातात येऊनही मी

ती स्वतःच्या उपयोगासाठी ठेवली नाही, या गोष्टीचा बापूंवर प्रभाव पडला. बापूंनी त्या शेटजींना आभाराचं पत्र पाठवलं व पृथ्वीसिंहानं नोट माझ्या हवाली केली असं त्यांना कळवलं. त्या शेटजींचं नाव आहे श्री. सोहनलाल दुगड. कलकत्ता आणि जयपूर इथं त्यांचा फार मोठा व्यापार आहे. त्यांच्या उदार व दानशूर स्वभावामुळं जनमानसात त्यांच्याविषयी आदराचं स्थान आहे. बापूंना तर ते प्रतिपरमेश्वर मानत होते. बापूंनी जेव्हा त्यांना आभाराचं पत्र पाठवलं, त्याचा त्यांना फार आनंद झाला व माझ्यासंबंधीही त्यांच्या मनात आदराची भावना निर्माण झाली. त्या दिवसापासून ते आजतागायत त्यांनी देशोन्नतीच्या कार्यासाठी हजारो रुपये माझ्या हवाली केले व अन्य प्रकारेही मला खूप मदत केली. मुंबईला माझ्या मुलाचा जन्म झाल्यानंतर ते मुद्दाम माझ्याकडे आले, आमच्याबरोबर भोजन केलं, त्यावेळी त्यांनी मुलाच्या हातात दोन हजार रुपये घातले. ब्रह्मदेशाचा प्रवास वृत्तान्त इथे पूर्ण होतो—सोहनलाल दुगड यांची हकिकतही त्यातच अंतर्भूत आहे.

मी ही गोष्ट परत एकदा स्पष्ट करू इच्छितो की बर्माचा माझा प्रवास, आश्रमात जे संकट माझ्यासमोर उभं राहिलं होतं, ते टाळण्यासाठीच केला होता. मीराच्या मनात माझ्याविषयी जे प्रेम आहे ते कालांतरानं नाहीसं होईल, असं मी गृहीत धरलं होतं. परंतु माझा हा अंदाज साफ चुकला, मी परत आल्यानंतर मीरा खूप आनंदित झाली. तिचं प्रेम आता अधिकाधिक स्पष्ट रीतीनं प्रगट होऊ लागलं. त्यानं मी जास्तच व्याकूळ झालो. बापूंना यातलं काही सांगता येत नव्हतं—तिच्या प्रेम-कटाक्षांना मला प्रतिसादही देता येत नव्हता. आश्रमात काहीतरी निमित्त शोधून मी तिच्यापासून दूर राहण्याचा प्रयत्न करू लागलो. भावनगर आणि मुंबईचे माझे मित्र भेटीसाठी बोलावताहेत असं सांगून बापूंची परवानगी घेऊन, मी माझी तिथून सुटका करून घेतली.



## मीराचं प्रेम आणि माझी अडचण . . . . २९

भावनगरला मीराचं एक पत्र हाती पडलं. पत्र प्रेमभावनेनं भरलेलं होतं. यापूर्वी मीरानं मला जी पत्रं लिहिली होती-त्या पत्रातही प्रेमभावनेचा आविष्कार होताच. त्या प्रेमाचा अर्थ मी भावा-बहिणीचं प्रेम असाच करत होतो. मीराच्या डोळयातून जो प्रेमभाव व्यक्त व्हायचा, तो बघितल्यानंतर या प्रेमभावनेमागं निराळीच काहीतरी भावना आहे, हे माझ्या ध्यानात येऊन चुकलं होतं. परंतु यासंबंधी बोलण्याचं मला धाडस होत नव्हतं. काही काही वेळा मला हा आपल्याच मनाचा काही तरी खेळ आहे, असंही वाटायचं. मीरा ही खरोखरच 'मीरा' आहे. परंतु आता आलेल्या पत्रानं सर्व संशयाचं निराकारण झालं. या पत्रामुळे हे स्पष्ट झालं की मीरा माझ्यावर प्रियकर म्हणून प्रेम करते. पत्र खालीलप्रमाणे होतं.

सेवाग्राम आश्रम
वर्धा (सी. पी.)

माझा प्रिय पृथ्वी, प्रिय बंधू,

तुमचं बहुमूल्य पत्र पोचलं. पत्र पोचताच मी ते वाचलं आणि सरळ बापूंकडे गेले. ते तेव्हा एकटेच होते. मी पत्र त्यांना दिलं. ते त्यांनी वाचलं आणि माझ्या डोळयाकडे बघत म्हणाले-हे तर फार चांगलं पत्र आहे.

तुमचं पत्र येईल, अशी मला अजिबात आशा नव्हती. मला तर भिती वाटत होती की, मी तुम्हाला नाराज केलेलं आहे. कारण मी स्वतःला, ज्या पुरुषाच्या शोधात मी होते असा पुरुष सापडला असतानाही, अयोग्य आणि निरुपयोगीच समजत होते. आजच पहाटे मी जेव्हा जवळच्या टेकडयांवर फिरायला गेले, तेव्हा मनातल्या निराशेमुळं माझ्या डोळयातून अश्रू बाहेर आले. आता तर तुमचं पत्रच माझ्यापाशी आहे. मला हे माहीत आहे की, माझा साथी माझ्यापासून कधीच दुरावणार नाही, नेहमीच माझ्यापाशीच राहील.

परमेश्वरानं मला जे काही दिलेलं आहे त्याबद्दल मी कृतज्ञता कशी व्यक्त करू. त्याचे आभार कसे मानू ? मी स्वतःला तुमच्या योग्यतेची कशी बनवू ? पृथ्वी ! तुम्ही मला जे काही दिलेलं आहे, त्याची तुम्हाला जाणीव नाही. मी बापूंसाठी आणि त्यांच्या उद्दिष्टांसाठी अतोनात परिश्रम केले आहेत. हे परिश्रम करतेवेळी माझ्या मनाची दुर्बलता

आणि काही गोष्टींचा अभाव सर्वोचित मी अनुभवत राहिले. एका दृष्टीनं मी सर्वंव अपूर्ण राहिले. तुमच्यामुळंच मला पूर्णत्व लाभणार आहे. तुमच्या पत्रातील प्रत्येक शब्द माझ्या हृदयाशी मी जपून ठेवला आहे आणि यापुढं मी माझ्या आत्म्याची संपूर्ण ताकद पणाला लावून मी स्वतःला एखाद्या कार्यात झोकून देईन.

बापूंना प्रत्येक गोष्ट समजते आणि ते सर्वंच बाबतीत मार्गदर्शन करतात. मी काल एकटीच त्यांच्याबरोबर फिरायला गेले होते. तुमच्याविषयी मी त्यांच्याशी बोलले. बापूंच्या आशीर्वादानंच, दिवसेंदिवस सगळा मार्ग सुस्पष्ट होत जाईल.

या पत्राच्या उत्तरादाखल मी लिहिलं होतं :—

"तुमच्या सर्व पत्रातून मला बहिणीचं प्रेम व्यक्त होताना दिसलं. परंतु आताचं पत्र वाचून, तुम्ही मला दाम्पत्य प्रेमाच्या बंधनात बांधू इच्छिता, हे स्पष्ट झालं आहे. असा अर्थ लावण्यात माझ्याकडून काही चुकलं असेल तर मी तुमची क्षमा मागते. मला अर्थ नीट समजावून सांगा. तुमचं पत्रही या सोबत परत पाठवत आहे. ते बापूंना दाखवा. मी त्यातून जो अर्थ काढला आहे—तो बरोबर आहे अथवा नाही, हे त्यांना विचारा. या पत्रातल्या अन्य गोष्टींसंबंधी उत्तर देण्याची काही आवश्यकता वाटत नाही. भेटीत त्यासंबंधी बोलू."

मीरानं बापूंसमोर स्पष्टपणे सांगितलं की ती बराच काळ स्वतःला व मलाही फसवत राहिली. ही गोष्ट खरीच होती की, तिच्या मनात माझ्यासंबंधी प्रेम होतं आणि ती मला विवाह-बंधनात जखडू इच्छित होती. मीराचं बोलणं ऐकून बापूंना काय वाटलं असेल ते बापूंनाच माहीत. बापूंनी यासंबंधी कुठं काही लिहिलं असल्यास मला त्याची माहिती नाही.

यानंतर मी मीराला पत्र लिहिलं नाही. यामुळं त्यांच्या मनावर मोठाच आघात झाला. त्यांच्या मनाचा दुबळेपणा सगळ्या आश्रमवासियांना समजला. बापूंनी श्री. नानाभाई भट्ट यांना पत्र लिहिलं. त्यात त्यांनी मीरेची सर्व हकीकत कळवून माझ्यासंबंधी चौकशी केली. हे पत्र अद्याप माझ्यापाशीच असून, ते मी खाली उद्धृत करत आहे.

२८-१२-१९४०

भाई नाना भाई,

पृथ्वीसिंह सध्या कुठे आहेत, ते मला माहीत नाही. ते जर तिकडे कुठं असतील तर, तुम्हाला सवड असल्यास, तुम्ही एक काम करा. मीराबेन त्यांच्याकडे पती या नात्यानं बघते. तिची अशी पक्की समजूत आहे की, तिचं-त्यांचं हे नातं जन्म-जन्मांतरीचं आहे. ती यांच्या जीवनाशी एकरूप होऊ इच्छिते. पृथ्वीसिंह मात्र तिच्याकडे बहीण म्हणून

पाहतात. त्यांनी तिच्याकडे बहीण म्हणून बघावं, याला मीच कारणीभूत आहे. ते ज्यावेळी आश्रमात आले तेव्हाच आश्रमातील स्त्रियांना भगिनी म्हणून माना, असं मी सांगितलं होतं व त्याप्रमाणे ते याच भावनेतून तिचा विचार करतात. इकडे मीराबेन मोठ्याच अडचणीत आहे. पृथ्वीसिंह काही आयुष्यभर ब्रम्हचारी राहणार नाहीत. एखाद्यानं, समजा एखाद्या स्त्रीकडे बहीण म्हणून बघितलं आणि प्रत्यक्षांत तसं नसेल तर मग अशा व्यक्तीला बंधनातून मुक्त करणेच योग्य होईल. माझं असंच मत विचारल्यानंतर बनलं आहे. यात कसलीच चूक मला दिसत नाही. मीराच्या लेखी हा जीवन-मरणाचा प्रश्न आहे. मीराबेन ही प्रत्येक दृष्टीनं एक परिपूर्ण व्यक्ती आहे. ती पृथ्वीला प्रत्येक बाबतीत सहायक ठरेल. त्यांच्यापासून आणि केवळ त्यांच्यापासून आपल्याला एक मुलगा व्हावा, अशी तिची मनोकामना आहे.

अशा परिस्थितीत पृथ्वीची समजूत घालणं, हे माझं कर्तव्यच ठरतं. त्यांना धार्मिक दृष्टीनं यात अडचण वाटत नसेल तर त्यांनी मीरेला आपली पत्नी म्हणून स्वीकारावं, कर्तव्यबुद्धीनं हे त्यांनी करावं असं मला वाटतं. तुम्हाला हे अवघड वाटत असेल आणि पृथ्वी एवढ्यात इकडे येणार असतील तर काहीच काळजीचं कारण नाही. एवढ्या उपरही तुम्हाला संकोच वाटत असल्यास राहू द्या. पृथ्वीला विचारून ते इकडे केव्हा येणार आहेत, हे कळवा.

तुमचं एकूण सर्व ठीकच चाललं असेल.

मी पुन्हा वर्ध्याला गेल्यानंतर बापूंनी सर्व हकीकत मला सांगितली. या बाबतीत मी सर्व दृष्टीनी मोकळा राहू इच्छित होतो. बापूंना मी विचारलं की हे प्रेम दोन्ही बाजुनी आहे असं मानता येईल काय? माझ्याकडून कोणत्याही प्रकारे, बोलण्या-वागण्यातून मीराला कधी असं जाणवलं का की मी तिच्यावर प्रेयसी म्हणून प्रेम करतो. बापू म्हणाले—नाही. मीराच्या ठिकाणीच हे प्रेम उत्पन्न झालं आणि या प्रेमानं तिला व्याकूळ बनवलं. तुमच्यावर कुणाचाच काही आक्षेप नाही—तुमची कुठलीच चूक नाही.

बापूंना आश्रमप्रवेशाच्या वेळी मी दिलेल्या वचनाची आठवण करून दिली. आश्रमातील स्त्रियांशी माता, भगिनी-कन्या, या नात्याव्यतिरिक्त इतर कुठल्याच दृष्टीने नातं जोडणार नाही, हे मी कबूल केलं होतं. बापू मला म्हणले की या वचनातून मी तुम्हाला मोकळा करतो. तुम्ही जर मीरा बरोबर लग्न केलंत तर तुम्हाला माझे आशीर्वाद आणि सहयोगच लाभेल. मी माझा निरुपाय व्यक्त केला. माझ्या या नकारामागं कुठलच कारण नव्हतं. हा माझा दुराग्रह होता की काय, हे मला सांगता यायचं नाही. बापूंनी एक प्रकारे मला आदेशच दिला होता. मी त्यांच्या आज्ञेचं पालन करणार नाही, हे त्यांच्या मनातही आलं नसेल. माझं उत्तर ऐकून बापू जरा नाराज झाले. मीराला त्यांनी मग दैवाच्या भरवशावर सोडून दिलं.

मीराची खात्री होती की आमचं दोघांचं पति-पत्नी हे नातं गतजन्मीचं आहे आणि या जन्मातही ते तसंच कायम ठेवण्याची तिची इच्छा आहे. मीरा आश्रमात राहायला आल्या-पासून तिनं केस कापलेले होते. तिचा पोषाख संन्यासिनीप्रमाणे होता. परंतु जेव्हा तिनं तिचं माझ्यावरचं प्रेम बापूंपाशी प्रकट केलं तेव्हापासून तिनं केस कापणं बन्द केलं. संन्यासिनीच्या वस्त्रांचाही तिनं त्याग केला होता. मी नकार दिल्यानंतर तिनं आश्रम सोडला आणि दूर डोंगरावर जाऊन तपाचरण सुरू केलं. यामुळं तरी माझी प्राप्ती होईल असं तिला वाटत होतं. मी बापूंना स्वच्छपणे सांगितले की मी कधी लग्नच करणार नाही असा काही निश्चय केलेला नाही, मात्र आश्रमवासी स्त्रीशी लग्न करणार नाही, असा मात्र माझा निश्चय आहे. आश्रमातून बाहेर पडल्यानंतर दुसरे दिवशी मी लग्न करीन, अशीही शक्यता आहे. बापूंच्यावर माझ्या म्हणण्याचा काय परिणाम झाला हे मला सांगता येणार नाही.

मीराखेरीज इतर अनेक आश्रमवासी तरुणींनी माझ्याविषयीचं त्यांना वाटणारं आकर्षण प्रगट केलं होतं. मी मोठ्या कठोरपणानं त्यांना या विचारापासून परावृत्त केलं. शर्मिलाचा आपली मनोकामना तशीच अपुरी ठेवावी लागली. मी माझ्या निश्चयापासून ढळलो नाही.

बापूंचे एक मोठे श्रीमंत गृहस्थ चाहते होते. त्यांनी त्यांच्या मुलीशी माझा विवाह व्हावा अशी इच्छा प्रदर्शित केली होती. मी उत्तर दिलं की दोन वर्षांनी मी यावर विचार करीन माझं उत्तर ऐकून त्यांच्या आशा पल्लवित झाल्या. त्या गृहस्थाला वाटलं की आता हे ठरल्याप्रमाणंच आहे. त्या मुलीबरोबर मला एकदा बाहेरगावी पाठवण्यात आलं. आम्हाला एकान्तवासात राहण्याचीही संधी देण्यात आली. परतल्यानंतर मी त्या मुलीला विचारलं---दोन दिवसांच्या आपल्या सहवासात मी कधी वासनेनं तुमच्याशी कुठला व्यवहार केला का? ती म्हणाली---मुळीच नाही.

१९४०-४१ चा काळ मोठ्या धामधुमीचा होता. देशात सर्वच क्षेत्रात अत्यंत स्फोटक परिस्थिती बनली होती. माझं मन सतत याच विचारांनी भरलेलं असे. आपल्याला कोणत्याक्षणी गोळी घातली जाईल, ह्याचा नेम नव्हता. जेव्हा सर्वत्र शांतता नांदेल आणि तणाव संपुष्टात येतील, तेव्हाच लग्नाचा विचार करण्यात अर्थ होता.

पंडीत जगतराम व माझे संबंध अत्यंत निकटचे आहेत हे जेव्हा मीराला समजलं तेव्हा ती त्यांच्याजवळ गेली. त्यांनीही तिला पृथ्वीसिंह फारच हट्टी स्वभावाचा आहे, हेच सांगितलं. त्यांच्या तोंडून एकवेळ नकार बाहेर पडल्यानंतर आता त्याचा होकार मिळवणं, कठीण आहे. हे ऐकून मीरा अधिकच खट्टू झाली आणि डोंगरावरील आपलं वास्तव्य संपवून ती बापूकडे परत आली. बापूंना म्हणाली---पृथ्वीसिंहांशी माझा विवाह होणार नसेल तर माझं जीवन व्यर्थ आहे. बापूंना तिची दया आली. ते श्री. जमनालाल बजाज यांना म्हणाले--आता हे आपलं सर्वांचंच कर्तव्य आहे की आपण पृथ्वीसिंहाची समजूत घालावी

त्यांच्या प्राप्तीसाठी एक स्त्री तपश्चर्या करते, तिच्या जिवाला धोका आहे. आपला हट्ट सोडा व तिचा स्वीकार करा. तार पाठवून मला भावनगरहून बोलावून घेण्यात आलं. आपल्या शेजारी बसवून बापूंनी मोठ्या प्रेमानं मला समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. मी उत्तर दिलं—बापू, माझ्या नकारामागे एक विचार आहे. मी सर्व बाजूंनी विचार करूनच नकार दिला आहे. एकवेळ मरायला मी सहजासहजी तयार होईल—पण मी निश्चय बदलणार नाही. मीराच्या जीवनाचं रक्षण करण्यासाठी मी सदैव धावून येईन परंतु पत्नी म्हणून तिला माझ्या जीवनाचा वाटेकरी बनवणं मला शक्य नाही. आमच्या दोघांच्याही सत्यपूर्ण वागणुकीविषयी बापूंच्या मनात कुठलाच संदेह नव्हता. आम्ही दोघेही आपापल्या आदर्शांना जपत आहोत, हे त्यांच्या लक्षात आलं. बापूंनी आम्हाला आमच्या नशीबावर सोडून दिलं.

कॉंग्रेस कार्यकारीणीच्या सर्वच महान नेत्यांनी मला समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. पंडित जवाहरलाल नेहरू खेरीज अन्य सर्वांनी मनापासून प्रयत्न केले. परंतु ते सर्व निष्फळ ठरले. माणसाचं मन एखादी गोष्ट करायची किंवा नाही, हे कसं ठरवतं, याचं संपूर्ण विश्लेषण करणं हे एखाद्या मानसशास्त्रज्ञाचंच काम आहे. वाचकांना एवढीच उत्सुकता असेल की दोन मनं एकमेकांच्या संबंधी विपरीत निर्णय इतक्या ठामपणे कशी काय करू शकली? मी माझ्या जीवनाचा हा अध्याय लिहायला घेतलाच आहे तेव्हा मीरानं माझी प्राप्ती व्हावी म्हणून मला जी पत्रं पाठवली, ती मी परत वाचली. भावनेच्या भरात तिनं ती लिहिली होती. तिची पत्रं आणि तिचं आत्मचरित्र मी अतिशय शान्त चित्तानं वाचलं. हे वाचन करताना मीरा एक महान, पवित्र स्त्री होती, हेच मला जाणवलं. त्यांना माझ्या ठिकाणी त्यांच्याच मनातलं चित्र दिसत होतं.

मीरानं जेव्हा माझा जीवन-वृत्तान्त वाचला तेव्हा तिच्या लक्षात आलं की आपल्या देशाची जुलमी इंग्रजांची राजवट झुगारण्यासाठी मी कोणकोणते प्रयत्न केले होते. त्यापायी मला काय काय सहन करावं लागलं. हे सर्वच काही सरळ आणि सोपं नव्हतं. ह्या माझ्या वृत्तीमुळेच भारताच्या स्वातंत्र्यासाठी तिला माझ्या जीवनाशी एकरूप व्हायचं होतं. कोणत्याही पुरुषाबरोबर त्याला आपलंसं करून घेऊन, त्याच्याशी विवाह करावा, असा तिचा कधीच उद्देश नव्हता. तिला जो जीवनसाथी हवा होता, त्याच्या मनात देशप्रेमाखेरीज अन्य कुठलीच गोष्ट नसावी अशी तिची अपेक्षा होती. तिला माझ्यात तो पुरुष दिसत होता.

माझी प्राप्ती व्हावी म्हणून मीरानं जे तपाचरण केलं, त्याची वर्णनं तिच्या पत्रांतूनच वाचली पाहिजेत. एरवी त्यासंबंधी अनुमान करता येणार नाही. आपलं तप सफल व्हावं, यासाठी त्यांनी शारीरिक व मानसिक कष्ट सहन केले. एखाद्या गोष्टीच्या प्राप्तीसाठी सर्व प्रकारे प्रयत्न केल्या तरही जर ती गोष्ट प्राप्त झाली नाही, तर त्या व्यक्तीची अवस्था कशी बनेल? जे कुणी अशी अवस्था अनुभवतात—त्यांनाच याची कल्पना येऊ शकेल.

एखाद्या चांगल्या लेखकानं मीराची ही प्रेमकहाणी लिहिली तर ती कादंबरीसारखी सरस वाटेल. या कहाणीतील दोन्ही मनस्वी व्यक्तींची स्वभावचित्रं रेखाटण्यासारखी आहेत. एकानं बापू आणि देश-सेवा यांनाच आपल्या जीवनाचे उद्देश मानले होते. दुसरी व्यक्ती अशी होती जी देशप्रेमाखातर फाशीच्या तख्तावर जाऊन आली होती. अनेक वेळा जिला मृत्यूच्या जबड्यात शिरावं लागलं आणि जिला जगातली कुठलीही स्त्री आपल्या मोहजालात अडकवू शकली नव्हती. मीरानं मला प्रेम-बन्धनात बांधून ठेवण्याचे प्रयत्न केले नाहीत त्यांनी एक महान व पवित्र उद्दिष्ट डोळ्यापुढे ठेवून त्यासाठी खडतर तपश्चर्या केली होती, हे मात्र खरं!

तपश्चर्या नेहमी सफल होते अशीच सर्वसाधारण समजूत आहे. परंतु आमच्या प्रकरणात एकाचं तप सफल होण्यासाठी दुसऱ्याचं तप निष्फळ बनत होतं, भंग पावत होतं. चाळीस वर्षांच्या तपश्चर्येपुढे दोन वर्षांचं तप मग किती टिकू शकणार? किती प्रभाव पाडू शकणार? दोन तपस्व्यांच्या तपातला हा संघर्ष होता.

माझी प्राप्ती व्हावी म्हणून अनेक मुलींनी माझ्याकडे प्रेमपूर्ण कटाक्ष टाकले होते, मात्र त्यांच्यापैकी कुणी मीरासारखं तपाचरण किंवा आराधना केलेली नव्हती. असं कुणी केलं असतं तर माझं जीवन अगदीच वेगळं बनलं असतं.

माझं जीवन हे एक शिस्तबद्ध जीवन आहे. योगायोगानंच ते तसं बनलं. कुणाच्या तरी मागे लागून, किंवा परिस्थितीनं भांबावून जाऊन मी कधीही माझ्या जीवनाची दिशा बदलली नाही. मला जीवनात अनेक वळणं आणि अडथळे ओलांडावे लागले. प्रत्येक वळणावर देशहित डोळ्यापुढे ठेवून आपल्याला पुढे जायचं आहे. हे उद्दिष्ट मी कधीही नजरेआड होऊ दिलं नाही. मीराला मी माझ्या जीवनाशी एकरूप करू शकलो नाही. माझा तो निर्णय चूक होता का बरोबर, ह्याचा निर्णय करण्यासाठी आजही मी धजू इच्छित नाही. माझ्या विद्वान वाचकांवर मी हा निर्णय सोपवतो.

• • •

## राजकीय परिस्थिती आणि माझी विचारसरणी . . . . ३०

ज्या वातावरणात मी त्या काळी रहात होतो त्याचं वर्णन करणं आवश्यक आहे, असं मला वाटतं. मी तेव्हा जे केलं ते योग्य की अयोग्य, ह्याचा निर्णय वाचकच करू शकतील.

बापू म्हणत असत की, 'भारत-छोडो-आंदोलन' रूपी हा संघर्ष, हा त्यांच्या जीवनातील अंतिम संघर्ष आहे. त्यावेळी सबंध जगात ज्या घटना घडल्या, त्या सर्वांचा भारतातील वातावरणावर परिणाम झाला होता—आणि हा परिणाम अभूतपूर्व होता. आपल्या देशावर प्रेम करणारा प्रत्येक देशभक्त यावेळी मातृभूमीसाठी स्वतःची आत्माहुती द्यायला तयार होता. या अन्तिम युद्धाच्या वेळी बापू मला आपल्या समवेत ठेवू इच्छित होते. १९४२ सालचा जानेवारी महिना असावा. बारडोली येथं गुजरात कॉंग्रेसच्या कार्य-कारिणीची बैठक होती. या बैठकीत, राष्ट्रीय सरकार स्थापन करत असताना, इंग्रजांचं प्रभुत्व मान्य करून, जपानचा सशस्त्र सामना करायचा किंवा नाही, या विषयावर चर्चा व्हायची होती. बापूंचा शस्त्रास्त्रांचा वापर करण्याला विरोध होता. गुजराथ-मधील बहुसंख्य नेते बापूंच्या विरोधात होते. या बैठकीतून बापू अत्यंत निराश होऊन बाहेर पडले. यानंतर बापूंशी या विषयावर माझी चर्चा झाली. बापूंनी स्पष्ट शब्दात विचारलं होतं की, भारताला स्वतंत्र करायचं असेल तर, जपान्यांच्या विरुद्ध आपण शस्त्र हातात घेऊन लढायचं का? तुम्ही याला तयार आहात का? हिंसेचा अवलंब करणं योग्य ठरेल का? मी त्यांना उत्तर दिलं—बापू, शस्त्र हातात घ्यायचं का नाही, हे मला समजत नाही. मला एवढंच कळतं की, तुमची बुद्धी माझ्या बुद्धीपेक्षा श्रेष्ठ आहे—जोपर्यंत ही श्रद्धा माझ्या मनात कायम आहे, तोपर्यंत मी तुमच्या पावलावर पाऊल ठेवून चालेन. मी अन्य विचार करणार नाही.

भारताच्या इतिहासात १९४२ हे वर्ष एक झंझावाती वर्ष होतं. केव्हा कुठं काय होईल, याचा कुणालाच पत्ता नव्हता. माझं मन देखील एका विचित्र धुंदीनं भारावून गेलेलं होतं. या सुमारास बापू एका मोठ्या आंदोलनाच्या तयारीत व्यग्र होते. मे महिन्याचे दिवस होते. बापू बिर्ला-भवन मध्ये थांबले होते. आंदोलन कशा तऱ्हेनं करावं, कसं चालवावं, यासंबंधी बापू माझ्याशी सल्ला-मसलत करू इच्छित होते. त्यांनी मला आपल्या पूर्ण विश्वासू सहकाऱ्यांत समाविष्ट केलं होतं. मला ते म्हणाले ही माझ्या जीवनातली शेवटची लढाई आहे. यामुळं मी तुम्हाला प्रत्येक क्षणी, प्रत्येक परिस्थितीत आपल्या बरोबर ठेवू इच्छितो. बापूंचा माझ्यावर एवढा विश्वास जडलेला होता. खरोखरच, मी मोठा भाग्यशाली होतो.

## दोन दिवसांत गांधीजींची दोन रूपं

गांधीजी माझ्याशी मुंबई, मालाड येथे चालविल्या जाणाऱ्या संघासंबंधी बोलले. तो बंद कसा करायचा, सर्व तरुणांना वर्ध्याला कसं न्यायचं याविषयी सरदार वल्लभभाई पटेलांशीही चर्चा केली होती. बापूंच्या निकटच्या सहकाऱ्यांत, बापू माझ्यावर किती जास्त विश्वास ठेवत चालले आहेत, ही बातमी वाऱ्यासारखी पसरली होती. अनेकांना ही गोष्ट खटकली व त्यांनी आपल्या पद्धतीनं बापूंना समजावण्याचा प्रयत्न केला. बापूंनी जो काही निर्णय घेतला होता, त्यासंबंधी पुनर्विचार करण्यास या मंडळींनी त्यांना भाग पाडण्यात आलं. बापूंनी मला बोलावून घेतलं व अहिंसक व्यायाम संघाच्या अंदाजपत्रकासंबंधी मला काही प्रश्न विचारले. गोष्टी तशा मामुली स्वरूपाच्या होत्या. त्यांच्या संमतीनंच मी अंदाजपत्रक तयार केलं होतं. त्यांच्या मान्यतेचं पत्रही माझ्या-पाशी होतं. माझ्या उत्तरानं त्यांचं समाधान झालं. त्यांचा दुसरा प्रश्न होता की मी काम करतेवेळी इतरांशी जरा कडकपणे वागतो, असं लोक सांगतात, हे खरं आहे काय ? मी उत्तर दिलं–बापू, मी सैनिकवृत्तीचा मनुष्य आहे. सैनिक तयार करतांना काही वेळा मला अवश्य कडक व्हावं लागतं. माझं उत्तर ऐकून बापूंना हसू आलं. गोष्ट एवढ्यावरच संपली.

बापूंना दोन दिवसांत दोन वेगवेगळ्या रूपांत बघितलं. पहिल्या दिवशी त्यांनी जे प्रेम व विश्वास दाखवला होता, त्यानं मी खरोखरच भारावून गेलो होतो. दुसऱ्या दिवशी गोष्टी तशा सर्वसाधारणच होत्या. तथापि त्यांनी मला ज्या तऱ्हेनं प्रश्न विचारले, ते ऐकून माझ्या मनात खळबळ निर्माण झाली. मी अत्यंत बारकाईनं यावर विचार करू लागलो. १८ मे १९४२ रोजी बापू मालाड येथील माझ्या संस्थेची पाहणी करण्यासाठी येणार होते. ठरल्यावेळी ते आले. चाळीस तरुणांनी दिमाखात व्यायामाच्या कसरतींचं प्रदर्शन केलं. मुंबईचे हजारो प्रेक्षक तिथं आले होते. श्री. जी. डी. बिर्ला, सरदार वल्लभभाई पटेल, महादेवभाई देसाई आणि मुंबईचे प्रमुख नेते कार्यक्रमाला उपस्थित होते. कवायतींचं प्रदर्शन सर्वांच्याच पसंतीला उतरलं. सरदार वल्लभभाईंनी योग्य ते आदेश देऊन वर्ध्याला जाण्याची कसकशी तयारी करायची हे सांगितले.

दोन दिवसांच्या अल्प काळात बापूंची दोन रूपं मला बघायला मिळाल्यामुळे माझा दृष्टिकोण बदलला. पहिले दिवशी बापूंनी जेव्हा मला सांगितलं की ही त्यांच्या जीवना-तली शेवटची लढाई आहे, तेव्हा मला वारंवार असंच वाटत होतं की, बापू आपली ही इच्छा पूर्ण करत आहेत. दुसरे दिवशी मी जेव्हा त्यांना काही प्रश्न विचारले तेव्हा बापूंनी ज्याला ते शेवटची लढाई म्हणत होते, त्यासंबंधीची रूपरेखा माझ्यासमोर मांडली.

आजपासून अठ्ठावीस वर्षांपूर्वीची ही गोष्ट आहे. भारतीयांच्या जीवनातला तो एक नाजुक क्षण होता. काय करायचं आणि कसं करायचं यासंबंधी निश्चयपूर्वक निर्णय घेणं अवघड होतं. आम्ही इंग्रजांना भारतातून हाकलून देण्याबाबत प्रयत्नशील होतो आणि इंग्रज घट्ट पाय रोवून उभे होते. जपान भारतातून इंग्रजांना हाकलून आपलं प्रभुत्व प्रस्थापित करू इच्छित होता. भारतीयांच्या दृष्टीनं हा प्रकार म्हणजे आगीतून निघून फुफाट्यात पडण्यासारखा होता. कोणाची बाजू घ्यावी, हा बिकट प्रश्न होता. बापूंनी नेमक्या कोणत्या शब्दात हा निर्णय मांडला होता, हे मी सांगू शकणार नाही. एक गोष्ट स्पष्ट होती की, आम्ही इंग्रजांना साहाय्य करणार नव्हतो आणि जपान्यांशीही सामना करणार नव्हतो. इंग्रज आमच्या पाठीवर स्वार झालेले होते. त्यांना खाली उतरून जपानी आमच्या पाठीवर स्वार होऊ इच्छित होते. आपली ही असहाय परिस्थिती लक्षात घेऊन बापूंनी जो निर्णय घेतला होता, त्याहून अधिक उत्तम गोष्ट दुसरी कुठलीच नव्हती.

भारताच्या राजकीय वातावरणात पुष्कळशा शोयी होत्या. भारताच्या स्वातंत्र्यसंग्रामात सामील झालेले लोक दोन गटात विभागले गेले होते. एका पक्षाची अशी इच्छा होती की, कोणत्याही रीतीनं इंग्रजांच्या तावडीतून देशाची मुक्तता झाली पाहिजे. ज्यांनी जळवांप्रमाणं आमच्या रक्ताचं शोषण केलं आहे, आम्हाला गुलाम बनवलेलं आहे, अशा लोकांशी आमचं बंधुभाव राहूच शकणार नाही. स्वतःला अत्यंत जागृत समजणारा दुसरा पक्ष, असं मानत होता की, आम्ही जर इंग्रजांना मदत केली नाही तर, जपान अगदी सहजतेनं भारतावर आपला अधिकार प्रस्थापित करील. लाखोंच्या संख्येनं जपानी भारतात घुसतील. असं जर घडलं तर त्यांच्या तावडीतून भारताला मुक्त करणं, हे स्वप्नवत् ठरेल. तेव्हा या पक्षानं घोषणा दिली की, युद्धात आपण इंग्रजांच्या बाजूनं उतरलं पाहिजे, त्यांची साथ केली पाहिजे.

पहिल्या पक्षानं श्री. सुभाषचन्द्र बोस यांच्या आवाहनाला पाठिंबा दिला होता. त्यांनी घोषणा दिली की, इंग्रजांना मुळापासून उखडून टाका आणि जापानचं स्वागत करा. इंग्रजांच्या तावडीतून भारताला मुक्त करण्यासाठीच भारत जपानकडून पोलाद घेतो आहे.

भारतातील क्रांतिकारकांनी बाँबफेक करणाऱ्या तुकड्या बनवल्या. सत्य आणि अहिंसेच्या उपासकांची-नेत्यांची नावं या बॉम्ब्सना देण्यात आली. उदाहरणार्थ, गांधी स्टिक, जवाहर डायनामाईट. सुभाषचन्द्र बोसच्या नेतृत्वाखाली आझाद हिन्द सेनेनं जपान्यांच्या मदतीनं भारतावर चाल केली होती.

कम्युनिस्टांनी इंग्रजांशी हातमिळवणी करून त्यांचा विश्वास संपादन केला. त्यांनी जपान्यांच्या विरोधात देशवासियांनी उभं राहून प्रतिकार करण्यासाठी आवाहन केलं. या दोन्ही पक्षांपैकी एकाचंही समर्थन बापूंनी केलं नाही. यामुळं आता देशापुढं तीन मार्ग उत्पन्न झाले. या तीन मार्गांपैकी कोणता मार्ग देशाच्या संदर्भात कल्याणकारक ठरला ह्याचा निर्वाळा भावी इतिहासकार करतील. आपल्याला एवढंच बघायचं आहे की, या तीन मार्गांपैकी देशानं कोणता मार्ग अवलंबिला.

भारताच्या द्वारावर-आसामच्या सीमेवर, जपान जेव्हा घणाघाती प्रहार करू लागला आणि हिटलर रशियाच्या छातीवर जाऊन बसला, तेव्हा जागतिक राजकारणात प्रचंड उलथापालथ झाली. सगळं वातावरणच बदललं. जपानच्या टोजोला व जर्मनीच्या हिटलरला अचानकच माघार घ्यावी लागली. याबरोबरच काँग्रेसच्या नेत्यांनीही आपला पवित्रा बदलला. "इंग्रजांनो, भारत सोडा" ही त्यांची घोषणा त्यांनी बंद केली. याच्या परिणामी इंग्रजी राजवट आणि काँग्रेस यांच्या दरम्यान समझोता झाला. जे काही झालं ते चांगलंच झालं. इंग्रजांचा आणि रशियाचा पराभव झाला असता आणि टोजो व हिटलर यांचा विजय झाला असता तर जगाचं एकूण चित्रच बदलून गेलं असतं. भारताचं काय झालं असतं हे सांगणं कठीण आहे. एवढं मात्र निश्चित सांगता येईल की, आज जो भारत स्वतंत्र आहे आणि भारतातील प्रत्येक मूल्यवान वस्तू सुरक्षित आहे, हे दृश्य त्या परिस्थितीत दिसलं नसतं.

जपान्यांच्या तुलनेत आम्ही इंग्रजांचे सहायक बनलो. या मार्गाचा स्वीकार केल्यामुळं आपण थोडंबहुत मिळवलं आहे, गमावलं काहीं नाही. एवढ्या विस्तारानं या घटनेचं मी वर्णन केलं आहे, याचं कारण या घटनेमुळेच माझ्या जीवनात एक महान परिवर्तन घडलं.

इंग्रजांना मदत करायची आणि जपान्यांविरुद्ध उभे राहण्याचा निर्णय १९४२ साली घेण्यात आला. हाच निर्णय जर १९४१ मध्ये घेण्यात आला असता तर बापूंना सोडून निघून जाण्याचा प्रश्न माझ्या जीवनात निर्माणच झाला नसता. माझ्या भावनांना आवर घालून मी बापूंच्या जवळ राहिलो असतो तर माझ्या हातून देशाची अधिक सेवा घडली असती, यात तिळमात्रही शंका नाही. बापूंपासून निघून गेल्यानंतर मला भारताच्या राजकीय क्षेत्रात बरंच भटकावं लागलं. १९४२ पासून १९५६ पर्यंत मी कम्युनिस्ट पक्षाचा कार्यकर्ता होतो. परंतु एकाही कामांत माझं मन रमलं नाही. इंग्रजांशी सहकार्य करून जपानच्या विरोधात उभं राहिलं पाहिजे, हे मत मी स्वीकारलं तेव्हाच मी बापूंच्याकडे परत जाणंच योग्य ठरलं असतं. बापूंच्या समवेत काम करण्याची संधी परत माझ्या वाटणीला आली खरी, परंतु मी तिचा उपयोग करून घेऊ शकलो नाही.

मीरा आणि बापूंचे नातू श्री. कनू गांधी ह्या दोघांनी मोठ्या प्रेमानं मी परत आश्रमात येऊन राहावं व बापूंचा सहायक व्हावं, यासाठी प्रयत्न केले. १९४४ साली बापू जेव्हा आगाखान पॅलेस मधल्या स्थानबद्धतेतून सुटून, जुहूला येऊन राहिले तेव्हा माझी या विषयावर त्यांच्याशी चर्चा झाली. बापूंनी अशी इच्छा व्यक्त केली की, पहिल्यांदा मी ज्या मन:स्थितीत त्यांच्याकडे गेलो होतो, तशाच मनोवस्थेमध्ये जर मी परत एकदा त्यांच्याकडे आलो, तर चांगली गोष्ट आहे. माझ्या काही निष्ठांचा प्रश्न होता. मी तसं करू शकलो नाही.

काँग्रेसनं निर्णय घेतला की अनामत्ता शस्त्राच्या बळावर प्रतिकार करायचा. या निर्णयाला बापूंचे आशिर्वाद होते. यामुळं सत्य आणि अहिंसा यांना मी जीवनमूल्य बनवू शकलो नाही.

## सत्य आणि अहिंसेसंबंधी माझे विचार

मनुष्य जेव्हापासून एक सामाजिक प्राणी बनला तेव्हापासूनच त्याला सामाजिक बंधनात राहण्याची आवश्यकता भासू लागली. माणसाच्या मनानं सामाजिक बंधनांचा स्वीकार करून त्याप्रमाणं वागणं त्यानं स्वीकारलं नसतं तर माणसा-माणसात परस्पराविषयी कधीही प्रेम निर्माण झालं नसतं. परस्परात विश्वासही निर्माण झाला नसता आणि मानवी संस्कृतीचाही विकास होऊ शकला नसता. हे झालं नसतं तर मानवाचा जीवननिर्वाह सुद्धा इतर प्राण्यांप्रमाणे झाला असता. माणसानं आपल्या सर्व प्रकारच्या शक्तींचा वापर करण्यात संयमाचा अवलंब करून, जीवन जगणं तो शिकला. परस्परावरील प्रेम व विश्वासामुळेच त्याला सत्य आणि अहिंसा या मूल्यांचा जीवनात अंगिकार करावा लागला. सत्याचा अवलंब केल्यामुळे एकमेकांवर विश्वास ठेवणं त्याला शक्य झालं. शब्दांना मोल प्राप्त झालं आणि तोंडातून बाहेर पडलेल्या शब्दांचं पालन करणं हे त्याला बंधनकारक ठरलं. अहिंसेचा स्वीकार केल्यामुळे माणूस इतर प्राणिसृष्टीहून स्वतःला अधिक सुरक्षित मानून जीवन जगू लागला. असंस्कृत समजल्या जाणाऱ्या आदिवासी व जंगली टोळ्या देखील ह्या दोन मूल्यांचा स्वीकार करूनच जीवन जगतात. प्रत्येक जण दुसरा सत्यपूर्ण वागणूक करतो आहे असं समजनच चालतो आणि या समजुतीमुळं तो त्याच्या समाजात स्वतःला सुरक्षित समजतो· लाखो वर्षांच्या कटु अनुभवानंतरही माणसाला जो उंची गाठता आली ती या मूल्यांमुळेच. सत्य-अहिंसेचं पालन केवळ आपल्या साथीदारापर्यंतच मानव समूहापर्यंतच त्याला अवलंबिता आलं. मानवजातीचा इतिहास हेच दर्शवितो की जे लोक व्यापकपणे ही मूल्यं स्वीकारून जगले त्यांचीच केवळ प्रगती होऊ शकली, तेच सुखा-समाधानानं जगू शकले.

वैदिक काळातील ऋषी-मुनी, अवलिये, पैगंबर, साधु-संत आणि धर्मगुरू यांनी माणसाला सदोदित हाच उपदेश केला आहे की, माणसानं दुसऱ्या माणसाची हत्या करू नये आणि त्यानं असत्याची कास धरू नये. हजारो वर्षांच्या अनुभवांचं परिशीलन करून मानसशास्त्रज्ञांनी देखील हाच निष्कर्ष काढला आहे की मानवप्राणी त्याच्या समाजात तेव्हाच सुखी आणि समाधानी बनू शकतो जेव्हा तो दुसऱ्यांना फसवणार नाही आणि एकमेकांचा जीव घ्यायला प्रवृत्त होणार नाही.

निसर्गतःच स्वरक्षणाची माणसाची इच्छा असते. यामुळेच तो आपल्या जीवाचं, आपल्या सहवासातील लोकांच्या जीवाचं आणि आपल्या हितांचं पूर्ण स्वरुपात रक्षण करण्याचे उपाय आणि मार्ग आत्मसात करतो. गरज पडली नाही तर तो खोटं बोलत नाही. सहजासहजी तो कुणाची हत्या करायलाही प्रवृत्त होत नाही. स्वार्थापोटी मात्र तो काहीही करायला तयार होतो.

मानवजातीच्या इतिहासावरून हेच स्पष्ट होतं की ज्या देशातील स्त्री-पुरुष परस्परांचं रक्षण करून एकमेकांची मदत करायला धावून जातात, एकमेकांविषयी सहकार्याची भावना ठेवून एकमेकांचा विश्वास संपादन करितात, तो देश आणि तिथला समाज सुखी बनतो.

ज्या माणसाच्या मार्गात काही संकटे नाहीत आणि ज्याच्या इच्छा-आकांक्षा सहज रीतीनं पूर्ण होतात, जो स्वतः बलसंपन्न आहे, अशा माणसाला खोटं बोलण्याची कधी गरजच पडत नाही. त्याला कुणाची हिंसा करण्याचंही कारण पडत नाही. ज्या माणसाचा स्वार्थ अमर्याद आहे, इच्छा-आकांक्षा अनंत असून तो शक्तिशालीही आहे परंतु स्वतःला कमकुवत समजतो, अशा माणसाला कुणाची हिंसा करण्यात किंवा असत्याची कास धरण्यात बिलकूल दिक्कत वाटत नाही. विषय-वासनांच्या तृप्तीसाठी आणि आर्थिक गरजा भागविण्यासाठी माणूस असत्याचा आश्रय करतो आणि इतरांची हिंसा करायलाही प्रवृत्त होतो. माणसाला विषय-वासना आणि आर्थिक गरजा यावर मर्यादा घालणं कठीण असतं. ज्यांनी इंद्रियावर विजय संपादन केलेला असतो, त्यांना खोटं बोलण्याची किंवा कुणाशी झगडा करण्याची गरज नसते. असा माणूस आढळणं शक्य नसतं. कसोशीनं शोधला तरी तो सापडत नसतो.

ज्या विशिष्ट सामाजिक वातावरणात आपण सर्वजण जगतो, तिथं एखादी बिर्लासारखी व्यक्तीच सफलतेनं सत्य-अहिंसेची मूल्यं आपल्या जीवनात स्वीकारू शकते, तेवढं धैर्य दाखवू शकते. मन, वचन आणि कर्म सर्वच बाबतीत दैनंदिन जीवनात सत्य-अहिंसेचं पालन करणं ही गोष्ट केवळ कल्पनेतच शक्य आहे. काम, क्रोध, मोह, लोभ, अहंकार या षड्रिपूंवर ज्यांना मात करता आली त्या माणसांना समाजानं देवतातुल्य मानलं. अधिकारवाणीनं अशा लोकांनी वेळोवेळी समाजापुढं सत्य-अहिंसा ही मूल्यं आत्मसात करण्याचा आग्रह धरलेला आहे. यासाठी भगीरथ प्रयत्न केले आहेत. ह्या मूल्यांचा सामूहिकपणे कुणी स्वीकार करू शकलेला नाही. मात्र या शिकवणुकीचा एक सुंदर परिणाम एवढाच घडून आला आहे की आम्ही सर्वांनी या मूल्यांचं महत्त्व मान्य केलेलं आहे.

सत्य आणि अहिंसा ही मूल्यं मानवाच्या लेखी एखाद्या आकाशपुष्पाप्रमाणेच ठरणार काय? विषयवासनांना आवर घालून, माणूस जीवन जगू शकेल काय? इतिहासाची शिकवण निराळी आहे. आम्हाला सदोदीत हेच बघायला मिळतं की मानव समाजात राहणारे सामर्थ्यसंपन्न लोक, सामर्थ्याच्या बळावर माणसांवर अत्याचार करतात, त्यांचं जीवन असह्य करून सोडतात. एका नीचपणानं ते आपलं जीवन व्यतीत करतात. अतापर्यंत कुणीच असं म्हटलेलं नाही, कुणीच हे मान्य केलेलं नाही की हिंसा करणं आणि छळ-कपटाचा अवलंब करून ऐश्वर्यसंपन्न जीवन जगणं हा माणसाचा धर्म आहे, त्याला तसा अधिकार आहे!

• • •

भावनगरचे सर्वच धाडसी तरुण माझ्या जीवनानं आकृष्ट होऊन माझ्याशी त्यांचे घनिष्ट संबंध निर्माण झाले होते. अनेकांना माझं घर त्यांचं स्वतःचंच वाटायचं आणि मी सांगेल तसं ते वागायचे. या तरुणांच्या सहवासात राहत असतांना मी जे रोमहर्षक आणि स्फुर्तीप्रद जीवन जगलो, त्या जीवनाच्या काही आठवणी आपणास सांगतो.

## प्रोफेसर काठियावाडी

यांचा मुलगा माझ्या खूप जवळ आला. तो एक तेजस्वी, बलशाली आणि सात्त्विक प्रवृत्तीचा मुलगा होता. अशा तरुणांना मी पूर्णपण आपलेसे करून घेत होतो. त्याचे वडील "भावनगर सामळदास कॉलेजात" एक प्रख्यात प्राध्यापक होते. त्यांनी आपल्या चिरंजीवांना भानुशंकरला सांगितला की हे बघ, तुझं आता लग्नाचं वय झालं आहे-तेव्हा लग्नाला तयार हो. मुलगा बी.ए. च्या वर्गात शिकत होता. तो म्हणाला की, स्वामीजींना विचारून मी काय ते ठरवीन. वडिलांनी विचारलं हे कोण स्वामीजी ? मुलानं उत्तर दिलं-स्वामीजी, मोतीबागेतील व्यायामशाळेत मुलांना शिक्षण देतात. त्यांचं उत्तर एकून प्रोफेसरसाहेब जरा चिडले व म्हणाले-तुमच्या स्वामीजींना मला एकवेळ भेटायला सांग. मी सहसा इतरांच्या घरी जायचं टाळत असे. त्यांचं मला अशा पद्धतीनं बोलावणं, मला मुळीच आवडलं नाही. तरीही मी त्यांना भेटायला गेलो. ते म्हणाले-तुम्ही चांगलेच उपद्रवकारक दिसता-मुलांना तुम्ही लग्नापासून परावृत्त करता. मी म्हणालो-कुठल्याही मुलाला लग्नापासून रोखलेलं नाही. मग आमचा मुलगा तुम्हाला विचारल्याखेरीज लग्न करणार नाही, असं कशामुळं म्हणाला? ते उद्गारले. मी म्हणालो तुमच्या मुलावर तुमचाच अधिकार असला पाहिजे-माझा अधिकार त्याच्यावर काय म्हणून असेल? यासंबंधी आपण विचार नको का करायला? जर आपण आपल्या मुलाचा विश्वास संपादन केला असता तर तो मला विचारायला कशाला आला असता?

## महाराणा प्रताप जयंती

आपल्या देशात वीर पुरुषांचं पूजन मोठ्या प्रमाणात होतं. वीर पुरुषांच्या जयंत्युत्सवामुळं सर्वांना प्रेरणा मिळते. माझ्या मनात असा विचार आला की, वीर पुरुषांचे दिवस वेगळ्या पद्धतीनं साजरे केले पाहिजेत. मी पन्नास तरुणांना सायंकाळी बोलावलं. थोडी रात्र झाल्यावर त्यांना घेऊन मी शहराबाहेर आलो. एका छोट्या टेकडीवर मी त्यांना

झोपायला सांगितलं. पहाटे चार वाजता त्यांना जागं केलं आणि पाच-पाच तरुणांच्या दहा तुकड्यात त्यांची विभागणी केली. प्रत्येक तरुणाला पावशेर गूळ आणि पावशेर फुटाणे दिले व सडकेने न चालता, शेता-शेतांतून वाट काढत चालत राहा, असा आदेश दिला. सायंकाळी या टेकडीवर आगीच्या ज्वाला दिसल्या म्हणजे तुम्ही सर्वांनी इथं परत यायचं. एखाद्या गावातून जाताना तिथं काही खायला प्यायचं नाही. गावच्या प्रतिष्ठित व्यक्ती-कडून तुम्ही तिथं गेल्याबद्दल सही आणायची. जी तुकडी सर्वांत अधिक अंतर चालत जाऊन इथं वेळेवर पोचेल त्या तुकडीला बक्षिस देण्यात येईल. एक तुकडी पंचेचाळीस मैलांचे अंतर चालून वेळेवर परत फिरली होती. थोडंसं खाऊन ४५ मैलांचा प्रवास करणंहे शूर सैनिकाला शोभेल असंच होतं.

## शिवाजी जयंती

एकदा रात्रीच्या वेळी मी दोनशे तरुण जमवले. कुणाचंही वय पंधरा वर्षांहून कमी नव्हतं. भावनगरजवळच एक भला मोठा कल्चर्ड पार्क होता. या पार्कच्या आत २५ मुलांना जमा केलं आणि १७५ मुलांना सबंध पार्कला वेढा घालून पहाऱ्यावर उभं केलं. २५ मुलांची तुकडी ही शिवाजीची तुकडी होती आणि १७५ मुलं म्हणजे मोगली फौजेचे शिपाई. रात्री बारा वाजता बिगूल वाजला. शिवाजीच्या तुकडीतील मुलांना मोगली पहाऱ्यातून बाहेर निसटायचं होतं. पार्कमध्ये सर्व प्रकारची जंगली जनावरं होती. साप-विंचू यांची तर गणतीच नव्हती. रानडुकरं आणि लांडगेही होते. काटेरी झुडुपांच्या मधून निसटायचं होतं. एका तासाच्या आत शिवाजी तुकडीला पहारा चुकवून बाहेर पडायचं होतं. दुसऱ्यांदा बिगूल वाजताच शिवाजीची तुकडी, एकत्र जमली-त्यांचा एकही शिपाई शत्रूच्या टोळीच्या हाती सापडला नव्हता. या खेळात जी मुलं सहभागी झाली होती त्यांच्या मनात या खेळाची आठवण कायमची राहिली-मोठ्या अभिमानानं ते यासंबंधी बोलायचे.

## निष्ठा आणि शौर्य

मुलांच्या शौर्याचा व निष्ठेचा एक प्रकार पुढीलप्रमाणेही आहे. मी तेव्हा राजपूत-वसतिगृहाचा प्रमुख होतो. १५० मुलं वसतिगृहात होती. त्यापैकी ५० मोठ्या मुलं वयाची होती. एके दिवशी रात्री माझ्या जवळच्या मित्रानं मला झोपेतून उठवलं. तो म्हणाला-मी एका संकटात सापडलो आहे. तुमची व तुमच्या मुलांची मला मदत हवी. मी म्हणालो की वसतिगृहातील मुलांना काही काम सांगता येणार नाही आणि रात्रीच्या वेळी मी त्यांना बाहेर जायलाही परवानगी देऊ शकत नाही. यामुळे मी होस्टेलच्या आजुबाजूला जी वस्ती होती तिथल्या तरुणांना बोलावलं, त्यांच्यामार्फत अन्य मुलांनाही बोलावणं पाठवलं.

स्वर्यांना व्यायामशाळेत गोळा केलं. रात्री बाराची वेळ—परंतु अशा अवेळी देखील पन्नास मुलं तावडतोब धावून आली. शहरातल्या एका मोठ्या अधिकाऱ्याचा नातलग असलेल्या एक जहागिरदारानं एका तरुणीचं जबरदस्तीने अपहरण करून तिला जंगलातल्या एका बंगल्यात बंद करून ठेवलं होतं. पोलिस मदत करायला तयार नव्हते. त्या तरुणीची त्याच्या तावडीतून सुटका करायची होती. त्या तरुणीचा गळा दाबून जीव घेण्याचा संभव होता किंवा तिची अन्यत्र रवानगीही झाली असती. यासाठी रात्रभर त्या घराभोवती वेढा घालून पहारा करायची आवश्यकता होती. कुणाला आत सोडायचं नव्हतं आणि आतून कुणाला बाहेर पडू द्यायचं नव्हतं. ५० मुलं हातात भाले, खंजिर आणि लाठ्या-काठ्या घेऊन रात्रभर झुडुपाआड पहारा देत उभे राहिले.

## मुलांची कसोटी

भावनगरच्या बाहेर एका खेड्यात मुलांच्या खेळांचे कार्यक्रम ठेवले. त्या गावी रेल्वे रात्री ११ वाजता पोचत असे. मुलांना आणण्यासाठी गावातून चार बैलगाड्या पाठवण्यात आल्या होत्या. चांदणी रात्र होती. माझ्या मनात मुलांची जरा गंमत करावी व त्यांची कसोटी बघावी असा विचार आला. गावातून चार बंदूकधारी माणसं बरोबर घेतली. बैलगाड्या ज्या रस्त्यानं यायच्या होत्या-तो रस्ता रोकायचं आम्ही ठरवलं. मुलं बैलगाड्यांत बसून मोठमोठ्यानं गाणी म्हणत येत होती. चांदणी रात्र होती. सर्वजण आनंदात होते. गावातल्या बंदूकधारी माणसांना मूलं ओळखत नव्हती. त्यांनी गाड्या अडवल्या व गाड्या बाजूच्या शेतात घ्या-आम्ही तुमची झडती घेणार आहोत, असं त्यांनी दरडावून सांगितलं. गाडीवान या प्रकाराने घाबरले. त्यांनी गाड्या सडकेच्या खाली नेल्या. बंदूकधारी मुलांना म्हणाले-तुमच्यापाशी जे काही असेल ते मुकाट्यानं आमच्या हवाली करा. मुलांनी आपल्या जवळची शस्त्रं-भाले, तलवारी लपवून ठेवल्या होत्या. एक धाडशी मुलगा म्हणाला-तुम्ही आम्हाला मारहाण करू नका-आमच्या सर्व वस्तू या बंडलामध्ये आहेत—बंडल उघडून आम्ही त्या तुमच्या हवाली करतो. सर्व मुलांना समजलं की बंडलातील भाले, तलवारी काढून या लोकांशी सामना करायचा आहे. बंडलं उघडताच मुलांनी शस्त्र बाहेर काढली व प्रतिकारासाठी सज्ज होऊन उभे राहिले.

माझ्या एका मित्राचं नाव होतं बहाउद्दीन उस्मान शेख. तो भाला घेऊन पुढे सरसावला. तीन बंदुकधारी आपल्या बंदुकी घेऊन शांतपणे उभे राहिले. मी अंगावर जाडेभरडे कपडे घातले होते आणि डोक्याला मोठं पागोटं बांधलं होतं. माझ्या मित्राने भाल्याने वार करण्यासाठी झेप घेताच मी त्याचा हात पकडला आणि जोरजोरात हसत सुटलो. सगळं गुपित फुटलं. मुलांची कसोटी बघितली आणि खेळाची मजा आली. गावातल्या लोकांनी मुलांच्या शौर्याची व हिंमतीची प्रशंसा केली.

## महात्मा गांधी की जय

एकवेळ मी दक्षिणामूर्ती भवनच्या वसतिगृहातील विद्यार्थ्यांना तलावावर पोहण्यासाठी घेऊन गेलो. समोरच्या बाजूनं चार तरुण कलंदर वृत्तीचे बैरागी येत होते. हा १९२३-२४ चा सुमार होता. राष्ट्रीय शाळांतून शिक्षण घेणारे विद्यार्थी खादीचा पोषाख वापरत असत आणि त्यांच्या डोक्यावर पांढरी टोपी ते घालत. पांढरी खादी टोपी गांधी-टोपी म्हणून ओळखली जात असे. अस्पृश्यता नाहीशी करण्याच्या आंदोलनामुळं सनातनी वृत्तीचे साधु-समाजाचे लोक महात्मा गांधींवर चिडलेले होते. गांधीजींना ते आपले शत्रू समजत.

आपल्याच धुंदीत येणाऱ्या त्या साधूंनी जेव्हा हे बघितलं की त्यांच्या पुढ्यात गांधींचे शिष्य येताहेत तेव्हा ते चिडले. ते तरुण बैरागी गांज्याच्या धुंदीत होते. गांधीजींचं नाव घेऊन ते अद्वातद्वा बडबड करू लागले. व्रजभाषेतून काही दोहे म्हणत त्यांची बडबड चालू होती. गुजराती मुलांना त्यातलं काहीच समजलं नाही. मला त्यांची सगळी आगळीक लक्षात आली. ऐकून मला वाईट वाटलं. मी त्यांना विचारलं—तुम्ही कशासाठी बडबड चालवली आहे? मी सैलसर धोतर नेसलं होतं—माझ्या डोक्यावरही गांधी-टोपी होती. अंगात ढगळ सदरा घातलेला होता. माझा पोषाख बघून ते बैरागी अधिकच चिडले. माझ्या ढगळ पोषाखामुळं—माझ्यासारखा माणूस त्यांना दरडावील-असं त्यांच्या स्वप्नातही नव्हतं. महात्मा गांधीजींचं नाव घेऊन ते ज्याप्रकारे शिवीगाळ करत होते-आता त्यांनी आपला मोहरा माझ्याकडे वळविला व हसत-हसत ते मला अद्वातद्वा बोलू लागले. मी या प्रकारानं आधीच अस्वस्थ होऊन तिथं उभा होतो. त्यांचं रंगरूप आणि एकूण वागणूक बघून मला खूपच वाईट वाटत होतं. क्षणात माझाही चेहरा बदलला-डोळे संतापानं लाल झाले मी हसण्याचा प्रयत्न केला-हसत हसतच त्यांना म्हणालो—ज्या महात्मा गांधींचं नाव घेऊन तुम्ही त्यांना शिवीगाळ केली-त्याच गांधीजींचा तुम्हाला जयजयकार करावा लागेल. म्हणा-'महात्मा गांधी की जय' माझी ही सूचना ऐकून त्यांची गांजाची नशा आणखीनच चढली. ते परत शिव्या उच्चारू लागले. जवळजवळ शंभर मुलं माझ्याबरोबर निघालेली होती-ते सगळे आमच्या भोवती गोळा झाले. बैरागी मला व महात्माजींना शिव्या घालतच होते.

घरातून बाहेर निघतांना माझ्या हातात एक दंडा असे. ४० तोळे वजनाचा चंदनाचा हा दंडा होता. माझा एक आवडता विद्यार्थी दंडा सांभाळून नेत असे. त्याचं नाव होतं बालाजी पटेल. मी त्याचं नाव घेऊन लौकर माझा दंडा इकडे आणून दे, असं सांगितलं-बैरागी म्हणाले-दंड्याची भीती कुणाला दाखवतोस? मी म्हणालो-भीती दाखवत नाही. तुम्हाला चांगला चोपच देतो. एवढ्यात दंड्यानं मारणार नाही, आधी हातानं प्रसाद देतो. त्यांच्यातला जो सर्वांत जाडाजुडा व ताकदवान वाटत होता व जो नकली पंडीत म्हणून वावरत होता, त्याचा गळा मी पकडला. मानेला हात घालून त्याला गचांडी देऊन वर

उचललं व म्हणालो–म्हणा–' महात्मा गांधी की जय! ' जेव्हा सर्वांनी मी त्याला किती सहजतेनं वर उचलून धरलं आहे, हे बघितलं तेव्हा ते घाबरले. मी म्हणालो–जयजयकार कर, नाहीतर जमिनीवर लोळवून तुझं नाक जमिनीवर रगडून काढीन आणि ' जय ' म्हणायला लावीन. हातावर लटकलेल्या अवस्थेतच त्यांना सरळपणे ' गांधीजी की जय ' हे शब्द काढले. त्यापूर्वी मुलांनी माझं क्रांतिकारी माणसाचं उग्र रूप कधीच बघितलेलं नव्हतं. ते मला अत्यंत प्रेमळ स्वभावाचा समजत होते. त्यांना हेही माहित होतं की महात्मा गांधींचा सत्य-अहिंसेचा विचार मला पटत नाही. दृष्टीकोण भिन्न असूनही, माझ्या मनात महात्मा गांधीजींविषयी किती आदर भरलेला होता, ह्याची कुणालाच कल्पना नव्हती.

## माळ्याच्या मिशा

एका सुट्टीच्या दिवशी मुलांना घेऊन मी एका खेड्यात गेलो. गावच्या लगत एक मोठा बगीचा होता. बगीच्यात पाण्याची मोठी विहीर होती. विहीर पायऱ्यांची होती. उन्हाळ्याचे दिवस होते. मुलं विहिरीत स्नानासाठी उतरली. थोड्या वेळात बाग करणारा माळी तिथं येऊन पोचला. तो आरडा-ओरडा करून मुलांना म्हणाला-चला ! विहिरीतून बाहेर निघा-नाही तर पिटून काढीन. त्याचं असं बोलणं आणि दरडावणं भुताला आमंत्रण देण्यासारखंच होतं. मुलं अतिशय चिडली. मी माळी बाबाला समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. मी म्हणालो-हे बघा ! मी या बागेच्या मालकाला चांगला ओळखतो–त्यांना तुम्ही जाऊन सांगा की स्वामीजी आणि त्यांचे विद्यार्थी विहिरीत स्नानासाठी उतरले आहेत. माझं काहीच ऐकून न घेता त्यानं मुलांना शिवी हासडली. समोरच्या मुलापैकी एकानं त्यालाही शिवी दिली तेव्हा त्यानं जवळची कुऱ्हाड हातात घेतली तो मुलगा घाबरून मागे सरला. दुसऱ्या मुलाच्या डोक्यात कुऱ्हाड हाणण्यासाठी तो जेव्हा पुढे सरसावला तेव्हा मी त्याच्या दिशेनं झेप घेतली-त्याच्या पुढ्यात येऊन मी दोन्ही हातांनी त्याच्या मोठमोठ्या मिशा मुठीत पकडून ठेवल्या. मिशा जोरात ओढून मी त्याला म्हणालो आधी कुऱ्हाड हातातून खाली फेक-नाहीतर तुझ्या मिशा उपटून हातात ठेवतो. मी खरोखरच मिशा उपटून काढीन या भीतीनं त्यानं कुऱ्हाड हातातून टाकून दिली. अशा गंमती-जमती अनेकदा घडल्या.

## माझ्या अहिंसा-वृत्तीची परीक्षा

१९४० चा सुमार होता. एका खेडेगावात मी कँप लावला होता. शेतात राहुट्या ठोकल्या होत्या. पाण्याचं अत्यंत दुर्भिक्ष्य होतं. जवळपासच्या शेतात ज्या विहिरी होत्या मुलं तिथं स्नानासाठी जात. सकाळची ११ ची वेळ होती. कडक उन्ह पडलं होतं. एके दिवशी मी मुलांना विहिरीवर स्नानासाठी पुरेसं पाणी मिळतं किंवा नाही, हे बघण्यासाठी तिकडे निघालो. आमचा कँप होता–त्याच्या जवळच एक मोठा बगीचा

होता. बगीच्यात विहिर होती. त्या विहिरीवरच मुलं जात होती. तो बगीचा एका साधूच्या मालकीचा होता. त्या साधूनं मुलांना स्नानाला येण्यासाठी कधीच मज्जाव केला नाही. त्या दिवशी त्याचं काय बिनसलं, कुणास माहीत, पण त्यानं मुलांना दर-डावून बगीच्याबाहेर पिटाळून लावलं. उन्हं तापत चालली होती. मुलांना खूप तहान लागली होती. तहानेनं ती व्याकुळ झाली होती. कँप जिथं होता त्या ठिकाणा व्यतिरिक्त कुठंच पिण्याच्या पाण्याची सोय नव्हती. काही मुलं छोट्या वयाची होती– तहानेनं ती फारच व्याकूळ झाली होती तिथून परत निघाली. मी त्यांना परत जाऊ न देता, त्यांना घेऊन बागेत शिरलो. मुलांना म्हणालो की पाणी काढून प्या व स्नानंही करा. मुलं जेव्हा विहिरीवर चढली तेव्हा साधूनं आरडाओरड सुरू केली. त्यानं मुलाच्या हातातून पोहरा हिसकावून घेतला. तो त्यांना पाणी पिऊ देईना. मी साधूला नम्रपणे विनंती केली की मुलं तहानेनं व्याकुळ झालेली आहेत. त्यांना पाणी पिऊ द्या. परंतु तो ऐकेना. मी जाऊन त्याच्या पाया पडलो–तरीही तो आपला हट्ट सोडीना. आता मीही पवित्रा बदलला. साधूच्या गाईचा एक दोर तिथं पडला होता–तो मी हातात घेतला–आणि साधूजवळ येऊन म्हणालो! हे बघा बाबाजी! मी दोरीनं बांधून तुम्हाला या झाडावर लटकावीन. मुलांची स्नानं आटोपेपर्यंत तुम्हाला लटकावून ठेवण्यात येईल. माझी बिघडलेली चर्या साधूनं पाहिली. थोड्यावेळापूर्वी नमस्कार करणारा माणूस आता दोरानं बांधण्याची भाषा करतो, हे त्याच्या लक्षातच येईना. आता साधूला समजलं–माझी ओळख पटली आणि तोच आता माझे पाय धरून म्हणाला–मी विसरलो–मला क्षमा करा ; माझं चुकलं!

• • •

## आश्रमातून बाहेर ३२

आश्रमजीवनात मी अन्य आश्रमवासियांसारखा राहू शकलो नाही. राजकारणासंबंधी विचार करण्याची व कार्य करण्याची माझी पद्धती वेगळी होती, ती मी सोडू शकलो नाही. आश्रम-जीवनाला मी काहीसा उबगलो होतो. माझ्या मनातली कालवा-कालव व्यक्त करण्यासाठी मी एक पत्र लिहून बापूकडे पाठवलं.

सेवाग्राम
१८-१-१९४१

पूज्य बापूजी,

आपल्या आदर्श जीवनानं माझ्या जीवनातही एक फार मोठी क्रांती घडून आली. त्या हेतूनंच मी तुरुंगवास पत्करला. अनेक वर्षांचे जिवलग स्नेही-सोबती सोडले. माझ्याकडे जे श्रद्धेनं बघत होते, त्यांच्या तोंडून निंदा-नालस्ती ऐकावी लागली. हे सारं घडण्याचं कारण म्हणजे आपल्याविषयी माझ्या मनात आत्यंतिक प्रेमादर निर्माण झाला होता. . . . त्या प्रेम रज्जूंनीच मला आतापर्यंत आपल्याकडे बांधून ठेवलं होतं . . . माझ्या मनात देशासंबंधी जे प्रेम आहे, देशासाठी प्राणार्पण करण्याची जी इच्छा मी मनात बाळगलेली आहे, त्याची कुणाला कल्पनाही करता यायची नाही. आपल्यावरील प्रेमामुळे मी आपल्याकडे ओढला जातो आणि देशाचं प्रेम मला दुसरीकडे ओढतं देशाची स्थिती सुधारण्यासाठी मी माझ्या सगळ्या इच्छा आणि कार्य त्याच्यावर केंद्रित करणं मला भाग पाडतं आहे. मी देशाचा एक सच्चा प्रेमिक आहे—देशाच्या स्वातंत्र्य यज्ञात आत्माहुती द्यायला उत्सुक असलेला मी एक पतंग आहे. देशासाठी बलिदान करण्याची माझी इच्छा आहे. आपला देश स्वतंत्र व्हावा यासाठी मी काही न काही करू इच्छितो. मी अनेकवार सेवाग्राम इथं राहण्याचा प्रयत्न करून बघितला परंतु मी राहू शकलो नाही. मला असं वाटतं की मी सेवाग्रामला किंवा वर्ध्याला राहू शकणार नाही. आतापावेतो इथं मी काहीच प्राप्त करू शकलो नाही. भविष्यातही मला तशी आशा वाटत नाही. भीती म्हणजे काय, हे मला ठावूक नाही. आजपर्यंत मी कुठल्या प्राण्याला, मनुष्याला, सत्ताधाऱ्याला, हवा-पाण्याला अथवा आगीला भ्यालेलो नाही. परंतु तुमची मात्र मला भीती वाटते. माझ्याकडून तुम्हाला कसल्याही प्रकारचं दुःख देण्याची माझी हिंमतच नाही. आज माझं मन अतिशय अस्वस्थ आहे. मी हे पत्र अश्रूंनी लिहितो आहे. माझ्या संयमाची आता हद्द झाली. तुरुंगातून सुटका झाल्यानंतर १ वर्ष ४ महिने मी इथं काढले परंतु देशासाठी या काळात मी काहीही केलं नाही. आपल्या दृष्टीनं सुद्धा मी काही करण्याच्या लायकीचा आपणास वाटलो नाही. या दोन्ही गोष्टींवर आज मी

खूप विचार केला. विचार करता करता माझं मन पार ढेपाळून गेलं आहे. माझी ही अवस्था राहिली तर माझ्या मनावर आणि शरीरावर या गोष्टीचा काय परिणाम होईल, हे मी सांगू शकत नाही. माझ्या या अवस्थेवर विचार करून आपण मजवर दया करावी आणि देशकार्य करण्यासाठी मला बाहेर पडण्याची आज्ञा द्यावी. माझं कार्य यशस्वीपणे पार पाडण्यासाठी मला आपल्या मदतीची गरज पडेल. एखाद्या विशिष्ट कारणामुळं आपण मला मदत देऊ शकला नाहीत तर आपण ती देऊ नये—मात्र आपल्या प्रेमाची आणि आशीर्वादाची मी सदैव अपेक्षा करीन.

## महात्माजींचं उत्तर

गांधीजींनी त्याच दिवशी मला उत्तर पाठवलं.

भाई पृथ्वीसिंह,

तुमचं पत्र मी काळजीपूर्वक वाचलं—माझ्याशी बोलायला भ्यायचं कारण काय? मी तुम्हाला इथं जबरदस्तीनं अडवून ठेवू इच्छित नाही. तुम्हाला इथं अतिशय शांत अवस्थेत व मनाला बरं वाटतं असेल तरच राहा—तुमच्या अशा राहण्यानंच मला आनंद वाटेल. परंतु माझं असं मत आहे की, जोपर्यंत आश्रमीय जीवनासंबंधी तुम्हाला मनापासून आत्मियता वाटत नाही, तोपर्यंत तुमचं इथं राहणं निरर्थक आहे. मला असंही वाटतं की ज्या माणसानं भीतीचा त्याग केलेला आहे, त्याला आश्रम-जीवनातून काय बरं मिळणार? यामुळेच तुम्हाला जिथं जावंसं वाटतं व जे कांही कार्य करावंसं वाटतं—याचा तुम्हाला पूर्ण अधिकार आहे. तुम्हाला माझे आशीर्वाद आहेतच. मला खात्री आहे की तुम्ही जिथं जाल व जे काही कार्य हाती घ्याल-त्यात सत्य आणि अहिंसा यांना स्थान असेल. मला पत्र पाठवत जा, तुमचं ठिकाण कळवत जा आणि शक्य झालं तर काय कार्य करत आहात हेही लिहीत चला. जेव्हा केव्हा तुम्हाला इथं यावंसं वाटलं तर अवश्य या. या संदर्भात माझ्याशी तुमची बोलण्याची इच्छा असेल तर अवश्य बोला. चांगल्या मनानं तुम्ही इथून चाललात, तर दुःख कशाचं? मनोधर्मानुसार वागण्यातच सुख आहे.

बापूंचे आशीर्वाद.

पत्र वाचून त्यावर चर्चा करण्यासाठी बापूंनी मला वेळ दिला. त्यांच्याशी विचार-विनिमय करून, आश्रम सोडून मी मुंबईला परत आलो. देशातल्या सामर्थ्यसंपन्न आणि भारावलेल्या तरुणांना देशप्रेमाच्या भावनेनं प्रेरित करून जोपर्यंत कार्याला जुंपणार नाहीत, तोपर्यंत देशाची प्रगती होऊ शकणार नाही, असं माझं ठाम मत होतं. देशाच्या प्रगतीसाठी बलशाली माणसांची गरज आहे—बापूंना हे मान्य नव्हतं. उलट त्यांचं मत असं होतं की हातात शस्त्र असलं की हिंसाचाराची प्रवृत्ती होते. यावर बोलताना एकवेळ मी त्यांना म्हणालो की मी दररोज ५०० दंड-बैठका काढतो—माझी ताकद एवढी आहे की साध्या हातांनी देखील मी

कुणावर प्रहार केला तर तो प्राणघातक ठरू शकतो. माझ्या मतगटात अशी शक्ती बाळगण्याचा, मला अधिकार नाही का? यावर बापूंचं उत्तर होतं—होय. मला याची आवश्यकता वाटत नाही. बापूंची ही विचारसरणी मला मान्य नव्हती—म्हणूनच मी मुंबईला रवाना झालो.

## अहिंसक व्यायाम संघ

मुंबईला माझ्या विश्वासू स्नेह्यांच्या मदतीनं मी एक युवक-आंदोलन सुरू केलं. या आंदोलनाचा एक भाग म्हणजे अनेक व्यायामशाळा सुरू करून, तरुणांना संघटित करून, त्यांना देशकार्याला उद्युक्त करायचं. मुंबईच्या वृत्तपत्रांनी माझी कल्पना उचलून धरली व संपूर्ण पाठिंबा दिला. शाळा-कॉलेजांना उन्हाळ्याची सुट्टी होती. शाळा-कॉलेजला शिकणाऱ्या मुला-मुलींसाठी मी एक कॅम्प आयोजित केला, तशी घोषणा केली. १,२०० मुला-मुलींनी कॅम्पसाठी नावं दिली. यात मुलींची संख्या १५० होती. १०–१२ वयोगटातील १०० मुलं होती—बाकीचे सर्व मोठ्या वयाचे होते.

या सुमारास देशातलं वातावरण उत्साहानं भरलं होतं. मुंबईच्या धनिकांची पुष्कळशी मुलं कॅम्पमध्ये दाखल झाली होती. वृत्तपत्रांतून दररोज कॅम्पमधल्या घडामोडी प्रकाशित होत होत्या. कॅम्प एक महिना चालणार होता. रविवारच्या दिवशी १,२०० मुलांच्या व्यायामाच्या कसरती बघण्यास हजारो नागरिक तिथं यायचे. कॅम्प किती सुंदर रीतीनं चाललेला आहे ही बातमी बापूंच्या कानावर गेली तेव्हा त्यांना या संबंधीची सविस्तर माहिती कळवावी, अशी इच्छा त्यांनी प्रगट केली. त्यांनी श्री. महादेवभाई देसाई, श्री. किशोरीलाल मश्रुवाला व श्री. जे. बी. कृपलानी, ह्या तिघांना कॅम्प बघायला पाठवून दिलं. कॅम्पचं वातावरण खूपच उत्साहजनक होतं. त्यांनी परत गेल्यानंतर महात्माजींना सांगितलं की पृथ्वीसिंहाचा हा उपक्रम स्तुत्य आहे. कॅम्प संपल्यानंतर बापूंना भेटायला गेलो तेव्हा व्यायामासंबंधीचं आंदोलन कसं यशस्वी ठरलेलं आहे यासंबंधी त्यांच्याशी माझी चर्चा झाली. माझ्या आंदोलनाला बापूंचे आशीर्वाद मिळाले आणि 'अहिंसक व्यायाम संघ' या नावाची संस्था स्थापन करण्यात आली. संस्थेचे कार्यकारी मंडळही बनवण्यात आलं. मुंबईच्या मालाड या उपनगरात सात एकरांचा एक बगीचा होता—त्यात एक इमारतही होती. संस्थेच्या कार्यालयासाठी ही इमारत ३०० रु. महिन्याच्या भाड्याने पाच वर्षांसाठी घेण्यात आली. सबंध भारतातून १०० तरुण निवडायचे व त्यांना शिक्षण देऊन त्यांना सामाजिक कार्याला लावायचं, हे या संस्थेचं उद्दिष्ट होतं. १०० मुलांची निवड करण्यासाठी मी सबंध भारताचा दौरा केला. १०० ऐवजी केवळ ४५ मुलंच मला योग्य आढळली. कॉलेजमध्ये शिक्षण घेणाऱ्या तरुणांना अहिंसा तत्त्वाचं फारसं आकर्षण नव्हतं. 'अहिंसक व्यायाम संघात' प्रवेश घेऊन आपला काहीच लाभ होणार नाही—असंच त्यांना वाटत होतं. ज्या ४५ तरुणांची निवड केली होती, त्यांच्याशी व्यक्तिगत संपर्क निर्माण

झाल्यानंतर त्यातल्या १० जणांना मला परत पाठवावं लागलं. महात्माजींची विचारसरणी ज्यांना मान्य होती असे काही मित्र माझ्या कार्यात सहभागी झाले. पैशांची मदत लागे, तेव्हा मी घनश्यामदासजी बिर्ला यांच्याकडे गेलो. त्यांच्याकडून उत्तर मिळालं की, तुम्हाला मदत करा अशी बापूंची चिठ्ठी तुम्ही आणलीत तर मी तुम्हाला हवे तेवढे पैसे देईन. मी त्यांना म्हणालो की पैसा देशातल्या मुलांना बलवान बनविण्यासाठी हवा आहे, बापूंना द्यायचा नाही. एके दिवशी त्यांचे थोरले बंधु श्री. रामेश्वरदास बिर्ला संस्थेला भेट द्यायला आले आणि जाते वेळी रु. १२,००० चा चेक देऊन गेले. अनेक मित्रांनीही आर्थिक मदत केली. ३,००० रुपये महिना असा आमचा खर्च होता—तो भागवायला कुठलीच अडचण पडली नाही. अशा पद्धतीनं संस्थेचं कार्य उत्तम प्रकारे चाललं आहे तेव्हा मग श्री. घनश्यामदास बिर्ला यांनी संस्थेच्या सर्व खर्चाची जबाबदारी उचलली.

सन १९४२ चा सुमार होता. महायुद्ध जोरात चालू होतं. जर्मनी आणि जपानची सरशी होत होती. याचा मित्रांनी धसका घेतला होता. जपान एका पाठोपाठ एक देश काबीज करत पुढे निघाला होता. जर्मन सैन्य रशियात पाय घट्ट रोवून उभं होतं. अशा अवस्थेत, काँग्रेसपक्ष महात्मा गांधींच्या नेतृत्वाखाली 'भारत छोडो' आंदोलन उभं करण्याची योजना आखत होता. इंग्रज सरकार कुठलातरी समाधानकारक तोडगा काढून भारतीयांचा पाठिंबा मिळविण्याच्या प्रयत्नात होतं. ह्याच सुमारास सिंगापूर आणि मलाया येथे हजारो भारतीय बंदिवान सैनिकांच्या मदतीनं रासबिहारी बोस, जनरल मोहनसिंग तसेच सुभाषचन्द्र बोस यांच्या नेतृत्वाखाली आझाद हिंद सेनेची स्थापना करण्यात आली. या सैन्याला आघाडीवर ठेवून, जपानी लोक भारतावर हल्ला करण्याची तयारी करत होते. यावेळी बारडोली येथे गुजरात काँग्रेस कार्यकारिणीची बैठक झाली. या बैठकीत इंग्रज सरकारनं भारत स्वतंत्र केला तर भारतानं जपान्यांचा सशस्त्र मुकाबला करायचा किंवा नाही, या विषयावर चर्चा झाली. महात्माजींच्या उपस्थितीत ठराव बहुमताने संमत करण्यात आला की जर इंग्रज सरकारनं भारताला स्वतंत्र केलं तर मग भारतानं शस्त्रबळानं जपानला तोंड द्यावं-- जपानी आक्रमणाचा प्रतिकार करावा. आधीपासूनच मी हे ठरवलं होतं की बैठक संपल्यावर आपण बापूंशी या विषयावर चर्चा करावी. बापूंनी मला सरळच विचारलं—तुम्ही या ठरावाशी सहमत आहात काय ? हिंसेचा अवलंब करून, तुम्ही हाती शस्त्र घेऊन जपान्यांशी सामना करायला तयार आहात काय? मी मोठ्या गंभीरपणानं उत्तर दिलं की मी हिंसा-अहिंसा या विषयावर चर्चा करू इच्छित नाही. मी एवढंच जाणतो माझ्यापेक्षा आपली विचार करण्याची शक्ती मोठी आहे—या श्रद्धेनंच मी आपल्याकडे बघतो. जोपर्यंत आपला माझ्यावर विश्वास कायम राहील—तोपर्यंत मी आपल्या पावलावर पाऊल ठेवून चालेन. दुर्दैवानं आपला माझ्यावरील विश्वास उडाला तर मग मी वेगळ्या मार्गानं निघेन—आपले मार्ग निराळे होतील. या गोष्टीवर आणखी चर्चेची गरज नव्हती. गोष्ट इथंच संपली.

जपाननं बर्मा काबीज करून, इम्फाळच्या घाटातून निघून भारतावर हल्ला करण्याची योजना बनवली होती. हिन्दुस्थानातील लहान मुलांना देखील इंग्रज जपान्यांच्या हल्ल्यापुढं उभे राहू शकणार नाहीत, हे समजत होतं. अशा सुमारास कॉंग्रेसनं 'भारत छोडो' आंदोलनाची तयारी केली होती. महात्मा गांधी अतिशय गंभीरपणानं या आंदोलनाच्या प्रत्येक टप्प्याचा खोलवर विचार करत होते. या दरम्यान काही कामानिमित्त ते मुंबईला आले. मी त्यांना भेटायला गेलो. त्यांच्याशी चर्चाही झाली. बापूजी मला म्हणाले— माझ्या आयुष्यातली ही शेवटची लढाई आहे. माझी मनापासून अशी इच्छा आहे की, तुम्ही सावलीप्रमाणं माझ्याबरोबर राहावं. माझा तुमच्यावर संपूर्ण विश्वास आहे–सत्य आणि अहिंसेचा संपूर्ण स्वीकार करून माझं अर्धवट राहिलेलं कार्य तुम्ही पूर्ण करू शकाल, अशीही मला खात्री आहे. मला आदेश मिळाला की मालाडला मी जी संस्था चालवतो, ती वर्धा इथं हलवा. यासंबंधी आवश्यक ती व्यवस्था करण्याबद्दल सरदार वल्लभभाई पटेल यांनाही सांगण्यात आलं. बापूजींच्या मनात कुठल्या प्रकारचा संघर्ष चालू होता, एका महान कार्याच्या पूर्ततेसाठी ते मला कशा रीतीनं तयार करत होते–ह्या गोष्टी ध्यानात येताच मी आपल्या भावी कार्यासंबंधी विचार करू लागलो. दोन दिवस बापूजींशी मी विस्तारानं चर्चा केली— यानंतर बापूजींची काय इच्छा आहे व ते काय करू इच्छितात, ह्या गोष्टी स्पष्टपणे मला समजल्या. 'भारत छोडो' आंदोलनाचा संपूर्ण आराखडा त्यांच्या डोक्यात तयार झाला. त्याची थोडीशी रूपरेषा मला समजली. यावरून माझी एवढीच समजूत झाली की गांधींजींना इंग्रजांनी भारत सोडून देऊन निघून जावं, असं वाटत होतं. अमेरिकेची मदत घेऊन इंग्रज जपानचा मुकाबला करण्याच्या प्रयत्नात होते. त्यावेळी भारत सोडून निघून जाण्याची कल्पना त्यांच्या स्वप्नात देखील नव्हती. बापूंच्या डोक्यात युद्धाची व्यूहरचना अशा प्रकारची होती की भारत यांनी इंग्रजांची मदत करायची नाही आणि जपान्यांच्या विरुद्ध शस्त्र घेऊन उभं राहायचं नाही. माझ्या क्रांतिकारक मनाला त्यांच्या ह्या उद्दिष्टकोणाशी सहमत होता आले नाही. मी विचार करत होतो की इंग्रजांना जर हिंदी लोकांचं साहाय्य मिळालं नाही आणि जपान्यांना आपण विरोध केला नाही तर त्यांचा मार्ग निष्कंटक बनेल आणि एकदा का जपानचे लोक इथं शिरले तर मग त्यांना बाहेर काढणं अशक्य होऊन बसेल. लाखोंच्या संख्येत जपानी इथं आले असते तर येथल्या निःशस्त्र जनतेला त्यांच्याशी संघर्ष करून त्यांना परत पाठवण्याचा विचार सोडून द्यावा लागला असता.

इंग्रज सरकारनं भारतीयांवर अनन्वित अत्याचार केले होते. परंतु इंग्रज राजवट भारतात, भारतीयांच्या साहाय्यानंच स्थिर झालेली आहे. ही वस्तुस्थिती मला स्पष्ट दिसत होती. ही मदत मिळाली नाही तर मग ते अधिक काळ इथं टिकाव धरू शकणार नाहीत. माझ्या देशबांधवांनी इंग्रजांना साहाय्य करून जपान्यांचं आक्रमण जर थोपवलं नाही तर देश वाचू शकणार नाही—हे स्पष्टपणे दिसत होतं.

बापूजींशी माझं इतरही बोलणं झालं. त्यांचे हे विचार देखील मला पटले नाहीत—मी त्यांच्याशी सहमत होऊ शकलो नाही. देशातल्या जनतेनं बापूजींचे विचार मान्य केले तर देश उध्वस्त होईल, हे मला स्पष्टपणे जाणवत होतं. बापूजींच्या राजकीय विचारांवरील माझा विश्वास पुरेपूर उडाला. या प्रकाराचा मला अत्यंत खेद झाला. आपण काय करावं आणि बापूजींना काय मागावं, ह्याचा मी विचार करू लागलो. बापूजी दुसरे दिवशी माझ्या इकडची संस्था बघायला येणार होते. वर्तमानपत्रांत ही बातमी झळकली होती. संस्थेतील युवक आणि शिक्षक प्रदर्शनाची जंगी तयारी करीत होते. श्री. केदारनाथजी अहिंसक व्यायाम संघाचे उपाध्यक्ष होते आणि माझे निकटचे मित्र होते. महात्माजीही त्यांच्याकडे आदराने बघत होते. मी त्यांची भेट घेतली आणि माझ्या मनातली खंत त्यांना बोलून दाखवली. मी स्पष्टच शब्दांत सांगितलं की गांधीजींच्या नेतृत्वावर आता माझा विश्वास राहिलेला नाही. त्यांच्याशी सहकार्य करणं किंवा राजकीय क्षेत्रात त्यांचा अनुयायी बनून यापुढे काम करणं मला जमणार नाही. उद्या जेव्हा महात्माजी संस्थेला भेट देतील तेव्हा तुम्हीच त्यांचं स्वागत करा. मी कार्यक्रमाला उपस्थित राहीन—मात्र मी त्यांच्या स्वागतात सहभागी होणार नाही. माझं बोलणं ऐकून श्री. केदारनाथजी सुन्न होऊन गेले.

दुसऱ्या दिवशी बापू संस्था बघायला आले. श्री. महादेवभाई देसाई, श्री. घनश्यामदास बिर्ला व सरदार पटेल त्यांच्या समवेत होते. त्यांनी संस्था बघितली तसेच मुलांच्या व्यायामाच्या कसरतीही बघितल्या. सर्वांनी समाधान व्यक्त केलं व बापूंनी सरदार पटेलांना ही संस्था वर्ध्याला हलविण्याची व्यवस्था करायला सांगितलं. श्री. केदारनाथजी त्यांच्या समवेतच बिर्लाभवन येथे गेले. त्यांनी बापूंना सांगितलं की तुम्ही तीन दिवस पृथ्वीसिंहा बरोबर चर्चा केली, त्या चर्चेचं फलित म्हणजे तुमच्या राजकीय नेतृत्वावरचा त्यांचा विश्वास उडाला आहे. अहिंसक व्यायाम संघ सोडून ते निघून जाऊ इच्छितात. हे ऐकून बापूंना खूप वाईट वाटलं. केदारनाथजींना त्यांनी सांगितलं की मला तिथं बोलावून घ्या—माझ्या मनातला संघर्ष ते जाणून घेऊ इच्छितात. केदारनाथजींनी हा निरोप मला सांगितला तेव्हा मी त्यांना म्हणालो की मी बापूंच्याकडे जायला काहीच हरकत नाही —मात्र मी आता त्यांचा एक श्रद्धाळू अनुयायी म्हणून जाऊ शकणार नाही. मी बिर्लाभवन येथे बापूंच्या भेटीसाठी गेलो. बापूंनी हसऱ्या मुद्रेनं मला विचारलं—तुम्हाला काय झालं? मी गंभीरपणानं उत्तर दिलं की माझ्याजवळ प्रमाण म्हणून सांगण्यासारखं काही नाही. मी श्रद्धेनं वाटचाल करत होतो आणि आपल्यातच केवळ माझं मार्गदर्शन करण्याचं सामर्थ्य आहे, अशी माझी श्रध्दा होती. आज माझ्या मनातल्या विश्वासालाच तडा गेला आहे. तेव्हा मी एखाद्या आज्ञाधारक अनुयायांप्रमाणं तुमचं अनुसरण करू शकत नाही. हे ऐकून बापूजी म्हणाले, ठीक आहे ! माझ्यावर विश्वास नका ठेवू—अहिंसेच्या तत्वज्ञानावर तर तुमचा विश्वास आहे ? मी म्हणालो अहिंसेचं तत्वज्ञान मला, तेव्हाही नीट समजलं नव्हतं, आताही मला ते कळलेलं नाही. ह्याचंच योग्य शिक्षण मिळावं या हेतूनेच तर मी आपल्याकडे आलो

होतो. आम्ही बराच वेळ बोलत होतो. माझा विचार ठरला होता. त्यात आता बदल होणार नव्हता. बापूंनी व्यायामशाळेतील सर्व विद्यार्थ्यांना आणि कार्यकर्त्यांना बोलावून घेतलं–तुम्हीच आता संस्था चालवण्याचं कार्य हाती घ्या, असं बापूंनी त्यांना सांगितलं. जर तुम्हाला शक्य झालं तर पृथ्वीसिंहांनी आपला विचार बदलावा असा प्रयत्न करा. संस्थेच्या विद्यार्थ्यांनी महात्माजींना स्पष्टपणे सांगितलं की पृथ्वीसिंहाशिवाय इतर कुणीही व्यक्ती ही संस्था चालवू शकणार नाही. आम्ही सर्वजण त्यांच्या हाताखाली शिक्षण घ्यायला इथं आलो आहोत. बापूजींनी मला समजावण्याचा खूप प्रयत्न केला. ते मला एवढं देखील म्हणाले की तुमचा माझ्यावर विश्वास नसो, किंवा अहिंसेवरही विश्वास नसला तरी संस्था बंद करू नका. संस्था चालवित चालवितच विचार करत राहा. मी माझा हट्ट सोडला नाही. माझ्या मनात एकच गोष्ट होती की देशातील तरुणांना प्रेरणा द्यायची, त्यांच्या मनात देशप्रेमाची भावना निर्माण करायची. श्री. किशोरीलाल मश्रुवाला यांनीही मी वर्ध्याला जाऊन बापूंची परत भेट घ्यावी, असा प्रयत्न केला. माझ्यावर काहीच परिणाम झाला नाही. मी भेटायला गेलो नाही. यासंदर्भात मी जेव्हा संघाचा त्याग करू लागलो, तेव्हा काही साथीदारांनी मला जे पत्र लिहिलं––त्याचाही उल्लेख करणे योग्य होईल. त्यांचं पत्र पुढील आशयाचं होतं––

अहिंसक व्यायाम संघ,
रामबाग, मालाड.
शनिवार, १६-२-१९४२.

आदरणीय सरदारजी,

सादर प्रणाम,

काल रोजी आपण आपला जो दृढनिश्चय आमच्यासमोर व्यक्त केला–त्याचा आमच्यावर फार मोठा आघात झाला आहे. हा आघात शब्दांद्वारे प्रकट करणं आम्हाला शक्यतेतलं नाही. आपल्या निर्णयानं आम्हाला मनोमन व्यथित केलं. आम्ही आपले साथी आहोत-साथी राहू इच्छितो. भारताच्या उद्धाराचं जे महान कार्य आपण हाती घेतलं आहे–त्यासाठी सर्व शक्ती पणाला लावायची आमची इच्छा आहे. अशा वेळी आपण आम्हाला सोडून निघालात, शरीर आणि मनानंही आमच्यापासून दूर चाललात, ही आमच्या दृष्टीनं अत्यंत दुःखाची गोष्ट आहे.

जगातल्या एका सर्वश्रेष्ठ व्यक्तीच्या जीवनाशी तुमचे जीवनधागे जुळले होते, हे बघून आम्हाला किती आनंद झाला होता ? आता चार दिवसांपूर्वीच आपण जेव्हा आम्हाला हे सांगितलं की गांधीजी तुम्हाला त्यांच्या निकट बोलावून आपला वारस व विश्वस्त बनवू इच्छितात, त्यांच्या महान कार्याची जबाबदारी ते तुमच्यावर सोपवू इच्छितात, हे ऐकून आमच्या मनात आनंदाच्या लहरी उचंबळल्या. अशा सुखात आम्ही डुबत असतानाच तुम्ही जेव्हा गांधीजींपासून, संघाच्या कार्यापासून अलग व्हायचा निर्णय घेतला, तेव्हा आमची मनं दुःखानं काळवंडून गेली.

गांधीजींच्या शब्दांनी किंवा त्यांच्या वागणुकीनं तुमच्या मनावर जबरदस्त आघात केला, यात मुळीच शंका नाही. विशेषतः आर्थिक बाबतीत तुम्हाला त्यांनी सुनावलं, हे खरोखरच दुःखदायक आहे. या सर्व गोष्टींना श्री. मनुभाई वगळता, आम्ही सर्वजणच जबाबदार आहोत—यामुळं तर अधिकच दुःख होतं. आम्हाला जे वेतन मिळतं ते सर्वसाधारणपणं इतरांना मिळतं, तेवढंच आहे. गांधीजींच्या त्यागी वृत्तीला आमचं वेतन खूपच अधिक वाटणं स्वाभाविकच म्हटलं पाहिजे. यामुळे तुम्हाला ते कठोरपणे बोलले, ह्याचं खूप वाईट वाटतं. आमची सर्वांची अशी इच्छा आहे की आमच्यापैकी ज्यांची त्यागाची तयारी नाही अशांना वगळून संस्थेचा उच्च आदर्श कायम राखावा. त्यागाची काही एक कसोटी ठरवून आपण आमचे वेतन ठरवावे—तेवढ्यात ज्यांचं भागण्यासारखं नसेल त्यांनी संघाच्या सेवेतून बाहेर पडावं—असं करणंच न्यायाला धरून होईल. आमच्या दुबळेपणामुळं तुम्ही गांधीजींची साथ सोडणं किंवा संघामधून बाहेर पडणं योग्य ठरणार नाही. आमच्यामुळं तुम्ही तडजोड सुद्धा करण्याचं कारण नाही.

आमची सर्वांची हीच हार्दिक इच्छा आहे की आपण गांधीजींसमवेत राहावं—दोघांमुळं कार्याला प्रचंड शक्ती लाभेल आणि त्यामुळं भारताचं उद्दिष्ट लौकर साध्य होईल. परंतु आपल्या बोलण्यावरून असं दिसतं की गांधीजींशी संबंध ठेवण्यानं तुम्हाला दडपण आल्यासारखं वाटतं—आम्हाला हेही मान्य आहे की गांधीजींनी तुम्हाला कडक शब्दात काही सांगितलं असेल—परंतु ते प्रेमातूनच तुम्हाला तसं बोलले असावेत. आमच्यावरील प्रेमामुळं तुम्ही कधीकधी आम्हालाही कडक शब्दात काही गोष्टी सुनावता. तुमची भाषा कडक असली तरी त्यापाठीमागचं तुमचं मन प्रेमळ आहे, ह्याची आम्हाला खात्री असते म्हणूनच तुमच्या बोलण्यावर आम्ही कधी चिडत, संतापत नाही. स्वतःचे दोष दूर सारण्याचेच प्रयत्न करतो. याप्रकारे गांधीजींच्या मनात तुमच्याविषयी प्रेम आणि उत्कट श्रद्धा असल्यामुळे त्यांनी थोडी कडक भाषा वापरली असली तरी त्यानं आपण व्यथित व्हायचं कारण नाही.

गांधीजींसमवेत काम करणं तुम्हाला जर अशक्यच वाटत असेल तर तुम्ही त्यांच्याशी पूर्ववत संबंध ठेवलेच पाहिजेत, असा आमचा आग्रह नाही. आणि समजा तुम्हाला संबंध तोडायचेच असतील तर ते अशा रीतीनं तोडा की कार्याला त्याची झळ लागू नये. गांधीजींना वाईट वाटू नये, लोकांच्यामध्ये हसं होऊ नये व आम्हालाही ते दुःखदायक ठरू नये. आम्हालाही मदत करणं शक्य होईल, असा एखादा मार्ग आपणच शोधून काढावा. आपलं कार्य स्वतंत्रपणे चालू राहावं आणि गांधीजींचे संबंधही पूर्वीसारखे घनिष्ठ राहावे. आर्थिक प्रश्नामुळेच ह्या सर्व बाबी निर्माण झाल्या असतील तर आधी सुचविल्याप्रमाणे आमचे पगार वगैरे कमी करून आपण मार्ग काढावा किंवा गांधीजींना आर्थिक जबाबदारीतून मुक्त करून ती सर्व जबाबदारी आपण स्वीकारावी. आमची वृत्ती त्यागी नाही म्हणून तुम्ही गांधीजींचा साथ सोडणं आम्हाला अजिबात मान्य नाही.

आपण अन्य काही कारणानं हे कार्य सोडण्याचं ठरवलं असेल तर मात्र आम्ही आपणास अडवू इच्छित नाहीत. आपल्या निघून जाण्यानं आम्हाला वाईट वाटणारच. आपल्या व्यक्तिमत्त्वाच्या स्वतंत्र विकासासाठी आपणास गांधीजींपासून अलग होणं आवश्यक असलं तरी त्यासाठी एवढी घाई करण्याची काही गरज आहे, असं आम्हाला वाटत नाही. आपण टप्प्या-टप्प्यानं ही गोष्ट करू शकता. हे कसं घडवून आणता येईल, यासाठीही आम्ही तुम्हाला अवश्य मदत करू.

भारतभूमीचं ज्यात कल्याण आहे—तेच झालं पाहिजे, राग-लोभ, मानापमान यांना बाजूस सारून आपण भारताचं हित ज्यात आहे, त्याच गोष्टीचा अवलंब कराल, अशीच आमची आपल्याकडून अपेक्षा आहे.

अशा प्रसंगी कसं वागावं, हे आम्हाला कळत नाही. परंतु आपल्या सहवासात राह्यला मिळावं—ही आमची उत्कट इच्छा आहे. आपल्या महान कार्यात आमचीही आपणास काही मदत झाली तर त्यातून आमचा आत्मविकासच घडून येईल.

आमच्यापैकी एकानंच हे पत्र लिहिलेलं असलं तरी या पत्रातून आमची सर्वांचीच भावना व्यक्त झाली आहे.

परमेश्वराजवळ शेवटी आम्ही एवढीच प्रार्थना करतो की आपले आणि गांधीजींचे संबंध अबाधित राहावेत—आपल्या दोघांच्या बळामुळं भारताच्या स्वातंत्र्याचा मार्ग अधिक सुकर बनो.

आणखी काय लिहिणार ?

आपले विश्वासू सहकारी,

१. गोपाळराव कुळकर्णी
२. श्री. रा. जोग
३. मनुभाई बदजी
४. प्रल्हाद वैद्य
५. मदनमोहन सिन्हा
६. श्यामजी जमोड.

## भावनगरच्या राजाचं सहकार्य

कम्युनिस्ट नेत्यांशीही माझे मतभेद झाले होते. त्यांच माझं जुळण्याची शक्यता राहिली नव्हती. महात्माजींपासून अलग झाल्यामुळे काँग्रेसच्या नेत्यांशी संबंध राहण्याचं कारण नव्हतं. अशा परिस्थितीत भावनगरला जाण्यावाचून मला अन्य गत्यंतर नव्हतं. म्हणून मी भावनगरला गेलो व तिथल्या महाराजांची—श्री. कृष्णकुमारसिंहजींची भेट घेतली.

ज्या काही घटना घडल्या होत्या, त्या मी त्यांच्या कानावर घातल्या व भावनगरला वास्तव्य करून गोहिलवाडच्या तरुणांची सेवा करायची इच्छा आहे, असं त्यांना सांगितलं. महाराज मोठ्या विश्वासानं व प्रेमानं माझ्याकडे बघत होते. माझी विनंती त्यांनी मान्य केली. एका मोठ्या व्यायामशाळेच्या स्थापनेची योजना आखण्यात आली. शहराच्या मध्यवर्ती ठिकाणी व्यायामशाळेसाठी प्रशस्त जमीन देण्यात आली आणि योजनेसाठी तीन लाख रुपये मंजूर करण्यात आले. भावनगर संस्थानच्या चीफ इंजिनिअरला बोलावून त्यांना व्यायामशाळेचं मॉडेल आणि नकाशे तयार करायला सांगण्यात आलं.

'भारत छोडो' आंदोलनानं चांगलाच जोर पकडला होता. सगळ्या नेत्यांना अटक करून तुरुंगात ठेवण्यात आलं होतं. जे तरुण नेते अद्याप मोकळे होते ते त्यांच्या मनाप्रमाणं कार्यक्रम पार पाडत होते. जे तरुण मोकळेपणानं आंदोलनात सहभागी होत होते ते मला भेटत होते व अनेक गोष्टींवर माझ्याशी चर्चाही करत होते. कम्युनिस्ट पार्टीशी संबंध असणाऱ्या लोकांचा या आंदोलनाला विरोध होता.

भावनगर संस्थानात सर प्रभाशंकर पट्टणी यांचे चिरंजीव श्री. अनंतराय पट्टणी हे दिवाण होते. त्या सुमारास संस्थानातील कोणतीही गोष्ट श्री. दिवाण यांच्या अनुमतीशिवाय होत नसे. व्यायामशाळेच्या स्थापनेची ही योजना महाराजांच्या आज्ञेनं तयार करण्यात आली, त्यासाठी श्री. दिवाण यांची पूर्वसंमती घेण्यात आली नव्हती. यामुळं मी दिवाणसाहेबांच्या डोळ्यात खुपू लागलो. मी महाराजांच्यावर स्वतःचा प्रभाव पाडण्यात यशस्वी झालो आहे, असं त्यांनी अनुमान केलं. आपल्या पदालाही उद्या हा सुरुंग लावील, असा त्यांना संशय आला. दुसऱ्या दिवशी सकाळी दहा वाजता व्यायामशाळेची कोनशिला बसवण्याचा कार्यक्रम व्हायचा होता, त्यापूर्वी मला अटक करण्याचं कारस्थान शिजलं.

## माझी अटक

इंग्रज सरकारच्या दृष्टीनं मी अत्यंत धोकादायक म्हणून मानला गेलो होतो. श्री. अनंतराय पट्टणी यांनी इंग्रज अधिकाऱ्यांचे कान फुंकले. 'भारत छोडो' आंदोलनात माझा हात आहे व आंदोलन उग्र स्वरूप धारण करणार आहे, हे त्यांनी इंग्रजांना सांगितलं. रात्री दोन वाजता १५० पोलिसांनी मी ज्या घरात राहत होतो—त्या घराला वेढा

घातला. पोलिस अधिकाऱ्यांनी पिस्तुलाचा धाक दाखवून मला ताब्यात घेतलं. पोलिसचे काही अधिकारी माझ्यावर पिस्तूल रोखूनच माझ्यासमवेत लॉरीत बसले. दोन लॉऱ्या भरून पोलिस आमच्या बरोबर होते. भावनगरपासून तीस मैल दूर पोचल्या-नंतर त्यांनी मला दुसऱ्या गाडीत बसवलं–आणि राजकोट(सौराष्ट्र) येथील तुरुंगात मला डांबून ठेवलं. फाशीची शिक्षा झालेल्या किंवा खुनाबद्दल शिक्षा भोगणाऱ्या कैद्यांना ज्या कोठडीत बंद करतात, तिथं मला ठेवण्यात आलं. हे लोक उद्या मला फासावर लटका-वणार की काय, अशीच मला शंका आली. सकाळ झाली मात्र मला फासावर घेऊन जाण्यासाठी कुणी तिथं आला नाही.

सौराष्ट्रातील कांग्रसचे नेते तिथंच बन्दिवान म्हणून होते. श्री. यू. एन. ढेबर यांनाही जवळच एका बंगल्यात स्थानबद्ध म्हणून ठेवलं होतं. श्री. यू. एन. ढेबर एकवेळ मला भेटायलाही येऊन गेले. चार पहारेकरी हातात नागव्या तलवारी घेऊन माझ्यावर पहारा बजावत होते. त्यांच्या पहाऱ्यात तुरुंगातील दिवस चालले होते. काही दिवसांनंतर मला इथून बाहेर काढून पुण्याजवळील येरवडा तुरुंगात माझी रवानगी करण्यात आली. इथंही मला भयंकर स्वरूपाच्या गुन्हेगारांना ज्या खोल्यात डांबतात, अशाच खोलीत बंद केलं. या खोलीच्या समोरच्या भिंतीची उंची, तुरुंगाच्या भिंती इतकीच होती.

माझा धाकटा भाऊ बर्मासिंह, जपाननं बर्मावर हल्ला केला तेव्हा, तो तिथून मुंबईला निघून आला. माझी बहीण रस्त्यात ज्या हालअपेष्टा वाट्याला आल्या त्यातच ती मरण पावली. मोठ्या बिकट परिस्थितीत भाऊ हिंदुस्थानात परत आले होते. माझ्या भावजयांनी हिन्द सरकारकडे मला आपल्या भावांचा इलाज करण्यासाठी पॅरोलवर माझी सुटका करण्यात यावी, असा अर्ज केला. सरकारनं पॅरोलवर माझी सुटका केली. भावनगरला येऊन मी भावांच्या औषधोपचाराची सर्व व्यवस्था केली.



## प्रभावतीशी परिचय

मीराबेनसंबंधी मी या अगोदर विस्तारानं लिहिलं आहे. मीराबेनखेरीज इतर अनेक स्त्रियांनी माझ्याशी विवाहबद्ध होण्याची इच्छा प्रगट केली होती. परंतु तो वेळा-पावेतो लग्न करण्याचा मी विचारच केला नव्हता. सन १९४२ मध्ये ऑक्टो-बरात भावनगर येथे माझी अटक होण्यापूर्वी माझा एका कुटुंबाशी संबंध आला. दक्षिणा-मूर्ती भवनचा माझा एक विद्यार्थी आजारी पडला होता—त्याचं नाव चंदुलाल भट्ट असं होतं. त्याला भेटायला मी अनेकदा त्याच्याकडे जात असे. श्री. चंदुलाल भट्ट यांची पत्नी श्रीमती मंशाबेन यांची धाकटी बहीण प्रभावती, हिची माझी ओळख झाली. काही दिवसां-पूर्वीच एम.ए.ची परीक्षा उत्तीर्ण होऊन अहमदाबादेहून ती बहिणीकडे आली होती. संभाषणाच्या ओघात मी सहजच तिला विचारलं थापुढं—काय करायचा तुमचा विचार आहे? ती म्हणाली नोकरी शोधायची, दुसरं करण्याजोगं काय आहे? मी म्हणालो-तुमच्या-सारख्या सुदृढ व निरोगी प्रकृतीच्या स्त्रीनं व्यायामाच्या क्षेत्रात कार्य केलं पाहिजे. तुम्ही जर कांदिवलीच्या 'फिजिकल एज्युकेशन कॉलेजात' जाऊन अभ्यासक्रम पुरा करून आलात तर चांगलं होईल. यामुळं तुम्हाला नोकरी लौकर मिळू शकेल, शिवाय देशाचीही सेवा करता येईल. यावर ती म्हणाली—मुंबईला जाऊन शिक्षण घेण्याइतपत आमची आर्थिक परिस्थिती चांगली नाही. मी विचारलं—खर्चाची व्यवस्था झाली तर तुमची तयारी आहे का? मोठ्या आनंदी चेहऱ्यानं तिनं संमती दर्शविली.

मी भावनगरच्या महाराजांना—कृष्णकुमारसिंहजींना सांगितलं की एम. ए. पदवी घेतलेली एक ब्राम्हण मुलगी माझ्या परिचयाची आहे. तिनं जर फिजिकल एज्युकेशन कॉलेजची पदवी संपादन केली तर स्त्रियांमध्ये व्यायाम प्रसाराचं कार्य चांगल्या तऱ्हेने होऊ शकेल. तिला जर दरमहा शंभर रुपयांचं आर्थिक साहाय्य मिळालं तर ती मुलगी हे शिक्षण घ्यायला तयार आहे. महाराजांनी माझी विनंती मान्य केली. प्रभावतीला मी ही बातमी जाऊन सांगितली व मुंबईला जायची तयारी कर, असंही म्हटलं. ती मुंबईला गेली.

या घटनेनंतर मला अटक करण्यात आली. फिजिकल एज्युकेशनची पदवी संपादन करून प्रभावती भारत स्काउटस् अँड गाईड्सचं काम करू लागली. जेलच्या पत्त्यावर तिनं मला एक पत्र पाठवलं. मी तिच्यासाठी जे काही केलं होतं, त्याबद्दल तिनं कृतज्ञता

व्यक्त केली होती. पत्रातून जिव्हाळा व्यक्त होत होता. माझ्याही मनात थोडी चल-बिचल निर्माण झाली. माणूस माणसाकडे स्वाभाविकपणेच आकर्षित होतो. यानंतर आमचा पत्रव्यवहार सुरू झाला. प्रभावतीनं तुरुंगात येऊन माझी भेट घेण्याची इच्छा प्रदर्शित केली. ती भेटायला येण्यापूर्वीच पॅरोलवर माझी सुटका झाली होती. भाव-नगरला रवाना होण्यापूर्वी मुंबईला मी तिला भेटायला गेलो. तिची भेट झाली नाही. तिच्यासाठी निरोप ठेवला. भावनगरला पोचल्यानंतर पॅरोलवर माझी सुटका झाली आहे, हे तिला तारेनं कळवलं. तार पोचताच प्रभावती भावनगरला आली—आमचं आपसात बोलणं झालं.

## विवाहासंबंधी माझी एकूण स्थिती व विचार

महात्मा गांधीपासून अलग झाल्यावर मी मनाशी असा निश्चय केला की समाजात राहून जर आपल्याला सामाजिक कार्य करायचं आहे तर त्यासाठी विवाह केला पाहिजे. विवाहसंबंधी माझी एकदा बापूजींशी व किशोरीलाल मश्रुवाला यांच्याशी चर्चा झाली होती. दुसऱ्या एका वेळी काकासाहेब कालेलकरांशीही मी या विषयावर बोललो होतो.

मी माझ्या आनंदी वृत्तीबद्दल आणि हसऱ्या मुद्रेबद्दल बाळपणापासूनच प्रसिद्ध होतो. काही तरी कारण असल्याशिवाय मी इतरांशी बोलत नाही, मात्र कुणाशी बोलू लागलो की मग मात्र त्याच्या अंतःकरणालाच हात घालतो—त्याच्याशी अंतःकरणापासूनच बोलतो. माझा हा स्वभावच बनलेला आहे. ह्याचा परिणाम जो व्हायचा तोच होतो. आश्रमात असताना सर्वांची दृष्टी माझ्यावर खिळलेली असे. मीराबेनची हकीकत सर्वांच्या तोंडी झाली होती. राष्ट्रासाठी महान कार्य करणाऱ्या व्यक्तीकडे ज्या आदरानं बघितलं जातं त्याच आदरानं आणि श्रद्धेनं भोवतालचे तरुण-तरुणी माझ्याकडे बघायचे. महिलाश्रमात अध्ययन करणाऱ्या मुलींशी माझी अनेकदा गाठ-भेट व्हायची. मी पुष्कळ वेळा तिथं जाऊन व्याख्यानंही दिली होती. अनेक वेळा मी त्यांना माझ्या जीवनातल्या घटना सांगितल्या. या सर्व गोष्टीमुळं अनेक तरुणी माझ्याकडे स्वाभाविकपणेच आकृष्ट झाल्या होत्या. एके दिवशी महिलाश्रमाचे अध्यक्ष, श्री. काका कालेलकर गंभीर चेहऱ्यानं, परंतु मोठ्या प्रेमानं, जवळ बसून मला म्हणाले—पृथ्वीसिंह, वाईट वाटून घेणार नसाल तर तुम्हाला मी एक गोष्ट सांगू इच्छितो. महिलाश्रममधील मुलींशी तुम्ही त्यांच्याकडे हसत हसत बघत-बोलत जाऊ नका. यामुळं त्या तुमच्याकडे आकर्षिल्या जातात. हे ऐकून माझ्यावर आघातच झाला. क्षणभर विचार करून मी जोरात हसलो. मी काका-साहेबांना विनंती केली की तुम्ही महिलाश्रमातील मुलींना बोलायला मज्जाव करा. ही गोष्ट मुलींना समजली तेव्हा त्या पूर्वीपेक्षाही अधिक प्रमाणात मला भेटू लागल्या—बोलू लागल्या.

एके दिवशी श्री. किशोरीलाल मश्रुवाला यांच्याशी माझी 'तरुणांच्या समस्या' या विषयावर चर्चा झाली. मश्रुवाला हे गांधीवादी तत्त्वज्ञानाचे थोर भाष्यकार होते. मी त्यांना प्रश्न केला की—तरुणी माझ्याकडे कशामुळे आकर्षित होतात? त्यांनी आपल्या पद्धतीनं मला समजावून सांगण्याचा प्रयत्न केला की निसर्गानंच स्त्री-पुरुषांची जोडी बनवलेली आहे. अनेक जण पुरुष असतात, अनेक जणी स्त्रिया असतात परंतु ज्यांच्या व्यक्तीमत्त्वाच्या ठिकाणी स्त्रीत्व किंवा पौरुष्य प्रगट होतं, अशा व्यक्तींकडे स्वाभाविकपणेच लोक आकर्षित होतात. तुमच्या व्यक्तिमत्त्वाच्या ठिकाणी असं पौरुष्य विशेषत्वानं प्रगट होत असल्यामुळे स्त्रिया तुमच्याकडे आकर्षित होतात. या विषयावर बापूजींशी बोलत असतांना त्यांनीही मान्य केलं की तरुण-तरुणी माझ्याकडे आकर्षित होतात. तरुणांचा प्रेमभाव स्वीकारून तुम्ही अधिक उंची गाठण्याचा प्रयत्न करा—तरुणींच्या मनात देशप्रेमाची ज्योत प्रज्वलित करून त्यांनाही महान बनवा. परंतु जर का तुम्ही कामवासनेच्या अधीन होऊन स्त्रियांकडे बघू लागला तर तुमचं आणि त्यांचं दोघांचंही अधःपतन घडून येईल. ही चर्चा खूपच उद्बोधक वाटली.

एके दिवशी विवाहासंबंधी माझी महात्माजींशी चर्चा झाली. महात्माजींनी मला विचारलं की तुम्ही एखाद्या मुलीशी लग्न करायचं आहे म्हणून मीरा बरोबर लग्न करायला नकार दिलात काय? त्यांचं बोलणं ऐकून मी जोरजोरात हसत सुटलो. बापूजी आधीपासूनच जरा गंभीर दिसत होते—मी मुक्ता हसतच आहे यानं त्यांना माझा थोडा रागही आला. त्यांनी बदललेली चर्चा बघून मीही जरा गंभीर बनून त्यांना म्हणालो—बापूजी, आपल्या या आश्रमात 'सेक्स' शिवाय अन्य बाबींनाही काही स्थान आहे की नाही? सवड असली म्हणजे आश्रमवासी या विषयावर खूप चर्चा करतात. याचं उघड कारण जे मला दिसतं ते हे की लोक तुमच्या इच्छेचा मान राखायचा म्हणून बळजबरीनं शिस्तबद्ध आणि संयमित जीवनाची प्रतिज्ञा तर घेतात परंतु मनात विकार का उत्पन्न होतात, त्यांच्यावर विजय कसा मिळवायचा, याचं बिलकूल ज्ञान नसतं आणि या विषयाचं त्यांना इथं शिक्षण देण्याचीही व्यवस्था नाही. यामुळं कामवासना तीव्र बनते की ते सहजतेनं तिच्या आहारी जातात.

मी त्यांना म्हणालो की कधीच लग्न करायचं नाही—असं काही मी ठरवलेलं नाही मी लग्न करणार आहे—मात्र अशा तरुणीशी विवाहबद्ध व्हायची माझी इच्छा आहे, जी माझ्या जीवनाचा बरोबर भाग बनू शकेल. एखादी स्त्री केवळ वासना-पूर्तीसाठी आपली नोकर बनून राहावी, अशा स्त्री बरोबर मी कदापिही लग्न करणार नाही. माझा गंभीर भाव बघून ते पुढं काही बोलले नाहीत. आमचं बोलणं इथंच थांबलं.

या सर्व गोष्टींचा एकत्रित परिणाम म्हणजे मी विचार करू लागलो की एका बलवान, सामर्थ्यसंपन्न आणि निरोगी व्यक्तीला जो समाज जीवनाशी एकरूप होऊन काही करू इच्छितो—अशा माणसानं वैवाहिक बंधन स्वीकारणंच उपयुक्त आणि लाभाचं आहे.

जोपर्यंत मी बापूजींच्या सहवासात आश्रमात राहत होतो, तोपर्यंत माझ्या मनात बदनामीचा कधी विचारही आला नाही. आणि अधिकाधिक निर्दोष बनून सेवा-कार्य बजावणं हेच माझं कर्तव्य मानलं होतं. आश्रम सोडून बाहेर पडल्यावर मी मनाशी ठरवलं की यापुढे एखाद्या स्त्रीनं प्रेमभाव प्रगट केला तर तिला स्पष्टपणे विवाहासंबंधी विचारायचं, आणि तिच्याशी विवाहबद्ध होऊ असं तिला सांगायचं. लग्नाला तिची संमती आहे किंवा नाही, हे विचारायचं तिची संमती असेल तर लग्न करायला माझी कसलीच अडचण नव्हती.

बापूंची साथ सोडल्यानंतर मला आता केवळ आपल्या बळावर व स्वसामर्थ्यावर सामाजिक जीवनात प्रवेश करायचा होता. देशातल्या तारुण्यानं मुसमुसणाऱ्या तरुण-तरुणींना प्रोत्साहन देऊन, प्रेरणा देऊन त्यांना देशसेवेत ओढायचं होतं. गुजरात व मुंबईच्या शेकडो घरातील आई-बाप माझ्याकडे आदरानं, प्रेमानं आणि विश्वासानं बघत होते. या शेकडो स्त्री-पुरुषांना मी एखादा आप्तच आहे, असंच वाटत असे. माझ्या मनात विचार यायचा की मोहाचा, वासनेला बळी पडण्याचा, एखादा क्षणही आपल्या जीवनात आला तर आयुष्यभराची आपली तपश्चर्या फोल ठरेल—समाजाचा ध्येयवादी व्यक्तीं-वरचा विश्वासच उडून जाईल. विचार करत असताना माझ्या डोक्यात कल्पना आली की विवाहित जीवन हे एखाद्या जहाजाच्या नांगराप्रमाणे आहे. जेव्हा जहाजाच्या नांगराचा फाळ समुद्र तळाशी शिरतो—तेव्हा कितीही प्रचंड वादळ येवो—ते जहाजाला त्या स्थानापासून तसूभरही हलवू शकत नाही. याप्रमाणेच विवाहित माणूस सांसारिक वादळाला धैर्यानं तोंड देऊ शकतो व धैर्यानं आपलं पाऊल घट्ट रोवून उभा राहू शकतो जी व्यक्ती सदाचारसंपन्न असते तिच्या जीवनात अनुचित वासनांना अवसरच नसतो एखाद्या प्रदर्शन स्थळी सर्वाधिक आकर्षक वस्तूवर जेव्हा 'सोल्ड आउट' (विक्री झालेली) ची पाटी लागते—तेव्हा ती वस्तू खरेदी करायचा विचार कुणाच्या मनात येत नाही समाजात विवाहित व्यक्तीची अशीच अवस्था असते.

योगायोगानं विवाह-बंधनासाठी माझं मन पूर्णपणे अनुकूल बनलेलं होतं. आता क्रांतिकारकाचं जीवन माझ्यासमोर नव्हतं—त्या मस्तीत धुंद राहायचं किंवा क्षणाक्षणाला मृत्यूच्या छायेत वावरायचं आता कारण राहिलेलं नव्हतं. एखाद्या प्रबळ इच्छेनंच दुसरी एखादी इच्छा दाबून ठेवता येते. देशप्रेमाचा एक खेळाडू म्हणून या मृत्यूशी आणि देशाच्या शत्रूंशी चार हात केले होते. बदलत्या परिस्थितीत या वेगळ्याच तऱ्हेनं जगण्यासाठी सिद्ध झालो होतो. यासाठीच प्रभावतीची भेट होण्यापूर्वी मी मनोमन ठरवलं होतं की आपल्या मनातली लग्नासंबंधीची गोष्ट तिला मोकळेपणानं सांगायची. भेट-झाल्याबरोबर तिच्यापुढे मी माझं मन उघडं केलं. मी तिला म्हणालो की तिच्या पत्रातून प्रेमभावनेचं ओझरतं दर्शन घडलेलं आहे. त्याचा माझ्या मनावर खूप परिणाम झाला आहे. अशा भारावलेल्या अवस्थेतच मी तुला इथं येण्याबद्दल लिहिलं

माझी काही चूक असेल तर मला क्षमा कर. जर तुम्हालाही माझ्याप्रमाणेच वाटत असेल तर मग मात्र आपण जन्माच्या गाठी बांधण्याचा विचार केला पाहिजे. प्रभावतीनं उत्तर दिलं—ज्या वेगानं तुम्ही तुमची जीवन-नौका चालवित आहात, आणि ज्या अवघड वळणांवरून तुम्ही जात आहात, त्या मार्गानं तुम्ही मला सोबत घेऊन जाऊ शकाल ? माझ्यात ती शक्ती नाही परंतु मला आपली मानून जर तुमच्या जीवनात वाटा उचलण्याची तुम्ही मला संधी दिलीत तर मला आनंद होईल.

आमचं दोघांचं आपसात ठरल्यानंतर प्रभावतीनं आपल्या आजीला, बहिणीला, मेव्हण्याला यासंबंधी सांगितलं. मेहुण्यांनी त्रयस्थपणे तिकडे फारसं लक्ष दिलं नाही. परंतु प्रभावतीच्या वडील बहिणीला—मन्दाकिनीला व तिची विदुषी आजी कस्तुरबा यांना ही कल्पना मुळीच आवडली नाही. एका कुलीन ब्राम्हण घराण्यातली मुलगी अशा एका क्षत्रिय माणसाबरोबर—ज्यानं कधी सामाजिक बंधनं पाळली नाहीत, जो सतत मृत्यूच्या खाईत उडी घेतो—अशा माणसाबरोबर विवाह करू इच्छिते—हे त्यांना पसंत पडणारे नव्हते. प्रभावतीनं ज्या दिवशी सर्वांना हे सांगितलं त्या दिवसापासून कुटुंबियांनी तिच्यावर बहिष्कार टाकला. त्या कुटुंबात मी तर आता जाऊच शकत नव्हतो. अंगावरच्या कपड्यानिशी प्रभावतीनं ते घर सोडलं व ती माझ्याबरोबर बाहेर पडली. आम्ही दोघं मुंबईला आलो आणि तिथल्या मित्रांना आमचा इरादा सांगितला. प्रभावतीच्या आप्त-मित्रांनी विविध प्रतिक्रिया व्यक्त केल्या. एकानं तिला म्हटलं—'यू आर मॅरिइंग विथ अ स्टॉर्म' (तू वादळा-बरोबर लग्न करते आहेस.) दुसऱ्यानं तिचं अभिनंदन करून म्हटलं—'यू हॅव कॉट अॅन एलि-गेटर' (तू एका मगराला आपल्या जाळ्यात पकडलं आहेस.) माझ्या काही मित्रांनी चकित होऊन उद्गार काढले—तू तर आपलं जीवन उध्वस्त केलंच आहेस—आता एका निष्पाप मुलीला कशासाठी बळी घेतो आहेस ? एवढं वय होईस्तोवर जो माणूस विवाहाचा विचार झुगारत होता, ज्यानं मीराबेनचं प्रेम ठोकरून बापूजींना हताश बनवलं, तोच माझ्यासारखा माणूस विवाह-बंधनात स्वतःला अडकवून घेईल, ही गोष्ट माझ्या मित्रांच्या ध्यानी-मनीही नव्हती.

## माझा विवाह

मी एक अगदीच भुकेकंगाल माणूस होतो. जवळ पैसा नव्हता—कुठून साहाय्य मिळण्याची आशा नव्हती. पाच दिवसांनी माझ्या पॅरोलची मुदत संपणार होती. २७ नोव्हेंबर १९४१ रोजी परत जेलमध्ये हजर व्हावं लागणार होतं. घनिष्ट मित्रांनी सर्व गोष्टींची व्यवस्था केली. लग्नाची तयारी झाली. कम्युनिस्ट पार्टीच्या कार्यालयात सर्वांना भोजन देण्यात आलं. क्रांतिकारी पद्धतीनं लग्न लावण्यात आलं

माझ्या एका श्रीमंत मित्रानं एक हजार रुपयांचं पाकीट माझ्या खिशात घातलं. लग्नाच्या काही मिनिटं आधी जो माणूस सर्वस्वी कंगाल होता, लग्न झाल्याबरोबर त्याचा कंगालपणाही संपुष्टात आला. अशा घटना जीवनात क्वचितच घडत असल्या पाहिजेत. लग्न ठरल्यानंतर कायद्याप्रमाणे कमीत कमी पंधरा दिवस मध्ये जाऊ द्यावे

लागतात. या नियमाचंही पालन करण्यात आलं. माझे एक जुने मित्र, भावनगरचे रहिवाशी श्री.चुन्नीलाल कापडिया व त्यांची पत्नी श्रीमती बसंतबेन, दोघेही लग्नाला हजरा होते. पं. राहुल सांकृत्यायन यांच्या 'सरदार पृथ्वीसिंह' या पुस्तकात माझ्या लग्नाचा जो फोटो प्रसिद्ध केला आहे तो फोटो खार येथील श्री. चुन्नीलाल कापडिया यांच्या घरी काढलेला होता. फोटो नरहर रावल यांनी काढला होता.

२७ नोव्हेंबर १९४३ ला आमच्या विवाहाची नोंदणी झाली होती. त्याच दुपारी,पॅरोलची मुदत संपत असल्याकारणाने, तीनच्या गाडीने येरवडा येथे पोचायचं होतं. मी निघण्याच्या तयारीत होतो एवढ्यातच मुंबईच्या एका पोलिस अधिकाऱ्यानं घरी येऊन सरकारच्या ऑर्डर्स हातात ठेवल्या. सरकारनं माझी पॅरोलची मुदत एका महिन्यानं वाढवून दिली होती. त्यामुळे येरवड्याला जायचं कारण नव्हतं.

प्रभावतीनं माझ्याशी विवाहबद्ध होण्यासाठी जी उत्सुकता व तयारी दाखविली त्यानं मी भारावूनच गेलो होतो. विवाहापूर्वी आमचे विशेष असे संबंध नव्हते. भेटीगाठी फारशा झालेल्या नव्हत्या. ह्यामुळे तिचे गुण-दोष मला फारसे माहीत नव्हते. जेव्हा तिचं माझ्यावर प्रेम जडलं आणि माझी जीवनसाथ करण्याचं ठरवलं-मग मात्र ती दृढनिश्चयानं माझी पत्नी बनून जीवनाची वाटेकरी झाली. तिनं सामाजिक, कौटुंबिक कुठल्याच बंधनांचा विचार केला नाही आप्त-स्व कीय सोडले आणि माझ्यासारख्या भणंग वृत्तीच्या माणसाशी नातं जोडलं. तिलाही तुरुंगात खितपत पडावं लागलं असतं किंवा कोणत्याही क्षणी गोळीला बळी पडावं लागलं असतं ! भावी जीवनातल्या सुखांचा यत्किंचितही विचार न करता-किंवा कोणत्या आपत्तींशी झगडावं लागेल, ह्याचा विचार न करता -तिनं माझ्याशी विवाह केला होता. ह्या सर्व गोष्टींचा विचार करुनच ती माझी सहधर्मचारणी बनली होती. काही दिवसांच्या सहजीवनानं आमची मनं जुळली-आम्ही परस्परांशी एकरूप झालो.

लग्नानंतर मला तुरुंगात परतणं भागच होतं. प्रभावतीसाठी आता स्वतंत्र बिऱ्हाड बघणं आवश्यक होतं. मित्रांच्या मदतीमुळं मला आर्थिक अडचण नव्हती. मुंबईच्या अंधेरी उपनगरात कुर्लारोडवर 'रुबी टेरेस' या इमारतीत चार खोल्यांचं घर भाड्यानं घेतलं. लग्नानंतर आम्ही याच घरी बिऱ्हाड थाटलं. यापूर्वीच माझ्या निकटच्या मित्रांनी मला संपूर्ण गृहस्थाश्रमी बनवलं होतं. घरात कशाचीच कमतरता नव्हती.

आमचा गृहस्थाश्रम सुरू झाला. विशेष उल्लेखनीय बाबींचा मी या अगोदर निर्देश केला आहे. वैवाहिक जीवनाचा सुंदर परिणाम म्हणजे अपत्यप्राप्ती-तिसऱ्या व्यक्तीची चाहूल लागली. ३ ऑक्टोबर १९४३ ला दुपारी दोन वाजून दहा मिनिटांनी आम्हाला मुलगा झाला. जन्म-कुंडलीच्या आधारे त्याचं नाव 'अजीतसिंह' ठेवण्यात आलं.

यानंतर ६ मे १९४९ रोजी आम्हाला मुलगी झाली. मुलीचं नाव'प्रज्ञा' ठेवण्यात आलं.

● ● ●

वंशपरंपरेनं मी सूर्यवंशी असल्यानं मला सौंदर्याची थोडीशी देणगी लाभलेली होती आणि काही सुंदर योगायोग जीवनात आल्यामुळे मी जीवन सुंदर बनविण्याचा प्रयत्न केला-जगातल्या सगळया सौंदर्यांचा उपभोग घेण्याची माझी वृत्ती होती -जीवनातल्या उप-भोगांना पाठ दाखवून विरक्तीनं जगण्याचा मी कधीच प्रयत्न केला नाही. देशाविषयी प्रेम आणि देशाची गुलामगिरीतून मुक्तता ह्या भावना तरुण वयातच माझ्या मनात निर्माण झाल्या- त्या तशा झाल्या नसत्या तर मी इतरांप्रमाणेच जीवनातल्या भोग-विलासात अडकून पडलो असतो-प्रेमबंधनात गुरफटून मी वेडयासारखा फिरत राहिलो असतो तरुण वयात मी एक शेर पाठ केलेला होता–

दिल मत टपक नजरसे कि पाया न जायेगा
ज्यूं अश्क फिर जमींसे उठाया न जायेगा.

(जमिनीत झिरपलेला अश्रू जसा हाती लागत नाही, हे माझ्या हृदया! तूही कुणाच्या नजरेतून असा ओघळू नकोस की तुझा मागमूसही लागू नये.)

ब्रह्मदेश, मलाया, चीन, जापान, फिलिपाइन्स बेटे, अफगाणिस्थान, रशिया, काफ पर्यंत- या सर्व देशांतून फिरत असताना मनाला मोहून टाकणारी सुंदर सुंदर दृश्यं मी बघितली- ती मला खूप आवडली देखील-परंतु मी माझ्या मनाला जागेहून ढळू दिलं नाही.

तरुण वयातच मी एक सुंदर उपदेश ऐकलेला होता. जीवनात चार पतनांपासून आपण स्वतःला सांभाळलं पाहिजे-विचार-पतन, वाक्य-पतन, दृष्टी-पतन आणि वीर्यपतन. माणसानं स्वतःला या चार पतनांपासून सांभाळलं तर मग कितीही निसरडया जमिनी-वरुन तो चालो-तो तिथून सुरक्षितपणे बाहेर पडेल, त्याचा पाय घसरणार नाही.

गुजरात आणि सौराष्ट्राची रमणीय भूमी-स्त्री सौंदर्यासाठी विशेष प्रसिद्ध आहे या प्रदेशात मी आठ वर्षे राहिलो. मी तिथं खूप सुंदर सुंदर फुलं उमलताना पाहिली. माझ्या मनातला भ्रमर त्या फुलांकडे झेपावण्यासाठी उत्सुक होता-परंतु भ्रमर उड्डाण करण्यापूर्वीच एक विचार त्याला जागेवरच जखडून ठेवत होता. माझ्या अन्तर्मनातून शब्द निनादत-"अरे गृहस्था! एका जुलमी राजवटीची टांगती तलवार तुझ्या मानेवर आहे-तुला पकडण्यासाठी हजारो रुपयांचं बक्षिस जाहीर झालं आहे. तुझे आश्रयदाते,

हितचिंतक आपल्या पाठपुराव्यात तुझं रक्षण करत आहेत-ते तुला ज्योतीवर झेपावणारा पतंग समजून, तुझ्यासाठी आपल्या प्राणाची बाजी लावत आहेत." हे विचार येताच मी माझं मन आवरलं होतं. मी असं कार्यक्षेत्र निवडलं जिथं असली आकर्षणं नव्हती. मी स्वतःभोवती अशी तटबंदी उभी केली की ज्यामुळं मी कुठल्याही आपत्तीत सापडलो नाही.

काळ बदलला, माझ्या जीवनाचं सर्वही बदललं-मी संसारी जीवनात प्रवेश केला—

फूल खिलकर बहारें सबा अपनी दिखला गये।
हसरत उन गुंचों पे है जो बिन खिले मुरझा गये॥

मानवी जीवन हे फळं-फुलं देणाऱ्या वृक्षाप्रमाणे आहे. योगायोगानं काहींच्या जीवनाच्या नुसत्या कळ्याच बनतात-काही कळ्या अर्धवट उमलून कोमेजून जातात आणि काही संपूर्णपणे उमलून दशदिशात आपला गंध भरून टाकतात-काही फळ बनून अनेकांची क्षुधा भागवतात-आणि काही परत बीजरूप धारण करून त्यातून वृक्षाचं रूप घेतात-जीवनक्रम चालू ठेवतात. जीवनाची ही सर्वोच्च पूर्तता, पुरुषार्थामुळं आणि प्रारब्धयोगामुळं प्राप्त होतं. ज्या व्यक्ती या उच्चतम अवस्थेपर्यंत पोचतात तेच मानव समाजाचे जीवन-स्रोत होतात.

अशा व्यक्तींना लोक भोग-विलासात गुरफटलेले म्हणत नाहीत. तशी त्यांची समजूत झाली असती तर त्यांनी तुम्हाला आपल्या घरात देखील घेतलं नसतं. ज ह्या मनात असे विचार आले म्हणजे मी खूप गंभीर होऊन विचारात पडे. माझ्या या वृत्तीमुळेच माझं मन कुठे पतन पावलं नाही.

मी कोणत्या परिस्थितीत लग्न केलं, ही हकीकत यापूर्वीच सांगितली आहे. मी जेव्हा ठरवलं की आता आपण लग्न केलं पाहिजे-तेव्हा माझ्यासमोर कुणी सुंदर स्त्री होती अशातला भाग नव्हता. माझ्या क्रांतिकारी जीवनात जी समरस होऊ शकेल अशा साथीदारीणीच्या शोधात मी होतो. माझ्याबरोबर वाटचाल करणारी स्त्री मला हवी होती. ती दिसायला सुंदर नसली तरी चालण्यासारखं होतं. मात्र तिच्या जीवनात सौंदर्य असावं-अशी माझी अपेक्षा होती. तरुणपणी मी एक मजेदार गोष्ट ऐकली होती-"एखादी विशेष स्वरूपाची समस्या तुमच्यासमोर नसेल तर मग तुम्ही एखाद्या सुंदर स्त्री बरोबर लग्न करा-दररोज नवनवीन समस्या तुम्हाला सोडवाव्या लागतील!"

यामुळं मी मोठ्या काळजीनं पावलं टाकत होतो. प्रभावतीची व माझी ओळख कशी झाली, हे मी यापूर्वीच सांगितलं आहे. लग्न झाल्यानंतर जे मित्र माझ्या अवती भोवती होते ते गंमतीनं म्हणायचे की आम्ही तुमच्याविषयी अनेक प्रकारचे तर्ककुतर्क करायचो. आम्हाला विचार पडायचा की हा माणस चांगला देखणा आहे

सुदृढ आहे, तरीही हा लग्न का नाही करत? हा कुणाच्या प्रेमात कसा पडत नाही? आम्हाला तर असं वाटत होतं की तुम्ही बहुधा 'पुरुष' नसला पाहिजेत. आता मात्र तुम्हाला तुमच्या पौरुषाचा पुरावा द्यावा लागेल——तो म्हणजे नऊ महिन्यांनी तुम्हाला मूल झालं पाहिजे व तो मुलगा असला पाहिजे.

योगायोगाने सर्व काही सुरळीतपणे पार पडलं आणि ठेवलेल्या मर्यादेतच आमच्या पोटी मुलगा जन्माला आला. तो मुलगा चांगल्या वजनाचा होता. सगळ्या मित्रांनी येऊन अभिनंदन केलं. मुलाची वाढ चांगली होती. आठ महिन्यांचा झाला तेव्हा त्याचं वजन चोवीस पौंड होतं. प्रसूतीच्या वेळी मुलाच्या आईला बराच त्रास झाला होता. तिच्या वेदनांनी मीच अतिशय व्याकुळ झालो होतो. मनात वैराग्याचे विचार येत होते——अनेक वर्षे माझ्या मनावर या गोष्टीचा परिणाम टिकून होता. माझ्या मनात वारंवार विचार यायचा की स्त्रीला ज्या प्रसूतिवेदना सहन कराव्या लागतात तशाच वेदना पुरुषांनाही झाल्या असत्या तर लोकसंख्येचा प्रश्नच निर्माण झाला नसता.

पुरुषाचं बीज स्त्रीच्या ठिकाणी कसं सुरक्षित राहतं आणि त्यातूनच ते कसं मानवी रूप घेऊन जन्म घेतं——हे खरोखरच अद्भुत आहे! एका मातेला पुत्रजन्माच्या किती वेदना सहन कराव्या लागतात——अत्यंत कठीण अशी तप साधना करावी लागते——हे केवळ ती माताच जाणे. माता-पुत्राचं जे विशिष्ट नातं निर्माण होतं—ते या तिच्या तपाचंच फळ असतं. आई मुलाकडे आपली प्रतिकृती म्हणून, आपल्या शरीराचा भाग म्हणून पहाते आणि मुलगाही मातेला जननी म्हणूनच संबोधितो.

मातेला प्रसूतीच्या ज्या वेदना होतात, त्या बघून माझ्या ठिकाणी एक प्रकारची विरक्तीच निर्माण झाली. या अवस्थेत चार वर्षे लोटली. मित्र पुन्हा माझी चेष्टा करू लागले. ते म्हणू लागले की तुम्हाला मुलगा योगायोगाने झाला आहे-आता तुम्हाला मुलगी झाली पाहिजे, तरच आम्ही तुम्हाला मानू. योगायोगानं त्यांची ही इच्छा देखील मी पूर्ण केली. मुलगी झाल्यानंतर मात्र मी मित्रांना बजावलं की यापुढं मी तुमचं कुठलंच आव्हान स्वीकारणार नाही.

मी लग्न केलं तेव्हा माझं वय ५२ वर्षांचं होतं. मुलगा व मुलगी परमात्म्याच्या धारणाप्रमाणे देखणी झाली. सुदृढ प्रकृती व बळ याही गोष्टी अनुवंशिकतेनं त्यांना लाभल्या. देशसेवेच्या कार्यातही आमची मुलं मागे राहणार नाहीत——अशीच आमची अपेक्षा होती.

माझं कौटुंबिक जीवन अत्यंत सुख-समाधानानं भरलेलं आहे. जीवनाची वाटचाल करत करत ७८ व्या वर्षापर्यंत येऊन पोचलो आहे. जीवनाचा वेग अद्यापही मंदावलेला नाही. कुठलंही दुबळेपण जीवनात अनुभवलं नाही. हा प्रवास आपल्या

मुक्कामाच्या दिशेनं वेगानं निघालेला आहे. ज्या एका उद्दिष्टानं त्यानं ही वाटचाल केली, त्या उद्दिष्टाची पूर्तता अजून व्हायची आहे. स्वातंत्र्य मिळालं परंतु अजून सुखप्राप्ती व्हायची बाकी आहे. त्याच कार्याला मी आता लागलो आहे.

आमच्या लग्नाच्या बातमीनं प्रभावतीच्या आजीवर आणि बहिणीवर मोठाच आघात झाला. त्यांना या गोष्टीवर विश्वासच बसत नव्हता की तिच्या सारखी ब्राम्हण कुळात जन्मलेली मुलगी, पदवीधर स्त्री, माझ्यासारख्या मुक्त जीवन जगणाऱ्याशी लग्न करायला तयार होईल. हा माणूस वैवाहिक बंधनात किती काळ अडकून पडणार? प्रभावतीचं जीवन या लग्नामुळं उध्वस्त होऊन जाईल, अशी त्यांना खात्री होती. एक समजूतदार तरुणी आपलं जीवन आपल्याच हातानं उध्वस्त करत आहे, ही गोष्ट त्यांना अनुचित वाटली. सात्विक संताप त्यांनी व्यक्त केला. प्रभावती आपला विचार बदलेल अशी त्यांची समजूत होती, परंतु तसं काही झालं नाही.

एका सुदृढ, सुशिक्षीत आणि कुलीन तरुणीला तिच्यावर भाळणारे अनेकजण भेटले असतील परंतु स्वतःहून ज्याच्यावर प्रेम करावं, असा तिला कुणीच भेटला नसावा. त्याचं घराणं सदाचारसंपन्न होतं—हा वारसा तिलाही मिळाला होता. आरोग्य, बळ आणि साहस या गोष्टी शिक्षणाद्वारे तिनं मिळविल्या होत्या. ज्याच्याविषयी श्रद्धा बाळगावी असा पुरुष त्यांना भेटला नव्हता. जेव्हा असा एक पुरुष तिच्यापुढं आपलं मन उघडे करुन ठेवताना तिनं माझ्या रूपानं बघितला—तिच्यासंबंधी वाटणारं आकर्षण जेव्हा त्यानं बोलून दाखवलं तेव्हा तिलाही मी तिच्या मनातला परमेश्वर आहे—हे तिनं ओळखलं. तिनं हा आपला निर्णय जीवनाचाच निर्णय म्हणून स्वीकारला.

बहिणीचा आणि आजीचा राग सात्विक होता. त्यांच्या मनात या प्रकाराविषयी अगदीच तिरस्कार होता, अशातली गोष्ट नव्हती. लग्नानंतर आमचं कौटुंबिक जीवन सुरू झालं. अनेक मित्र भेटी-गाठीसाठी आमच्याकडे येऊ लागले. मीराबेन देखील भेटायला आली—प्रभावतीला आशीर्वाद देऊन गेली. प्रभावतीच्या आजीनं आमचं जीवन सुखा-समाधानानं चाललं आहे, हे बघितल्यानंतर त्यांचाही राग कालांतरानं संपला. प्रभावतीला सामाजिक जीवनात प्रतिष्ठा मिळत चालली, लोकांना तिच्या विषयी आदर वाटू लागला. काही दिवसांनी तिची आजी आमच्याकडे राहायला आली. तिनं मोठ्या मनानं आम्हाला सामावून घेतलं—आमचा स्वीकार केला. माझ्या मुलाचा-अजीतसिंहाचा जेव्हा जन्म झाला तेव्हा बाळ-बाळंतिणीची सर्व काळजी आजी कस्तूरबा यांनीच घेतली होती. लहान वयातच मी मातृप्रेमाला पारखा झालो होतो. माता कस्तूरबा यांनी माझी ती उणीव भरून काढली. त्यांनी माझ्यावर पुत्रवत प्रेम केलं. माझी अपेक्षा एवढीच असते की आपण नेहमी त्यांच्या विश्वासाला आणि प्रेमाला पात्र ठरावं.

● ● ●

स्वातंत्र्य प्राप्तीनंतर भारतात सरकारच्या राजकीय, सामाजिक आणि आर्थिक धोरणात आमूलाग्र परिवर्तन घडून आलं. संस्थानी राजवट असताना भारतीय समाजात जी मंडळी मान-सन्मानाचं, वैभवशाली जीवन जगत होती, त्यांना हे नवीन बदल काट्याप्रमाणं सलू लागले. परिवर्तन काही क्रांतीमुळं घडून आलेलं नव्हतं-तर समाजाचा जो एकंदर ढाचा बदलला होता-त्यामुळं घडून आलं होतं. एखाद्या धरणीकंपासारखं हे परिवर्तन आपोआप जीवनात आलं होतं. हवा बदललेली आहे, हे बघून इंग्रजी राजवटीनं हळूहळू आपला गाशा गुंडाळायला सुरुवात केली. जे संस्थानिक व राजे-महाराजे इंग्रजांच्या कृपेमुळं सत्ता उपभोगत होते-त्यांनीही बदललेल्या वाऱ्याचा अंदाज बघून आपल्या नौका त्या दिशेनं हाकायला सुरुवात केली होती. काँग्रेसच्या सरकारांनीही त्यांचे मान-सन्मान आणि आर्थिक गरजा ध्यानात घेऊन, त्यांना सांभाळून घेतलं होतं-निश्चित बनवलं होतं. राजांचे आणि नवाबांचे सार्वभौम अधिकार काढून घेण्यात आले होते परंतु त्यांच्या भोग-विलासात फरक पडला नव्हता. त्यामुळे ते तसे समाधानात होते.

राजस्थान राज्याच्या सरकारनं तिथल्या जहागिरदारवर्गाबद्दल जो निर्णय घेतला होता, हा निर्णय तो वर्ग स्वेच्छेनं स्वीकारू इच्छित नव्हता. आर्थिक दृष्टीनं ते पूर्वीपासूनच फारसा चांगल्या परिस्थितीत नव्हते-परंतु शेतांवर राबणाऱ्या कुळांवर त्यांची फार मोठी सत्ता होती. आपला हा अधिकार सोडायला ते राजी नव्हते. या राज्याच्या निर्णयानुसार शेतावर काम करणारी कुळं आपोआपच त्या जमिनींचे मालक म्हणून घोषित करण्यात आली. जहागिरदारांना जमिनींच्यासाठी विशेष अशी नुकसान भरपाई मिळाली नाही. ८० टक्के जहागिरदारांची परिस्थिती मोठी दयनीय बनली. कुळांच्याकडून मिळणाऱ्या उत्पन्नावरच त्यांचा उदरनिर्वाह अवलंबून होता. भाकरी मिळण्यासाठी त्यांच्याकडे कसली कला अथवा हुन्नर नव्हती. जमिनींचे ते मालक होते परंतु जमिनीसाठी कष्ट करण्याची त्यांना सवय नव्हती. राजांच्या आज्ञेत राहून व लढाईच्या वेळी राजाला मदत करायची यासाठी पूर्वजांनी या जहागिरी मिळविल्या होत्या. आपल्या तलवारींच्या पराक्रमानं या जहागिरी कमावलेल्या आहेत, अशी त्यांची समजत होती. त्यांनी असा निर्धार व्यक्त केला की तलवारीच्या बळावर आम्ही जहागिरी मिळवल्या आहेत-तलवारीच्या बळावरच त्यांचं रक्षणही करू.

सन १९५६च्या जून महिन्यात मी कम्युनिस्ट पक्ष सोडला. भारताचे पंतप्रधान श्री.जवाहरलाल नेहरू यांची मी भेट घेतली. १९४५ पासून माझं कार्यक्षेत्र त्यांच्यापेक्षा निराळं झालं होतं. तरीही एकमेकांच्या देशप्रेमाविषयी व निष्ठेविषयी आदर होता. पंतप्रधानांच्या नेतृत्वाखाली राहून, त्यांच्यावर निष्ठा ठेवून, मी त्यांना भेटलो होतो. त्यांनीही तेवढ्याच उत्साहानं प्रतिसाद देऊन त्यांच्या बरोबर काम करण्याची संधी दिली. त्यांना हे माहित होतं की माझे पूर्वज राजस्थानातील जैसलमेरच्या भाटी क्षत्रिय कुळाचे होते व नंतर ते पंजाब प्रान्तात राहू लागले होते-मी या कुळात जन्मलो होतो. कुठे काय करता येईल यासंबंधी आमचं बोलणं चालू असताना त्यांनी मला राजस्थानात जाऊन काम करा, असा सल्ला दिला.

इंग्रजी राजवट संपुष्टात आल्यानंतर राजस्थानच्या जहागिरदारवर्गाची आर्थिक स्थिती बिकट बनली होती. त्यांच्यावर फार मोठा आघात झाला होता व हा आघात शांतपणे सहन करणं त्यांना अगदीच कठीण होऊन गेलं. ज्या प्रकारचं एक बन्दिस्त जीवन ते जगत होते-ती सगळी बंधनं आता कचाकच तुटत होती . नवीन बंधनं त्यांनी अद्याप स्वीकारली नव्हती-तशी त्यांची इच्छाही नव्हती. मन मानेल त्या पद्धतीनं ते वागत होते. समाजामध्ये एकप्रकारे अराजकता माजवण्याचा त्यांचा प्रयत्न होता. पंतप्रधान श्री. नेहरूंनी मला सांगितलं की राजस्थानचे क्षत्रिय आणि जहागिरदार अत्यंत शूरवीर आणि स्तुवर्ण्य आहेत. राष्ट्राचा जणू ते कणाच आहेत. राजकीय बदल त्यांना नीट समजावून सांगून त्यांची मनं आपल्या बाजूला वळवण्याचा प्रयत्न करायचा आहे. त्यांचं हे आवाहन ऐकल्यानंतर राजस्थानातील आपल्या क्षत्रिय बांधवांची मी समजूत घालतो, अशी मी त्यांना खात्री दिली. पंतप्रधानांची एकच इच्छा होती की तिथल्या जहागिरदारांनी स्वेच्छेनं जहागिरदारी-प्रथा संपुष्टात आणणं स्वीकारावं. यामुळं होणाऱ्या त्यांच्या आर्थिक नुकसानीसंबंधी व भरपाईसंबंधी नंतर तपशिलानं वाटाघाटी होऊ शकतील. जहागिरदार वर्ग स्वेच्छेनं जहागिर-पद्धती संपवायला तयार असतील तर मी युरोपला जाण्याअगोदर तुम्ही मला जामनगर येथे येऊन भेटा.

राजस्थानचे मुख्यमंत्री श्री. मोहनलाल सुखाडिया यांना माझ्यासंबंधी पंतप्रधानांनी पत्र पाठवून कळवलं होतं. मी जाऊन त्यांची भेट घेतली. मुख्यमंत्री श्री. सुखाडिया यांनी जोधपूरला सर्व जहागिरदारांना बैठकीसाठी निमंत्रित केलं. त्यांना माझा परिचय करून देण्यात आला. मी मोकळेपणानं त्यांच्याशी बोललो-माझ्या मनातले भाव मी खालीलप्रमाणे मांडले :

"समाजामध्ये एक प्रकारचा भूकंप घडून आलेला आहे. इंग्रजांनी त्यांची राजवट सर्व बाजूंनी सुरक्षित करून आपली पाळंमुळं पाताळापर्यंत रुजवली होती-त्यांनी आपले पाय घट्ट रोवलेले होते. भारताच्या राजे-महाराजांचा हा दृढ विश्वास होता की जोपर्यंत चन्द्रसूर्य अस्तित्वात आहेत तोपर्यंत आपली सत्ता अबाधित राहील. परंतु आपण सर्वांनी हे

बजिवलं आहे की मूळ धट्ट रोवून उभी असलेली इंग्रज राजवट, अनेक नवलच्या घटना घडत गेल्यामळे, एकाएकी संपुष्टात आली आहे. भारतातील सर्व राजे-रजवाड्यांनी परमेश्वराची इच्छा समजून, स्वेच्छेने नवा बदल स्वीकारला आहे, सत्तान्तर मान्य केलं आहे.'

"राज्य चालविण्यासाठी इंग्रजांपाशी सर्व प्रकारचं शस्त्रबळ उपलब्ध होतं-संहारक शस्त्र त्यांच्या हाताशी होती. कडव्याशी निष्ठावान भारतीय त्यांच्या इशाऱ्यावर वाटेल ते करायला तयार होते. राजे-रजवाड्यांकडील शूर व निष्ठावान साहाय्यकर्त्यांची तर मोजदाद करता येणार नव्हती. आता परिस्थिती प्रतिकूल बनलेली आहे तेव्हा येणाऱ्या युग-परिवर्तनासमोर ते नतमस्तक झाले. आता केवळ जहागिरदारच जहागिर प्रथा कायम ठेवू इच्छित आहेत. त्यांच्या या इच्छेला सार्वजनिक पाठिंबा मिळू शकणार नाही, त्यांच्या बाजूने कोणी आंदोलन उभं करणार नाही-आंदोलन यशस्वी करण्यासाठी कोणत्याही राज्यातील जनता पाठिंबा देणार नाही. ज्या शासन व्यवस्थेनं जहागिरदारी प्रथेचे खांब उभे केले होते ती शासन-व्यवस्थाच आता राहिलेली नाही-आणि त्या शासन व्यवस्थेचे सहाय्यक बनलेले राजे-महाराजेही आता सत्तेवर राहिलेले नाहीत. जहागिरदारवर्गाला कांग्रेस किंवा अन्य कोणत्याही मोठ्या पक्षाचा पाठिंबा मिळू शकणार नाही. ज्या आंदोलनाला जनतेचा किंवा एखाद्या मोठ्या राजकीय पक्षाचा जोपर्यंत पाठिंबा मिळत नाही, तोपर्यंत असं आंदोलन यशस्वी होऊ शकत नाही. १९४७ नंतर जो प्रचंड धरणीकंप झाला आहे त्यामुळं सर्वच व्यवस्थेची पडझड झाली आहे- अनेक वस्तूंचं स्थान आणि मूल्य बदलून गेलेलं आहे. धरणी-कंपामुळे जी वस्तु ज्या ठिकाणी जाऊन पडली-ती त्याच स्थानावर कायम राहिली. हा बदल ज्याला मानवला नाही तो वटवाघळाप्रमाणे अधांतरी लटकत राहिला."

"परदेशी राजवटीला भारतावर सत्ता चालविण्यासाठी सैन्य-बळाची आणि निष्ठावान सैनिकांची व सेवकांची जरुरी होती. आज भारतात भारतीय जनतेची राजवट आहे. खेड्यापाड्यात राहणाऱ्या ८७% जनतेच्या पाठिंब्यामुळेच ही राजवट स्थिर होऊ शकेल. प्रौढ मतदानावर आधारलेली ही जनतेची राजवट आहे. खेड्यापाड्यातले शेतकरी शासनाचा कारभार चालण्यासाठी जो खंड भरतात, मालगुजारी देतात-शासनानं जर त्यांना जमिनीसंबंधी काही सवलती व अधिकार दिले नाहीत तर हा वर्ग शासनाशी एकनिष्ठ कसा राहील? आज शासनाला शस्त्रधारी सैनिकांपेक्षा मतदारवर्गाच्या सहकार्याची अधिक गरज आहे. मला ही गोष्ट चांगली ज्ञात आहे की आजच्या ह्या जहागिरदारात त्या शूर-वीरांच्या पुत्र-पौत्रादिकांचा समावेश आहे-ज्या शूर-वीरांनी या भूमीच्या रक्षणासाठी बलिदान केलेलं आहे. ज्या जहागिरी त्यांना देण्यात आल्या होत्या त्या दान म्हणून, भिक्षा म्हणून देण्यात आल्या नव्हत्या. तलवारीच्या धारेवर चालत राहूनच त्यांनी या जहागिरी मिळवल्या होत्या. आता काळ बदलला आहे. भारतात राहणाऱ्या सर्व नागरिकांना आता समान अधिकार प्राप्त झाले आहेत. त्यामुळं प्रत्येक नागरिक आपल्या अधिकाराचं रक्षण करण्यासाठी बलिदानाला तयार झाला आहे. राजस्थान सरकारनं सर्व शेतकऱ्यांना नागरिक

अधिकार दिले आहेत. आज देशाच्या रक्षणाचा भार सैन्य किंवा जहागिरदारवर्गावर अवलंबून नाही. जेव्हा देशाच्या संरक्षणाचा भार क्षत्रियांवर आणि जहागिरदारांवर राहिलेला नाही तेव्हा रक्षणासाठी म्हणून त्यांना जे अधिकार पूर्वी मिळाले होते-ते आता कसे काय राहतील ?"

"आपल्या देशाच्या प्राचीन राजकीय, आर्थिक आणि सामाजिक इमारती एकापाठोपाठ एक ढासळत चालल्या आहेत व त्यांच्या जागी नवीन इमारतींच्या पायाभरणीचं काम सुरु झालं आहे. जुन्या इमारतींमधील उपयोगी पडणाऱ्या वस्तू, नवीन इमारतीसाठी वापरता येतील. भारतातील क्षत्रिय आणि जहागिरदार जुन्या इमारतींचे पायाभूत दगड होते-त्या इमारतींचे आधार-स्तंभ होते. आज ज्या नव्या इमारतींची पायाभरणी सुरु आहे, त्या पायाभरणीत ते जर आज सामील झाले नाहीत तर शासनाला उपलब्ध सामुग्रीचा वापर करून या इमारती उभ्या कराव्या लागतील. दगडा-विटांचा वापर करूनच त्यांना इमारती बांधाव्या लागतील. संगमरवरी दगड बाजूस पडून राहतील त्या मूल्यवान दगडांचा मग काय उपयोग होणार ? त्यांचे तुकडे तुकडे करून सडकेसाठी ते वापरले जावेत काय ?"

अशा प्रकारचे विचार मी राजस्थानच्या क्षत्रियांसमोर व जहागिरदारांच्यासमोर मांडले. ह्याचा परिणाम अपेक्षेप्रमाणेच घडून आला. नवा दृष्टिकोण आत्मसात करून त्यावर विचार करण्याचं त्यांनी स्वीकारलं-त्यांना ते भागच पडलं—प्रश्न कसा सोडवता येईल यावर ते विचार करु लागले. 'भू—स्वामी आंदोलनाचे' संयोजक ज्या प्रकारची आश्वासनं पदरात पाडून घेण्यासाठी आले होते—त्यापैकी त्यांना काहीच मिळालं नाही. त्यांनी पराभव मान्य केला नाही परंतु आंदोलनही मोठ्या प्रमाणात पुढे चालवलं नाही. या आंदोलनातून शेवटी त्यांच्या पदरी काहीच पडलं नाही.



पंजाबच्या मातीत जो जन्मला, ज्याच्या प्रत्येक श्वासात पंजाबचं अस्तित्व होतं, ज्याच्या रोमरोमातून पंजाबीपणा प्रतीत होत होता, अशा पंजाबी व्यक्तीला त्याच्या आयुष्याची ६६ वर्षं स्वेच्छेनं पंजाबात वास्तव्य करता येऊ नये या गोष्टीला एक निराळाच व गमतीचा इतिहास आहे.

बाळपणी प्रतिकूल परिस्थितीमुळे मला पंजाब सोडून जाणं भाग पडलं. पंजाबवरील माझ्या प्रेमानं मला परत पंजाबकडे ओढून नेलं. गुलामगिरीच्या शृंखलातून देशाची मुक्तता करण्यासाठी मला परत पंजाबमधून बाहेर पडावं लागलं. तरुणपणी अमेरिकेतील जीवनातली सर्व प्रलोभनं क्षणात झुगारून मी परत पंजाबच्या भूमीवर पाऊल ठेवलं. आपल्या ध्येयाच्या पूर्ततेसाठी मी फाशीच्या तख्तापर्यंत जाऊन आलो. १९१५ साली दररोज स्नान झाल्यानंतर दोन-दोन तास उभं राहून याच पंजाबचं चित्र मी डोळ्यापुढे आणत होतो, ज्याची सेवा करण्याचा अधिकार फाशीच्या गळफासाचा ज्याला स्पर्श झाला आहे त्यालाच हा अधिकार पोचतो.

१९१५ ते १९२२ या कालखंडात जेव्हा मी काळ्या-पाण्यावर व भारतातील अनेक तुरुंगांच्या काळ्या, कुट्टकुट्ट्या कोठड्यात बन्दिवान होतो, हाता-पायात बेड्या होत्या-त्याही कामी पंजाब भूमीची सेवा करण्याची पुन्हा संधी आपणास मिळेल हाच आशेचा चिवट धागा माझ्यापुढे होता. ती संधी आता माझ्या जीवनात आली. मी स्वतःला मोठा भाग्यवान समजतो. एखाद्या महान तपश्चर्येचं फळ काय असतं, हे महान तपश्चर्या करणाऱ्यालाच कळतं. ज्या पंजाबचं प्रेम माझ्या मनात भरलेलं होतं, ज्याची सेवा करता यावी म्हणून सर्वसाधारण माणूस कल्पनाही करू शकणार नाही, अशा गोष्टी मी केल्या-त्याच पंजाबच्या भूमीवर १७ डिसेंबर १९५७ रोजी मी स्थायीक होण्याच्या उद्देशानं पाऊल ठेवलं. ते भाग्य मला लाभलं. ज्या परिस्थितीमुळे मला ही सुसंधी मिळाली त्या परिस्थितीला शतशः धन्यवाद!

१९५७ पूर्वी पंजाबशी माझं नातं सांगायचं म्हणजे, बाळपणी जो पंजाब माझ्या रोमरोमी भिनला-एवढंच त्याच्याशी नातं. पंजाबीपणा मी माझ्या देहात साठवून घेतला होता. १९०८-१९१० पर्यंत याच भूमीवर राहून उच्चतम ध्येयांची प्रेरणा मी मिळवली. याच भूमीवर असताना दास्याच्या शृंखला कशा तोडता येतील यासाठी मी अनेक विचार मनाशी केले होते. पंजाबच्या याच भूमीवर उभे राहून देशबांधवांना हे दाखवण्याचा प्रयत्न केला होता की देश स्वतंत्र करण्यासाठी स्वतःचं बलिदान करण्यासाठी कसं सज्ज व्हावं लागतं

सर्व जगभर भ्रमंती करून, पायपीट करून, अमूक प्रकारच्या अग्निदिव्यातून पार होऊन जीवनाच्या संध्याकाळी मला परत पंजाबात राहण्याची संधी मिळते-हे खरोखरच माझं सुदैव म्हटलं पाहिजे.

सेवेचं व्रत आत्मसात करून, सेवेच्या क्षेत्रात एक सेवक म्हणून मी जेव्हा काम करू लागलो, तेव्हा पंजाबच्या एका महान समाजसेवकाची माझ्यावर दृष्टी पडली. त्यांनी मोठ्या चतुरपणानं मला पंजाबमध्ये नेलं. पंजाबच्या तरुणवर्गाची सेवा करण्याचं भाग्य माझ्या वाट्याला आलं याचे सर्व श्रेय सरदार प्रतापसिंह कैरों, पंजाब सरकार आणि शिक्षण खात्याला द्यावे लागतील. मी या सर्वांचा अतिशय आभारी आहे. ज्या तरुणांनी शिक्षक-अध्यापकांनी, शिक्षण खात्यातील अधिकाऱ्यांनी मला संधी दिली आणि माझी सेवा स्वीकारली याबद्दल मी या सर्वांचा आभारी आहे.



तुरुंगातून मी जेव्हा पळालो व भूमिगत अवस्थेत राहू लागलो त्या सुमारास मी एका अशा देशभक्ताच्या शोधात होतो जो देशप्रेमासाठी काहीही करायला तयार आहे— जो संपूर्णपणे देशाला स्वतंत्र करण्यासाठी सर्वप्रकारे प्रयत्न करतो आहे— ज्याच्या निष्ठा वादातीत आहेत व मनात विश्वास निर्माण करणाऱ्या आहेत. अशी व्यक्ती माझ्या दृष्टोत्पत्तीस आली नाही. १९२७–२८ मध्ये पंडित जवाहरलाल नेहरू भारतातील तरुणांच्या गळ्यातले ताईत होते— तरुणांचे लाडके नेते होते. मी या अगोदर त्यांना कधी बघितलेले नव्हते. ज्या उत्कटतेने ते देशसेवेच्या कार्याला लागले होते आणि भारताला स्वतंत्र करण्याची आकांक्षा ते ज्या तळमळीने व्यक्त करत होते— हे सर्व बघून मी त्यांच्याकडे ओढला गेलो. इंग्रज सरकारच्या गुप्तहेरांचा त्यांच्याभोवती सतत गराडा असे. पुष्कळसे गुप्तचर देशभक्तांचे पोषाख घालून त्यांच्या आगेमागे फिरत. अशा परिस्थितीत त्यांना भेटायचं कसं— हा एक प्रश्नच होता. माझ्या प्रामाणिक हेतूवर विश्वास ठेवणारा व पंडितजींनाही ज्याच्यावर विश्वास आहे, असा कुणीच माणूस भेटेना. त्या सुमारास देशाची राजकीय परिस्थिती खूपच अस्थिर बनलेली होती.

## राजकोटमध्ये

इंग्रज सरकारचे धूर्त हेर मोठ्या संख्येनं राजकोटला आलेले होते. जवाहरलालजींच्या सर्व कार्यक्रमांवर बारीक नजर ठेवणे व त्यांना भेटायला कोण कोण येतं, याची नोंद घेणे हे त्यांचं काम होतं. रस्त्यावर, स्टेशनवर, प्रत्येक नवख्या व अपरिचित माणसावर हे हेर नजर ठेवून होते. या सर्वांचा डोळा चुकवून, जवाहरलाल नेहरू यांच्यापर्यंत कसं पोचायचं, ही माझ्यासमोरची बिकट समस्या होती. त्यांना भेटून त्यांच्याशी चर्चा करणं ह्या तर दूरवरच्या गोष्टी होत्या. त्यांना जवळून पाहायचं कसं, हा खरा प्रश्न होता. राजकोटला जाऊन आपण त्यांचं दर्शन घ्यायचंच, हे मी मनोमन पक्कं ठरवलं. नेहरूंना तर बघायचं— नाल गुप्तचरांच्या दृष्टीला पडायचं नाही, यासाठी मी एक योजना आखली.

सायंकाळी माझे भावनगरमधील तरुण मित्र एका स्पेशल गाडीनं राजकोटला रवाना झाले. मीही त्यांच्याबरोबर प्रवास करावा, असा त्यांचा आग्रह होता. मी त्यांना खरं कारण सांगू शकत नव्हतो. हसत हसत त्यांना एवढंच सांगितलं की मी राजकोटला येऊन तुम्हाला भेटेन. राजकोटला मी कशातऱ्हेने पोचलो याचं सविस्तर वर्णन अन्यत्र केलं

आहे. गाडी राजकोटला पोचली त्याच सुमारास मीही रातोरात १०८ मैलांचं अंतर सायकलीवरून प्रवास करून पुरं केलं होतं. सायकल एका ओळखीच्या माणसाकडे ठेवून मी मिरवणुकीत सामील झालो. माझी शारीरिक ताकद बघून तरुण वर्ग माझ्यावर खुश होता—आणि गुप्तचरांच्या नजरेला आपण पडलो नाही म्हणून मी खुश होतो. जवाहरलाल यांना बघता येईल—त्यांचं दर्शन होईल, यानं मी आनंदित झालो होतो.

जवाहरलालजींना भेटण्याची संधी मिळाली. आमचं थोडसं बोलणंही झालं. एका विषयावर मी एक जोशपूर्ण भाषणही केलं—परंतु जवाहरलालजींच्या मनात माझ्यासंबंधी विश्वास निर्माण करू शकणारा, असा कुणी भेटला नाही. गुलामगिरीमुळं माणसं एवढी संशयी वृत्तीची बनली होती की, देशावर प्रेम करणाऱ्या दोन व्यक्ती एकमेकांवर विश्वास ठेवू शकत नव्हत्या. जवाहरलालजींना भेटून स्वातंत्र्याचं आंदोलन अधिक तीव्र बनवण्याचा माझा विचार होता. स्वतःच्या हतबलतेपुढं काहीच करता येत नव्हतं. मी खूप व्याकूळ बनलो. जवाहरलालजींची माझी सविस्तर भेट झाली असती तर माझं कार्यक्षेत्र, जीवन-कार्य आणि भविष्य सारं काही बदलून गेलं असतं. परंतु नियतीला हे मंजूर नव्हतं.

### लखनऊला

१९३४ च्या अखेरीस मी जेव्हा रशियाहून भारतात परत आलो तेव्हा काही तरी विशिष्ट कार्य स्वीकारल्याशिवाय केवळ भूमिगत होण्यात अर्थ नव्हता. भारतातील सर्व प्रमुख कम्युनिस्ट नेते या सुमारास एकतर जेलमध्ये होते किंवा भूमिगत झाले होते. अत्यंत विश्वासातील व्यक्तीशिवाय त्यांना भेटणं शक्य होत नसे. मला या नेत्यांशी संपर्क साधता आला नाही. त्यांची भेट घेण्यात मला आणखी एक धोका दिसत होता, त्यांच्यापैकी कोण ब्रिटिशांचा हेर असेल, हे सांगणं कठीण होतं.

पंडितजींची भेट व्हावी, असं मला तीव्रतेनं वाटत होतं—मला राजकीय क्षेत्रात काम करण्याची इच्छा होती ना! रशियामधून क्रांतीची जी प्रेरणा घेऊन मी परत आलो होतो ती प्रेरणा मला गप्प बसू देत नव्हती. लखनऊला काँग्रेस पक्षाचं अधिवेशन भरणार होतं. पंडित जवाहरलाल नेहरू त्याचे प्रमुख होते. अधिवेशनाला भारतातील सर्व महान नेते यायचे होते. तिथं जावं म्हणजे जुन्या मित्रांच्या भेटी होतील—ह्या विचारानं मी लखनऊ गाठलं. लखनऊला एका मित्राकडे थांबलो व आंध्र प्रदेशातील नेत्यांची भेट घेतली. श्री. बुलसू साम्बमूर्तीसंबंधी मी पूर्वी सांगितलंच आहे. ते काँग्रेस कार्यकारिणीचे सदस्य होते. मी त्यांना भेटून सांगितलं की कसंही करून माझी पंडित जवाहरलाल नेहरूंशी भेट घडवून आणा.

त्यांना तुरुंगवास घडो—हे सर्व त्यांना मान्य होतं. मात्र देशावर प्रेम करणारा एखादा क्रांतिकारक सुरक्षित राहू शकणार नाही, हे ते स्वीकारू शकत नव्हते. अशा प्रकारच्या भावनेतून जे देशावर प्रेम करतात, त्यांच्यासंबंधी कवीनं एका क्रांतिकारकाच्या तोंडी पुढील ओळी घातल्या आहेत :

देश की खातिर मेरी दुनिया में यह तौकीर हो,
हाथ में हो हथकडी, पाओं पडी जंजीर हो।
सूली मिले, फांसी मिले और मौत दामनगीर हो,
आँखों की खातिर तीर हो, मिलती गले शमशीर हो।
इससे भी बढकर गर कोई तौकीर हो,
मंजूर हो ! मंजूर हो ! मंजूर हो ?

वर्ध्याला

या घटनेनंतर आमच्या अनेकवेळा भेटी झाल्या. अनेक गोष्टींवर आमची चर्चाही झाली. माझ्या आत्मसमर्पणानंतर जेलमध्ये गेल्यावर, आमचा पत्रव्यवहारही झाला. वर्धा येथे बापूंजवळ असतांना जवाहरलालजींच्या जवळ जाण्याची अनेकवेळा संधी मिळाली.

एकदा पंडितजींनी श्री. जयप्रकाश नारायणजींशी माझी ओळख करून दिली. त्यांनी निर्मळ मनानं मला सल्ला दिला की मी भारतातील प्रख्यात नेत्यांपासून चार हात दूरच राहावं कारण त्यांच्या जीवनात क्रांतिकारकांच्या गुप्त हालचाली गुप्त राहू शकत नाहीत, एखाद्याच्या चुकीनं तुमचं बिंग फुटलं तर तुमचं जीवन उध्वस्त होईल ! तसं न घडो !

१९४२ साली मी जेव्हा महात्माजींपासून अलग झालो व वर्तमानपत्रांतील बातम्यांवरून जवाहरलालजींना ही गोष्ट समजली तेव्हा मी त्यांना भेटावं, असा त्यांनी बराच प्रयत्न केला. त्यावेळी हा निरोप मला पोचला नाही व मी त्यांना भेटायला गेलो नाही, हे माझं मोठं दुर्दैव होतं.

१९४२ नंतर मी एक विशिष्ट विचारसरणी स्वीकारली—त्यामुळं माझा दृष्टिकोणच बदलून गेला आणि वेगळ्याच प्रकारच्या कार्यात पडल्यामुळे मी जवाहरलालजींपासूनही दूर दूर गेलो. आमच्यात दुरावा निर्माण झाला तरी एकमेकांवरील विश्वासाला कधी तडे गेले नाहीत.

भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर भारत सरकारच्या रक्षणासाठी देशबांधवांना उद्देशून मी जे पत्रक प्रसिद्ध केलं—त्या पत्रकात माझ्या मनातलं चित्र चांगल्या रीतीनं व्यक्त झालं आहे.

अनेक इकडच्या तिकडच्या व्यापांत मी गुरफटत गेलो व दहा वर्षांचा काळ अशाच पद्धतीनं गेला. जवाहरलालजींना भेटण्याची काही संधीच चालून आली नाही.

## पासपोर्ट घेण्यासाठी

विश्व-शांतीसाठी जगभर जे आंदोलन उभं राहिलं—त्यात मी उत्साहानं पडलो. शांततेच्या रक्षणासाठी आशिया खंडातील देशांची एक मोठी परिषद पेकिंगला भरायची होती. या परिषदेला उपस्थित राहण्यासाठी माझं नाव सुचविण्यात आलं. चीनच्या भूमीवर पासपोर्टशिवाय मला पाय ठेवणं अशक्य होतं ! त्यावेळी माझं वास्तव्य सौराष्ट्रात होतं. श्री. यू. एन. ढेबर यांच्या शासनानं मला पासपोर्ट द्यायला नकार दिला. महात्मा गांधींचा अनुयायी असलेल्या एका क्रांतिकारकाला—ज्यानं आपलं सबंध आयुष्य देशसेवेसाठी वेचलं होतं, त्याला पासपोर्ट नाकारला जातो, ही गोष्ट धक्कादायक होती. मी मन थोडं शांत केलं आणि जवाहरलालजींच्या मदतीशिवाय पासपोर्ट मिळणं अशक्य आहे—हे माझ्या लक्षात आलं. पत्र पाठवून मी त्यांना भेटीसाठी वेळ मागितली. मला वेळ कळविण्यात आली. भेट झाल्याबरोबर जवाहरलालजींच्या तोंडून शब्द बाहेर पडले—"अरे ! किती वर्षांनी भेटताहात ? भेटला का नाहीत—यापूर्वी ?" त्यांच्या शब्दातून, चेहऱ्यावरील आविर्भावातून माणुसकी प्रगटत होती. मी मनातल्या मनात स्वतःला दूषण देऊ लागलो. एका भल्या माणसाला आपण इतके दिवस का भेटलो नाहीत. ह्या प्रश्नाचं काय उत्तर द्यावं, हेच मला कळेना. मी म्हणालो—"भेटायला काही कारण दिसत नव्हतं—आणि तशी गरजही भासली नाही—आपण भारताचे पंतप्रधान आहात व मी आहे शांततेचा एक कार्यकर्ता. आज तशी आवश्यकता पडल्यामुळं व आपल्या मदतीशिवाय हे काम होऊ शकत नाही—असं लक्षात आल्याबरोबर आपल्याला भेटायला आलो. मी चीनला जाऊ इच्छितो परंतु आपल्या सरकारला मी देशाबाहेर जाण्यात धोका वाटतो—मी माझ्या देशावर आपल्या इतकंच प्रेम करतो असं आपण समजत असाल—तर मग माझ्यापासून देशाला कोणता बरं धोका आहे?" मी बोलत असतानाच त्यांच्या चेहऱ्यावर बदल जाणवले. काही क्षणातच हसऱ्या चेहऱ्यानं ते म्हणाले—नियमाप्रमाणं तुम्ही पासपोर्टसाठी आवश्यक ती फॉर्मस् भरून द्या—तुम्हाला अवश्य पासपोर्ट मिळेल.

माझ्या भाषणातून मी जवाहरलालजींवर आणि त्यांच्या राजकारणावर कडक टीका केली होती. त्यांच्यासंबंधी अनेक प्रसंगी मी आदर व प्रेम व्यक्त केल्यामुळे कम्युनिस्ट माझ्याविषयी साशंक होते. आमची ही भेट झाल्यानंतर, हा उमद्या मनाचा, राजनिष्ठ व सुसंस्कृत माणूस प्रत्येक गोष्टीचं मूल्यमापन मनात पूर्वग्रह न ठेवता करतो, उच्च भूमिकेवरून तो सर्व व्यवहाराकडे बघतो, हे त्याचं चित्र कायमचं माझ्या मनावर कोरलं गेलं.

## चिनी आक्रमणानंतर

चीननं भारतावर आक्रमण केल्यानंतर काही दिवसांनी मी जवाहरलालजींची भेट घेतली. थोडं बोलणं झालं. चिनी आक्रमणामुळे निर्माण झालेले गुंतागुंतीचे प्रश्न, त्यामुळं निर्माण झालेले भयंकर स्वरूपाचे दुष्परिणाम, यासंबंधी देशबांधवांना—विशेषतः तरुणवर्गाला

नीट समजावून सागण्याची आवश्यकता आहे—असं आमचं बोलणं झालं. जवाहरलालजींच्या इच्छेनुसार मी देशाच्या कोपऱ्या-कोपऱ्यात जाऊन, कॉलेज विद्यार्थ्यांना, शिक्षकांना पंडितजींचा संदेश समजावून सांगितला.

## कॉंग्रेसपक्षाच्या संघटनेसंबंधी

काश्मीरचे नेते शेख अब्दुल्ला यांच्या सुटकेनंतर वृत्तपत्रांनी सरकारवर कडाडून टीका केली होती—हे आपणा सर्वांना माहीत आहे. स्थानबद्धतेतून सुटका झाल्याबरोबर शेख अब्दुल्लांनी जी भाषणं केली आणि आपलं निराळंच रूप त्यांनी दाखवलं, या घटनांनी मीही खूप अस्वस्थ झालो. मी जवाहरलालजींना पत्र लिहून भेट मागितली. २५ एप्रिल १९६४ रोजी दुपारी १२-१५ ची वेळ मला देण्यात आली. ठरल्यावेळी त्यांनी मला भेटीला बोलावलं. अर्धा तास आम्ही अनेक बाबींवर मोकळेपणानं चर्चा केली. कॉंग्रेस संघटनेसंबंधी बोलताना मी स्पष्टपणे त्यांना सांगितलं की आपण जर कॉंग्रेस संघटनेची मजबूत बांधणी करू शकलो नाहीत, तर देशाला आपत्तीमधून वाचवणं कठीण होऊन बसेल. त्यामुळं कॉंग्रेस संघटना वाचवणं हे मी माझं कर्तव्य मानतो—असं मी त्यांना सांगितलं. यासंदर्भात आपण सोपवाल ते काम करायला मी तयार आहे, असंही म्हटलं. कॉंग्रेस कार्यकर्त्यांना राजकीय प्रश्नांचं फारसं ज्ञान नाही—त्यांना जर पद्धतशीरपणे सर्व गोष्टींची माहिती करून देण्यात आली तर त्याचे निश्चितच चांगले परिणाम घडून येतील. जवाहरलालजींना माझे विचार पसंत पडले. त्यांनी खिशातून नोटबुक काढून, यासंबंधी कॉंग्रेसचे अध्यक्ष श्री. कामराज यांच्याशी चर्चा करण्याबिषयीची नोंद केली. ए. आय. सी. सी. च्या बैठकीच्या वेळी जवाहरलालजी, श्री. कामराज यांच्याशी कॉंग्रेस संघटना मजबूत करण्याचं कार्य माझ्यावर सोपवण्यासंबंधी चर्चा करणार होते. त्यांचं आणि श्री. कामराज यांचं काही बोलणं झालं अथवा नाही, किंवा काय ठरलं याविषयी मला काहीच समजलं नाही.

## मृत्यूनंतर

३० मे रोजी जवाहरलालजींना भेटून मी आसामच्या दौऱ्यावर निघणार होतो. २७ मे रोजी त्यांच्या निधनाची बातमी समजल्यानंतर मी फरीदाबादहून दिल्लीला पोंचलो. रात्रीची वेळ होती. साडे आठ वाजले असावेत. पावसाचे थेंब पडत होते. वारा जोरात सुटला होता. 'तीन-मूर्ती ' कडे जाणारा रस्ता बंद होता. दुसऱ्या अनेक रस्त्यांनी जाऊन मी जवाहरलालजींच्या निवासस्थानाजवळ पोंचलो. तिथं गेल्यावर निवासस्थानाच्या चहुबाजूस हजारो श्रद्धाळू नागरिकांनी रांगा लावल्या आहेत, हे माझ्या दृष्टीस पडलं. जनसमुदाय अत्यंत शांत होता—कुणाच्या तोंडून शब्द देखील बाहेर पडत नव्हता. असं वाटत होतं की जवाहरलालजी निष्प्राण झाल्याबरोबर ही सर्व माणसंही निष्प्राण बनली आहेत. चैतन्यच लोप पावलं आहे. देशावर उत्कट प्रेम करणाऱ्या देशभक्तांचं खरं रूप मला बघायला मिळालं होतं—मीही त्यातलाच एक होतो. तिथं थोडावेळ उभा राहून

व नंतर इकडे तिकडे फिरून, जवाहरलालजींचं अंत्यदर्शन कसं घेता येईल, यासंबंधी मी विचार करू लागलो. त्या रात्री निराश होऊनच मला परतावं लागलं. दुसऱ्या दिवशी २८ मे रोजी त्या ठिकाणी परत गेलो तेव्हा तोच जनसागर तिथे उभा होता. ऊन्ह वाढत होतं आणि वाढत्या उन्हाबरोबर लोकांच्या झुंडीच्या झुंडी तिथं येऊन थडकू लागल्या. प्रत्येकाचे डोळे, चेहरा आणि त्यांचं मौन हेच स्पष्ट करत होतं की एका महान तपस्व्याचं दर्शन तप केल्याशिवाय होऊ शकणार नाही. एका तपस्व्याच्या आठवणींनी साऱ्यांनाच तपस्वी बनवलं !

लोकांच्या मनात आपल्या लाडक्या नेत्याविषयी किती श्रद्धा भरलेली आहे आणि ते किती शांतपणे तिथं उभे राहिले आहेत, हे दृश्य बघून ज्या महान तपस्व्यानं प्राण्यांना आपल्या हृदयात, डोळ्यात समावून घेतलं होतं त्या पवित्र माणसाला लोकही आपल्या मनात—डोळ्यांच्या पापण्यात साठवून त्याला डोक्यावर घेऊन त्याचे पुजारी बनतात ही गोष्ट स्पष्टपणे प्रतीत होत होती. अंत्यदर्शनासाठी येणाऱ्या लोकांची संख्या सारखी वाढत होती. आपण कुठेतरी अशा ठिकाणी जाऊन उभं राहावं—जिथून त्यांचं दर्शन होईल, हा विचार करून टिळक रोडच्या मोठ्या सडकेवरील एका छोट्या गल्लीत जाऊन मी उभा राहिलो.

ज्या माननीय लाडक्या नेत्याला मी अनेकवार भेटलो होतो—ज्यानं मला जवळचा मानलं होतं—त्या नेत्याला त्याच्या अखेरच्या यात्रेच्या मार्गावर वीस फूट अंतरावरून मी बघितलं—त्याचं दर्शन घेतलं.

जो निःस्वार्थी समाजसेवक आपल्या हयातीत ज्या मार्गावरून वाटचाल करत जीवन जगतो, सेवाभावी लोक त्या समाजसेवकाच्या मार्गावर आपले डोळे खिळवून उभं असतात अंत्य यात्रेच्यावेळी ज्या भावनेनं लोक त्यांच्या तिरडीला खांदा देतात-त्याच भावनेनं त्या रस्त्याच्या मातीचा कण न् कण पवित्र मानून कपाळाला लावतात—त्या थोर व्यक्तींना पार्थिवही लोकांच्या अंतःकरणात कायमचं टिकतं—ही आठवण, आयुष्यभर त्यांच्या मनात कायम राहते.

आमचा देश खरोखरच मोठा भाग्यवान आहे—ज्या देशात आपोआपच स्वार्थरहित आणि समर्थ नेते जन्म घेतात—ज्यांना आम्ही डोक्यावर घेऊन मिरवण्यात अभिमान मानतो—तो देशही महानच म्हटला पाहिजे—आपला देश असाच सुदैवी राहो, हीच प्रभूचरणी प्रार्थना !

**चिन्ती आक्रमणासंबंधी** .. .. .. . ३८

चिनी आक्रमणाच्या वेळी नेहरूजींच्या आदेशावरून भारतभर फिरून तरुणांना प्रेरणादायी ठरावीत, अशा उद्देशानं मी जी व्याख्यानं दिली त्यांच्या गोषवारा पुढीलप्रमाणे होता :—

" कम्युनिझमच्या प्रचाराचं निमित्त करून, विश्वासघातकी चिनी लोक, लुटमार करत, अत्याचार व पीडा शस्त्रबळानं भारतावर कब्जा करून, सगळ्या जगात यांचा भडीमार करून आपलं वर्चस्व प्रस्थापित करण्याच्या प्रयत्नात आहेत.

भारतात येऊन स्थायिक होण्यासाठी चिनी चोर कसे लालचावलेले आहेत, हे आपणास चांगलं माहीत आहे. भारतासारख्या स्वर्गतुल्य देशात राहता येईल या कल्पनेनं, हळूहळू पुढे निघाले आहेत, एखाद्या भाजी-पाल्याप्रमाणे ते कापले जात आहेत—परंतु त्यांची घुसखोरी थांबत नाही.

आमच्या देशाचे शूर तरुण चिन्यांचा प्रतिकार करून त्यांना कापून काढत आहेत—आपल्याही प्राणांची आहुती देत आहेत—मात्र ते मागे हटत नाहीत. सेनापतींच्या आज्ञेनं योजना आखून ते काही वेळा माघार स्वीकारतात—योग्य जागा हेरून ते परत शत्रूंवर चाल करतात.

हिटलरच्या क्रूर आणि सुसज्ज सैन्यापुढं रशिया व इंग्लंड या देशांना सतत चार वर्षं योजनापूर्वक माघार घ्यावी लागली—परंतु आपल्या पोलादी चौकटीच्या संघटनेत लेशमात्रही भेग त्यांनी पडू दिली नाही. ही वस्तुस्थिती मी आपल्या डोळ्यांनी बघितलेली आहे. त्यांची संघटना शिथिल बनली असती तर सबंध जगावर क्रौर्याचं साम्राज्य प्रस्थापित झालं असतं.

हिटलरच्या अत्याचारी फौजांनी अर्धा रशिया भस्मसात करून टाकला. पंचाहत्तर लाख तरुण सैनिकांना गोळ्या घालून ठार करण्यात आलं. एक कोटी तरुण जखमी झाल्यामुळे बेकार बनले. हिटलरच्या बॉम्ब हल्ल्यांनी लंडनमधील आठ लाख घरं उडवून बेचिराख करण्यात आली.

जो हिटलर वादळाच्या रूपानं मानवतेचा वृक्ष समूळ उपटून टाकण्याच्या विचारात होता—त्याच हिटलरला व त्याच्या क्रूर फौजेला दोस्त-राष्ट्रांच्या संघटित सैन्यांनं असं उखडून फेकलं की आज त्याचा कुठं मागमूसही शिल्लक राहिला नाही.

आम्हाला अवतार मानून चालणाऱ्या माझ्या मित्रांनो! ईश्वरी अवतार, ऋषी-मुनी व गुरुजनांना भजणाऱ्या उपासकांनो, प्रत्यक्ष रणांगणावर जाऊन आम्हाला जगाला हे दाखवून द्यायचं आहे की आम्ही अशा महापुरुषांचे वारसदार आहोत—ज्यांच्या महानतेपुढं सारं जग नतमस्तक होतं. आपण कुणी एकाकी आहोत असं मानण्याचं कारण नाही. मानवतेचं कल्याण इच्छिणारे सर्वजण आपल्या सोबत आहेत. आपण मागू ती मदत करायला ते सदैव तयार आहेत. आम्ही मदत स्वीकारायचाच अवकाश, भारत-चीन युद्ध हे जागतिक महायुद्धाचं रूप धारण करील.

चिनी सैन्याचं आक्रमण अधिकाधिक उग्ररूप धारण करत आहे. कोणत्याच रणक्षेत्रात आमचे सैनिक त्यांच्याशी चांगला मुकाबला करू शकले नाहीत. आमच्याकडे आधुनिक संहारक शस्त्रांची कमतरता आहे. मानव-जातीच्या प्रेमाची महती गाणारे व विश्वास-घातकी चिनी आक्रमकांना शत्रू लेखणारे लोक आम्ही त्यांच्याकडून प्राणघातक शस्त्रं खरेदी करून शस्त्रबळ वाढविण्याची आपणाला सूचना करत आहेत. ज्या हत्यारांनिशी चिनी लुटारू आपल्यावर चाल करून आले आहेत—तसली शस्त्रं आपल्या सैन्यापाशी नाहीत. ही शस्त्रं आपण तावडतोब बनवू शकत नाही. आधुनिक शस्त्रास्त्रं खरेदी करून आणावी, एवढा पैसा देशाकडे नाही.

जगातील सर्व पुरोगामी राष्ट्रं, चीनची जी आगेकूच चालली आहे ती थांबविण्याबद्दल जोपर्यंत चीनवर दबाव टाकणार नाहीत तोपर्यंत चीन माघार घेणार नाही. हे सगळे देश आपल्या मदतीला धावून आले नाहीत तर मग भारतालाही आपली धोरणं बदलावी लागतील. कोणत्याही क्षणी भारताचं राजकीय धोरण बदलू शकतं. यासंबंधी काहीही अनुमान करणं कठीण आहे. आपले सर्वांचे लाडके नेते जवाहरलाल नेहरू हेच या संबंधी निर्णय घेऊ शकतात. अशा या बिकट परिस्थितीत आपल्या सरकारच्या ज्या काही अपेक्षा असतील त्या पूर्ण करण्याची जबाबदारी तरुण वर्गानं उचलली पाहिजे. जोवर रणमैदानावर जाऊन प्राणांची बाजी लावायला तुम्हाला कुणी आव्हान केलेलं नाही तोपर्यंत तुम्ही तरुणांनी आपलं रक्त त्या जवानांसाठी सुरक्षित ठेवावं जे रणांगणावर, देशाच्या सीमेवर आपल्या रक्ताचा सडा शिंपडत आहेत.

तरुणांनो! बलाची उपासना करा. तारुण्याचं उष्ण रक्त तुमच्या धमन्यांतून वाहत आहे—देशासाठी तुमचे बाहू स्फुरण पावले पाहिजेत. बलोपासना करता करता तुमचा आत्मविश्वास अशा रीतीनं जागृत होवो की, चिनी घुसखोरांचा तुम्ही सहजपणे प्रतिकार करू शकाल.

तरुण मित्रांनो! तुम्ही मोठे भाग्यशाली आहात. तुम्ही सर्वजण शक्तिशाली बनून आपल्या देशाचं रक्षण करा. तुम्हाला शाळा-कॉलेजातून सैनिक शिक्षण मिळावं, याची भारत सरकारनं व्यवस्था केली आहे. तुम्ही निष्ठावान सैनिक बनून, देशाचं रक्षण

करण्याची जी संधी चालून आलेली आहे, ती तुम्ही वाया घालवू नका. सैनिकी शिक्षण पूर्ण करून तुम्ही जगातल्या आधुनिक शस्त्रास्त्रांची मागणी करा—अशी शस्त्रं तुमच्या बलशाली हातात आल्यावर, चिन्यांना तुम्ही हाकलू शकाल—त्यांना माघार घ्यायला भाग पाडाल. रशियामध्ये स्टालिनग्राडच्या भूमीवर हिटलरच्या फौजांची जी परिस्थिती झाली—तीच गत चिनी सेनेची होईल.

अत्याचारी हिटलरच्या जुलमी पंजातून सुटका करून घेण्यासाठी रशियाच्या एक करोड तरुणींनी आपलं बलिदान केलं होतं. आपण देखील त्याच बाण्यानं चिनी घुसखोरांवर प्रचंड प्रहार करून त्यांना पळता भुई थोडी करण्याचा का बरं निर्धार करू नये? प्राचीन वीर-गाथांमधून, धरणी ही आपली माता आहे, तिचं रक्षण बलिदान करूनच होऊ शकतं, असंच सांगितलेलं आहे

आपणाला हवी असलेली प्रचंड मदत मिळेपर्यंत, केवळ तारुण्याच्या ताकदीवरच आपल्याला शत्रूला थोपवून ठेवावं लागेल. राष्ट्राच्या शिस्तीनी सब बंधनं स्वीकारून, पोलादी शृंखलांची बंधनं स्वीकारून—आणि राष्ट्राची तटबंदीची चालती-फिरती भिंत बनून आम्हाला देशरूपी किल्ल्याचं रक्षण केलं पाहिजे.

रणांगणावरचे शूर सैनिक बनून आम्ही आपल्या देशाच्या स्वातंत्र्याचं रक्षण केलं तर विजयाची पताका आपल्या हाती असेल—मानवतेविषयी प्रेम असलेले बलशाली व स्वतंत्र देश आपल्या साहाय्यासाठी आपल्या मागे उभे राहतील. त्यानंतर आपल्या राष्ट्राच्या शत्रूंची तीच गत होईल, जी घुसखोरांची किंवा लुटारूंची होते—विश्वासघातक्यांची होते.

'जय-हिंद' ची घोषणा देत देत पुढे चला! पुढली येणारी पिढी देखील घोष करील 'जय-हिन्द'!

* * *

इ. स. १९१४ पावेतो मला राजकारणाचं नीट आकलन झालेलं नव्हतं—यामुळेच सह-काऱ्यांची मला पारख करता आली नव्हती. कुणाचीही कोणत्याही प्रकारे परीक्षा केली नव्हती. त्यांची पारख करून घ्यावी, हा विचारही मनापुढे उभा राहिला नाही. सर्वजण माझ्यासारखे देशप्रेमानं भारावलेले होते.

१९१५ साली सर्वांनाच अत्याचारांच्या भट्टीत झोकल्यामुळे एक प्रकारच्या अग्नि-दिव्यातून जावं लागलं. आमचं हे अग्नि-दिव्य १९२२ पर्यंत होत राहिलं. माझे अनेक सहकारी या अग्नि-दिव्यानं उजळून निघाले. बघणाऱ्यांचे डोळे त्यांच्यावरच खिळून राहिले

ज्यांच्या जीवनानं मी प्रभावित झालो व जे माझ्यापुढे प्रेरणादायी म्हणून ठरले अशा माझ्या सहकाऱ्यांची आठवण करण्याचं भाग्य मला लाभलं, याचा खरोखरच आनंद वाटतो. त्यांचा मला कधीच विसर पडला नाही. माझ्या या सहकाऱ्यांकडे सगळा पंजाब मोठ्या अभिमानानं पाहतो. ही सर्व माणसं आता मानवजातीची अमूल्य रत्नं म्हणून ओळखली जातात.

या सर्वांत, बाबा खड्गसिंह त्यागाची आणि सदाचाराची मूर्ती समजले जात होते.
बाबा केसरसिंह हे नर-केसरी होते. शौर्याचा आणि पौरुषाचा ते मूर्तीमंत अवतार होते.
बाबा ज्वालासिंह देखील मानव-प्रेम, देशप्रेम, सेवा आणि सज्जनपणाचा अवतार होते.
बाबा निधानसिंह व बाबा संत विसाखासिंह तपस्वी, सत्यता आणि गांभिर्याचे प्रतीक होते.
पंडीत जगतराम भारद्वाज (हरयाणा), गगन बिहारी हे स्वप्नं बघणारे होते—मोकळ्या वातावरणात गगनभराऱ्या मारणाऱ्या पक्षाप्रमाणे होते.

श्री. विष्णु गणेश पिंगळे, सज्जन, बुद्धिमान व महानतेचे आदर्श पुरुष होते.

बाबा हरनामसिंह टुंडीलाट, कविसम्राट रवीन्द्रनाथ टागोरांनी, ज्या वीरांना उद्देशून, आपली प्रख्यात कविता 'एकला चालोरे' लिहिली—त्या वीर पुरुषांचे प्रतिक होते.

झाशीचे धैर्यशाली पं. परमानन्द यांचं जीवनही एक आदर्श जीवन होतं.

बाबा प्यारासिंह व बाबा शेरसिंह, या दोन ज्येष्ठ व्यक्तींचं माझ्या जीवनात निराळं स्थान होतं.

आपल्या प्राचीन इतिहासात राजर्षी म्हणून ज्यांना संबोधिलं आहे त्यांची आठवण यावी असं व्यक्तिमत्त्व बाबा सोहनसिंह भकना यांचं होतं. ही एक व्रतधारी व्यक्ती होती.

करतारसिंह सराबा यांचं जीवन वीजेच्या तारेप्रमाणं होतं. अतिशय थंड मनाची माणसंही त्यांच्या सहवासानं पेटून निघायची—त्यांच्यात विजेचा संचार व्हायचा. अतुलनीय साहसाची व वीरतेची ते मूर्ती होते.

माझ्या देशसेवा-भावनेविषयी ज्यांनी सहानुभूती दाखवली, ज्यांनी माझं रक्षण केलं व वेळोवेळी माझी मदत केली व प्रत्येक कार्यात साथ दिली—ज्यांच्या मदतीमुळं मी सोळा वर्षं भूमिगत अवस्थेत परंतु समाजोपयोगी कार्यात भाग घेऊ शकलो—त्यातल्या काहींची नावं खालीलप्रमाणे आहेत :—

१. आन्ध्र प्रदेशचे मोठे काँग्रेसचे पुढारी व तरुण कार्यकर्ते ज्यांनी १९२१ च्या माझ्या तुरुंगवासाच्या काळात मला सर्व प्रकारची मदत केली.
२. ३० नोव्हेंबर १९३२ च्या सकाळी बारच्या सुमारास एखाद्या देवदूताप्रमाणं ज्यानं माझी मदत केली होती, ज्यांचं नावही मला समजलं नाही तो महाराष्ट्रातील एक शूर तरुण.
३. अमरावती येथील डॉ. वऱ्हाडपांडे
४. अमरावतीचेच एक प्रख्यात समाजसेवक डॉ. शिवाजीराव पटवर्धन
५. मुंबईचे डॉ. नारायण दामोदर सावरकर
६. पुणे येथील काकासाहेब गाडगीळ
७. श्री. गणेश रघुनाथ वैशंपायन तसेच श्री. काशीनाथ वैशंपायन
८. श्री. पुरुषोत्तम विनायक बाणे, भावनगर
९. श्री. हरिभाई त्रिवेदी, भावनगर
१०. श्री. नानाभाई भट्ट, भावनगर
११. श्री. बहाउद्दीन उस्मान शेख, भावनगर
१२. श्री. पी. डी. पट्टणी, भावनगर
१३. श्री. जोरावरसिंह गोहिल, भावनगर
१४. श्री. मणिलाल बक्षी, भावनगर
१५. श्री. मस्तराम पंड्या, भावनगर
१६. श्री. अमृतलाल सेठ
१७. श्री. हरखचंद मोतीचंद शहा
१८. श्री. जीवनलाल मोतीचंद शहा
१९. श्री. मनुभा चैयर-माल

२०. श्री. लाला दुनिचंद, अम्बाला
२१. श्री. जनाब महमदअली कायल
२२. श्री. हेमचन्द चतुर्भुज शुक्ला (जीवनलाल कंपनीचे)
२३. श्री. हरिकृष्ण
२४. श्री. सरोजकुमार बक्षी
२५. श्री. गिरधरलाल जसानी, कलकत्ता
२६. श्री. रतिलाल जसानी, कलकत्ता
२७. श्री. नटवरलाल जसानी, कलकत्ता
२८. श्री. नागरदेवळेकर
२९. श्री. चुन्नीलाल कापडिया, मुंबई
३०. श्री. काळे गुरुजी, मुंबई
३१. श्री. पोपटानी, मुंबई
३२. श्री. गोपालदास महंत, मुंबई
३३. श्री. विठ्ठलदास जोहरी, मुंबई
३४. श्री. पुरुषोत्तमदास फडिया, मुंबई
३५. श्री. गोपालराव कुलकर्णी
३६. श्री. आबासाहेब बाग
३७. श्री. हाथीभाई गुलाबचंद, मुंबई
३८. श्री. सोहनलाल दुगड, कलकत्ता
३९. श्री. अम्बुभाई सेठ गलियाकोटवाले, मुंबई

क्रमांक ३६ ते ३९ मधील तीन धनिक व्यक्तींनी मला समाजोपयोगी कार्यांसाठी प्रेमानं आर्थिक साहाय्य केलं. माझं जीवनही सुखासमाधानानं कंठता आलं. श्री. कांतिलाल मोदी आणि भावनगरचे संस्थानिक श्री. कृष्णकुमारसिंहजी यांचा उल्लेख यापूर्वीच मी केलेला आहे.

या व्यक्तींखेरीज शेकडो कुटुंबांनी व तरुणांनी मला मागितली ती मदत केली. त्या सर्वांचे नामोल्लेख करणं केवळ अशक्य आहे. त्या सर्वांच्या आठवणी मी मनात जपून ठेवल्या आहेत. त्यांच्या आठवणींच्या बळावरच आजही मी सेवेच्या क्षेत्रात उभा आहे—आपल्या अंगीकृत कार्यात मग्न आहे.

• • •

जीवनाच्या वाटचालीत माझ्यासमोर वेगवेगळी वळण आली. प्रत्येक वळणापाशी यापुढे कोणत्या दिशेनं जावं, हा एक मोठाच प्रश्न माझ्यासमोर उभा राही. अनेकवेळा अशा प्रसंगी निर्णय घेतांना दोनच गोष्टी माझ्यापुढे उभ्या रहायच्या—कैदी बनून तुरुंगात खितपत पडायचं की स्वाभिमानी मृत्यू स्वीकारायचा !

अनुभवानं माझं असं मत झालेलं आहे की वेळोवेळी जीवनामध्ये मी जी दिशा स्वीकारली जो मार्ग निवडला—तोच माझ्यासाठी योग्य होता. ठरविलेल्या मार्गानं जाऊन मी माझ्या जीवनाचा उत्कर्ष करू शकलो—सतत प्रगती करत राहिलो. लोकांच्या दृष्टीनं मी घेतलेला निर्णय चुकीचा असण्याची शक्यता आहे. परंतु विचार केल्याशिवाय मी कुठलीच गोष्ट केली नाही—एवढं मात्र निश्चित सांगू शकतो. मी अतिशय आत्मविश्वासानं जे जे केलं त्याबद्दल मला कधी पश्चात्ताप करावा लागला नाही—दुःख मानावं लागलं नाही.

१९४२ ते १९४७ हा काळ भारताचं कल्याण व्हावं असं मानणाऱ्या व्यक्तींच्या जीवनातला एक कसोटीचा काळ होता. कार्यासंबंधी आणि कार्याच्या परिणामासंबंधी योग्य निर्णय कोणता ठरेल, हा प्रश्न सर्वांच्याच समोर होता. ही कसोटीची वेळ होती. यात कोण यशस्वी झाला, कोण अयशस्वी झाला ह्याचा निवाडा भावी इतिहासकार करतील. ह्या सुमारास भारतीयांना खालील प्रश्नावर मोठ्या गांभीर्यानं विचार करावा लागला :

१. सैतानी *इंग्रज राजवटीशी कोणत्याप्रकारे वागावं ? मित्रत्वानं की शत्रुत्वानं ?
२. अहिंसा-हिंसा यापैकी कोणत्या शस्त्राची निवड करावी ?
३. बॉम्बस्फोट करून माणसं ठार करावी का केवळ पूल उडवून द्यावे ?
४. मुसलमानांना भाऊ मानून आलिंगन द्यावं का त्यांना परमेश्वराच्या भरंवशावर सोडून द्यावं ?
५. आक्रमण करणाऱ्या जपान्यांविरुद्ध शस्त्र हातात घेऊन सामना करावा का इंग्रजा-विरुद्ध लढणारे आपले साथी म्हणून त्यांचं स्वागत करावं ?
६. इंग्रज सत्तेशी सामना देऊन जपानचा मार्ग निष्कंटक करावा का इंग्रजांशी असलेले मतभेद मिटवून त्यांना सहकार्य देऊन जपान्यांना नेस्तनाबूत करावं ?

---

*बापू इंग्रज सरकारला सैतान म्हणून संबोधित होते.

विचारशील भारतीयांनी ह्या प्रश्नांचा गंभीरपणे विचार करून निर्णय घेतला होता. या निर्णयाविषयी वेगवेगळे दृष्टिकोण असू शकतात.

इंग्रजांच्यासमोर देखील मोठी समस्या होती—मित्र कुणाला मानावं? शत्रू कुणाला मानावं? शासनाची सूत्रं कुणाच्या हाच्यात द्यावी? आपल्याशी एकनिष्ठ असणाऱ्या संस्थानिकांच्या हाती? की आपल्याला 'सैतान' म्हणून संबोधणाऱ्या कांग्रेस नेत्यांच्या हाती? वर्णभेद न जुमानणाऱ्या आणि आपल्या विजयासाठी सहकारी म्हणून सोबत आलेल्या कम्युनिस्टांना शासनाची सूत्रं द्यावीत काय? भारताला परमेश्वराच्या हवाल्यावर सोडून द्यावं? का दडपशाहीचं धोरण कायम ठेवून सत्ता आपल्याच हाती ठेवावी?

शेवटी जे काही झालं ते आम्हीच केलं, सर्वांनी एकत्र येऊन केलं—असाही विचार मांडला जातो. सर्व गोष्टींचा शांत मनानं विचार करून, जे व्हायला हवं होतं—तेच झालेलं आहे, असा निर्वाळा देणं—हे अवघड आहे. माझ्या दृष्टीनं ही एक विवाद्य स्वरूपाची बाब ठरली आहे.

हिंदुस्थानपासून वेगळं होऊन पाकिस्तान अस्तित्वात आणलं पाहिजे, हे विचार मुसलमानांच्या मनात याच सुमारास थायला लागले होते. पाकिस्तान अस्तित्वात येऊन आता २२ वर्षे होऊन गेली आहेत. (या आत्मचरित्राची दुसरी आवृत्ती १९७० साली प्रसिद्ध झाली आहे.) पाकिस्तानात किंवा हिंदुस्थानात वास्तव्य करणारे मुसलमान दोन्ही देशात विभागणीची रेघ ओढून असं म्हणू शकतात काय की पाकिस्तानातील मुसलमानांवरच परमेश्वरी कृपेचा वर्षाव होतो आहे?

हिंदुस्थानातील कम्युनिस्ट अथवा क्रांतिकारी वर्ग—संघर्षाची आग भडकावून तसेच शस्त्रबळावर भारताला स्वतंत्र करून, कामगार-किसानांचं राज्य स्थापन करू शकले असते किंवा नाही—ही बाब देखील चर्चेचा विषय ठरू शकेल.

जर हिन्दू-मुसलमान एकत्र राहून सतत धार्मिक द्वेषाची आग भडकावत राहिले असते व त्या आगीत दोघंही जळत राहिले असते तर काय झालं असतं?

जर कांग्रेसच्या मंडळींनी, कम्युनिस्टांनी आणि क्रांतिकारकांनी इंग्रजांचे पाय ओढून त्यांचं कंबरडं मोडण्याचा प्रयत्न केला असता तर जपानचा मार्ग मोकळा झाला नसता काय?

जर जपाननं—फिलीपाईन, हांगकांग, सिंगापूर, मलाया आणि ब्रम्हदेशावर ज्याप्रमाणं आपला कब्जा बसवला, तशीच गत हिन्दुस्थानचीही त्यानं केली असती तर जगाचं आज जे चित्र दिसतं तसलं चित्र दिसलं असतं काय?

हिन्दुस्थानातील क्रांतिकारक व कम्युनिस्ट शस्त्रबळावर हिन्दुस्थान स्वतंत्र बनविता येईल या विचाराचे होते—त्यांनी तसा प्रयत्न केला असता तर ते विजयी झाले असते काय?

चांगकाई शेकनं चीनवर जसा कब्जा केला होता, तसा इंग्रजांनी जर कधी काळी भारतावर कब्जा केला असता, आपली पकड अधिक घट्ट केली असती, तर त्या परिस्थितीत भारताची अवस्था चीनसारखीच झाली नसती का? भारताचा चीन झाला असता.

त्या काळच्या परिस्थितीचं हे विस्तृत चित्रण मी एवढ्याच उद्देशानं केलं आहे की परिस्थिती कुणाच्याच हातात नव्हती, हे लक्षात यावं. आम्ही प्रत्येकजण आपापल्या मार्गाने चाललो होतो.

इ. स. १९४२ ते १९४६ पर्यंत मी भारताच्या राजकारणात भ्रमंती करत होतो मन:शांती आणि बुद्धीचा समतोल नाहीसा झाला होता. वेड लागू नये म्हणून मी काही बाही कामं करत राहिलो. त्यावेळच्या राजकीय वातावरणात दोन प्रकारच्या विचारधारा स्पष्टपणे दिसू लागल्या होत्या. सत्तारूढ पक्षाच्या मते क्रांती होऊन चुकली होती. त्याची सुंदर फळं चाखण्यासाठी आता शांततेची गरज होती, असं त्यांचं मत होतं. दुसऱ्या पक्षाचं म्हणणं होतं––इंग्रज निघून गेले आहेत हे खरं, परंतु क्रांती झालेली नाही. अजूनही वर्गसंघर्ष कायम आहे- अगदी परक्या राजवटीमध्ये होता, तसाच आहे. काळ्या आणि गोऱ्या भांडवलदारांचे हितसंबंध सुरक्षित आहेत. पिडीत जनतेच शोषण जसंच्या तसंच कायम आहे. 'क्रांतीचा विजय असो'––'इन्कलाब जिंदाबाद ! हाच या पक्षाचा जीवनाचा घोष होता.

इंग्रज सरकारच्या वेळी सरदार भगतसिंहानं 'इन्कलाब जिंदाबाद' ची जी घोषणा दिली होती ती तरुणांच्या ठिकाणी खूपच लोकप्रिय झाली. जोषपूर्ण आवाजात व मोठ्या आवडी ही घोषणा दिली जायची. मात्र राजकीय क्षेत्रातील कार्यकर्त्यांना या घोषणेचा गूढ अर्थ अनेकदा ध्यानात येत नसे.

मार्क्सनं क्रांतीचं जे तत्त्वज्ञान सांगितलं होतं-त्यावर बरंच चिंतन करून त्यानं एक सिद्धान्त मांडला होता की क्रांतीचा स्त्रोत जीवनात सातत्यानं चालू राहील.

ज्या लोकांच्या हाती सत्ता येते, ते लोक योजना आखून कार्यक्रम निश्चित करतात. ती योजना अमलात आणण्यासाठी व प्रत्यक्षात आणण्यासाठी ते आपली सर्व शक्ती पणाला लावतात. त्यांच्या मार्गात कुणी जरासंही विघ्न आणण्याचा प्रयत्न केला तर ती त्यांना अजिबात सहन होत नाही. ते जनतेवर बंधनं लादून त्याप्रमाणं तिला वागायला भाग पाडतात. अशावेळी त्यांना कुणी रोखण्याचा प्रयत्न केला किंवा काही आडकाठी निर्माण केली तर ते त्याला उचलून बाजूस फेकण्याचा प्रयत्न करतात. सत्तारूढ पक्ष आणि जनतेत कार्य करणारे पक्ष वेगळ्याच अडचणीत पडतात त्यांना सांभाळणं अवघड होऊन बसतं. त्या सुमारास भारतात नेमकी अशीच अवस्था निर्माण झाली होती. भारतातील क्रांतिकारक क्रांती घडवून आणण्याचा कार्यक्रम आखत होते आणि सत्तारूढ काँग्रेसचे नेते शांततेचं आवाहन करून सरकारच्या बळावर देशाची प्रगती करू इच्छित होते.

माझ्या एकूण समजुतीनुसार, प्रत्येक गोष्टीचं मूल्यमापन बदलल्याचं मला स्पष्ट दिसत होतं. देशाची आर्थिक, राजकीय आणि सामाजिक परिस्थिती झपाट्यानं बदलत होती. विविध विचारसरणींमध्ये संघर्षकारक परिस्थिती दिसत होती. काँग्रेस व कम्युनिस्ट यांच्या विचारात कुठंचं समन्वय नव्हता. जनतेला साम्यवादी विचारसरणी मानवणारी नव्हती. सत्य आणि अहिंसेचे सिद्धान्तही ती स्वीकारू शकत नव्हती. देशाची ही अशी अवस्था बघून मी या निष्कर्षावर येऊन पोचलो की साम्यवादी तत्त्वज्ञानाचा स्वीकार करणं देशहिताच्या दृष्टीनं लाभदायक ठरणार नाही.

अनेक वर्षांचा अनुभव तसेच जे मी बघितलेलं होतं, त्या आधारे मला स्वतःला मन, वाणी आणि कर्मानं सत्य आणि अहिंसा ही मूल्यं स्वीकारणं कठीण वाटू लागलं. मी असा विचार करत होतो की एकमेकांशी सहकार्य करून, राष्ट्रीय शिक्षणानं व उद्योग-धंदांच्या विकासानं देश संपन्न बनवला जाऊ शकतो. खऱ्या अर्थानं मी कधीच कम्युनिस्ट होऊ शकलो नाही तसेच सत्य-अहिंसावादीही बनू शकलो नाही. राष्ट्रवादाचा अर्थ मला समजत होता. माझ्या जीवनात मी जे काही केलं ते स्वतःला राष्ट्रवादी समजूनच केलं.

राष्ट्राला सुखी बनवणं हेच मी माझं कर्तव्य मानलं. मला जे काही शिक्षण मिळालं होतं त्या आधारावर रचनात्मक क्षेत्रात प्रवेश करून देशाला संपन्न बनवता येतं—हे मला समजत होतं. माझं असं निश्चित मत बनलं की शिक्षणाच्या मदतीनंच देशवासियांना रचनात्मक कार्यक्रमाकडे आकर्षित केलं पाहिजे आणि म्हणूनच मी शिक्षण-क्षेत्रात प्रवेश केला.

राष्ट्रीय शिक्षण, राष्ट्रीय अनुशासन आणि राष्ट्रीय ऐक्य—हीच राष्ट्रीय जीवनाची महत्त्वाची तीन अंगं आहेत. देशातल्या तरुणांचं मन यांकडे वळून त्यांना शिक्षण दिलं जाणं जरुरीचं आहे. गेली आठ वर्षं मी हेच कार्य करत आहे.

तरुणांना व इतर लोकांना सिद्धान्त म्हणून माझे विचार खूप आवडतात—परंतु या विचारांना त्यांच्या जीवनात आचाराचं स्थान मिळत नाही. देशातल्या तरुणवर्गावर वातावरणाचा प्रभाव असतो. देशात योग्य वातावरण निर्माण करण्यात अद्याप पावेतो यश मिळालेलं नाही, हे खेदानं कबूल करावं लागतं. तरुणांच्यासाठी योग्य वातावरण निर्माण करण्यासाठी आपल्याला बरंच काही करावं लागेल.

## क्रांतीसंबंधीची विचारसरणी

माझं जीवन हे क्रांतिकारकाचं आहे. जे कुणी स्वतः क्रांतिकारक नाहीत किंवा यासंबंधी ज्यांनी कधी विचारही केला नाही, त्या लोकांना माझा हा जीवन-वृत्तान्त वाचून हे लक्षात आलं असेल की क्रांतिकारक म्हणवला जाणारा माणूस कोणत्या मातीचा बनलेला असतो, त्याचं रंग-रूप, वागणं कसं असतं?

जेव्हा एखाद्या पुरोगामी विचाराच्या माणसाच्या डोक्यात एखादं कार्य करण्याची कल्पना येते तेव्हा ती कल्पना समूर्त करण्याची धुंदी त्याच्या ठिकाणी निर्माण होते. तो निश्चियानं स्वीकारलेल्या मार्गानं चालत राहतो. प्रगतीचा मार्ग हा कधीच सरळ आणि मळलेला नसतो––आपला मार्ग आपल्यालाच तयार करावा लागतो. क्रांतिकारकाला मार्गात येणाऱ्या प्रत्येक संकटाचा सामना करावा लागतो––वाटेत एखादा प्रचंड खडक लागला तर तोही त्याला फोडून काढावा लागतो. रस्त्यातील सर्वसाधारण अडथळे तो सहजपणे बाजूस सारतो किंवा त्यांना ओलांडून पलीकडे जातो परंतु ज्यांना बाजूस सारता येत नाही किंवा ओलांडताही येत नाही––अशा गोष्टींशी तो मग सरळ मुकाबला करतो––त्या गोष्टींशी संघर्ष करणं त्याला भागच पडतं.

जो पर्यंत एखादा क्रांतिकारक आपल्या मार्गातल्या गोष्टी तुडवत निघतो किंवा त्या ओलांडून पुढे जात राहतो-तोपर्यंत तो फारसा कुणाच्या नजरेत भरत नाही. परंतु मार्गातील प्रचंड खडकाशी त्याची झुंज सुरू होते आणि या लढाईत तो बेशुद्ध होऊन खाली पडतो––शुद्धीवर आल्यावर परत उठून बसतो, तेव्हा आजुबाजूच्या लोकांचं त्याच्याकडे लक्ष जातं. समान ध्येयाचे लोक त्याच्याभोवती एकत्रित होतात आणि सामूहिक पद्धतीनं तो खडक फोडण्याचा ते सर्व प्रयत्न करतात. सर्वांनी वारंवार खडकाला धडका दिल्यानंतर खडक किती कठीण आहे आणि आकारानं किती प्रचंड आहे, हे लक्षात येतं. तो समूह आणखी जोरानं धडका देतो आणि खडक फुटतो-त्याचे छोटे-छोटे तुकडे होतात. प्रवाहाबरोबर ते छोटे छोटे तुकडे कुठंतरी वाहून जातात.

सर्वसामान्य माणूस क्रांतिकारकाला संहार करणारा, विध्वंसक म्हणून ओळखतो. कुणाला ठार करणं, हे त्यांचं उद्दिष्ट नसतं. संहाराच्या मुळाशी असते सृजनाची, निर्मितीची प्रेरणा––हीच त्यांच्या बलिदानाचीही प्रेरणा असते.

जे क्रांतिकारक प्रचंड खडकाशी झुंज घेताना स्वतःच मोडून पडतात व धुळीत मिसळून जातात––पहाडाशी टक्कर घेऊन त्यांचा चुराडा होताना समाजाचं त्यांच्याकडे लक्ष जातं. ज्या पहाडाशी तो तरुण टक्कर घेतो, तो पर्वत मानव-समाजाच्या मार्गात एक अडथळा म्हणून––उभा होता-आणि तो फोडलाच पाहिजे, असंच समाजाला वाटत असतं समाजाच्या प्रयत्नानं तो पहाड मग जमीनदोस्तही होतो.

पहाडावर पडणारे पाण्याचे छोटे-छोटे थेंब जेव्हा खडकावरून प्रवाहरूपानं वाहतात किंवा वाफ बनून हवेत विलीन होतात-जमिनीत शोषले जातात––अशा या थेंबांचं वाफेत होणार रूपांतर किंवा जमिनीत जिरून जाणं ,हे त्या खडकाला फोडण्याच्या कामी पुष्कळच उपयुक्त ठरतं. खडकाच्या पायथ्याशी जमिनीत शिरलेलं पाणी, त्या खडकाची मुळं कमकुवत करून टाकतं. तेच जलबिंदु वाफेचं रूप घेऊन, ढग बनतात. ढगातून पाऊसधारा बनून डोंगरावर पडतात आणि प्रवाह बनून खडकावर आघात करतात––दबाव टाकतात.

भारताचे लाडके सुपुत्र ज्यांनी देशासाठी बलिदान केलं—ते कुणी हिंसावादी, विध्वंसक किंवा दहशतवादी होते काय? त्या हुतात्म्यांना अशातऱ्हेनं संबोधणं म्हणजे आपल्या अज्ञानाचंच ते द्योतक ठरेल. ज्यांच्यापाशी कल्पनाशक्तीचा अभाव आहे—व ज्यांना सखोल विचार करता येत नाही अशी माणसं हुतात्म्यांच्या बाह्यात्कारी गोष्टी ध्यानात घेऊन त्यांना अशा तऱ्हेनं संबोधतात. त्या हुतात्म्यांनी आपल्या मनात कोणतं चित्र रेखाटलेलं होतं-त्याकडे मात्र कुणाचंच लक्ष गेलं नाही. आज भारतभूमीमध्ये जिथं जिथं विधायक कार्य दिसतं—ते सर्व त्यांच्याच बुद्धिमत्तेमुळं निर्माण झालं आहे. तलाव, बांध किंवा कालवे-कारखाने प्रसंगी त्यांनी उद्ध्वस्तही केले असतील—परंतु त्यांच्या मनातलं ध्येय साकार करण्यासाठी त्यांना हे करावं लागलं.

निर्मितिशील भारताच्या भाग्योदयासाठी क्रांतिकारकांनी जे कार्य केलं त्या क्रांतिकारकांचे तुम्ही निंदक बनू नका. त्यांना विनाशकारी शक्तीचे उपासक मानू नका. ज्या शक्तीचा व बळाचा त्यांना वापर करावा लागला, अवलंब करावा लागला, तो केवळ नाईलाजापोटी होता. त्यांना कुणाची साथ मिळाली नाही—एकाकीपणा त्यांना जाणवला। त्यांच्यापाशी सामुदायिक शक्तीचा अभाव होता. त्यांनी स्वतःला पेटवून समाजावर होणारे अत्याचार वेशीवर टांगले. स्वतःच लावलेल्या आगीत ते भस्मसात झाले नसते तर अत्याचारांचं उघडंनागडं स्वरूप कुणाला दिसलंच नसतं. अत्याचार करणारे व ते सहन करणारे—ह्यांचं रूप यामुळेच जगासमोर येऊ शकलं.

उंच वृक्षावरची फळं काढण्याची इच्छा बाळगणाऱ्या लोकांना जर झाडावर चढून फळं काढता येत नाहीत, त्यांच्यापाशी शिडी नाही, एकमेकांच्या खांद्यावर चढून फळं काढावीत एवढी त्यांची संख्या नाही, अशा परिस्थितीत दगडांच्या किंवा काठीच्या मदतीनं फळं पाडण्याशिवाय ते काय करू शकणार? क्रांतिकारकांची अवस्था नेमकी अशीच होती. लोक ज्यांना दहशतवादी कृत्यं म्हणतात, तसली कृत्यं दुसरा काही पर्याय नव्हता, म्हणून त्यांना करावी लागली होती. मी स्वतःचा समावेश या क्रांतिकारकांमध्येच करतो. काही लोक माझ्यासारख्याला दहशतवादी म्हणून नावं ठेवत आपल्या शांतताप्रियतेचा डंका वाजवतात—ह्याची मला जाणीव आहे.

आज जर सरदार भगतसिंह, चंद्रशेखर आझाद आणि त्यांचे शूर साथीदार, ज्यांनी दहशतवादी मार्गाचा अवलंब केला, ह्यात असते तर तेही रचनात्मक कार्य करत राहिले असते—असंच कार्यक्षेत्र त्यांनी निवडलं असतं.

इ. स. १९३८ मध्ये मला स्पष्टपणे दिसत होतं की भारतवासी आता जागे झाले आहेत व स्वातंत्र्याच्या मार्गाने ते निघाले आहेत. लोकांच्या सामूहिक शक्तीची मला जेव्हा जाणीव झाली तेव्हा तरुणांनी आता गुप्त रीतीनं किंवा भूमिगत होऊन कार्य करण्याची जरुरी नाही तर त्यांनी आता उघड स्वरूपात काम करावं, असाच निर्वाळा माझ्या मनानं दिला.

अत्याचार करणाऱ्यांचे अत्याचार जाहीर रीतीनं लोकांसमोर मांडता येतात, तर मग भूमिगत राहाचं कारणच काय? अत्याचार करणारी व्यक्ती आमचं शासन चालवणारी होती आणि शासनापुढं लोक वाकत होते. त्या शासनाच्या अन्यायांचं चित्र लोकांसमोर स्पष्टपणे मांडता येत होतं. हे शासन संपुष्टात आणण्यासाठी निराळया प्रयत्नांची काय गरज होती?

मी एखाद्या चोराप्रमाणे लपत-छपत फिरत होतो. भारताची जागृत जनता माझ्या रक्षणासाठी धावून येईल, अशी माझी कल्पना होती. अत्याचारी शासन माझ्या केसालाही धक्का लावू शकणार नाही, असा माझा समज होता. माझ्या मनात अशाप्रकारचे भाव उत्पन्न होताच, आपल्या अंधाऱ्या गुहेतून डरकाळया फोडत बाहेर येणाऱ्या सिंहाप्रमाणं, मी प्रगट होऊन काम करू लागलो. क्रांतिकारकांच्या ध्येयनिष्ठेमुळं, भारत देश जागा झाला होता. मोहिनीविद्या अवगत असलेला एखादा जादूगार देखील आता त्यांना झोपी जायला भाग पाडू शकत नव्हता—ह्याची मला पूर्ण खात्री होती. माझे हे बहुमोल विचार कुठल्याही परिस्थितीत भारतीय तरुणांपुढे ठेवण्याची माझी इच्छा होती. आत्मसमर्पणाचा मार्ग स्वीकारून व त्यानंतर १९६६ पावेतो तुरुंगवासाची तयारी ठेवून, मी माझा हा विचार लोकांपुढं मांडला. बापूंनी मला समजावून सांगितलं—सोळा वर्षं जशी भूमिगत अवस्थेत काढली, तशीच आणखी काही वर्षं काढा, असा त्यांचा सल्ला होता. प्रकट झाल्यानंतर इंग्रज सरकार मला जिवंत राहू देणार नाही, अशी त्यांना शंका आली—कदाचित ते मला तुरुंगात ठेवून झिजवून झिजवून ठार करतील, असंही त्यांना वाटत होतं. ज्या सरकारचा उल्लेख बापू 'सैतान' म्हणून करायचे, त्या सरकारकडून सभ्य व सुसंस्कृत वागणुकीची आशा कशी करायची?

माझा निर्धार कायम होता. बापूंचे आशीर्वाद आणि त्यांचा सहवास मला लाभला. माझ्या सुटकेसाठी बापूंनी खूप प्रयत्न केले. सैतानी इंग्रज राजवटीनं त्यांचं ऐकलं नाही. बापूंनी शेवटी श्री. महादेवभाई देसाई यांच्यामार्फत मला निरोप पाठवला की, सुटका होण्याची आशा नाही—परमेश्वराचं चिंतन करा! मी त्यांना उत्तर पाठवलं की, देश आता खडबडून जागा झाला आहे—गुलामगिरीच्या शृंखला झुगारायला तो उत्सुक आहे. देशाच्या मुक्ततेबरोबरच माझीही मुक्तता होईल.

जेलच्या यातना सहन करून तसेच भूमिगत अवस्थेत अनेक संकटांशी सामना करून जो पिचून निघालेला आहे, ४६ वर्षं वय असताना आणखी २६ वर्षं तुरुंगवास ज्यानं परत स्वेच्छेनं स्वीकारला आहे—त्याच्या मनात काय काय येत नसेल? ह्याची कुणी कल्पना करू शकतो काय? परंतु मी आपल्याच तन्द्रीत मस्त होतो. त्यावेळी ज्यांनी मला पाहिलं होतं व जेलमध्ये जे मला भेटायला आले होते-माझ्या मनात १९६६ पर्यंत तुरुंगात राहवं लागेल ही कल्पना देखील नव्हती, ह्याची साक्ष ही मंडळी देऊ शकतील. देशाची जागृत जनता देश स्वतंत्र करणार, हेच चित्र माझ्या डोळयासमोर होतं.

त्यावेळी सबंध देशभर असं एक वातावरण निर्माण झालं होतं की, अनेक क्रांतिकारक माझ्याप्रमाणेच विचार करत होते. १९२९ साली दिल्लीच्या असेंब्लीत जो बॉम्बस्फोट झाला होता-त्या स्फोटानं सर्वांना जाग आणली होती. क्रांतिकारकांची खात्री होऊन चुकली की, देशातली जागृत जनता आता स्वातंत्र्यमार्गावर वाटचाल करणार—आता ती स्वातंत्र्य मिळवल्याशिवाय गप्प बसणार नाही. आता घातपाती उपायांची आवश्यकता नाही. या एका घटनेनंतर घातपाती प्रकार भारताच्या कोणत्याही भागात योजनापूर्वक घडलेले दिसणार नाहीत.

जेलमधून माझी सुटका झाल्यानंतर बापूंनी मला चरखा व खादीच्या प्रचारकार्यात लावण्याचा प्रयत्न केला. या कार्यात माझं मन फारसं रमलं नाही.

देशातल्या तरुणांच्या मनात देशप्रेम, सद्गुण आणि शौर्य ही मूल्यं विकसित केली नाहीत तर देशाचं भवितव्य अंधकारमय होईल, असं मला माझ्या आजवरच्या राजकीय क्षेत्रातील कार्यांच्या अनुभवावरून प्रामाणिकपणे वाटत होतं. मी या विचारावर ठाम राहिलो. शेवटी बापूंनेही आशीर्वाद मला लाभले आणि मी हा संदेश घेऊन तरुणांच्या समोर उभा राहिलो. तरुणवर्गानं माझं स्वागत केलं. माझ्या योजनेचाही समाजानं सन्मान केला. माझी योजना अधिक व्यापक बनवून बापूंच्या समवेत मी राहिलो असतो तर माझं जीवन सार्थकी लागलं असतं. मी तरुणांचा सोबती व सहायक बनून त्यांना योग्य दिशेने नेऊ शकलो असतो. काही घटना--प्रसंगांच्या मी आहारी गेलो—मन आवरू शकलो नाही—त्यामुळं माझ्या जीवनाला वेगळीच दिशा मिळाली.

१५ ऑगस्ट १९४७ चा दिवस, स्वातंत्र्य-दिन म्हणून साजरा व्हायचा होता. जो माणूस फाशीच्या तक्तावर चढता-चढता बचावला, ज्याच्या डोळ्यांपुढं काळ्या पाण्याच्या काळ कोठडीत १५५ दिवस सतत मृत्यूचं थैमान चाललेलं होतं, सोळा वर्षं ज्याच्यावर सतत टांगती तलवार होती, काबूलच्या नरकासारख्या तुरुंगात ज्याला तेरा महिने डांबण्यात आलं होतं--असा एक माणूस आता स्वतंत्र भारतात, स्वतंत्र ध्वजाच्या छायेत--मुक्त झाला होता—स्वतंत्र बनला होता. हजारो संकटांचा सामना करून, एखाद्या शेतकऱ्यानं आपलं शेत पिकवावं, उभ्या पिकानं त्याचं शेत डोलताना त्याला जसा आनंद होतो, तसाच आनंद स्वातंत्र्य मिळाल्याचं बघून मला झाला होता. आपलं जीवन सार्थकी लागल्याचं मला जाणवलं. आजच्या ह्याच क्षणासाठी मी काय-काय करण्याचा प्रयत्न केला होता--त्यापायी कसे-कसे हाल सहन केले होते!

आज केव्हा केव्हा मनाच्या निराश अवस्थेत असं वाटतं की, ते सारं मृगजळच तर नव्हतं? मात्र गंभीर होऊन विचार करू लागलो म्हणजे ते मृग-जळ नव्हतं तर १९४७ मधील भाक्रा धरणाच्या गोविंदसागराचं खरंखुरं पाणी होतं—असंच जाणवतं.

१९४७ च्या १५ ऑगस्ट पूर्वीच स्वतंत्र भारतात आपण कुठं स्थायिक व्हावं, असा विचार पडला. पंजाबात रहावं की, ज्या भूमीनं व तिथल्या जागृत जनतेनं आपलं समजून मला सामावून घेतलं होतं, त्या प्रदेशात राहावं ? जिथं सतत सात वर्षं अविश्रांत परिश्रम करून आपण तरुणांच्या गळ्यातले ताईत बनलो होतो—तिथलं मोहक चित्र माझ्या मनापुढे उभं राहिलं. मी त्या मोहाकडे आकर्षित झालो. शेवटी मी मनाशी पक्का निर्धार केला की ज्या भूमीवर आपण जनराष्ट्राचे सेवक बनलो, आपल्या तपःपूत आचरणानं आपण तरुणांचे आवडते बनलो आणि जिथं आपलं दुसरं जीवन सुरू झालं त्याच भूमीवर अंतापर्यंत राह्यचं—त्याच भूमीच्या आश्रयाला जायचं.

### स्वातंत्र्य-दिन

बाहेर रिमझिम पाऊस पडत होता—पावसाळ्यातली ती रात्र होती. रात्री बारा नंतर भारत स्वतंत्र व्हायचा होता. खुल्या मैदानावर सभा भरवण्याची हिंमत झाली नाही. एका भव्य इमारतीच्या प्रशस्त प्रांगणात सभा घेण्यात आली. भावनगरचे सर्व माननीय काँग्रेस नेते सभास्थानी जमले होते. मीही सभेला उपस्थित होतो. परंतु मी काँग्रेस पक्षाचा सभासद नव्हतो, बापूंचा सहकारी नव्हतो. सर्व नेत्यांची जोशपूर्ण भाषणं झाली. लोकांच्या आग्रहाखातर मलाही बोलावं लागलं. त्या रात्री आम्ही कोणकोणती सोनेरी स्वप्नं पाहिली, मन किती आनंदानं भरुन गेलं होतं, त्या सर्व गोष्टींची आज नीट कल्पना करता येणार नाही. त्या रात्री आम्हा सर्वांना ज्या प्रकारचा आनंद होत होता—आजही तसाच आनंद अनुभवता आला असता, तर किती चांगलं झालं असतं !

### माझं भाषण

त्या सभेत मी जे भाषण दिलं, ते काहीसं या प्रकारचं होतं—"रात्रीचे १२ वाजल्यानंतर स्वतंत्र म्हणण्याचा अधिकार आपल्याला मिळणार आहे. आपण हा अधिकार आपल्या पुरुषार्थाच्या बळावर मिळवला आहे काय ? वस्तुस्थिती काय आहे, ह्या गोष्टीचा मी ऊहापोह करणार नाही. आपण आता स्वतंत्र आहोत, ही सत्य गोष्ट आहे. जर हा अधिकार आम्ही पुरुषार्थाच्या बळावर मिळवला असेल तर जगासमोर याच पुरुषार्थाच्या बळावर आपणास महान कार्य करून दाखवावं लागेल. शेकडो वर्षांच्या गुलामगिरीनं आम्हाला दुर्बल बनवून टाकलं आहे. पोटाची आग शांत करण्यासाठी जे मिळेल ते आम्ही पोटात घालतो व त्यालाच अन्न समजतो. शरीराची नग्नता लपवण्यासाठी आम्ही अंगावर जे काही घालतो, त्यालाच आम्ही वस्त्र समजायला लागलो. थकून भागून, विश्रांती घेण्यासाठी जिथं शरीर टेकवतो, त्यालाच घर मानायला लागलो."

"अपुऱ्या वस्त्र-निवाऱ्यात जीवन कसंबसं कंठता येतं—परंतु काम करण्यासाठी व जीवनाचा जोम टिकवण्यासाठी योग्य प्रमाणात अन्न हे मिळालंच पाहिजे. एका वर्षानंतर—"आम्ही स्वतंत्र आहोत"–असं म्हणण्याचा आम्हाला तेव्हाच अधिकार पोचेल जेव्हा आपण

देशवासियांना दोन वेळ पोटभर खायला देऊ शकू. आतापर्यंतच्या गुलामगिरीनं आम्हाला दुर्बल व साधनहीन बनवून टाकलं आहे. आपल्या देशबांधवांना पोटभर जेवण द्यायचं असेल तर आपल्याला शेतीचं उत्पादन वाढवावं लागेल. आज ज्या जमिनीतून एक मण धान्य पिकतं तेवढ्याच जमिनीतून आपणास दोन मण धान्याचं उत्पादन करता आलं नाही तर निराशाच आपल्या पदरी पडेल."

"देशाची ८५% जनता खेड्यापाड्यात राहणारी आहे. सर्व बुद्धीजीवी वर्ग व धनिक-वर्ग शहरातून राहतो. जमिनीची उत्पादन शक्ती घटत चालली आहे कारण बुद्धीमान लोकांनी आपली बुद्धी व श्रीमंतांनी आपली संपत्ती या उत्पादन कार्याकडे लावली नाही. कार्य आणि जीवन शक्तींचा विकास करण्यासाठी बुद्धी आणि संपत्ती दोन्हींचीही आवश्यकता आहे. खेड्यापाड्यात या दोन्हींचाही अभाव आहे. जे बुद्धीजीवी लोक व श्रीमंत लोक देशाला स्वतंत्र करण्यासाठी झटले त्यांना आणखी एक पाऊल उचलावं लागणार आहे. शेतीची उत्पादनक्षमता वाढवण्यासाठी त्यांना खेड्यात जाऊन रहावं लागेल. आपली बुद्धी व पैसा या कामी खर्च करावा लागेल. मी एक क्रांतीकारक आहे. देशाला गुलामगिरीच्या बंधनांतून मुक्त करण्याचा, त्या शृंखला तोडण्याचा मी निर्धार केला होता. माझं कार्य आता समाप्त झालं आहे. मी आता खेड्यात जाऊन राहण्याच्या विचारात आहे. या कामी मला कुणाची साथ लाभेल काय? राजकीय क्रांती झाली, आता आर्थिक क्रांती करायची आहे. विचारपूर्वक व आधुनिक तंत्रांचा अवलंब करून शेतीचं उत्पादन वाढवायचं आहे. भारताच्या खेड्यातील जनतेचा, शेतकऱ्यांचा दृष्टीकोण बदलावयाचा आहे—त्यात क्रांती घडवून आणायची आहे. खेड्यातला शेतकरी वर्ग जुन्याच पद्धतीनं वागू लागला, पारंपारिक पद्धतीनं शेती करू लागला तर स्वातंत्र्याला काही अर्थ उरणार नाही."

## मला साथ लाभली

माझ्या पत्नीनं अहमदाबाद सारख्या मोठ्या शहरात राहून एम. ए. ची पदवी मिळवली होती—त्यानंतर शारीरिक शिक्षणाचा अभ्यासक्रम पुरा करून डी. पी. एड. ची पदविका आणि शिक्षणशास्त्राची बी. टी. पदवी संपादन केली होती. तिला यापुढं शहरी जीवन सोडून खेड्यात शेतकऱ्यांसमवेत राहायला जावं लागेल हयाचा पत्ता नव्हता. मात्र तिला या गोष्टीची जाणीव होती की तिनं जो जोडीदार निवडला आहे—तो पूर्वाश्रमीचा क्रांतिकारक आहे—ज्याला तुरुंगात सडत पडणं, त्रासभार सहन करणं किंवा कुणाची साथ मिळो वा न मिळो, आपला मार्ग एकटयानेच चालणं, ह्या गोष्टी नवीन नाहीत. श्रीमती प्रभावती ही ब्राम्हण घराण्यातली, उच्च शिक्षण प्राप्त केलेली स्त्री होती. कुठलाही मागचा पुढचा विचार न करता ती माझ्या समवेत शहरी जीवन सोडून निघाली. आम्ही एका अशा जंगलात येऊन राहू लागलो जिथं दोन-दोन मैल पर्यंत माणसांची वस्ती नव्हती. निर्जन भागात जाऊन आम्ही राहू लागलो.

श्री. जे. डी. बोरा, एम. बी. बी. एस., हे प्रसिद्ध समाजसेवक मला नावानं ओळखत होते—माझं जीवन त्यांना माहित होतं, कारण ते भावनगरचेच रहिवाशी होते. मुंबईला त्यांचा व्यवसाय खूप जोरात होता आणि खूप पैसा त्यांच्या गाठीशी होता. हजारो रुपयांची प्राप्ती सोडून तेही माझ्याबरोबर जंगलात राहायला आले.

१९२४ साली भावनगरच्या महाराजांचा—श्री. कृष्णकुमार सिंहजींचा—माझा परिचय झाला होता. त्यांनी मला जसजसा समजवून घ्यायचा प्रयत्न केला तसतसा मी त्यांचा निकटवर्ती बनत गेलो. मी खेड्यात जाऊन शेतकऱ्यांची सेवा करू इच्छितो, ही गोष्ट जेव्हा त्यांना समजली—यासाठी मी गोहिलवाडसारख्या भागाची निवड केली आहे, हे त्यांना कळलं तेव्हा ते माझ्या मदतीला धावून आले. त्यांच्या मदतीनं मी ३५ एकर जमीन खरेदी केली. शेतातच घर बांधलं—पाणी मिळावं यासाठी तीन विहिरी खोदल्या आणि फळझाडं लावून शेती सुरू केली. जर माझ्या पत्नीचं सहकार्य मिळालं नसतं किंवा डॉ. बोरासारखे समाजसेवक मला येऊन मिळाले नसते तर खेड्यात मी कसा काय राहू शकलो असतो? भावनगरच्या महाराजांचं बहुमोल साहाय्य लाभलं नसतं, तर खेड्यात जाण्याचं माझं स्वप्न, हे केवळ स्वप्नच राहिलं असतं.

## शेतकऱ्यांचं जीवन

शेत नांगरण्याची, जनावरांपासून संरक्षण करण्यासाठी त्याला कुंपण घालण्याचे तसेच पावसाने माती वाहून जाऊ नये म्हणून बांध-बन्दिस्तीची ही सर्व कामे आम्ही केली. जमिनीच्या आतील दगड फोडून, काळा पाषाण हातोड्यानी चूरा करून, साठ फूट खोल विहीर खणून, पाणी लागल्यानंतर आम्ही जेव्हा बागायती शेती केली तेव्हा भोवतालचे शेतकरी आश्चर्यचकित होऊन बघतच राहिले. माझ्यासारख्या एका क्रांतिकारकानं ज्यानं इंग्रज राजवटीची पाळंमुळं उपटून काढण्याचा प्रयत्न केला होता तोच क्रांतिकारक आता भारताच्या ग्रामीण जीवनातील वाईट गोष्टींचं उच्चाटन करण्यासाठी कंबर बांधून उभा राहिलेला आहे, हे त्याच्या दृष्टोत्पत्तीस आलं. आपल्या धाडसानं आणि कौशल्यानं मी शहरी तरुणांचा जसा आवडता बनलो होतो—आता अंग मेहनतीची कामं करून खेड्यातील शेतकरीवर्गात लोकप्रिय होऊ लागलो. आपल्या भाषणांनी हजारोंची मनं जिंकणारा व त्यांच्या मनात देशप्रेम जागे करणारा माणूस हातोड्याने दगड फोडून—जमिनीच्या पोटातील पाण्याचे झरे शोधून, त्या जमिनीवर जीवनही निर्माण करू शकतो.

तारुण्याचा काळ मी देशातील वाईट सरकारच्या समूळ उच्चाटनासाठी खर्च केला होता. परंतु संपूर्ण जीवनाचं हेच एकमेव उद्दिष्ट नव्हतं. आमचा उद्देश होता स्वराज्याची व सुराज्याची स्थापना तसेच देशवासियांचं, जनतेचं राज्य मजबूत करणं—लोकशाहीची मुळं खोलवर रुजवणं.

बांडिट व अत्याचारी परकी राजवट उलथण्याचं कार्य पूर्ण झालं होतं. आपल्या देशातील उदार मताच्या नेत्यानं सरकार कसं टिकेल—त्याची मुळं खोलवर कशी रुजू शकतील—या विशेष मी जेव्हा विचार करू लागलो तेव्हा हे काम अत्यंत कठीण आहे, हे माझ्या लक्षात येऊ लागलं. हे कार्य एवढं बिकट होतं की साधारण माणूस त्याची कल्पना देखील करू शकत नव्हता.

परकी राजवट नष्ट करण्याचं कार्य लाखो लोकांच्या बळावर पार पाडता आलं. विचार करता करता ही गोष्ट स्पष्ट झाली की स्वकीयांचं, आपलं सरकार स्थिर करण्यासाठी कोट्यावधी लोकांच्या सहकार्याची गरज आहे. प्राणघातक हल्ला करण्यासाठी मनात जोश व ऊर्मी असावी लागते—हे कार्य फार जोखर तडीस नेता येतं—विरोधकांच्यापेक्षा आधी विजय व यशप्राप्ती करून घेता येते. परंतु जमिनीची साफसफाई करून, बी-बियाणं टाकून खत वगैरे घालून पाणी दिल्यावर, बीजातून छोटी-छोटी रोपं वर येतात—या रोपांच्या रक्षणासाठी मेहनत घ्यावी लागते—या कार्याकडे कुणाचं लक्षसुद्धा जात नसतं. हे कार्य सफलतापूर्वक पार पाडलं तरी त्यातून सामाजिक यश पदरी पडत नाही. कुणी वर्षा न वर्षं, भूक-तहान विसरून सारं जीवन या कार्यासाठी पणाला लावावं लागतं—तेव्हा कुठं काही प्रमाणात यश मिळतं. मी जी ३५ एकर जमीन घेतली होती त्या जमिनीवरील कुंपणासारखे निरुपयोगी गवत आणि काटेरी झुडपं खणून जमीन खोदून काढून टाकावी लागली होती. केवळ या अनावश्यक गोष्टी मुळापासून उखडून काढणं एवढंच काही माझं उद्दिष्ट नव्हतं, माझं उद्दिष्ट होतं माणसाला जीवन देणारं अन्नधान्य उत्पन्न करणं, फळझाडं मोठी करणं—आपोआप उगवणारी व भूमीला भार होणारी निरुपयोगी झुडपं यांचा नायनाट करून तिथंही धान्य, फळं, फुलं घ्यायचा प्रयत्न करणं-सर्व जमीन लागवडीखाली आणणं.

क्रांतिकारक म्हणून कार्य करताना मी एवढ्या हालअपेष्टा सहन केल्या होत्या, ज्यांची कल्पना करणंही कठीण आहे. या हाल-अपेष्टा सहन करत असताना माझं मन एवढं निबर बनलं होतं की मी सहन करू शकणार नाही, अशी कोणती गोष्ट शिल्लक राहिली नव्हती.

मी जेव्हा शेतकऱ्यांचं जीवन स्वीकारलं—तेव्हा माझ्यापुढे एक निराळंच जग उभं राहिलं. माझ्याबरोबर शेतीची कामं करणारे लोक तसेच आजुबाजूचे शेतकरी व त्यांचं जीवन मला, जवळून बघायला मिळालं. ते लोक सतत जमीन खोदायचे आणि मिळणाऱ्या तुटपुंज्या उत्पन्नातून आपल्या जीवनाच्या गरजा भागवायचे. त्यांच्याकडे बघून असंच जाणवायचं की तहान, भूक, थकावट या गोष्टींना त्यांच्या जीवनात काही स्थानच नाही. शेतकरी म्हणून जगायला लागण्यापूर्वी असा एकही दिवस गेला नसेल ज्या दिवशी मी स्नान आटोपण्यापूर्वी दाढी केलेली नसेल. या नव्या जीवनात दाढी करावी, असा विचार देखील मनात यायचा नाही. जेव्हा माणूस एखाद्या कामात आपला सर्व वेळ व शक्ती लावतो तेव्हा त्याचं अनेक गोष्टींकडे लक्ष देखील जात नाही—एवढंच नव्हे तर त्याला स्वतःचाही संपूर्ण विसर पडतो.

क्रांतिकारक म्हणून कार्य करताना मी खूप साहस व जोश यांचा अवलंब केला होता. डोक्यात एक प्रकारची नशा चढल्याप्रमाणे मी वागायचो—मन सतत हेलकावे अनुभवत असायचं. मी खूप उंच भरारी मारायचो आणि सतत लोकांच्या नजरा माझ्यावर खिळवून ठेवायचो. शेतकऱ्याचं जीवन हे एखाद्या तपस्व्याप्रमाणं आहे, हे मी अनुभवू लागलो. मातीतून जीवन घडवण्याचं त्याचं कार्य आहे. तो आपल्या कामात पार गढून गेलेला असतो. काम करता करता थकला म्हणजेच तो शांत होऊन बसतो आणि भूक शमवण्यासाठी जे काही मिळेल ते तो आपल्या पोटात ढकलतो.

## क्रांतिकारक आणि जीवन-वृत्तान्त

भारताच्या दिवंगत क्रांतिकारकांची जीवन-चरित्रं वाचून माझ्या मनात अनेक प्रकारचे भाव निर्माण होतात. त्यांच्या पवित्र आठवणीत माझं मन निराळीच धुंदी अनुभवतं.

क्रांतीच्या काळात त्यात ज्यांनी भाग घेतला व त्यांच्यापैकी जे हयात आहेत, त्यांनी आपली आत्मचरित्रं लिहिली आहेत. अशी आत्मचरित्रं वाचताना मनात वेगळ्याच प्रकारचे भाव निर्माण होतात. त्यांच्या आत्मचरित्रातून त्यांचं जे जीवन समोर येतं, त्यामुळे मनाला खिन्नता येते. देशातील जनतेला सुखी बनविण्यासाठी ज्यांनी अतोनात हाल सहन केले होते—आजचं बदललेलं वातावरण पाहून मूग गिळून गप्प बसण्यासाठी, त्यांनी हा सगळा त्याग केला होता काय? आपल्या जीवनाचं ध्येय पूर्ण झालं आहे, असं समजून ते स्वस्थ बसून राहिले आहेत काय? जे काम करायचं होतं—ते सगळं पूर्ण झालं? केवळ लिहिणं बाकी होतं—म्हणून लिहून टाकल्यानं सर्व संपलं आहे काय ?

माझ्या सहकाऱ्यांनी, मित्रांनी आणि चाहत्यांनी मलाही माझं जीवन-वृत्तांत लिहिण्याबद्दल प्रोत्साहन दिलं. आपण काय काय केलं, ते जगापुढे मांडण्याची इच्छा माझ्याही मनात निर्माण झाली. प्रत्येकालाच आपण महान बनावं असंच स्वाभाविकपणे वाटत असतं—मग त्यांचं हे महान बनणं केवळ कल्पनेच्या पातळीवर, आभासात्मक का असेना. अनेक जण आपल्या कर्तृत्वानं महान बनतात तर काही जण आपल्या भूत काळातल्या आठवणी काढून त्यातच संतोष मानतात.

मी माझ्या जीवनात कुठलंच महान कार्य केलेलं नाही, ही वस्तुस्थिती आहे. परंतु तुलनात्मक दृष्टीनं विचार करून माझ्या हातूनही काही महान गोष्टी पार पडल्या आहेत, असं लोकांना वाटतं. माझा जीवन—वृत्तान्त वाचून लोक काय विचार करतील ? ते असं विचारणार नाहीत का, की हीच ती दीप-ज्योत होती काय, जिनं अंधार हटवण्याचा प्रयत्न केला होता? हा जो जीवन-वृत्तान्त मी लिहून काढला आहे, तो वाचताना माझं मन कष्टी होतं. माझे जे साथीदार फासावर चढले, जेलच्या यातना भोगताना मरण पावले, ते सर्वजण माझ्याकडे अभिमानानं बघायचे. राष्ट्रपिता महात्मा गांधींनी माझ्यासंबंधी काय विचार केला होता—माझ्यासंबंधी बरंच काही लिहिलं होतं. त्यांच्या अपेक्षा निराळ्याच होत्या.

आज मी अंतर्मुख होऊन स्वतःकडे बघतो तेव्हा मला ती जुनी क्रांतिकारकाची प्रतिमा माझ्या ठिकाणी कुठे दिसतच नाही. देशाच्या एकूणच बदललेल्या परिस्थितीचा मीही अंश झालो आहे, हे मला खेदानं कबूल करावं लागतं. बापूंना माझ्याकडून अशी आशा वाटत होती की मी माझ्या शक्तीच्या बळावर देशाचं वातावरण शुद्ध ठेवण्याचा प्रयत्न करीन.

ह्या देशातील जुलमी राजवटीला उध्वस्त करण्याची प्रतिज्ञा ज्या दिवशी मी घेतली होती—त्या दिवशी हजारो जण माझ्या भोवती गोळा झाले होते. आमच्या सर्वांच्या ठिकाणी प्रचंड आत्मविश्वास होता—परस्पराविषयी विश्वासाची भावना होती. आम्ही सर्वांनी मूल्यवान वस्तूंचा त्याग केला होता व लोक आम्हाला जिवंत हुतात्मे समजत होते !

आज भारत स्वतंत्र झाला आहे. परकीय राजवटीचा अस्त झालेला आहे आणि जनतेच्या लाडक्या नेत्यांच्या हातात देशाचं सरकार आहे. आजचे काही नेते आपणही क्रांतिकारकांपैकी आहोत असं सांगतात—देशासाठी आपण सर्व प्रकारचा त्याग केला आहे—असंही ते आपल्या ठिकाणी मानतात.

आज जेव्हा मी स्वतःकडे क्रांतिकारकाच्या चष्म्यातून बघतो तेव्हा माझाच चेहरा मला अनोळखी दिसायला लागतो. इतर क्रांतिकारकांचे चेहरेही मला उजळ वाटत नाहीत आत्मविश्वास, परस्परांवरील विश्वास, आत्मसन्मान आणि परस्पराविषयी आदर ह्या सर्व गोष्टींचा लोप झाला आहे. आत्मसन्मानाशिवाय व परस्परांच्या विषयी आदर असल्याशिवाय, सामाजिक जीवन कधी आनंददायक होईल काय ? सामाजिक जीवनात कुठे-आदरच राहिला नसेल तर अशा जगण्याचं प्रयोजन तरी काय ?

देशातल्या भोळ्या-भाबड्या जनतेनं ज्यांच्यावर विश्वास टाकला, तीच माणसं स्वार्थान्ध बनून, एकमेकांवरील विश्वास आणि आदर गमावून बसली, तर मग सामाजिक जीवन कसं काय टिकेल ?

साधु–सन्तांचा, प्रचारकांचा व प्रचार–साधनांचा मुळीच अभाव नाही. तरीही देशातील लोक चांगल्या मार्गानं का बरे वाटचाल करत नाही ? आज कुणीही क्रियाशील बनून सन्मार्गानं जाताना दिसत नाही, हेच तर त्याचं कारण नसेल ?

राष्ट्रपिता महात्मा गांधींनी देशहित डोळ्यासमोर ठेवून एक मार्ग स्वीकारला होता. त्या मार्गानं ते स्वतः गेले. त्यांना हाच मार्ग योग्य आहे असं वाटलं. त्यांच्या आवाहनाला प्रतिसाद देऊन सर्व जण त्यांच्याच मार्गानं निघाले, आपल्या ठरवलेल्या मुक्कामावर येऊन पोहचले. स्वतंत्र भारत वारसाहक्कानं आपल्या हाती आला—परंतु त्यांनी दाखवलेला मार्ग मात्र आपण विसरून गेलो—चुकीच्या मार्गानं आपण निघालो.

## देशवासियांच्या नावे अनावृत पत्र

आज आपल्या देशात एक भयंकर स्वरूपाची स्थिती निर्माण झाली आहे. त्यामुळं अराजक सदृश वातावरण निर्माण झालं आहे. या संदर्भात देशहिताचा विचार करणारा प्रत्येक भारतीय मोठ्या व्याकूळ मनानं यासंबंधी विचार करायला लागला आहे.

मी स्वतः देखील अशाप्रकारची व्याकुळता अनुभवली आहे—माझ्या मनावरील हे दडपण हलकं करण्यासाठी, मी २५ मे १९६४ रोजी पंडित जवाहरलालजी यांच्याशी चर्चा करावी म्हणून त्यांना भेटलो. त्यांनी मला बराच वेळ दिला आणि आमचं असं ठरलं की काँग्रेस संघटना मजबूत करण्यासाठी मी माझी सर्व शक्ती आणि वेळ याकामी खर्च करावा. दुर्दैवाने ते मला या कामी लावू शकले नाहीत आणि देशहिताचं काही काम माझ्याकडून करून घेण्यासाठी ते हयात राहिले नाहीत. मला हवं होतं ते कार्यक्षेत्र मिळू शकलं नाही.

पंडितजींच्या निधनानंतर माझ्या मनाची उदासीनता आणखीच वाढली आहे. त्यांना पत्र पाठवून, प्रत्यक्ष भेटून तसंच चर्चा करून मी माझ्या मनाचं सांत्वन करू शकत असे. आता मी कुणाला भेटू? कुणाला पत्र पाठवू? माझं पत्र वाचून त्याचं उत्तर पाठवायला कोणाला सवड असणार? मला तर आज एकही माणूस असा दिसत नाही, ज्याला आपल्या मनाची खिन्नता सांगावी किंवा चर्चा करावी. आज तर देशाची जनताच माझी माता बनून समोर उभी आहे. म्हणून मी माझ्या या जनतारूपी मातेला हे खुलं पत्र लिहून स्वतःला तिच्या चरणी समर्पित करत आहे.

१९१४ साली गदर–पार्टीच्या क्रांती-प्रेमी वीरांचा एक सहकारी बनून देशासाठी बलिदान करण्यासाठी मी स्वतःला समर्पित केलं होतं. १९३८ साली सोळा वर्षांच्या भूमिगत जीवनाचा त्याग करून मी महात्मा गांधीच्यापाशी त्यांची सेवा करण्याच्या हेतूनं स्वतःचं समर्पण केलं होतं परंतु आज मात्र जनतारूपी मातेशिवाय इतर कुणीच ज्याला आपलं समर्पण करावं असा दिसत नाही.

देशासाठी बलिदान करणाऱ्या हुतात्म्यांनी आपल्या बलिदानानं देशात जागृती उत्पन्न केली. जनता जागृत झाली—अनेक घटनांचा सुंदर मेळ जमून आला आणि देश स्वतंत्र झाला. स्वतंत्र राष्ट्रांच्या पंक्तीत बसण्याचा मान आपणही मिळवला. आपल्या वाढत्या शक्तीच्या जोरावर अन्य बलशाली स्वतंत्र राष्ट्रांचा आपण विश्वास संपादन केला. त्यांची आपण मदत मिळवू शकलो. पंचवार्षिक योजना यशस्वी करण्यासाठी आपण बरंच काही केलं. भूमीची उत्पादनशक्ती वाढवून, मोठमोठे कारखाने स्थापन करून व धरणं बांधून, आपण देशाच्या समृद्धीत भर घालण्याचे प्रयत्न केले. एवढं सगळं करून देखील, एक सत्य स्वीकारावंच लागतं की आमच्या हातून जे करवून घेण्यात आलं तेवढंच आम्ही केलं—स्वेच्छेनं, योजना आखून, देशकल्याणासाठी क्वचितच आपल्यापैकी कुणी काही केलं असेल!

आपल्या स्वार्थासाठी आपण सर्व काही करतो. सर्वोच्च शिक्षण प्राप्त करून कौशल्यपूर्ण कामं आपण करतो, मेहनत-मजदूरी व व्यापारधंद्यातही कामं करतो. अधिकात अधिक पैसा मिळविण्यासाठी लांडग्या-लबाड्याही करतो. प्रत्येक जण आपला स्वार्थ साधण्यासाठी एकमेकांची पिळवणूक करण्याच्या युक्त्या शोधून काढतो. पैसा मिळवण्याच्या लालसेनं, आम्ही आपल्या मनाला अथवा बुद्धीला आवर घालत नाहीत यामुळं आम्ही आपल्या सहकाऱ्यांचा, मित्रांचा आणि देशवासियांचा विश्वास गमावून बसलो आहोत. एकमेकासंबंधी अविश्वासाचं वातावरण निर्माण झाल्यामुळे एकूण देशाचंच वातावरण बरंच कलुषित झालं आहे. एकमेकांविषयी कुठं प्रेम दिसत नाही. जिकडे तिकडे जातीयतेचा धुमाकूळ चाललेला दिसतो. घरी-दारी, गल्लीत-रस्त्यावर, धार्मिक स्थळी आणि राजकारणाच्या आखाड्यात, विधानसभा व लोकसभेपर्यंत आम्ही सर्वजण जातीयतेच्या बंधनात अडकून पडलो आहोत. रात्रंदिवस हलकट व नीच व्यवहार करण्याची, दुसऱ्याच्या पुढ्यातील ताट ओढण्याची, आम्हाला लाज वाटत नाही.

हिन्दू महासभा, कम्युनिस्ट, समाजवादी, जनसंघी, स्वतंत्रदल व अकालीदल आदि सर्वच राजकीय पक्षांची दररोज छी-थू होताना दिसते. प्रत्येक पक्ष दुसऱ्या पक्षावर टीका करतो. याच्या पाठीमागे खरोखरच काही तत्त्वं आहेत असं कुठेच दिसत नाही. भर चौकात उभे राहून आपण एकमेकावर जी चिखलफेक करतो, हे बघून कुणाही सभ्य माणसाची मान-शरमेनं खाली झुकेल.

आपल्या देशाच्या इतिहासात अशाही एक दिवस उगवला होता जेव्हा काँग्रेसच्या व्यासपीठावरून अनेक देशभक्तांनी बलिदान केलं होतं. काँग्रेसरूपी दिव्यात आपल्या जीवनानं तेल ओतलं होतं आणि पूर्ण तेजानं तळपणाऱ्या त्या दीपज्योतीवर अनेक तरुण पतंगाप्रमाणे झेपावले होते. आज मात्र काँग्रेसची ती दीपज्योती बलिदानाच्या तेलाभावी, मंद-मंद झालेली दिसते. त्यामुळं आता कुणी पतंगही तिच्याभोवती नाचत-बागडत नाहीत—त्यांना काही आकर्षण राहिलं नाही. आता त्या दिव्याभोवती फक्त माशा घोंघावताना दिसतात.

आज देशात सर्वत्र अंधार पसरलेला आहे. देशातील जनता मार्ग चुकल्यामुळे भरकटत चाललेली आहे. प्रकाशाच्या जोरावर अंधार नाहीसा करून जनतेला योग्य मार्गावर पोचवायचं असेल तर काँग्रेसच्या दिव्यात परत बलिदानाचं तेल घालून, दीपज्योत प्रज्वलित करावी लागेल. दीपज्योत तेवत राहिल्यावरच पतंग तिकडे झेप घेतील.

आज अंधारात भटकणाऱ्या लोकांनी एकमेकांची लूट, हिसका-हिसकी चालविली आहे. यामुळं एक भयंकर अवस्था निर्माण झाली आहे. या परिस्थितीवर आम्हाला नियंत्रण घालता आलं नाही—तर याचे परिणाम अतिशय घातक ठरण्याची शक्यता आहे.

परवापर्यंत आपण जेव्हा परक्या सत्तेच्या बंधनात अडकलो होतो——तेव्हा आम्हाला गुलामगिरीचं जीवनच चांगलं आहे, असं वाटत होतं. गुलामगिरी आम्हाला आवडू लागली होती. सुखोपभोगानं विलासी जीवन जगायला मिळावं यासाठी आम्ही अत्यंत नीच व त्राणेरड्या गोष्टी करायला तयार होतो. त्या सुमारास देशाला जागं करून योग्य मार्गावर आणण्यासाठी तपस्वी व्यक्तींची गरज होती——सुखोपभोगांचा व विलासी जीवनाचा त्याग करून तिकडे पाठ फिरवून, हसत हसत या तपस्वी व्यक्तींनी देशासाठी मृत्यू स्वीकारला. असे वीर पुरुष तेव्हा जन्माला आले व त्यांनी देशाला जागं केलं.

स्वातंत्र्य मिळाल्यानंतर आपणाला योग्य दिशेनं व अचूक मार्गानं वाटचाल करणं आवश्यक होतं. परंतु आपण त्या मार्गाने गेलो नाहीत. आम्ही परत भोग-विलासाचे किडे बनलो. भोग-विलासाचा किडा बनलेली व्यक्ती प्रत्येक गोष्टीवर आपला हक्क सांगते. पैशाशिवाय असा अधिकार प्राप्त होत नाही——यामुळं पैसा मिळविण्यासाठी आम्ही कोणत्याही स्तराबर जायला तयार होतो——अत्यंत नीच कृत्यं करायला मागे-पुढे पाहिनासे झालो.

आज आपणाला दीपज्योतीवर झेपावून भस्मसात होणाऱ्या पतंगांची गरज नाही आणि छातीवर गोळ्या खाणाऱ्या वीरांचीही आवश्यकता नाही. तुरुंग जीवनात खितपत राहणाऱ्या व तिथेच सडत-सडत मरण पावणाऱ्या देशभक्तांची किंवा फाशीच्या दोराबर लटकणाऱ्या हुतात्म्यांचीही आज गरज राहिलेली नाही. आज गरज अशा लोकांची आहे जे भोग-विलासाला लाथ मारू शकतील——सर्व मोहांना तुच्छ लेखतील. मोह-मायेचा संपूर्ण त्याग करून, प्राणाची बाजी हसत हसत लावणाऱ्या नर-वीरांची कालपर्यंत गरज होती. परंतु आज अतिशय साधेपणानं राहून, संयमी बनून, समाजोपयोगी कार्य करणाऱ्या लोकांची देशाला गरज आहे.

१९०७ पासून ते आजतागायत मी वेळोवेळी निरनिराळ्या भूमिका सादर करत आलो आहे. कोणतीही भूमिका करतेवेळी मी नेहमीच माझ्या सहकाऱ्यांच्या आदराला व प्रेमाला पात्र ठरलो आहे. गेल्या सात वर्षांपासून देशातील तरुणांच्या सेवेचं कार्य मी स्वीकारलं आहे व हे कार्य करताना मला त्या तरुणांच्याकडून आदर व प्रेम मिळालेलं आहे.

प्रत्येक माणसासमोर तारुण्याच्या काळात काही सोनेरी स्वप्नं असतात. जीवनातले अनेक विलास भोगण्याची त्याची इच्छा असते. मी भर तारुण्यात मृत्यूशी कसं खेळावं याचं प्रात्यक्षिक तरुणांना करून दाखवलं. वार्धक्यात प्रत्येक माणूस शारीरिक आणि मानसिक व्याधींपासून दूर पळण्याचा प्रयत्न करतो——आपलं जीवन शांतपणानं व सुखा-समाधानात जावं असं त्याला वाटतं. मी समाजासाठी काही उपयुक्त कार्य करत राहावं व फारसा त्रासही होऊ नये, यासाठी भारत सरकारनं एक चांगली व्यवस्था करून ठेवली आहे. मला त्यात कसलीच उणीव दिसत नाही. मला मागणी करावी लागावी, अशी कुठलीच गोष्ट नाही.

मी देशाची सेवा न केल्यामुळेच आपल्याला हे सारे मिळालं आहे---असंच मला वाटतं. परंतु हे सर्व सुख मला एखाद्या काट्याप्रमाणं बोचत राहतं. मोबदला मिळावा यासाठी मी कुठलंच कार्य केलेलं नव्हतं. देशप्रेमाच्या नशेत धुंद बनून देशहिताचं जे काम मनात आलं तेच मी केलं होतं. यामुळे आजची घोर निराशाजनक स्थिती बघून, जीवनाची संध्याकाळ झाली असताना, ७८ वर्षांचं वय होऊनही---अतिशय गंभीरपणानं, मी हे अनुभवतो आहे की देशवासियांना तपस्वी बनून समाजाची सेवा कशी करावी, हे त्यांच्या निदर्शनाला आणण्याची आवश्यकता आहे.

जवाहरलाल यांच्या निधनानंतर मी विचार करत होतो की आपण आता मोह-मायेचे पाश तोडून आपली सर्व शक्ती समाजाच्या सेवेसाठी खर्च केली पाहिजे. मी एक क्रांतिकारक आहे व त्यामुळे मी क्रांतिकारकासारखाच सर्व गोष्टींचा विचार करतो. देशात जी परिस्थिती निर्माण झाली आहे, तिचा माझ्यावर सखोल परिणाम झालेला आहे. तपस्वी बनून मला माझी सर्व शक्ती समाज-सेवेसाठी लावली पाहिजे. याखेरीज माझ्या मनात दुसरा कोणताच विचार येत नाही. माझ्या मनात परत एक वादळ निर्माण होत आहे---मी आणखी काही तरी नवं करून दाखवावं यासाठी ते मला प्रवृत्त करत आहे.



[महात्मा गांधींची पत्रं]

सेवाग्राम
२१-५-१९४०

भाई पृथ्वीसिंह,

तुमचीं तिन्ही पत्रं पोंचलीं. प्रभाकुमारी संबंधी तुम्हीं कडक धोरण अवलंबिण्याचं कारण नाहीं. तुम्हीं केवळ सावध व दक्ष राहण्याची गरज आहे. बौद्धीक आणि व्यावहारीक ज्ञान दोहोंवर अहिंसेचं पूर्ण नियंत्रण असायला हवं. हिंसक आणि अहिंसक युद्धाच्या अत्यंत महत्त्वाच्या विनसातून सत्य आणि शांती पूर्णतः सुस्पष्ट होत जाते. 'धोका' येथे आपल्या ज्या तुम्हीं जो उल्लेख केला आहे त्यात मला विशेष अर्थ दिसत नाहीं. कुठल्याही कार्यक्षेत्रात काम करणाऱ्या लोकांना अनेक अडचणींना तोंड द्याव लागतं. तुम्ही जे निवेदन पाठवलं आहे, त्यानं तुमच्यावर काही विशेष जबाबदारी पडली आहे, असं मला वाटत नाहीं. शेवटी तुमचं सर्व काही ठीकच होईल. लोकांना काय लाभ झाला, हे आम्हाला समजून येईल. मी अहिंसेचा विचार समजावण्यासाठी काहीही हातचं राखून ठेवलं नाहीं. असं असलं तरीही हा विचार पूर्णपणे एखाद्याला समजावण्यात मी अयाग पावेलो तरी यशस्वी झालो नाहीं. माझ्या तुमच्याकडून खूप अपेक्षा आहेत.

बापूचे आशीर्वाद

(अनुवादित)

---

सेवाग्राम
वर्धा (सी.पी.)

C. W. 2959
5648
२३-५-४१

भाई पृथ्वीसिंह,

तुमचं पत्र पोंचलं. आपली शिकवण ही केवळ अहिंसक दृष्टीनंच असायला हवी. यामुळंच आपण तलवारी वगैरे सारख्या हिंसक हत्यारांचा उपयोग शिकवू शकत नाहींत. मात्र त्यांच्या विरोधी अहिंसक प्रतिकार कसा करायचा हे अवश्य शिकवावं. तलवारीचं उत्तर तलवारीनं देणं हा हिंसक प्रतिकार आहे. खुनी माणसाच्या हातून तलवार हिसकावून घेणं, हा अहिंसक प्रतिकार होईल. खुनी माणसासमोर मुंडी खाली करून उभं राहणं आणि

मृत्यू स्वीकारणं, हाच उत्तम प्रतिकार होईल. अशा प्रकारच्या प्रतिकारासाठी आपल्या ठिकाणी फार मोठी क्षमाशीलता असायला हवी. अशा लोकांना व्यायामाची किंवा अन्य प्रकारच्या शिक्षणाची गरज राहणार नाही. ज्या लोकांच्या मनातून भीतीची भावना जात नाही अशांना पद्धतशीर व्यायाम शिक्षणाची गरज आहे; ज्यांना हिंसा-अहिंसा यातील भेद पूर्णपणे समजला नाही—अशांना हे शिक्षण द्यावं—अशा लोकांना अहिंसक व्यायामाचं शिक्षण देण्याची आमची इच्छा आहे. माझी ही कल्पना मी तुमच्याकडे लेखी स्वरूपात पाठवीत आहे. या संक्षिप्त लेखनातून मी सर्व काही मांडलेलं आहे, असं मला वाटतं

नाथजी आणि कि. भाई यांनीही हे पाहावं आणि त्यांचे काही प्रश्न असतील तर ते विचारावेत.

बापूंचे आशीर्वाद

---

C.W. 2963
5652

२-१०-४१

भाई पृथ्वीसिंह,

पत्र पोचलं. अहिंसा ही तर मानव जातीबरोबरच जन्माला आली. हिटलर देखील खुद्द स्वतःला तर मारत नाही. फार थोडांशाच का होईना, परंतु ही देखील अहिंसाच आहे—कारण की अहिंसा हा आत्म्याचा स्वभाव आहे. म्हणूनच एकतर आपण या बरून जाऊन तिचं पालन करू किंवा आपण प्रयत्नपूर्वक व स्वेच्छेनं तिचं पालन करू. जे साध्य करायचं आहे त्याच्यापुढं आपला प्रयत्न म्हणजे समुद्राच्या बिंदूप्रमाणं आहे, हे नीट समजून घ्या परंतु बिंदूमध्ये देखील समुद्राचा गुण असतो-म्हणून ही काही क्षुल्लक बाब नव्हे. बाकीच्या गोष्टी तुम्ही इथं याल तेव्हा.

बापूंचे आशीर्वाद

नवी दिल्ली

क्र. ६८०, पीएमएच-५८ मार्च २४, १९५८

प्रिय पृथ्वीसिंहजी,

आपली दोन-तीन पत्रं माझ्याकडे आली असून ती मी वाचली आहेत. मी कामामध्ये एवढा व्यग्र होतो की त्यांची उत्तरं पाठवू शकलो नाही.

आपण लिहिलं आहे की आपल्या आणि श्री. गोसले यांच्या कामात केव्हा केव्हा फरक पडतो. एकमेकांशी विचार-विनिमय करूनच ही गोष्ट निकालात काढता येईल. या संदर्भात आपण सरदार प्रतापसिंह कैरों यांच्याशीही सल्लामसलत करू शकता. त्यांची भेट होणं मात्र कठीण आहे. त्यांच्याशी मीही यासंबंधी बोलेन.

आपण आन्दोलनासंबंधी जे लिहिलं आहे, तेही मी वाचलं. आपण ज्या गोष्टींचा निर्देश केला आहे--त्या गोष्टी आमच्याही ध्यानात आहेत व त्याबाबत प्रयत्नही केले जातात आपलं टिपण मी अन्न मंत्रालयाकडे पाठवलं आहे.

१४ एप्रिलला मी चंडीगडला जाणार आहे. कदाचित आपणाला तिथं भेटण्याचा योग येईल.

आपला,

**जवाहरलाल नेहरू**

---

श्री. पृथ्वीसिंह,
एम. एल. ए. फ्लॅट-२६,
सेक्टर ३, चंडिगड.

क्र. २१५३-पीएमएच-५८ ऑगस्ट ३१, १९५८

आपलं दीर्घ पत्र पोचलं. मी ते वाचलं. आपणाला वाटणारी काळजी, मला समजू शकते. आजकाल मनाला बावरून टाकणाऱ्या अनेक गोष्टी घडत आहेत. हा काही आपल्याच एका देशाला जडलेला आजार नाही--बाकीच्या देशांची देखील अशीच अवस्था आहे.

आपण काहीतरी बाहेरच्या क्षेत्रात काम करू इच्छिता, असं लिहिलं आहे. आपण नेमकं काय करू इच्छिता, हे माझ्या नीट लक्षात आलं नाही. आपण मला भेटू इच्छित असाल तर इथं येऊन अवश्य भेटू शकता.

नवी दिल्ली
२-२-५९

प्रिय पृथ्वीसिंहजी,

आपलं ३१जानेवारीचं पत्र पोचलं. त्या अगोदर पाठवलेलं पत्रही पोचलं होतं. मी लगेचच डॉ. श्रीमाळी यांचं लक्ष याकडे वेधलं होतं. मी त्यांना सूचना करू शकत नाही फक्त विचार म्हणून त्यांच्यापुढे काही गोष्टी मांडू शकतो. मी त्यांना परत एकदा याची आठवण करून देईन.

आपला,
जवाहरलाल नेहरू

---

क्र. ७७४-पी एम एच-५९. मार्च २९, १९५९

आपलं २७ तारखेचं पत्र पोचलं तसंच त्यासोबत पाठवलेला मजकूरही बघितला. तुमची योजना चांगली आहे असंच माझं मत बनलं. या योजनेमुळं चांगला फायदा होऊ शकतो. सरदार प्रतापसिंग कैरों यांनी ती स्वीकारलेली असल्यामुळं ती सुरु करण्यासाठी काही अडचणी येऊ नयेत आणि लवकरात लवकर हे काम उभं करणं शक्यतेतलं व्हावं.

खरं म्हणजे अशा योजनांचं केवळ कागदावरील आराखड्यानं मूल्यमापन होऊ शकत नाही जे लोक प्रत्यक्ष योजना अंमलात आणतील तेच ती चांगली का वाईट हे ठरवू शकतील. आपल्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. म्हणूनच ही योजना चांगल्या तऱ्हेने राबवली जाईल, ह्याची मला खात्री आहे.

आपण लिहिलं आहे की देशातील अन्य भागातील लोकही या योजनेत सामील झाले पाहिजेत. हे जर होऊ शकलं, तर फारच उत्तम होईल. योजनेची कागदपत्रं मी डॉ. श्रीमाळी यांच्याकडे पाठवत आहे. कुठल्याही परिस्थितीत या कामाचा शुभारंभ तुम्ही पंजाबपासूनच केला पाहिजे. हेच एक मोठं काम होईल. नंतर इतर लोकही या कामात सहभागी होतील.

---

प्रधान मंत्र्यांचा निवास
नवी दिल्ली
२५-११-५९

प्रिय पृथ्वीसिंहजी,

आपलं २४ तारखेचं पत्र पोचलं. मी भावनगरच्या महाराजांना भेटेन व काही दिवसांनंतर त्यांना इथं बोलावून घेईन. सध्या मात्र मी अनेक कामांत गढून गेलो आहे.

आपला,
जवाहरलाल नेहरू

---

प्रधान मंत्र्यांचा निवास
क्रमांक १९४१-पी एमएच-६०. नवी दिल्ली
६ सप्टेंबर, १९६०.

पृप्रिय थ्वीसिंहजी,

आपलं पत्र मला मिळालं. मी ते मोठ्या बारकाईनं वाचलं. शाळांतून आपलं काम चालू आहे, हे वाचून आनंद झाला. तिथल्या शिक्षकांनाही यापासून फारच मोठा फायदा होत आहे.

आपला,
जवाहरलाल नेहरू

---

क्रमांक २३७०-पी एमएच-६२. २८ डिसेंबर १९६२

आपलं २५ तारखेचं पत्र पोचलं. मी डॉ. श्रीमाळी व सरदार प्रतापसिंग कैरों यांच्याशी तुमच्या संबंधी बोललो होतो आणि त्यांनी तुम्ही अन्य भागांत जावं, या गोष्टीस मान्यताही दिली. तुम्ही प्रथम उत्तर प्रदेशात व बिहारमध्ये जावं, असं मला वाटतं. नंतर अन्य भागांत जावं. मी आपलं पत्र डॉ. श्रीमाळी यांच्याकडे पाठवतो म्हणजे त्यांना उचित कार्यवाही करता येईल.

तुमचे चिरंजीव अजितसिंग यांना एमरजन्सी कमिशन मिळेल, अशी अपेक्षा मी करतो ते एक चांगले युवक आहेत. जे काम त्यांना सोपवण्यात येईल, ते काम ते उत्तम तऱ्हेनं करतील.

---

क्रमांक ८३९-पी एमएच-६३.　　　　२ एप्रिल १९६३

आपलं पत्र व त्याच बरोबर ढेबरभाईचं पत्र दोन्ही पोंचली. आपण आपल्या सीमा भागात जावं व तिथं दौरा काढावा, हेच योग्य होईल असं मी समजतो. ढेबरभाई लिहि-तात की दोन वर्षासाठी आपण तिकडे जावं. ही फार लांबची गोष्ट आहे. आताच त्याबाबत निर्णय करण्याची आवश्यकता नाही.

मला असं वाटतं की आपण हिमाचल व पंजाब प्रांतांत जावं. जम्मू व काश्मिर सूतं बाजूस ठेवा. योग्य वेळी मी हिमाचल प्रदेशाच्या लेफ्टनंट गव्हर्नरांना पत्र पाठवीन.

---

क्रमांक ९७४-पी एमएच-६३.　　　　१३ एप्रिल १९६३

आपलं ८ तारखेचं पत्र पोंचलं. हिमाचल प्रदेशाच्या लेफ्टनंट गव्हर्नरांना मी तुमच्या-संबंधी पत्र पाठवत आहे.

आपल्या दौऱ्याच्या संदर्भात आपण जे लिहिलं आहे ते मला ठीक वाटतं. आपण हिमाचल प्रदेश व पंजाबच्या सीमा भागांचा दौरा करावा.

सरदार प्रतापसिंग यांनी सुचवल्याप्रमाणं आपण पंधरा दिवस पंजाबात व १५ दिवस अन्य भागांना दौरा करावा हेच मलाही चांगलं वाटतं. ह्यामुळं आपण सर्वत्र जाऊ शकाल आणि मधून मधून पंजाबात देखील राहू शकाल. या भागात दौरा करणं फारच आवश्यक आहे. पंजाबशीही संपर्क ठेवता येईल.

आपण केंद्र सरकारात सामील होऊन काम करण्याची जी इच्छा प्रगट केली आहे हे होऊ शकेल परंतु यात पुष्कळ अडचणी उभ्या राहतील. एक नवाच पायंडा इथं सुरू होईल आणि अशा गोष्टीत अनेक अडचणी उभ्या राहतात.

आपण मला इंग्रजीमधून जे सविस्तर टिपण पाठवलं आहे ते मी वाचलं आणि डॉ. श्रीमाळी यांच्याकडे ते पाठवलं आहे.

---

पत्र सं. २/१०३/५६-६३-पी. एम.　　　　६ जून १९६३

७ जून रोजी सकाळी आसामला जाण्यापूर्वी प्रधानमंत्रीजी थोड्यावेळासाठी इथं थांबले होते तेव्हा त्यांना आपलं २४ मे चं पत्र पोंचलं. आपण एन. डी. एस. मध्ये उत्तम प्रकारे काम करू शकाल, असं प्रधानमंत्र्यांना वाटतं. आपलं पत्र त्यांनी डॉ. श्रीमाळी यांच्याकडे पाठवलं आहे.

आपला,

प्राणनाथ साही

(प्रधानमंत्र्यांचे खाजगी सचिव

## [ राजर्षी पुरुषोत्तमदास टंडन यांचा संदेश ]

१७ जानेवारी १९४१

शारीरिक शिक्षणाच्या संदर्भात सरदार पृथ्वीसिंहजी यांनी एक योजना तयार केली आहे. शाळा-कॉलेजांतील युवक-युवतींनी ही योजना अंमलात आणावी, यासाठी मुंबई सरकारच्या विचाराधीन ती बनवण्यात आली आहे, असं समजतं. मला ही योजना चांगली वाटते.

सरदार पृथ्वीसिंहांचं असं मत आहे की विशिष्ट अवस्थेनंतर शारीरिक शिक्षण सव विद्यार्थ्यांना दिलं जावं. त्यांच्या या विचाराशी मी पूर्णपणे सहमत आहे. त्यांची ही योजना अंमलात आणण्यासाठी अधिक विलंब करण्याची जरूर नाही. या योजनेची अंमल-बजावणी झाली तर देशातील युवक-युवतींचं स्वास्थ्य सुधारेल व त्याबरोबरच मानसिक लाभही त्यांच्या पदरात पडेल, अशी माझी धारणा आहे. सरदार पृथ्वीसिंहजी आपल्या कार्यात यशस्वी होवोत-अशी सदिच्छा मी व्यक्त करतो.

पुरुषोत्तमदास टंडन

---

## [ मीरा भगिनी यांना लिहिलेलं पत्र ]

१६-३-१९४२.

प्रिय भगिनी मीरा,

तुझं पत्र पोचलं. ते वाचून मी गुश्च झालो. स्वातंत्र्य चळवळीच्या या वादळी काळात प्रत्येक देशप्रेमी माणसाचं देश स्वतंत्र व्हावा म्हणून त्यानं एकाग्रचित्तानं परिश्रम करणं, हे आद्य कर्तव्यच असलं पाहिजे. काही स्वप्नं बघता बघता; जे कष्टप्रद जीवन मी जगलो, ती स्वप्नं साकार करण्याखेरीज अन्य कुठल्याही विचाराला माझ्या मनात थारा मिळू नये, हीच माझी इच्छा आहे. देशाच्या या नाजुक स्थितीची तुला काहीच कल्पना नाही का? तू भारतवासीयांच्या सेवेखेरीज दुसऱ्या एखाद्या विचारानं तू अगदी वेडं बनाव? खरं म्हणजे तू आपली संपूर्ण ताकद स्वातंत्र्यप्राप्तीवर केंद्रित करून भारतीय भगिनींच्यासाठी आदर्श बनलं पाहिजे. आपल्या तब्येतीची हेळसांड करून तू स्वतःला भारतभूमीवर भार कशासाठी बनवत आहेस? भारताच्या गुलामगिरीच्या श्रृंखला तोडून टाकण्यासाठी तुमच्यासारख्या वीर महिलांची मदत हवी आहे–तुमच्या साहाय्याची आवश्यकता आहे. मीरा, परमेश्वरानं तुला अनेक गुण बहाल केले आहेत.

तू स्वार्थी बनू नकोस. कृपा करून मला मदत कर आणि स्वातंत्र्यासाठी लढा देणाऱ्यांसाठी तू प्रेरणा-स्रोत हो–त्यांची मार्गदर्शक हो. इतिहास हा तुझ्या या सेवेचा साक्षी असेल. वेळ कोणती आहे, हे समजून घे ! जे ध्येय मला प्राणाहूनही प्रिय आहे–त्या ध्येयासाठी तू आपलं

संपूर्ण शारीरिक आणि मानसिक सामर्थ्य समर्पण कर. अशा या काळी, सर्वसामान्य नागरिकालाही अधिकातअधिक त्याग करण्यासंबंधी सांगितलं जात आहे. या सर्वसामान्य नागरिकांच्यापेक्षा उच्च पातळीवर येऊन प्रेमत्यागाचं महान बलिदान करणं तुला शक्य होणार नाही का?

तुझ्या अशा प्रकारच्या त्यागानं मी खरोखरच धन्य होईन व विधात्यानं ज्या कार्यासाठी मला जन्माला घातलं आहे, त्या कार्यासाठीही प्रेरणा मिळेल. तू जिथं कुठं असशील तिथं दृढ मनानं राहा. आपल्या राष्ट्रीय कर्तव्यापासून अजिबात हटू नकोस. मृदुलाला अडचणीत टाकू नकोस. दृढनिश्चय अंगी बाणवून मला मानसिक शांती दे म्हणजे वेळ प्रसंगी मला या कार्यासाठी मृत्यूही स्वीकारावा लागला तर मला शांतपणे मरणं शक्य होईल.

बंधूवत स्नेहांकित,

(अनुवादित)

पृथ्वीसिंह

------

Segaon Wardha

24. 8. 38

My dear Prithvisingh,

I write to you in English so that you may get this earlier. I had your letters. I am glad you are having good treatment and that you have mental peace. I know that non-violence in thought is the most difficult of attainment. And yet without the co-operation of thought non-violence in word and action does not become an all pervading irresistable force that it undoubtedly. Such non-violence comes only through God's grace. And that grace descends only on those who make a ceaseless effort must greater surely than what we make to attain material ends.

I am persuing my work. Much depends on the external atmosphere.

You will continue to write regularly to me.

A letter is being sent to your people. I have already told you they met me and I was pleased they came.

Pyarelal is suffering from Typhoid. But he is on the mend.

Yours sincerely,

M. K. Gandhi

Utmanzari
5. 10. 38.

Dear Prithvisingh,

I am on the train taking me to the Frontier Province. I am likely to be there for a month. During that time I must try to send one of my party to meet you. I would like you therefore to keep the nearest visiting day free of other visitors. You will let me know at Peshawar the day on which the visit may take place.

I am not worrying about changing your class from A to B. I am therefore glad that you are not worrying yourself. I must get hold of the new type of wool-spinning Charkha.

Mahadev having become ill has stayed away in Delhi. Pyarelal is with me and is well.

Bapu

(M. K. Gandhi)

Segaon.
21. 12. 38.

My dear Prithvisingh,

I have your two letters. I have been too busy to write to you earlier but Pyarelal has been attending to every one of your requirements. The wool is being taken up and I shall have it woven and of course make use of it myself, unless I make better use of it by using it for exhibition purposes. I have not decided.

Though I do not want to publish your letter, as the authorities may not like its publication whilst you are still a prisoner, I am going to make judicious use of it amongst those who are still unconvinced of the matchless superiority of non-violence over violence. So far as your own case is concerned you may depend upon my doing every thing in my power. You need not do any thing there till I advise you otherwise.

I have a very fine portrait of you taken by Kanu which Pyarelal is sending to your brother, but he will be writing independently to you.

Mahadev is quite well now though I do not want him to return to his regular work.

Yours,

Bapu

(M. K. Gandhi)

Rajkot.

21.5.39.

My dear Prithvisingh,

I was delighted to receive your letter. I did receive the previous letter, and I have been in correspondence with Shantilal about your book. There is a hitch about the book being released for publication. I think there is no hurry about it.

I see that you have finished one year, and I am glad that you have gained considerable inward experience. You must have seen from my recent writings, how much value I attach to spinning as an aid to the growth of the spirit of non-violence, that is to say when spinning is done as a symbol of non-violence. Mechanically considered too, a person who spins for hours together, takes delight in it, will not be easily reffled. He is able to meditate all the while he is spinning, provided his wheel is in perfect order when the music of the wheel is an aid to contemplation. And he is no spinner who has no control over his wheel. I do wish that your second year is commenced with a resolution to achieve perfection in spinning as an aid to the development of non-violence. Your experience and experiment will help me considerably as I believe you to be accurate in reading your own heart. Not many are able to do so. Men are more self-deceived than deceiving. I am glad you like my first statement on Rajkot. Now you have before you the second. It was a difficult statement, but now the whole burden is off my shoulders.

Mahadev is now completely restored, and is with me. Jamnadas is at Bombay.

Yours,

Bapu

(M. K. Gandhi)

14. 6. 39.

Dear Prithvisingh,

Your letter of 27th May is very good. It shows that you have no difficulty in understanding the working of Ahinsa. There are many who swear by Ahinsa have not understood my step.

I have not given up the attempt to secure possession of your book.

Attempts continue to be made about the release of the political prisoners. There are difficulties in the way. But for those who only know the non-violent way success is contained in the effort itself. And prisoners who believe in non-violence regard prison life or the outside with indifference. They serve whether in prison or outside.

I hope to go to the Frontier Province early July when both Mahadev and Pyarelal will be with me. One of them will surely see you.

Love.

Segaon Wardha. Bapu

14. 6. 39. (M. K. Gandhi)

( Original in Gujrati )

21. 5. 40.

Bhai Prithvisingh,

Your three letters received. You need not take any stern attitude towards Prabha Kumari. You are to remain conscious and alert. Non-violent approach demands full control on intellectual and practical understanding. Truth and silence stand fully revealed in matters of great importance of violent and non-violent deeds. The case you have made out for going to Ghoga is not so weighty. Men of deeds in the field of action are to face so many hardships. From the description you have given I do not think that there is so much pressure upon you. In the end you will come out all right. We shall know how much people have gained. I have taxed myself to the hardest in imparting training in the understanding of non-violence. I have not succeeded in making any one to realise it.

I am looking towards you.

Sevagram. Bapu Ka Ashirwad

21. 5. 40.

